# श्रीरामकृष्ण-चरित्र

(द्वितीय भाग)

लेखक — कै. न. रा. परांजपे



श्रीरामकृष्ण आश्रम,
नागपूर, मध्यप्रदेश.

१९४९

# श्रीरामकृष्ण-चरित्र

( द्वितीय भाग )

लेखक—कै. न. रा. परांजपे

( द्वितीय आवृत्ति )



श्रीरामकृष्ण आश्रम,
नागपूर, मध्यप्रदेश

जानेवारी १९५० ]

# अनुक्रमणिका

# श्रीरामकृष्ण-चरित्र



## १. श्रीरामकृष्णांची वेदांतसाधना

( १८६५–६६ )

" त्थागटाने वेदाताचा उपदेश दिला–तीन दिवसात समाधि ! माधवी लतेखाली ती माझी समाधि अवस्था पाहून तो हतबुद्ध होऊन म्हणाला–' आ रे ! ए क्या है रे ? ' मग तो मला जायला परवानगी मागूं लागला ते ऐकून मला भावावस्था प्राप्त झाली व त्या अवस्थेत मी म्हणालो–" वेदाताचा बोध झाल्याशिवाय तुला येथून जाता येत नाही ! " तेव्हापासून रात्र-दिवस मी त्याच्या जवळ असे––एकसारख्या वेदाताच्या गोष्टी ! ब्राह्मणी म्हणाली–' बाबा ! वेदात ऐकू नको–भक्तीची हानि होईल ' "

" ज्या अवस्थेला पोहोचले असता, साधारण साधक पुन्हा तेथून परत फिरू शकत नाहीत, एकवीस दिवसातच त्याचे शरीर पिकलेल्या पानाप्रमाणे गळून पडते, त्या अवस्थेत आईच्या कृपेने पुरे सहा महिने होतो ! "

––श्रीरामकृष्ण

मधुरभावसाधनेमध्ये सिद्ध होऊन श्रीरामकृष्णानी आता भावसाधनाची चरम भूमि गाठली होती म्हणून आता यापुढील त्याच्या अपूर्व साधनांची हकीकत लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी, या कालीं त्याची मानसिक अवस्था कशी होती, हें एकवार पाहिले असता ठीक होईल

कोणत्याहि प्रकारची भावसाधना करू लागण्यापूर्वी साधकाला संसारातील रूपरसादि सर्व भोग्य विषयाचे विचार बाजूला ठेवावे लागतात. महान् भगवद्भक्त तुलसीदासजीनी—

जहॉ राम तहॅ काम नहि, जहॉ काम नहि राम ।
तुलसी कबहू होत नहि, रवि रजनी इक ठाम ॥

असें जे म्हटलें आहे, ते सर्वथैव खरें आहे श्रीरामकृष्णाचे अलौकिक जीवन, हे या सिद्धाताचें एक उत्तम उदाहरण आहे कामकाचनत्यागरूप बळकट पायावर त्यांनी आपल्या भावसाधनाची इमारत उभारली, आणि हा पाया कधीहि ढिला होऊ दिला नाही, म्हणूनच त्यानी ज्या ज्या साधना करण्यास सुरुवात केली, त्या त्या साधनामध्ये अत्यंत अल्प काळामध्ये ते सिद्ध होत गेले म्हणून यावेळीं त्याचें मन कामकाचनाच्या प्रलोभनाच्या सीमेपलीकडेच निरंतर राहात असे, हें सागावयास नको

विषयवासनाचा सर्वस्वी त्याग करून, नऊ वर्षांपेक्षाहि जास्त काळ त्यानी, केवळ ईश्वरलाभाच्या प्रयत्नात निमग्न राहण्यांत घालविल्यामुळे, त्याच्या मनाची यावेळीं अशी स्थिति झाली होती की, ईश्वरावांचून इतर कोणत्याहि विषयाचें स्मरण-मनन करणें त्याना विषासारखें होऊन गेलें होतें ! कायावाचामनेंकरून ईश्वरालाच सारात्सार परात्पर वस्तु असे सर्वतोभावें ते समजूं लागल्यामुळे, इहपरलोकातील इतर कोणत्याहि वस्तूच्या प्राप्तीविषयी त्याचें मन सर्वथैव उदासीन झालें होते

सासारिक सर्व विषय आणि स्वत च्या सुखदु खादि सर्व गोष्टी विसरून, मनात घेतलेल्या एखाद्या विषयाच्या चिंतनात एकाग्र होण्याचा त्याना इतका अभ्यास झाला होता की, क्षणार्धांत इतर सर्व विषयापासून मन परावृत्त करून, वाटेल त्या विशिष्ट विषयात वाटेल तेव्हा ते त्याना एकाग्र करता येई दिवसामागून दिवस, महिन्यामागून महिने अथवा वर्षा-मागून वर्षे जरी निघून गेली, तरी त्याच्या त्या विषयाच्या चितनात तिळमात्र खळ पडत नसे आणि ईश्वरावाचून म्हणजे जगात काही इतर प्राप्तव्य वस्तु आहे अथवा असणे शक्य आहे, ही कल्पना सुद्धा त्याच्या मनात क्षणमात्रहि उदय पावत नसे !

आणि जगत्कारण ईश्वरावर "गतिर्भर्ता प्रभु साक्षी, निवास शरणं सुहृत्" अशा प्रकारचा दृढ विश्वास, निर्भर आणि प्रेम, याची तर श्रीराम-कृष्णाच्या ठिकाणीं पराकाष्ठा होऊन गेली होती, एवढेच नव्हे तर या गुणाच्या साहाय्याने, त्यानी ईश्वराशीं अत्यत प्रेमाचा, जिव्हाळ्याचा सबंध जुळवून ठेवला होता, एवढेच नव्हे तर, बालकाचा ज्याप्रमाणे आपल्या मातेवर विश्वास असतो, तिजवर त्याचे जसे प्रेम असते आणि तिच्या कृपाछत्राखाली, ते जसे पूर्ण बेफिकीर असते, तशी स्थिति साधकाच्या मनाची झाल्यास, त्याला ईश्वर आपल्याजवळ असल्याचा सदैव अनुभव येतो, त्याच्याशी तो बोलू शकतो, ईश्व-राचें बोलणें त्याला ऐकूं येतें आणि त्याच्या कृपाछत्राखाली तो पूर्णपणे निर्भय होऊन जगांत नि शंक रीतीने व्यवहार करतो या गोष्टीची अनेकदा प्रत्यंतरें मिळाल्याकारणाने, सर्व लहान मोठया गोष्टींत श्री जगदंबेचा आदेश घेऊन त्याप्रमाणे निर्भय आणि नि शंक रीतीने वागण्याचा त्याना आता पूर्णपणे सराव झाला होता.

कदाचित् कुणाला अशी शंका येईल की, जगत्कारणाचा याप्रमाणे माता म्हणून लाभ करून घेऊनहि श्रीरामकृष्ण आणखी साधना कशाला करावयाला लागले ? साधना वगैरे ज्यासाठी करावयाच्या ते ध्येय प्राप्त झाल्यावर मग

आगखी साधना कशाला ? या विषयाचा ऊहापोह मागे एकवार होऊन गेला आहे, तरी यासबंधाने एकदोन गोष्टी येथे सागावयाच्या आहेत श्रीरामकृष्णाच्या चरणकमली बसून त्याच्या साधनेतिहासमधुचे पान करीत असता आमच्याहि मनात एक दिवस ही शका आली व त्याप्रमाणे आम्ही श्रीरामकृष्णाना प्रश्नहि केला त्यानी यावर उत्तर दिले, “ हें पाहा, जो समुद्रकिनाऱ्यावर सर्वदा वास करतो, त्याच्या मनात कधी कधी असें येते की, ‘ या रत्नाकर समुद्रामध्ये काय काय रत्ने आहेत ती पाहू, ’ त्याप्रमाणे जगन्मातेचा लाभ होऊन आणि तिच्याच जवळ सदा राहूनहि, त्यावेळी माझ्या मनात येई की, अनंतभावमयी अनंतरूपिणी अशा मातेला निरनिराळ्या भावात आणि निरनिराळ्या रूपात पाहावे म्हणून ज्या वेळी ज्या भावाने तिला पाहण्याची इच्छा होई, त्या वेळी त्या भावाने दर्शन देण्याकरिता मी तिच्याजवळ अत्यत व्याकुळ अंत करणाने धरणें धरून बसे आणि माझी कृपामयी आईहि तिच्या त्या भावाच्या दर्शनासाठी ज्या ज्या गोष्टीची आवश्यकता असे, त्या त्या गोष्टीची स्वत सर्व प्रकाराने सोय करून देऊन माझ्याकडून आपली सेवा यथासाग करून घेत असे आणि त्या त्या भावाचे मला दर्शन देत असे ! या रीतीने भिन्न भिन्न मताच्या साधना, तिने माझ्याकडून करवून घेतल्या ”

सर्व भावामध्ये श्रेष्ठ जो मधुरभाव त्याची चरम सीमा गाठल्यानंतर श्रीरामकृष्णाच्या मनात सर्व भावातीत अशा वेदातोक्त अद्वैत भावाची साधना करण्याची उत्कट इच्छा उत्पन्न झाली मधुरभावसाधनेनंतर अद्वैत भावसाधनाच करण्याची श्रीरामकृष्णाना का इच्छा झाली असावी, याचा विचार करता यातहि काही हेतु दिसून येतो भावराज्य आणि भावातीत राज्य याच्यामध्ये परस्पर कार्यकारणसबध असलेला नेहमी दिसून येतो कारण, भावातीत अद्वैत राज्यातील भूमानद हाच मर्यादित होऊन, भावराज्यातील दर्शनस्पर्शनादि सभोगजन्य आनदरूपाने प्रकाशित झालेला असतो म्हणून, मधुरभावाची पराकाष्ठा मिळवून, भावराज्याची चरम सीमा गाठल्यावर, भावातीत अद्वैत

भूमीवाचून, त्याचे मन दुसऱ्या कोठे वेधावें ? अद्वैत भावसाधनेची हकीगत सागण्यापूर्वी याच सुमारास घडून आलेल्या एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करून, मग आपल्या मुख्य विषयाकडे वळू

श्रीरामकृष्णाच्या वडील भावाच्या ( रामकुमाराच्या ) मृत्यूनंतर, त्याची मातोश्री, आपल्या राहिलेल्या दोघा मुलाकडे राहून, आपल्या आयुष्याचे दिवस कसेबसे कठू लागली परतु आपल्या अत्यत प्रिय कनिष्ठ पुत्राला वेड लागले असे जेव्हा तिने लोकाच्या तोडून ऐकले, तेव्हा मात्र तिच्या शोकाला पारावारच उरला नाही तिने मुलाला घरी आणविले, त्याच्या औषधपाण्याची व्यवस्था केली, कदाचित देवाचा कोप असेल असे वाटून काही शाति, अनुष्ठाने केली आणि पुढे मुलाची प्रकृति जेव्हा बरीच ताळ्यावर आली असे तिला वाटले, तेव्हा कुठे तिच्या जिवात जीव आला. आशा मोठी बलवान आहे, म्हातारीने लगेच, मुलाच्या कल्याणाच्या आशेने त्याचे लग्न करून दिले, परतु गावाहून परत दक्षिणेश्वरी आपल्या कामावर रूजू झाल्याबरोबर, गदाधराची पुन्हा पहिल्यासारखीच अवस्था झाल्याचे ऐकून मात्र तिचा धीर सुटला मुकुदपूरच्या जागृत महादेवाने ' गदाधराला दिव्योन्माद झाला आहे ' असा जरी कौल दिला तरी, तिचे मन ससारात लागेना. पुढे लवकरच, आपल्या आयुष्याचे राहिलेले दिवस आपल्या मुलाजवळ घालवावे असा विचार करून ती दक्षिणेश्वरीच येऊन राहिली ( १८६४ ) मथुरबाबूनी तिची राहाण्याची सर्व व्यवस्था नौबतखान्यात करून देऊन, तिच्या तैनातीला एक बाई ठेवली श्रीरामकृष्ण स्वत रोज सकाळ सध्याकाळ तेथे जाऊन काही वेळ तिची सेवा-शुश्रुषा करीत मथुरबाबूंनी अन्नमेरुव्रताचे अनुष्ठान केल्याचे मागे सागितलेच आहे, त्याच सुमारास तिचे दक्षिणेश्वरी आगमन झाले तेथे आल्यापासून आपल्या आयुष्याची राहिलेली * बारा वर्षे तिने

* चंद्रादवींना स. १८७६ मध्ये देवाज्ञा झाली त्याची उत्तरक्रिया श्रीरामकृष्णानी, ते स्वत सन्यासी असल्यामुळे आपला पुतण्या रामलाल याचेकडून

दक्षिणेश्वरी काढली अर्थात् श्रीरामकृष्णाच्या वात्सल्यभावसाधना, मधुर-भावसाधना आणि अद्वैतभावसाधना या गोष्टी, श्रीचंद्रादेवी दक्षिणेश्वरी असताना घडल्या.

श्रीमती चंद्रादेवीच्या लोभराहित्याचे आणि उदार स्वभावाचें एक उदाहरण येथे सांगितल्यास बरें होईल ही गोष्ट श्रीमती चंद्रादेवी दक्षिणेश्वरी आल्यानतर थोड्याच दिवसात घडून आली मागे सागितलेच आहे की, यावेळी कालीमदिराची सर्व व्यवस्था मथुरनाथाच्या हाती आलेली होती आणि यावेळी नाना प्रकारच्या सत्कार्याकडे ते मुक्तहस्ताने पैसा खर्च करीत होते. श्रीरामकृष्णावर त्याची पराकाष्ठेची भक्ति, श्रद्धा आणि प्रेम असल्यामुळे आपल्या मागे त्याची नीट व्यवस्था कशी राहील, ह्या विचारात आणि तसा बदोबस्त करून ठेवण्यात ते आतल्या आत नेहमी गढलेले असत परतु श्रीरामकृष्णाच्या तीव्र वैराग्यामुळे, त्याच्यापुढे तोड उघडून या विषयाची गोष्ट काढण्याचे त्याना धाडस होत नसे कारण मागे एकदा त्यानी हृदयजवळ मुद्दाम म्हणून दाखविले होते की, " श्रीरामकृष्णाच्या नावे काही रक्कम बँकेत ठेवण्याचा माझा विचार आहे " हेतु हा की, हृदयने ही गोष्ट श्रीरामकृष्णा-जवळ बोलावी व मग त्याना ही गोष्ट कितपत पसंत पडते, याचा आपल्यास

---

करविली मातोश्रीच्या मृत्यूने त्याना अत्यत दु ख झालें आपल्या आईची उत्तरक्रिया आपल्या हातून घडली नाही, म्हणून वाईट वाटून, पुढे एक दिवस ते तिच्या नावाने तर्पण करण्यास बसले परंतु हातात पाणी घेताच हाताची बोटे वाकडीतिकडी होऊन सारें पाणी सांडून गेले ! एक दोन वेळ असेच झाल्यावर त्याना रडू कोसळले व " आई, तुझ्या नावाने तर्पण करणेंसुद्धा माझ्याने होत नाही ग ! " असे म्हणत ते समाधिमग्न झाले ! पुढे एका पंडिताच्या तोडून त्यानी ऐकलें की, आध्यात्मिक उन्नतीची पराकाष्ठा झाली म्हणजे " गलितकर्मअवस्था " प्राप्त होते, म्हणजे सर्व कर्में आपोआप नष्ट होऊन जातात

अजमास लागावा परंतु याचा परिणाम फार निराळाच झाला यानंतर मथुरबाबूची व श्रीरामकृष्णाची गाठ पडताच, एखाद्या उन्मत्ताप्रमाणे, श्रीराम-कृष्ण हातात काठी घेऊन त्याच्या अंगावर धावून गेले व " साल्या, तूं मला विषयी करू पाहतोस ? " असे ओरडत त्याना मारण्याला तयार झाले ! अशी गोष्ट घडून आल्याकारणाने, श्रीरामकृष्णाच्या नावाने काही करून ठेव-ण्याची त्याच्या मनातील उत्कट इच्छा पूर्ण होण्याचा काहीच सभव दिसेना पण आता श्रीमती चंद्रादेवी तेथे राहण्यास आल्यामुळे त्याना आपली इच्छा सफल होण्याची थोडी फार आशा वाटू लागली त्यानी नित्य त्याच्याकडे जावे, मोठया गौरवाने त्याना " आजीबाई, आजीबाई " म्हणावे व त्याच्याशी नानाप्रकारच्या गप्पागोष्टी कराव्या ! त्याच्या अशा प्रेमळ वर्तनाने चद्रादेवीनाहि ते थोडक्याच दिवसात प्रिय झाले पुढे एक दिवस, बरी वेळ पाहून गोष्टीवरून गोष्ट काढता काढता, मथुरबाबू म्हणाले, " पण आजीबाई ! तुम्ही इतके दिवस येथे आहात, पण माझ्याकडून तुम्ही आपली काहीच सेवा करून घेतली नाही, हे असे का बरे ? मला जर तुम्ही खरोखरच 'आपला' म्हणत असाल, तर तुम्ही मनाला येईल ते माझ्याजवळून आज मागून घेतलेच पाहिजे ! " सरळ स्वभावाच्या म्हातारीला, यावर काय बोलावे ते समजेना, तिने पुष्कळ विचार करून पाहिला, पण तिला कोणत्याच गोष्टीची कमतरता दिसेना. तेव्हा ती मथुरबाबूंना म्हणाली, " बाबा, तुझ्या घरी मला कोणत्याहि गोष्टीची कमतरता नाही बरे जर कधी एखादा जिन्नस लागला, तर तुझ्याजवळून मागून घेईन, मग तर झाले ? " असे म्हणून म्हातारीने आपली पेटी त्याच्यापुढे उघडून म्हटले, " हे बघ, माझ्याजवळ इतकीं वस्त्रे अजून शिल्लक आहेत आणि इथे खाण्यापिण्याची तर कांहीच काळजी नाही. तो तर सगळा बंदोबस्त तू अगोदरच करून ठेवला आहेस व अजूनहि करीत आहेस मग रे आता मला तुझ्याजवळ मागायचें काय राहिले ? " पण मथुरबाबू काही केल्या सोडीनात. " काही तरी आज माझ्याजवळून

मागून घ्याच," असा हट्ट धरून बसले. बराच विचार केल्यावर म्हातातीला आपल्याला पाहिजे असलेला एक जिन्नस आठवला व ती म्हणाली, "बरं बाबा, तूं जर एवढा अगदी द्यायलाच निघाला आहेस, तर आता माझ्याजवळ तमाखू नाही, तेवढी चार पैशाची आणून दे!" विषयी मथुरानाथाचे डोळे पाण्याने भरून आले व ते तिला नमस्कार करून म्हणाले, "अशी माता असल्याशिवाय का असा अलौकिक पुत्र जन्माला येतो?" असे म्हणून त्यानी चार पैशाची तमाखू आणवून म्हातारीस दिली

श्रीरामकृष्णानी वेदांतसाधनेस सुरवात केली, त्यावेळी त्याचा चुलतभाऊ हलधारी, श्रीराधागोविंदजीच्या पूजकाच्या कामावर होता वयाने श्रीरामकृष्णाहून वडील असल्यामुळे आणि भागवत वगैरे शास्त्रग्रंथात त्याची थोडी फार गति असे म्हणून, त्याला कसा अहंकार असे, श्रीरामकृष्णाच्या आध्यात्मिक अवस्थास तो कसे मेंदूचे विकार म्हणे, त्याच्या बोलण्याने श्रीरामकृष्णाच्याहि मनात संशय उत्पन्न होऊन त्याच्या निरसनार्थ ते श्रीजगन्मातेकडे कशी वरचेवर धाव घेत व त्या दोघाचा नेहमी कसा वाद चाले— वगैरे सर्व हकीगत मागे सांगितलीच आहे मधुरभावसाधनाकाली, श्रीरामकृष्णांचा स्त्रीवेष वगैरे पाहून तर त्याची पक्की समजूत होऊन गेली की, श्रीरामकृष्णाना खास वेड लागले आहे श्रीरामकृष्णाच्या तोंडून असे ऐकले आहे की, वेदांतसाधनेचे वेळी हलधारी दक्षिणेश्वरी होता, त्याचा व परमहंस श्रीमत् तोतापुरीचा अध्यात्मविषयावर कधी कधी वादविवाद होई, एकदा त्या दोघामध्ये अशाच अध्यात्मरामायणाच्या गोष्टी चालल्या असता श्रीरामकृष्णाना सीता व लक्ष्मण याच्यासह श्रीरामचंद्राचें दर्शन झालें होतें

सन १८६५ च्या आरंभी श्रीमत् तोतापुरीचें दक्षिणेश्वरीं आगमन झालें त्यानंतर काही महिन्यानी आजारी पडल्यामुळे हलधारीने आपलें पुजारीपण सोडलें व त्याच्याजागीं श्रीरामकृष्णांचा पुतण्या अक्षय (रामकुमारांचा पुत्र,) याची नेमणूक झाली

इतर साधनांप्रमाणे वेदांतसाधनेचे वेळीहि श्रीरामकृष्णाना गुरूचा शोध करावा लागला नाही गुरूच स्वत: त्याचेकडे चालत आले ! श्रीरामकृष्णाच्या वेदातसाधनेचा इतिहास सागण्यापूर्वी, त्याच्या गुरूविषयी उपलब्ध असलेली माहिती येथे देऊ

श्रीमत् परमहस तोतापुरी हे चागले उच, दीर्घाकृति आणि भव्य पुरुष होते सतत चाळीस वर्षाच्या दीर्घ तपश्चर्येने त्याना निर्विकल्प समाधि साध्य झाली ! तरी सुद्धा ते आपला बराचसा काळ ध्यान-धारणेत आणि समाधीतच घालवीत ते नेहमी नग्न राहात असत आणि म्हणूनच श्रीरामकृष्ण त्याचा " न्यागटा " ( नग्न ) या नावाने उल्लेख करीत कदाचित् आपल्या गुरूचे नाव घेऊ नये, म्हणूनहि न्यागटा ह्या मोघम नावानेच त्याचा उल्लेख ते करीत, असेहि असेल तोतापुरी कधीहि घरात राहात नसत आणि नागासप्रदायी असल्यामुळे, त्याची अग्नीची पूजा असे नागापथी साधु हे अग्नीला अत्यत पवित्र मानतात आणि कोठेहि गेले तरी आपल्याजवळ सर्वकाळ अग्नि प्रज्वलित ठेवतात याला " धुनी " असे सर्वसाधारण नाव आहे नागापथी साधु सकाळ सध्याकाळ धुनीची पूजा व आरती करतात आणि मिळालेल्या भिक्षान्नाचा प्रथम अग्नीला नैवेद्य दाखवून, मग ते आपण ग्रहण करतात दक्षिणेश्वरी असताना श्रीतोतापुरी पचवटीखालीच राहत आणि तेथेच त्याची धुनी सदा सर्वकाळ पेटलेली असे ऊन असो, पाऊस असो, तोतापुरीची धुनी सदैव पेटलेलीच असे त्याचें जेवणखाण, निजणें, बसणें,—सर्व त्या धुनीजवळ असे आणि रात्र पडल्यानंतर, थकलेंभागलेलें सर्व जगत जेव्हा सर्व चिंता आणि काळज्या विसरून विरामदायिनी निद्रेच्या माडीवर शातिसुखाचा अनुभव घेण्यात निमग्न झालेलें असे, तेव्हा श्रीमत् तोतापुरी उठून आपली धुनी अधिकच प्रज्वलित करून तिच्याजवळ दृढ आसनावर बसून, आपल्या निवात निष्कंप प्रदीपासारख्या मनाला, गभीर समाधीमध्ये निमग्न करीत दिवसासुद्धा ते बराच वेळ ध्यानात निमग्न असत, परंतु साधारण लोकाना समजून न येईल, अशा तऱ्हेचें त्याचें तें ध्यान असे, अंगावरच्या

वस्त्राने आपले सर्व शरीर झाकून घेऊन, ते धुनीजवळच निजलेले दिसून येत. लोकाना वाटे-" तोतापुरी निजले आहेत बरे का ! "

तोतापुरी आपल्याजवळ एक लोटा, एक लाबलचक चिमटा आणि एक आसन एवढेच काय ते सामान बाळगीत आणि एकच लाब रुंद चादर आपल्या देहाभोवती सदैव गुंडाळून ठेवीत ते आपला लोटा आणि चिमटा रोजच्या रोज घासून अगदी लखलखीत ठेवीत असत ते रोजच्या रोज आपला बराच वेळ ध्यानाभ्यासात घालवितात हे पाहून पुढे एक दिवस श्रीरामकृष्णानी त्याना विचारले-" तुम्हाला तर ब्रह्मज्ञान झाले आहे, तुम्ही तर सिद्ध झाला आहा, मग तुम्हाला रोजच्यारोज ध्यानाभ्यासाचे कारण काय ? " श्रीरामकृष्णाकडे गंभीर मुद्रेने पाहून, तोतापुरीनी आपल्या लोट्याकडे बोट दाखवून म्हटले, " हा लोटा पाहा, कसा लखलखीत दिसतो आणि मी जर हा रोजच्यारोज घासला नाही तर हा मळून गेल्याशिवाय राहील काय ? मनाचे सुद्धा अगदी असेच आहे ध्यानाभ्यास करून, मनाला सुद्धा जर रोजच्यारोज असेच घासून पुसून स्वच्छ राखीत गेले नाही, तर तेहि मलिन होऊन जाते " तीक्ष्णदृष्टि-सपन्न श्रीरामकृष्णानी आपल्या गुरूचे उत्तर ऐकून पुन्हा विचारले, " पण लोटा जर सोन्याचा असेल तर ? मग तो रोजच्यारोज जरी नाही घासला, तरी काही तो मलिन होत नाही " तोतापुरी हसून म्हणाले, " ह, असे तर खरेच " ध्यानाभ्यासाच्या आवश्यकतेची ही गोष्ट श्रीरामकृष्णाच्या मनात नेहमी असे आणि प्रसंगानुसार ह्या गोष्टीचा ते नेहमी उल्लेख करीत

वेदातशास्त्रात सागितले आहे की, ब्रह्मज्ञान झाल्यावर मनुष्य पूर्ण निर्भय होऊन जातो आपण स्वत च नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभाव, अखंड सच्चिदानंदस्वरूप, सर्वव्यापी, अजर अमर आत्मा आहोत, असा ज्याला प्रत्यक्ष अनुभव आला, त्याच्या मनांत भय कोठून आणि कोणाचे उत्पन्न व्हावे ? जगामध्ये एका सद्वस्तुवाचून दुसरे काहीच नाही, असे ज्याने प्रत्यक्ष पाहिलें आहे, त्याला भय कोणाचे ? श्रीमत् परमहस तोतापुरी हे अशाच कोटींतील

जीवन्मुक्त महापुरुष होते चाळीस वर्षांच्या दीर्घोद्योगाने त्यांनी ही अवस्था प्राप्त करून घेतली असल्यामुळे, त्यांचे रोजचे व्यवहारहि साधारण माणसासारखे नसत नित्यमुक्त वायुप्रमाणे ते नेहमी मनास येईल तिकडे फिरत असत वायुप्रमाणेच संसारातील कोणतेहि गुणदोष त्यांना स्पर्श करू शकत नसत आणि वायुप्रमाणेच ते एकाच ठिकाणी कधीहि फार वेळ बद्ध होऊन राहात नसत त एकाच ठिकाणी तीन दिवसापेक्षा जास्त कधीच राहात नसत ! परंतु श्रीरामकृष्णाची अद्भुत मोहिनीशक्ति इतकी जबरदस्त होती की, तेच तोता, पुरी, श्रीरामकृष्णाजवळ अकरा महिनेपर्यंत राहिले ! असो

तोतापुरीच्या निर्भयतेसंबंधी श्रीरामकृष्ण आम्हास अनेक गोष्टी सांगत असत त्यामध्ये खुद्द दक्षिणेश्वरीच घडलेली एक गोष्ट सांगत असत एक दिवस रात्री- जिकडे तिकडे सामसूम झाल्यावर तोतापुरी नित्याप्रमाणे आपली धुनी अधिकच प्रज्वलित करून ध्यानस्थ बसण्याच्या तयारीत होते जिकडे तिकडे शांतता पसरली होती, रातकिड्यावाचून इतर कसलाहि आवाज ऐकू येत नव्हता वारा सुद्धा वाहत नव्हता इतक्यात एकाएकी पंचवटीतील झाडाच्या फांद्या हालू लागल्या व झाडावरून एक भला उंचा पुरा भव्य असा पुरुष खाली उतरला आणि तोता- पुरीकडे टक लावून पाहात, एकेक पाऊल सावकाश टाकीत त्यांच्या अगदी जवळ येऊन धुनीच्या एका बाजूस बसला ! त्याला पाहून आश्चर्य वाटून तोतापुरींनी विचारले, "कोण तू ?" त्या पुरुषाने उत्तर दिले, "मी देवयोनीतील असून भैरव आहे या देवस्थानाचे रक्षण करण्यासाठी मी नेहमी याच झाडावर राहत असतो" तोतापुरी तिळमात्र न डगमगता त्याला म्हणाले, "वा ! ठीक आहे तू जो आहेस, मीहि तोच आहे तूहि ब्रह्माचे एक रूप आहेस, मीहि ब्रह्माचेच एक रूप आहे ये, इथे बसून ध्यान कर." हें ऐकून तो पुरुष हासला आणि पाहता पाहता दिसेनासा झाला जगु काय काही विशेष गोष्ट घडली नाही. अशा बेफिकीर वृत्तीने, तोतापुरींनीहि शांतपणाने ध्यानास सुरुवात केली ! दुसरे दिवशीं सकाळी श्रीरामकृष्ण येतांच, त्यांनी त्यांना रात्रीची हकीगत सांगितली.

ती ऐकून श्रीरामकृष्ग म्हणाले, “ तो या ठिकाणीं असतो खरा, मला सुद्धा अनेकदा त्याचे दर्शन झाले आहे कधी कधी तो पुढे घडणाऱ्या गोष्टीहि मला सागे एकदा पंचवटीची सर्व जमीन दारूखान्यासाठी ( Powder Magazine ) घेण्याची कपनीने खटपट चालविली होती हें ऐकून मला चैन पडेना. या साऱ्या ससाराच्या धामधुमीपासून दूर जाऊन, एकीकडे आईचें शातपणे चितन करण्याला ती जागा बरी सापडली होती, पण ती कपनीने घेतल्यावर अशी जागा आता कुठे मिळगार, या विचाराने मला काही सुचेना राणी रासमणीच्या तर्फे, मथुरबाबूनी ही जमीन जाऊ न देण्याविषयी खूप खटपट चालविली अशा वेळी एक दिवस, हा भेरव झाडावर बसलेला मला दिसला मला हाक मारून तो म्हगाला, ‘ भिऊ नको ही जागा कपनी घेऊ शकगार नाही कोर्टात तिच्या विरुद्ध निकाल होईल ’ आणि पुढे तसेंच झाले. ” असो

श्रीमत् तोतापुरीचे जन्मस्थान हिदुस्थानात पश्चिमेकडे कोठे तरी होते, परंतु नक्की गाव श्रीरामकृष्णाच्या सागण्यात कधीच आलं नाही कदाचित् त्यानीच तोतापुरीनाहि याबद्दल विचारले नसावे कारण सन्यासी, आपल्या पूर्वाश्रमाची माहिती—नाव, गाव, गोत्र वगैरे कधी कोणास सागत नाहीत सन्याशाला अशी माहिती विचारणें व सन्याशाने त्याचे उत्तर देणें, ह्या दोन्हीहि गोष्टी शास्त्रनिषिद्ध आहेत, म्हणून श्रीरामकृष्णानी त्याना ही माहिती विचारली नसावी तरी पण, श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाल्यानंतर, त्याची सन्यासी शिष्य-मंडळी, पंजाब, हिमालय वगैरे बाजूस फिरत असता, त्याना वृद्ध सन्यासी मंडळीकडून असे समजले की, श्रीमत् तोतापुरी पंजाबच्या जवळपास कोठल्या तरी ठिकाणचे राहणारे असावे त्याच्या गुरूचा मठ कुरुक्षेत्राजवळ लुधियाना नामक गावी असे ते स्वत एक विख्यात योगी पुरुष होते लुधियानाचा मठ त्यानी स्थापन केला, की त्यांच्याहि गुरूंनी स्थापन केला, याविषयी काही माहिती मिळाली नाही तरी पण तोतापुरींचे गुरु या मठाचे महंत होते व दरवर्षी त्या मठात त्यांचा उत्सवहि होत असतो, असें या फिरणाऱ्या सन्यासी

मंडळींना समजले ते तमाखू खात असत, म्हणून उत्सवात अजूनहि लोक तमाखू घेऊन येतात व मठातील मंडळीस वाटतात गुरु समाधिस्थ झाल्यावर, श्रीमत् तोतापुरी गुरूच्या गादीवर बसले

श्रीमत् तोतापुरींनी लहानपणापासूनच आपल्या गुरूंच्याच जवळ राहून, साधनादिकाचा अभ्यास त्यांच्या देखरेखीखाली केला होता तोतापुरींनी सांगितलेल्या माहितीपैकी काही काही गोष्टी श्रीरामकृष्ण आमचेजवळ सांगत ते म्हणत, “ त्यागटा म्हणे की, आमच्या मंडळीत सातशे त्यागटे होते जे प्रथमच ध्यान शिकायला सुरुवात करीत, त्यांना प्रथम गादीवर बसवून ध्यान करायला शिकवीत कारण, कठीण आसनावर बसले तर पायांना कळ लागते आणि मग सारें लक्ष ईश्वराकडे लागण्याऐवजी शरीराकडेच लागते मग गादीवर बसून ध्यान जमू लागले, म्हणजे त्याला उत्तरोत्तर अधिकाधिक कठीण आसने देत शेवटी नुसते चर्मासन अथवा नुसती जमीन यावर बसून त्याला ध्यान करावे लागे आहार वगैरे सर्व विषयासंबंधानेहि असेच नियम बांधलेले असत नेसण्याच्या वस्त्रासंबंधानेहि असेच हळूहळू त्याला नग्न राहण्याचा अभ्यास करावा लागे लज्जा, घृणा, भय, जात, कुल, शील इत्यादि अष्टपाशांनी जन्मापासून मनुष्य बद्ध झालेला असतो की नाही ? म्हणून क्रमाक्रमाने एकेकाचा त्याग करण्याचें त्याला शिक्षण देत ध्यान वगैरे गोष्टींत शिष्य प्रवीण झाला म्हणजे त्याला प्रथम इतर साधूंच्या संगतीने व मग एकट्यानेच तीर्थाटन करून यावें लागे त्या मंडळीचे सर्व विषयाचे असेच सूक्ष्म नियम होते ”
महंत निवडण्याची पद्धत कशी असे, याविषयी श्रीरामकृष्ण म्हणत, “ त्यांच्या संन्यासी मंडळीत जो परमहंसपदाला पोहोचला असेल, त्यालाच, गादी रिकामी झाल्यावर, ते महंत करीत तसे नसेल तर, पैसा व अधिकार हाती आल्यावर कोणीहि अर्धाकच्चा संन्यासी बिघडून जाण्याचा संभव असतो. म्हणून जो सर्वस्वी कांचनत्यागी असेल त्यालाच ते आपला महंत निवडून त्याचे हातीं पैशाचा सर्व कारभार देत म्हणजे मग त्याचा सद्व्यय कसा होईल याची काळजी करण्याचें कारणच उरत नसे ” असे

नर्मदेच्या तीरावरून निघून गंगासागराचे स्नान आणि श्रीक्षेत्र जगन्नाथची यात्रा करून फिरत फिरत श्रीमत् परमहंस तोतापुरी पंजाबकडे आपल्या मठाला परत जाताना वाटेंत दक्षिणेश्वरीं उतरले येथे दोन तीन दिवस राहून पुढे जाण्याचा त्यांचा विचार होता तेथे त्यांना आगण्यात श्रीजगदंबेचा कोणता हेतु होता, याची त्यांना काहीच कल्पना नव्हती

कालीमंदिरात प्रवेश करून, श्रीमत् तोतापुरी प्रथम घाटावर गेले घाटावरच एका बाजूस, इतर लोकांसारखेंच एक वस्त्र गुंडाळून घेऊन श्रीरामकृष्ण ईश्वरचिंतनात तन्मय होऊन बसले होते त्यांच्या त्या तेज पुंज आणि भावोज्वल वदनमंडलाकडे दृष्टि जाताच, तोतापुरींनी ताबडतोब जाणले की, हा कोणी असामान्य पुरुष दिसतो वेदांतसाधनेला इतका उत्तम अधिकारी क्वचितच दिसून येतो " तंत्रप्राण बंगालमध्ये वेदांताचा असा अधिकारी पुरुष सापडतो हे आश्चर्य आहे ! " असें म्हणत, ते मोठया कौतुकाने श्रीरामकृष्णाजवळ गेले व त्यांच्याकडे नीट न्याहाळून पाहून, आपला समज बरोबर आहे अशी खात्री पटताच, ते श्रीरामकृष्णांना म्हणाले, " तूं वेदांतसाधनेला उत्तम अधिकारी आहेस असे मला वाटत आहे तुझी वेदांतसाधना करण्याची इच्छा आहे काय ? "

**श्रीरामकृष्ण**—" मीं करीन की करणार नाही, हे मला कांही एक समजत नाही तें सारें माझ्या आईला माहीत आहे तिने सांगितले तर करीन "

**तोतापुरी**—" तर मग जा, आपल्या आईला हें विचारून लवकर ये कारण मला येथे फार दिवस राहण्यास सवड नाही "

श्रीरामकृष्ण यावर काही बोलले नाहीत. ते तसेच थेट श्रीजगदंबेच्या मंदिरात गेले आणि तेथे भावाविष्ट स्थितींत असतां त्यांना जगदंबेने सांगितलें, " जा, वेदांत शीक, तुला शिकविण्यासाठीच त्या संन्याशाला आणले आहे. "

श्रीरामकृष्ण तेथून उठून अत्यत हर्षाने तोतापुरींच्याकडे गेले व आपल्याला आईने परवानगी दिल्याचें त्यानी त्याना सागितलें, मदिरातल्या देवीलाच हा प्रेमाने आई म्हणतो, असे आता कुठे तोतापुरींच्या लक्षात आले व श्रीरामकृष्णाच्या बालकासारख्या सरळ स्वभावाचा त्याना अचंबा वाटला आणि हा अशा प्रकारचा स्वभाव अज्ञान व कुसस्कार याचा परिणाम होय, असे वाटून, श्रीरामकृष्णाची त्याना कीवहि आली कारण, ते कट्ट वेदाती असल्यामुळे, त्याना वेदातोक्त कर्मफलदात्या ईश्वरावाचून, दुसरा कोणताहि देव माहीत नव्हता निर्गुग ब्रह्माच्या ध्यानाभ्यासानेच निर्विकल्प समाधि अवस्थेला पोहोचलेल्या श्रीमत् तोतापुरीना श्रीरामकृष्णासारख्या उत्तम अधिकारी पुरुषाचा, सगुग ब्रह्मावरील बालकासारखा सरळ विश्वास, कसासाच वाटला! आणि त्यातल्या त्यात श्रीरामकृष्णाची आई कोण? तर त्रिगुणमयी ब्रह्मशक्ति माया! मायेला तर तोतापुरी निव्वळ भ्रम असे मानीत व तिचे अस्तित्व मानण्याची अगर तिच्या उपासनेची काहीच आवश्यकता नाही, असा त्याचा सिद्धात होता म्हणून अज्ञानबंधनापासून मुक्त होण्यासाठी, ईश्वराची अगर शक्तिसंयुक्त ब्रह्माची प्रार्थना करण्याची साधकाला काही एक जरूरी नाही, हे सर्व त्याच्या स्वत च्या प्रयत्नावर अवलबून आहे, असे ते मानीत असो आपल्याजवळ दीक्षा घेऊन. ज्ञानमार्गाची साधना याने सुरू केली म्हणजे, याचा हा सस्कार व हें अज्ञान लवकरच दूर होईल, असा विचार करून तोतापुरीनी यासबंधाने आणखी काही न बोलता दुसराच विषय काढला ते म्हणाले, "वेदातसाधनेची दीक्षा घेण्यापूर्वी शिखासूत्राचा त्याग करून तुला प्रथम यथाशास्त्र संन्यास घेतला पाहिजे" श्रीरामकृष्णानी थोडा विचार करून उत्तर दिलें, "हे सर्व जर गुप्त रीतीने करता येईल, तर यालाहि माझी हरकत नाही. परंतु उघड रीतीने सन्यास घेतल्यास, माझ्या वृद्ध आईला अत्यत दु ख होईल आणि तिला दु ख झालेलें माझ्याच्याने मुळीच पाहवणार नाही." तोतापुरीनी त्याचे म्हणणे कबूल केले व "चागला मुहूर्त पाहून तुला गुप्त रीतीने सन्यास देऊ," असे म्हणून, इतर इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या-

वर कालीमंदिराच्या उत्तरेच्या भागात असलेल्या रमणीय पंचवटीखाली जाऊन तेथे त्यानी आपले आसन माडले

नंतर शुभमुहूर्त पाहून श्रीमत् तोतापुरीनी श्रीरामकृष्णाना आपल्या पितृ-पुरुषाच्या तृप्तीसाठी श्राद्धादि क्रिया करण्यास सागितले व ते झाल्यानंतर त्यानी त्याच्याकडून यथाविधि स्वत चे श्राद्ध करविले कारण सन्यासदीक्षा घेण्याच्या वेळेपासून, साधकाने भूरादि सर्व लोकप्राप्तीच्या आशा आणि अधिकार सोडावयाचे असतात म्हणून त्यापूर्वीच, साधकाने आपले आपणच श्राद्ध करावे असे शास्त्रानी सागितले आहे

ज्याना गुरु म्हणून म्हणावयाचे, त्याच्यावर पूर्ण भरवसा ठेऊन, ते सागतील त्याप्रमाणे अगदी अक्षरश वागावयाचे, असा श्रीरामकृष्णाचा स्वभाव असल्यामुळे, श्रीमत् तोतापुरीनी जे काही करण्यास सागितले, त्याचे अगदी अक्षरश आचरण श्रीरामकृष्णानी केले श्राद्धादि पूर्वक्रिया सपल्यावर ते व्रतस्थ राहिले आणि गुरूनी सागितल्याप्रमाणे सर्व साहित्य जमवून पचवटीखालील, आपल्या साधना-कुटिरात, तें व्यवस्थित रीतीने माडून मोठया उत्कठेने ते शुभ मुहूर्ताची वाट पाहात राहिले

रात्र सरली आणि शुभ ब्राह्म मुहूर्ताची वेळ जवळ आल्याचें पाहून ही गुरुशिष्याची अलौकिक जोडी त्या शात आणि पवित्र साधना-कुटिरात प्राप्त झाली पूर्वकृत्य समाप्त झाल्यानंतर होमाग्नि प्रज्वलित झाला आणि ईश्वरा-साठी सर्वस्वत्यागरूप जे व्रत सनातन कालापासून गुरुपरंपरेने या भारतवर्षात चालत आले आहे व ज्याच्या योगाने ह्या भारतवर्षाला ब्रह्मज्ञपदवीचा मान आजहि साऱ्या जगात मिळत आहे, त्या त्यागव्रताचे अवलंबन करण्यापूर्वी उच्चारण्याचे जे मंत्र असतात त्याच्या पवित्र आणि गंभीर ध्वनीने ती सारी पंचवटी भरून गेली ! पवित्रसलिला भागीरथीचें स्नेहपूर्ण वक्ष स्थल त्या ध्वनीच्या सुखस्पर्शाने कंपित होऊन गेले होते आणि आज पुष्कळ दिवसानी पुन्हा एकदा, भारताच्या आणि सर्व जगाच्या कल्याणासाठी एक साधक सर्वस्व

त्यागरूप असिधाराव्रताचें अवलंबन करीत आहे, असें जाणूनच की काय, ही आनंदाची बातमी दिगंतराला पोहोचविण्यासाठी गगामाता अत्यत हर्षाने शब्द करीत, मोठया त्वरेने आपला मार्ग आक्रमण करीत होती !

गुरु मंत्र म्हणत होते आणि त्याचे अलौकिक शिष्यहि अत्यंत एकाग्रतेने त्याचा पुनरुच्चार करून, हुताशनामध्ये आहुति टाकीत होते प्रथम प्रार्थना मंत्र झाले

" परब्रह्मतत्व मला प्राप्त होवो परमानंदलक्षणोपेत वस्तु मला प्राप्त होवो अखडैकरस मधुमय ब्रह्मवस्तु माझ्यामध्ये प्रकाशित होवो ब्रह्मविद्ये-सह नित्य वर्तमान असणाऱ्या हे परमात्मन्, देव मनुष्यादि तुझ्या सर्व सताना-मध्ये मीच तुझ्या करुणेला योग्य बालक आहे हे ससाररूप दु स्वप्नहारिन् परमेश्वरा, माझ्या द्वैतप्रतिभासरूप सर्व दु स्वप्नाचा विनाश कर हे परमात्मन्, मी आपल्या सर्व प्राणवृत्तीची तुझ्यामध्ये आहुति देऊन, सर्व इद्रियाचा निरोध करून त्वदेकचित्त झालो आहे हे सर्वप्रेरक देवा ! ज्ञानप्रतिबंधक सर्व मलीनता माझ्यामधून काढून टाकून, असभावना-विपरीतभावनारहित तत्वज्ञान, जेणेकरून मला प्राप्त होईल, असे कर सूर्य, वायु, सर्व नद्याचें पवित्र जल, व्रीहीयवादि सस्य, सर्व वनस्पति आणि जगातील इतरहि सर्व पदार्थ, तुझ्या निर्देशाने मला अनुकूल होऊन, तत्वज्ञानलाभाच्या कामी मला सहायता करोत ! हे ब्रह्मन्, तूंच या जगतामध्ये नानाप्रकारच्या रूपानी प्रकाशित झाला आहेस शरीर आणि मन शुद्ध होऊन, तत्वज्ञानधारणेची योग्यता मला प्राप्त व्हावी म्हणून, अग्निरूप तुझ्यामध्ये मी आहुति देत आहे, प्रसन्न हो ! " *

नंतर विरजा होमाला सुरुवात झाली —

---

* त्रिसुपर्ण मंत्राचा भावार्थ

" माझ्यामधील पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ह्या पंचभूताचे अंश शुद्ध होवोत आहुतीच्या योगाने रजोगुणप्रसूत मलीनतेपासून वियुक्त होऊन मी ज्योति स्वरूप होईन, असे होवो ! "

" माझ्यामधील प्राणपचक, कोषपंचक, हे शुद्ध होवोत ! "

" माझ्यामधील शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध-प्रसूत, सर्व विषयसस्कार शुद्ध होवोत माझे मन, वाक्य, कार्य, कर्म आदिकरून सर्व शुद्ध होवोत "

"हे अग्निशरीरी निजलेल्या, ज्ञानप्रतिबंधहरणकुशल, लोहिताक्ष पुरुषा! जागृत हो हे अभीष्टपूरणकारिन्, ज्ञानप्रतिबधक सर्व वस्तूंचा नाश करून, गुरुमुखातून ऐकलेल्या ज्ञानाची, माझ्या अत करणात जेणेकरून नीट धारणा होईल, असे कर माझ्यामध्ये जे जें काही आहे ते तें सर्व शुद्ध होवो "

" चिदाभास ब्रह्मस्वरूप मी, दारा, पुत्र, संपत्ति, लोकमान्यता सुंदर शरीर वगैरेच्या लाभाच्या सर्व वासनाची अग्नीमध्ये आहुति देतों ! "

अशा तऱ्हेने पुष्कळ आहुति दिल्यानंतर, " भूरादि सर्व लोकलाभाच्या सर्व आशा-इच्छा मी या क्षणापासून सोडून दिल्या आणि या क्षणापासून जगतातील सर्व प्राणिमात्राला मी अभयदान देतों ! " असे म्हटल्यानंतर होम समाप्त झाला शिखासुत्राचाहि यथाविधि होम झाला आणि पुरातन कालापासून चालत आलेल्या परंपरेप्रमाणे, गुरूंनी दिलेल्या कौपीन, काषायवस्त्र व नाम * यानी भूषित होऊन, श्रीरामकृष्ण, श्रीमत् परमहस तोतापुरीच्या जवळ उपदेश ग्रहण करण्यासाठी एकाग्रचित्त होऊन बसले

---

* श्रीतोतापुरीनीच सन्यास देताना श्रीरामकृष्णाना " श्रीरामकृष्ण " हें नाव दिलें.

नंतर श्रीमत् तोतापुरी नानाप्रकारच्या युक्त्यानी आणि सिद्धात-वाक्यानी त्या दिवशी श्रीरामकृष्णाना समाधि अवस्था प्राप्त करून देण्याचा प्रयत्न करू लागले श्रीरामकृष्ण म्हणत की, " त्या दिवशी त्यागट्याने आपले सर्व साधनलब्ध अनुभव आणि उपलब्धि मला पटवून देण्याचीच कमर बांधली आहे की काय, असे वाटले " ते म्हणत, " मला दीक्षा देऊन, त्यागटा नानाप्रकारच्या सिद्धात-वाक्याचा उपदेश करू लागला व मनाला सर्वस्वी निर्विकल्प करून आत्मध्यानात निमग्न हो, असे सागू लागला परतु माझी स्थिति अशी झाली की, ध्यान करावयास बसून, पुष्कळ प्रयत्न करूनहि मन पूर्णपणे निर्विकल्प करण्याचे अथवा नामरूपाच्या सीमेपलीकडे जाण्याचे माझ्याच्याने होईना इतर सर्व विषयापासून मन सहज परावृत्त करता आले, परंतु ते असे निर्विषय होताक्षणी, श्रीजगदंबेची चिरपरिचित चिद्घन उज्ज्वल मूर्ति डोळ्यापुढे उभी राहून, नामरूपत्यागाचा समूळ विसर पाडू लागली! ध्यान करावयास बसावे आणि मन निर्विषय होताच आईची मूर्ति डोळ्यापुढे उभी राहावी, असे एकसारखे तीन दिवस झाले, तेव्हा निर्विकल्प समाधीसबंधाने मी जवळ जवळ निराश झालो आणि डोळे उघडून त्यागट्याकडे पाहून म्हणालो, " मन पूर्णपणे निर्विकल्प होत नाही, काय करू? " हे ऐकून त्यागट्याला राग आला आणि माझा तिरस्कार करून तो म्हणाला, " होत नाही म्हणजे काय?" असें म्हणून इकडे तिकडे पाहून, त्याने एक काचेचा तुकडा शोधून काढला आणि त्याचे सुईसारखे तीक्ष्ण टोंक माझ्या कपाळावर दोन्ही भुवयाच्यामध्ये जोराने टोचून म्हणाला, " या ठिकाणी आपलें मन एकाग्र कर. " तेव्हां पुन्हा एकदा अगदी दृढ निश्चय करून ध्यान करूं लागलो आणि पूर्वीप्रमाणे श्रीजगदंबेची मूर्ति डोळ्यापुढे येताक्षणी, ज्ञानाला तरवार कल्पून तिने त्या मूर्तीचे मनातल्या मनात, दोन तुकडे करून टाकले! तेव्हा मग मनामधे कसल्याच प्रकारचा विकल्प उरला नाही—आणि ते ताबडतोब, नामरूपात्मक-राज्याच्या सीमेपलीकडे सरासर चढून समाधिमग्न झाले! " अशा रीतीने,

श्रीरामकृष्णाना समाधि लागल्यावर, बराच वेळ श्रीमत् तोतापुरी त्याच्या जवळच बसून राहिले मग हळूंच त्या पवित्र कुटीराच्या बाहेर येऊन, आपल्यामागे उगीच कोणी आत शिरून, आपल्या शिष्याला त्रास देऊ नये, म्हणून त्यानी त्या कुटीराचे दार बंद करून, त्यास कुलूप लावून घेतले आणि जवळच पंचवटीखाली आपल्या आसनावर स्वस्थ बसून दार उघडण्यासाठी श्रीरामकृष्णाच्या हाकेची मार्गप्रतीक्षा करू लागले

दिवस संपला, रात्र आली, तीहि जाऊन दुसरा दिवस उजाडला असे लागोपाठ तीन दिवस गेले, तरी दार उघडण्यासाठी श्रीरामकृष्णाची हाक ऐकू येईना ! तेव्हा मात्र श्रीमत् तोतापुरींना आश्चर्य वाटले आणि आपल्या अद्भुत शिष्याची अवस्था तरी काय आहे ती पाहावी, या उद्देशाने त्यानी स्वत च त्या कुटीराचे दार हलकेच उघडून आत प्रवेश केला आणि पाहातात तो आपला शिष्य तीन दिवसांपूर्वी समाधि लागताना जसा बसला होता, अगदी तसाच बसला असून, देहामध्ये प्राणाचे बिलकुल चिन्ह नाही, मुखमंडल मात्र शात व गंभीर असून त्यावर अपूर्व तेज झळकत आहे ! बहिर्जगताच्या सबंधाने आपला शिष्य अजूनहि अगदी मृतप्राय असून त्याचे चित्त-मात्र निवात-निष्कप-प्रदीपवत्, ब्रह्मामध्ये लीन होऊन राहिले आहे !

हा प्रकार पाहून स्तभित होऊन, श्रीमत् तोतापुरी स्वत शी म्हणूं लागले, "ही गोष्ट खरोखरीच शक्य आहे काय ? जी गोष्ट साध्य करून घेण्याला मला चाळीस वर्षे सतत परिश्रम करावे लागले, ती गोष्ट या महा-पुरुषाने तीनच दिवसात साध्य करून घेतली काय ?" असा संदेह उत्पन्न होऊन त्यानी श्रीरामकृष्णाच्या अंगावरील सर्व लक्षणे—हृदयाची स्पदनक्रिया चालूं आहे की नाही, नाकातून थोडा तरी श्वासोच्छ्वास चालूं आहे की नाही वगैरे—पुन्हा नीट न्याहाळून पाहिली. परंतु हृदयाची क्रिया बंद होती, श्वासो-च्छ्वासहि बंद होता ! मग त्यांनी श्रीरामकृष्णाच्या त्या काष्ठवत् शरीराला डिवचून पाहिलें, पण व्यर्थ त्याचा काहीच परिणाम दिसून येईना ! तेव्हा

मात्र तोतापुरीच्या आश्चर्याला आणि आनंदाला सीमाच उरली नाही " ही काय विलक्षग गोष्ट आहे ! ही तर खरोखरच समाधि ! ! " असे शब्द त्या आश्चर्याच्या आणि आनंदाच्या भरात त्याच्या तोंडातून बाहेर पडले

नतर आपल्या त्या अलौकिक शिष्याला समाधीतून उतरण्यासाठी श्रीतोतापुरींनी काही प्रक्रियेला सुरुवात केली आणि थोडयाच वेळात " हरि-ॐ " मत्राच्या गभीर ध्वनीने ती पवित्र आणि पुण्य पचवटी भरून गेली

श्रीमत् तोतापुरीना आपला शिष्य सामान्य नसल्याची जाणीव पहिल्या भेटीलाच झाली होती आणि आता तर त्याच्या अलौकिकत्वाची त्याना प्रत्यक्षच खात्री पटून, त्यानी त्याला " परमहस " ही पदवी दिली आपल्या शिष्यावर त्याचे फार प्रेम जडले, एवढेच नव्हे तर त्याच्याविषयी त्याच्या मनात अत्यत आदरहि उत्पन्न झाला आणि त्याच्या सगतीचा आपल्याला लाभ झाला तर बरे होईल, असें त्याना वाटूं लागले आपल्या त्या असाधारग शिष्याच्या अद्भुत आकर्षगाने त्याचा जाण्याचा दिवस लाब लाब सरकू लागला आणि त्याच्या नेहमीच्या रीतीप्रमागे एखाद्या ठिकागी राहण्याचे जास्तीत जास्त जे तीन दिवस तेहि निघून गेले, तरी तेथून हालण्याचा विचारच त्याच्या मनात येईना ! आठवडा झाला, पधरवडा झाला, एक महिना झाला, सहा महिने लोटले, तरी श्रीरामकृष्णाच्या संगतीचा दिव्य आनंद सोडून दुसरीकडे जाण्याला त्याचे मन घेईना

रोज सकाळ सध्याकळ, त्या पुण्य आणि पवित्र पचवटीखाली बसून या दोघा महापुरुषाच्या ज्या निजानदाच्या गोष्टी चालत असतील आणि त्यावेळी जे आनंदाचे तुफान सुरत असेल, त्याची थोडी सुद्धा कल्पना येणे आमच्या सारख्या सामान्य मानवास अगदी दुरापास्त आहे श्रीरामकृष्णाना आता वेदातावाचून दुसरा कोगताहि ध्यास नव्हता आणि श्रीमत् तोतापुरीनाहि आपल्या शिष्याला वेदातशास्त्रातील गूढ तत्त्वे स्वत च्या अनुभवाच्या अधि-

कारयुक्त वाणीने समजून देण्याशिवाय दुसरा कोणताहि आनंद नव्हता ! कित्येक वेळी त्या दोघाना आपल्या आनंदाच्या भरात, दिवसरात्रीचे आणि खाण्या-पिण्याचेहि भान उरू नये !

श्रीमत तोतापुरी वेदांतोक्त कर्मफलदात्या ईश्वरावाचून इतर देवदेवता मानीत नसत आणि एखाद्याचा देवदेवतावर विश्वास असलेला पाहिल्यास, ते त्याला अज्ञान अथवा कुसंस्काराचा परिणाम म्हणत, असे वर सांगितलेच आहे. अगदी लहानपणापासून सर्व प्रकारच्या मायाजाळापासून दूर आपल्या गुरूंच्या चरणी वास करण्याचे महद्भाग्य त्याना प्राप्त झाले असल्यामुळे, आत्मज्ञान-लाभाच्या कामी ते स्वतःच्या प्रयत्नावाचून इतर कशालाहि किंमत देत नसत श्रीमदाचार्यांनी आपल्या विवेक-चूडामणीच्या आरंभीच म्हटले आहे की, " या जगामध्ये मनुष्यत्व, ईश्वरलाभाची इच्छा आणि सद्गुरूचा आश्रय या तीन गोष्टींचा लाभ होणे परम दुर्लभ आहे याला ईश्वराचीच कृपा पाहिजे " या तिन्ही गोष्टीचा लाभ श्रीमत् तोतापुरीना लहानपणीच झाला होता आणि तेव्हा-पासून आपल्या ध्येयाकडे दृष्टि ठेवून त्यानी ते सतत चाळीस वर्षाच्या दीर्घ परिश्रमानंतर प्राप्त करून घेतले होते त्याना आपल्या मनाबरोबरहि फारसा झगडा करावा लागला नसावा, कारण लहानपणीच त्याना सद्गुरूचा आश्रय मिळाल्यामुळे व त्याच्या ठिकाणी त्याची पूर्ण निष्ठा असल्यामुळे सद्गुरूच्या आज्ञेप्रमाणे अक्षरश वर्तन त्याचेकडून सहज होई वैष्णव संप्रदायामधे एक म्हण आहे —

गुरु कृष्ण वैष्णव तिनेर दया हइल ।
एकेर दयाविने जीव छारे खारे गेल ॥

गुरु, कृष्ण आणि वैष्णव (साधु) ह्या तिघाची दया होऊनहि एकाच्या दयेवाचून—म्हणजे मनाच्या दयेवाचून—जीवाचा सत्यनाश झाला. असल्या पाजी मनाच्या हाती श्रीमत् तोतापुरी कधीहि सापडले नव्हते ईश्वरावर भरवसा व विश्वास ठेऊन गुरूच्या आज्ञेप्रमाणे आपल्या ध्येयाचा मार्ग

आक्रमण करीत असता त्यानी एकदा सुद्धा मागे वळून संसाराच्या गोधळाकडे आणि गडबडीकडे पाहिले नव्हते. अर्थातच त्याचा सारा भर उद्योग, प्रयत्न, आत्मविश्वास याच्यावरच असे आपल्या मार्गांत असता मन जर मध्येच एकाद्या अडेल तट्टासारखे अडून बसले, तर हा सारा प्रयत्न आणि आत्मविश्वास झंझावातात सापडलेल्या गवताच्या पेंडीसारखा कोठच्या कोठे नाहीसा होतो आणि त्याच्या जागी अविश्वास उत्पन्न होऊन त्या पूर्वीच्या हिमतबहाद्दराची एखाद्या क्षुद्र असहाय किडयापेक्षाहि केविलवाणी स्थिति होऊन जाते—ह्या गोष्टीचा श्रीमत् तोतापुरीना अनुभव नव्हता ईश्वरकृपेने बहिर्जगतातील शेकडो गोष्टीची अनुकूलता न मिळाल्यास, जीवाच्या सर्व प्रयत्नाचा आणि उद्योगाचा काही सुद्धा उपयोग होत नाही व त्याच्या आशेप्रमाणे त्याला फलप्राप्ति होत नाही, या गोष्टीचा तोतापुरीना अनुभव नव्हता, यामुळे साधकाने आत्मज्ञान प्राप्तीसाठी देवदेवताचे साहाय्य मागावे ह्या गोष्टीचा त्याना बरोबर समजच पटत नसे भक्तिमार्ग हा दीन दुबळ्या अशक्त लोकाचा मार्ग आहे असे ते म्हणत. ईश्वरभक्तीने आणि प्रेमाने तन्मय होऊन भक्तसाधक ससारातील सर्व विषय, एवढेंच काय पण आत्मतृप्तीसुद्धा विसरून आपल्या भक्तीच्या जोरावर ईश्वराचे दर्शन घेऊ शकतो, भक्तीच्या अत्यत उच्च अवस्थेत भक्त शुद्धाद्वैतज्ञानाचा सुद्धा अधिकारी होतो आणि म्हणून त्याच्या जप, कीर्तन, भजनादिक गोष्टीचाहि फार उपयोग आहे, त्या म्हणजे वेडेपणाचे अगर दुबळेपणाचे प्रदशन नव्हे—ही गोष्ट श्रीमत् तोतापुरीच्या लक्षात येत नसे म्हणून ते भक्ताच्या भावतन्मयतेची एखादे वेळी चेष्टाहि केल्याशिवाय सोडीत नसत अर्थात् या सर्वाचा अर्थ असा नव्हे की, श्रीमत् तोतापुरी नास्तिक होते अथवा त्याच्यात ईश्वरानुराग नव्हता ते स्वत शमदमादि सपत्तिवान शात प्रकृतीचे पुरुष असून भक्तीच्या शातभावाचे साधक होते आणि दुसऱ्यामधील त्या भावातील ईश्वरभक्तीचा मात्र भाग त्याना समजे परंतु ईश्वराला आपला सखा, पुत्र, स्वामी वगैरे समजून त्या भावाने त्याची भक्ति केल्यास साधकाची उन्नति झपाटयाने होऊं शकते, या गोष्टीकडे त्याचे कधीच लक्ष गेले नव्हते, म्हणून अशा प्रकारच्या

भक्तांचे ईश्वरविरहाने बेहोश होणें, त्याची व्याकुलता, त्याचा धावा, त्याचा अभिमान, त्याचा हट्ट, तसेच भावाच्या प्रबळतेने त्याचे हास्य, नृत्य अथवा क्रंदन, वगैरे गोष्टीना ते वेडयाचे चाळे समजत त्याची अशी कधीहि कल्पना झाली नाही की, या चाळ्याच्या योगाने साधकाची उन्नति झपाटयाने होऊन त्याला आपल्या ध्येयाची प्राप्ति फार लौकर होते. अर्थातच ब्रह्मशक्ति जगदंबेची मनोभावाने भक्ति, पूजा करणे व भक्तिविषयक इतर गोष्टी याच्यासबंधाने त्याचा श्रीरामकृष्णाशी अनेक वेळी वाद जुंपे

अगदी लहानपणापासून, श्रीरामकृष्ण, नेहमी सकाळी व सन्ध्याकाळी हाताने टाळी वाजवत वाजवत आणि कित्येकदा भावावेशात नृत्य करीत करीत, काही वेळपर्यंत-" हरि बोल, हरि बोल " " हरिगुरु, हरिगुरु " " प्राण हे गोविंद मम जीवन " " मनकृष्ण-प्राणकृष्ण-ज्ञानकृष्ण-ध्यानकृष्ण-बोधकृष्ण-बुद्धिकृष्ण " " तूच जगत्, जगत् तुझ्यामध्ये " " मी यत्र, तूं यन्त्री "— इत्यादि भजन मोठमोठयाने करीत असत वेदात ज्ञानाने, अद्वैतभावाने निर्विकल्प समाधीचा लाभ झाल्यानतर सुद्धा हा नित्यक्रम त्यानी कधीहि सोडला नाही एक दिवस, पचवटीखाली, श्रीमत् तोतापुरीच्या बरोबर नानाप्रकारच्या धर्मविषयक गोष्टी ते करीत असता सन्ध्याकाळ झाली त्याबरोबर सर्व गोष्टी एकदम बंद करून ते लगेच वरीलप्रमाणे भजन करू लागले हा प्रकार पाहून श्रीमत् तोतापुरीना अत्यत आश्चर्य वाटले आणि जो पुरुष वेदातमार्गाचा इतका उत्तम अधिकारी, की केवळ तीनच दिवसात ज्याने निर्विकल्प समाधि प्राप्त करून घेतली,—अशा पुरुषाने एखाद्या अगदी हीन अधिकाऱ्याप्रमाणे भजन करावें, याचा त्याना काहीच उलगडा होईना मग त्याची थट्टा करण्याच्या उद्देशाने ते श्रीरामकृष्णाकडे पाहून म्हणाले, "क्यों रोटी ठोकते हो?" श्रीरामकृष्ण हसत हसत म्हणाले, " गप्प बसाल का जरा ? मी इकडे ईश्वराचें नामस्मरण करतोय्, आणि तुम्ही काय म्हणता 'क्यो रोटी ठोकते हो ?'" श्रीरामकृष्णांच्या या सरळ बोलण्याने तोतापुरीनाहि गंमत वाटली व त्याच्या या अशा

करण्यात कांही तरी अर्थ असला पाहिजे असें समजून ते आणखी काही न बोलता स्तब्ध बसले

आगखी असेच एक दिवस, संध्याकाळ होऊन गेल्यावर श्रीरामकृष्ण श्रीमत् तोतापुरीच्या धुनीजवळच बसले होते ईश्वरीय कथाप्रसगात दोघाचीहि मने इतक्या उच्च स्थितीला जाऊन पोहोचली होती की, अद्वैतानुभवात ती जवळ जवळ तन्मय होऊन गेली होती त्याच्यापुढे असलेल्या त्या धुनीतील अग्निनारायणाचा आत्मा सुद्धा जगु काय, त्याच्या आत्म्याशी एकत्वाचा अनुभव घेऊन आनदाने आपल्या शंभरहि जिभा बाहेर काढून खदखदा हासत होता ! त्या दोघानाहि जगताचें जवळ जवळ भानहि नव्हते ! अशा वेळी बागेच्या नोकराचाकरापैकी एकजग आपली चिलीम भरून, विस्तव घेण्यासाठी तेथे आला आणि धुनीतून एक लाकूड बाहेर ओढून त्याचा निखारा काढून घेऊ लागला दोघेहिजग ब्रह्मानदात इतके निमग्न झाले होते की, तो मनुष्य तेथे आलेला आगि त्याने लाकूड बाहेर ओढलेले, त्याच्यापैकी कोणाच्याहि लक्षात आले नाही इतक्यात एकाएकी तोतापुरीची नजर त्याचेकडे गेली आणि आपल्या पवित्र अग्नीला हा मनुष्य शिवला असे पाहून ते अत्यत सतापले आणि शिवीगाळहि करूं लागून, आपला चिमटा घेऊन, त्याला मारण्याचेहि भय दाखवू लागले !

हा सर्व प्रकार पाहून श्रीरामकृष्ण त्या तन्मय स्थितीत अर्धबाह्य अवस्थेत मोठमोठयाने हसूं लागले व वरचेवर "वाहवा ! वाहवा ! शाबास ! शाबास !" असे म्हणूं लागले ! श्रीरामकृष्णानी आपल्याला असे म्हणावे याचे आश्चर्य वाटून तोतापुरी म्हणाले, "तू असे काय करतोस ! पाहा बरे या माणसाने केवढा अपराध केला आहे तो ?" श्रीरामकृष्णानी हसत हसत उत्तर दिले, "हं, त्याचा अपराध तर खराच, पण मला त्याच्यापेक्षा तुमच्या ब्रह्मज्ञानाचीच जास्त गमत वाटली ! आताच ना तुम्ही म्हणत होता की, एका ब्रह्मावाचून या जगात दुसरें काहीहि सत्य नाही, जगतातील सर्व वस्तु आणि व्यक्ति त्याचाच प्रकाश आहेत आणि लगेच एका क्षणांत हें सर्व विस-

रून त्या माणसाला मारायलाहि तयार झालात ? म्हणून हसतोय् की, महामायेचा प्रभाव केवढा जबरदस्त आहे ! ” श्रीरामकृष्णाचें हें बोलणे ऐकून, तोतापुरी गभीर होऊन, काही वेळ स्तब्ध बसले व मग श्रीरामकृष्णाना म्हणाले-“ ठीक बोललास मी रागाच्या भरांत खरोखरच सर्व गोष्टी विसरून गेलो होतो ! राग मोठा पाजी आहे ! आजपासून मी कधी रागावणार नाही ! ” आणि खरोखरच त्या दिवसापासून तोतापुरी कधीहि रागावलेले दिसले नाहीत

श्रीरामकृष्ण म्हणत असत, “ पचभूताच्या कचाट्यात सापडून ब्रह्म रडत असते डोळे मिटून तुम्ही कितीका म्हणाना, ‘ मला काटा बोचला नाही, माझा पाय दुखत नाही, ’-पण काटा बोचताच वेदनानी लगेच तळमळ सुरू होतेच त्याचप्रमाणे मनाला किती का शिकवाना-की तुला जन्म नाही, मृत्यु नाही, तुला पाप नाही, पुण्य नाही, तुला शोक नाही, दु ख नाही, तुला क्षुधा नाही, तृष्णा नाही, तूं जन्म-जरारहित, निर्विकार, सच्चिदानदस्वरूप आत्मा आहेस,—पण जराशी कुठे प्रकृति बिघडली, जरासे मनापुढे ससारातील रूपरसादि विषय आले, जरासे कामकाचनाच्या वरवर दिसणाऱ्या सुखाला भुलून, हातून एखादें वाईट काम झाले की लगेच, मोह, दु ख, यातना याची मनात गर्दी उसळून, सारा आचार-विचार विसरून जाऊन, माणूस अगदी गडबडून जातो व त्याला काही सुचेनासे होतें म्हणून, ईश्वराची जर कृपा झाली नाही, महामायेने गळ्याला बाधलेली दोरी जर सोडून टाकली नाही तर कोणालाहि आत्मज्ञान आणि आनंदाची प्राप्ति होणार नाही, हे खूप समजा चडीत सागितले आहे, नाही ?—“ सैषा प्रसन्ना वरदा नृणा भवति मुक्तये ”-तिने कृपा करून जर वाट मोकळी केली नाही तर काही एक होण्याची आशा नको ”

“ राम, लक्ष्मण आणि सीता वनात चालले होते वनातल्या वाटा अरुंद, एका वेळी एकच माणूस जाऊं शकेल इतक्याच धनुष्यबाण हातीं घेऊन राम सर्वांच्या पुढे चालले होते, त्याच्या मागोमाग सीता चालली होती आणि

तिच्या मागोमाग लक्ष्मण धनुष्यबाण घेऊन चालला होता लक्ष्मणाची श्रीराम-चंद्रावर अत्यंत भक्ति आणि प्रीति त्याला वाटे की, आपल्याला रामचंद्र नेहमी दिसावे पण करतो काय ? त्याच्या आणि रामाच्या मध्ये सीता चाललेली असे म्हणून राम न दिसल्यामुळे त्याला एकसारखी तळमळ लागलेली असे बुद्धि-मती सीतेच्या लक्षात ही गोष्ट आली आणि तिच्या मनात करुणा उत्पन्न होऊन, वाट चालता चालताच ती थोडीशी बाजूला झाली आली म्हणाली, " हू आता बघा. ' तेव्हा कुठे लक्ष्मण डोळे भरून आपल्या इष्ट मूर्तीला पाहूं शकला ! त्याचप्रमाणे जीव आणि ईश्वर याच्यामध्येहि मायारूपी सीता असते तिने जीवरूपी लक्ष्मणावर कृपा करून जर त्याची वाट सोडली नाही व त्याचा पाश तोडून टाकला नाही, तर जीवाला रामरूप ईश्वराचे दर्शन होणार नाही, हे निःसंशय समजा तिची कृपा झाली की, जीवरूपी लक्ष्मणाला रामरूपी ईश्व-राचे दर्शन होण्यास मुळीच वेळ लागत नाही आणि तिचा जर कृपा झाली नाही तर मग हजार का विचार कराना, त्यापासून काही एक होणे नाही " असो

श्रीजगदंबेची तोतापुरीवर जन्मापासून कृपा होती सत् संस्कार, सरळ मन, योगीमहापुरुषाचा आश्रय, बलिष्ठ आणि निकोप शरीरप्रकृति याचा त्याना लहानपणापासूनच लाभ झाला होता महामायेने त्याना कधीहि आपले उग्र रूप दाखविले नव्हते, अर्थातच, श्रीमत् तोतापुरीना उद्योगाने आणि सतत परिश्रम करून निर्विकल्प समाधि अवस्था प्राप्त करून घेणे, म्हणजे अगदी सोपी गोष्ट आहे असेच वाटत असे त्याना कसे समजावे की, आपल्यावर श्रीजगदंबेची कृपा असल्यामुळेच, आपल्या परमार्थमार्गातील सर्व अडथळे तिने स्वत दूर करून, आपला मार्ग सुगम करून ठेवला होता पण आता इतक्या दिवसानंतर, ही गोष्ट त्याना समजून देण्याचे श्रीजगदंबेच्या मनात आले. इतक्या दिवसानतर त्याच्या मनातील भ्रम दूर होण्याची वेळ आली

श्रीमत् तोतापुरीची शरीरप्रकृति अत्यंत निकोप रोग, अजीर्ण, शरीराचे तऱ्हतऱ्हेचे आजार, याचे त्याना कधी दर्शनहि झालें नव्हते जे खावे, तें

पचून जावें—कधी तक्रार नाही जेथे पडावे तेथे झोप तयार मन सदैव आनंदाने आणि शांतीने भरलेलें, कधी काळजी की उदासीनता नाही परतु बंगालच्या पाण्याचा आणि दमट हवेचा त्याच्या शरीरावर परिणाम झाला व श्रीरामकृष्णाच्या अद्भुत आकर्षणाने दक्षिणेश्वरी काही महिने लोटतात, तोच त्याच्या त्या पोलादासारख्या शरीरात रोगाने प्रवेश केला ! त्याना रक्तअमाश झाला, रात्रदिवस पोटात मुरडा होऊ लागून पोट दुखू लागले आणि त्याचे धीर, गभीर आणि स्थिर मनसुद्धा ब्रह्मविचारापासून आणि समाधि-अवस्थेपासून ढळू लागून, शरीराकडेच लागूं लागले ! पचभूताच्या तडाक्यात ब्रह्म सापडल्यावर आता सर्वेश्वरी श्रीजगदबेवाचून दुसरा त्राता कोण ?

प्रकृति बिघडण्याचे पूर्वीपासून त्याना समजून चुकले होते की, या प्रातात आपली प्रकृति ठीक राहणार नाही, म्हणून ह्या ठिकाणी यापुढे राहणे योग्य नाही परंतु श्रीरामकृष्णाच्या दिव्य संगतीसुखाचा लोभ त्याना सुटेना व अखेर ते आजारी पडलेच रोग वाढत चालला असता मधून मधून त्याना तेथून दुसरीकडे निघून जाण्याची इच्छा होई "आज श्रीरामकृष्णाची परवानगी घेऊ," असा त्यानी विचार करावा, परंतु श्रीरामकृष्ण त्याच्याकडे येऊन बसले, म्हणजे भगवत्कथाप्रसगात आपल्या बेताचा त्याना विसर पडावा आणि त्याचे जाणे लाबणीवर पडावें असा प्रकार कितीदा तरी झाला ! एखाद्या वेळी श्रीरामकृष्ण त्याच्याकडे आल्यावर त्याची परवानगी घेण्याचे त्याच्या अगदी ओठावर यावे, पण तितक्यात बेत फिरून त्याना वाटावे, "ॲ, काय घाई आहे ! आजचा दिवस राहूं, उद्याच जाऊं झाले !" पण असे होता होता रोगाचें पाऊल मात्र पुढेच पडत चाललें श्रीमत् तोतापुरीची प्रकृति दिवसेंदिवस जास्तच बिघडत चालली हें पाहून, श्रीरामकृष्णानी मथुरबाबूंना सागून औषधाची व्यवस्था करविली आणि त्याची सेवाशुश्रूषा ते स्वत करू लागले पोटदुखण्याने फारच त्रास होऊ लागला, तर आपल्या मनाला समाधिमग्न करून देहाचें सर्व दु ख विसरून जाण्याइतकी शक्ति, अजूनपर्यंत तोतापुरींच्या अंगीं राहिली होती.

रात्रीची वेळ आज तोतापुरीचे पोट फारच दुखत होतें निजण्याचा प्रयत्न करावा पण लगेच पोटात कळ येऊन उठून बसावे पण बसून तरी कुठे बरे वाटत होते ? पुन्हा कलंडावे पुन्हा उठावें, असा एकसारखा प्रकार सुरू होता त्यानी विचार केला की, आता समाधि लावून बसावे झाले, मग या देहाचे जे काय व्हायचे असेल ते होवो पग आज त्याची समाधीहि लागेना सारें मन त्या पोटाच्या वेदनाकडेच लागूं लागले ! समाधि लावण्याचा त्यानी पुष्कळ प्रयत्न केला, पग व्यर्थ तेव्हा मात्र त्याना आपल्या शरीराचा फार राग आला, ते स्वत शी म्हणाले, " आज या शरीराच्या भोगाने, मन सुद्धा माझ्या ताब्यात नाही अं ? ही काय गोष्ट आहे ? मी तर काही शरीर नाही, मग काय ? आता शरीराचाच निकाल लावून टाकतो म्हणजे झाले उगीच याच्या सगतीने स्वत ला यातना तरी कशाला करून घेऊं ? आता वेळहि बरी आहे आत्ताच्या आत्ता या शरीराचे गगेत विसर्जन करून टाकून, सगळ्याच भोगाचा आणि दु खाचा शेवट करून टाकतो ! " असा विचार करून, पुन्हा एकदा नेटाने प्रयत्न करून, आपल्या मनाला ब्रह्मचितनात स्थिर करून, श्रीमत् तोतापुरी हळूहळू सरकत सरकत गगेच्या काठी गेले, आणि पाण्यात उतरून हळूहळू पुढे जाऊ लागले पण काय आश्चर्य ! एवढी मोठी गगानदी आज खरोखरच आटून गेली की काय ? तिच्या प्रवाहात एक माणूस बुडेल इतके सुद्धा पाणी आज नाही काय ? हे झाले तरी कसे ? श्रीमत् तोतापुरी चालत चालत जवळ जवळ पैलतीरापर्यंत गेले, तरी गगेत बुडण्याइतकेहि पाणी कोठे नसावे ? हळूहळू पलीकडील तीरावरची घरे आणि झाडेहि, त्या रात्रीच्या काळोखात दिसूं लागली ! तेव्हा आश्चर्याने चकित होऊन तोतापुरी स्वत शी म्हणाले, " काय ही दैवी माया ! मला बुडून मरण्यापुरतेहि पाणी आज नदींत नाही ! ईश्वराची ही काय अपूर्व लीला ! " इतक्यात आतूनच कोणी तरी त्याच्या बुद्धीवरील आवरण दूर केले आणि त्याच्या अंत करणात एकदम प्रकाश पडला !—

“ हा सारा त्या जगदंबेचा, त्या विश्वजननी, अचिंत्य शक्तिरूपिणी, मायेचा खेळ ! ही सारी तिचीच लीला ! जली, स्थली, काष्ठी, पाषाणी—सर्व ठिकाणी तीच माया, तीच जगदंबा ! शरीर तीच, मनहि तीच, भोगहि तीच, यातनाहि तीच, ज्ञान तीच, अज्ञानहि तीच, जन्म तीच, मृत्यूहि तीच ! दिसणारे न दिसणारे,समजणारे न समजणारे सर्व तीच ! मनबुद्धीच्या सीमेआत तीच ! त्याच्या सीमेपलीकडेहि तीच ! अघटनघटनापटीयसी तीच ! कर्तु-मकर्तु अन्यथाकर्तु समर्थ तीच ! तिची इच्छा नसेल तर, कोणालाहि तिच्या मायाजालामधून सुटता यावयाचे नाही ! तिची इच्छा नसेल तर मरण्याचे सुद्धा कोणामध्ये सामर्थ्य नाही ! इतके दिवस ब्रह्म या नावाने मी जिला ओळ-खून जिचें चिंतन करीत होतो तीच ही जगदंबा ! शिव आणि शिवशक्ति, ब्रह्म आणि ब्रह्मशक्ति एकच !”

रात्रीची वेळ ! अमावास्येसारखा अंधकार ! सर्व जगत् शांत—कुठेहि कशाचा आवाज नाही ! श्रीमत् तोतापुरी त्या गंगेच्या पाण्यात—त्यांना बुडून मरण्याइतकेहि पाणी नसलेल्या त्या गंगेच्या पाण्यांत—श्रीजगदंबेच्या अचिंत्य लीलेचे चिंतन करीत उभे ! त्यांना जिकडे तिकडे जगदंबाच दिसूं लागली आणि “ जय जगदंबे ” असा जयघोष करीत स्वत ला तिच्या पायी सर्वस्वी समर्पण करून, ते जसे गंगेत पुढे सरकत गेले तसेच मागे परतून हळूहळू निघाल्या ठिकाणी परत आले ! आणि तिरावर येऊन, तेथून पंचवटीखालील आपल्या धुनीजवळ जाऊन पोहोचले त्यांना आता शरीराच्या यातनांचें भानच नव्हते आणि मनालाहि एक प्रकारची अपूर्व शांतता प्राप्त झाली होती ! राहिलेली रात्र त्यांनी जगदंबेचे नामस्मरण करण्यात आणि ध्यानात घालविली.

पहाट होताच, नित्याप्रमाणे, श्रीरामकृष्ण त्यांच्या समाचारास येऊन पाहतात तों ते सर्वस्वी बदलून गेलेले ! मुखमंडल आनंदाने फुललेले, तोंडावर हास्याची छटा आणि शरीर तेज पुंज—जणु काय ते कधी आजारी होते की नव्हते !. श्रीरामकृष्णांना, आपल्याजवळ येऊन बसण्यास खुणेने सांगून, तोता-

पुरींनी रात्री घडलेली सर्व हकीगत हळूहळू त्याना सागितली ते म्हणाले, " हा आजारच माझा बधु झाला आणि त्यानेच, काल रात्रीं, मला श्रीजगदबेचे दर्शन घडविले इतके दिवस मी किती अज्ञानी होतो ! ते काही असो, तूं आपल्या आईला विचारून, मला आता येथून जाण्याची परवानगी द आता कुठे ही गोष्ट माझ्या लक्षात आली की, हा सारा तिचाच खेळ आहे माझे डोळे उघडण्यासाठी इतके दिवस तिनेच मला येथे राहण्याचा मोह उत्पन्न केला नाही तर मी येथून केव्हाच निघून जावयाचा पण तिची तशी इच्छा नव्हती आता मला येथून जाण्याला हरकत नाही, म्हणून तुला म्हणतो की, मला आता तिच्याकडून परवानगी मिळवून दे " हे ऐकून श्रीरामकृष्ण हसत हसत म्हणाले, " का ? झाली खात्री आता ? माझ्या आईला इतके दिवस मानीत नव्हता, नाही का ? आणि " शक्ति ' मिथ्या, ' ' झूट ' " असे म्हणून माझ्याशी वाद करीत होता, नाही का ? मला तिने कधीच समजावून दिले आहे की, ज्याप्रमाणे अग्नि आणि त्याची दाहक शक्ति एकच, त्याचप्रमाणे ब्रह्म आणि ब्रह्मशक्ति अगदी एकच आता तुम्हीच स्वत अनुभव घेतला, हे ठीक झाले !"

पहाट होऊन गेली नौबतखान्यात नौबती झडू लागल्या सनया सुस्वर आवाज काढून गाऊ लागल्या मदिरामध्ये श्रीजगन्माता आता उठली असेल या विचाराने, शिव आणि राम याच्याप्रमाणे गुरु व शिष्य या संबंधाने बद्ध झालेले हे दोघे महापुरुष उठले आणि श्रीजगदबेच्या मदिरात जाऊन त्यानी तिच्या चरणकमली साष्टाग प्रणिपात केला दोघानाहि खास वाटले की, आता मात्र श्रीजगदंबेने तोतापुरीना दक्षिणेश्वराहून जाण्याची, मोठ्या आनंदाने परवानगी दिली आहे यानंतर एक दोन दिवसानी श्रीमात् तोतापुरी श्रीरामकृष्णांचा निरोप घेऊन दक्षिणेश्वराहून पश्चिमेकडे कोठे तरी निघून गेले त्यानंतरची त्याच्याबद्दलची काहीच हकीगत समजली नाही

श्रीमत् तोतापुरीच्या सबधाने आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला म्हणजे, श्रीरामकृष्णाच्या तोडून ऐकलेल्या त्याच्या विषयीच्या बहुतेक सर्व

गोष्टी संपल्य। श्रीरामकृष्ण सागत असत की, श्रीमत् तोतापुरीना किमया ि अवगत होती आणि त्यानी कित्येकदा तिच्या योगाने ताबे वगैरे धातूंचे सोने केलें होतें त्याना ही विद्या गुरुपरंपरेने अवगत झाली होती ” तोतापुरी म्हणत असत की, “ या विद्येचा स्वत चा स्वार्थ साधण्याकडे अथवा भोग’ विलासप्राप्तीकडे कधीहि उपयोग करावयाचा नाही, असा सक्तीचा निर्बंध आहे केल्यास, ती विद्या नष्ट होऊन शिवाय गुरूंचेहि अकल्याग होते तरी पण मठामध्ये अनेक मंडळी असतात, त्याचा योगक्षेम चालविण्यासाठी–अथवा-त्याच्या तीर्थाटनास लागणाऱ्या खर्चासाठी या विद्येचा उपयोग करण्यास मोकळीक आहे ” असो

अशा रीतीने, तीन दिवसाऐवजी पुरे अकरा महिने दक्षिणेश्वरी राहून, आणि श्रीरामकृष्णाच्या जवळूनहि काही गोष्टी शिकून श्रीमत् परमहस तोतापुरी तेथून निघून गेल्यानंतर, ( १८६५-६६ ), श्रीरामकृष्गानी मनात असा निश्चय केला की, आता यापुढे, निर्विकल्प अद्वैत भावामध्येच निरंतर राहावयाचें आता मी, तूं, जगत् वगैरे सर्व कल्पना सोडून देऊन, श्रीभगवानाच्या अद्वय अखंड सच्चिदानदरूपामध्येच, एक होऊन राहावयाचे त्याच्या मनाने एकदा गोष्ट घेतल्यावर, ती अर्धवट करणे, त्याना कधीच माहीत नसे आताहि तीच गोष्ट ते निरतर समाधि-अवस्थेतच राहू लागले ! इतर सर्व विषयाचें तर राहोच, पग त्याना आपल्या शरीराचेहि भान राहीनासे झाले ! खाईन किंवा निजेन अथवा शौचादि नित्य व्यवहार करीन, या विचाराचाहि त्याच्या मनात उदय होईनासा झाला ! बोलणें, चालणें अजीबात बद झाले त्या अवस्थेत कुठलें “ मी आगि माझे ” आगि “ तू आणि तुझे ? ” द्वैत नाही आगि एकहि नाही ! कारण दोहोंची जिथे कल्पनाच नाही तिथे एकाची तरी कल्पना कशी यावी ! त्या अवस्थेत मनाच्या सर्व वृत्ति शात आणि स्थिर असतात ! केवळ —

किमपि सततबोधं केवलानंदरूपं
निरुपममतिवेलं प्रख्यमाख्याविहीनम् ।
निरवधिगगनाभं निष्कल निर्विकल्प
हृदि कलयति विद्वान् ब्रह्म पूर्णं समाधौ ॥
प्रकृतिविकृतिशून्य भावनातीतभावं–इ०

—विवेकचूडामणि

त्या अवस्थेत केवळ आनंद ! आनंद ! त्याला दिक् नाही, देश नाही, आलंबन नाही, रूप नाही, नाम नाही ! केवळ, अशरीरी आत्मा आपल्या अनिर्वचनीय आनंदमय अवस्थेत मनबुद्धिगोचर अशा सर्व प्रकारच्या भावाच्या पलीकडे, एक प्रकारच्या भावातीत अवस्थेत, स्थिर झालेला असतो शास्त्रामध्ये याच अवस्थेला " आत्म्याशी आत्म्याचे रमण " असे म्हटले आहे अशा या अनिर्वचनीय अवस्थेंत स्थिर होण्याला, त्याच्या मार्गांत काही एक अडथळा नव्हता. जगातील सर्व वस्तु, सर्व व्यक्ति, सर्व प्रकारच्या आशा, इच्छा याचा संबंध त्यानी कधीच तोडून टाकला होता कारण श्रीजगदंबेच्या दर्शनासाठी रात्रंदिवस तळमळ करीत असता त्यानी हे सर्व विजय तिच्या पादपद्मी अर्पण केलेच होते त्यावेळी त्यानी म्हणावे, " आई ! हे तुझे ज्ञान अज्ञान, धर्म अधर्म, चागले वाईट, पाप पुण्य, यश अयश, हे सर्व तुझे तूं घेऊन जा मला यांतील काहीहि नको, मला फक्त तुझ्या पादपद्मी शुद्धा भक्ति दे " अर्थातच या सर्वांचा त्यानी तेव्हा कायमचाच त्याग केला असल्यामुळे, आता त्याचें मन गुंतण्याला काहीच विषय राहिला नव्हता. एक श्रीजगदंबेची मूर्ति मात्र राहिली होती ! तिलाहि त्यानी, ज्ञानरूप तलवारीने आपल्या मार्गातून बाजूला काढून टाकले होते ! मग आता काय बाकी राहिले ? आता रात्रंदिवस त्या अनिर्वचनीय आनंदमय अवस्थेवाचून दुसरें काही उरले नाही !

या अवस्थेत श्रीरामकृष्ण एकसारखे सहा महिने राहिले ! ! ते म्हणत, " ज्या अवस्थेला पोहोचले असतां, साधारण साधक पुन्हा तेथून परत फिरूं

शकत नाहीत, एकवीस दिवसातच त्याचें शरीर पिकलेल्या पानाप्रमाणे गळून पडतें, त्या अवस्थेत आईच्या कृपेने पुरे सहा महिने होतों! दिवस केव्हा उगवला, रात्र केव्हा झाली याचेंहि बिलकुल भान नसे मेलेल्या माणसाच्या नाकातोंडात जशा माशा जातात तशा गेल्या तरी काही समजूं नये केस वाळून त्याच्या जटा झाल्या! नेसलेल्या वस्त्रातच विधि व्हावे, पण काही माहीत पडू नये! अशा स्थितीत शरीर टिकणे शक्य आहे काय? तें केव्हाच नष्ट झाले असते, पण त्याच सुमारास दक्षिणेश्वरीं एक साधु आला होता. त्याने बघताक्षणीं माझी अवस्था ओळखली आणि तो समजला की, या देहा-कडून श्रीजगदंबेची अनेक कामे अजून व्हावयाचीं राहिली आहेत, म्हणून याचे आपल्याला रक्षण करता आले तर अनेक लोकाचे कल्याण होईल त्याच्या जवळ एक रुळासारखी काठी होती त्या काठीने मारून मारून मला शुद्धीवर आणण्याचा त्याने प्रयत्न करावा! आणि मी जरासा शुद्धीवर आलोसा दिसले की, लगेच त्याने व हृदयने, एकदोन घास घशात कोंबावे! त्यातील काही अंश एखादे दिवशी घशाखाली उतरावा, एखादे दिवशी उतरूहि नये. असा प्रकार सहा महिनेपर्यंत चालला होता!! यानंतर काही दिवसानी जगदंबेचा आदेश झाला की "भावमुखी राहा. लोककल्याणासाठी भावमुखी राहा" त्यानंतर रक्त आमाशाने आजारी पडलों पोटदुखीने असह्य वेदना होत पोटामध्ये खुप मुरडा होई एकसारखे शौचास जावें लागे. अशा आजारीपणात सहा महिने गेल्यावर मग कुठे शरीराचें भान आलें, इतर लोकासारखी शुद्ध आली! नाहीतर, तोंपर्यंत, मधून मधून, मन आपोआप मोकळें सुटून, बघता बघता निर्विकल्प अवस्थेंत जाऊन मग्न होई!"

आणखी एक दिवस आपल्या अद्वैत अवस्थेसंबंधी बोलत असतां श्रीरामकृष्ण म्हणाले, "काय अवस्था येऊन गेली! कितीतरी दिवस हरगौरी भावाने घालविले! किती दिवस राधाकृष्ण भावाने, किती दिवस सीताराम भावाने! राधाभावाचें वेळी एकसारखा कृष्णाचा ध्यास! आणि सीताभावाचें वेळीं रामाचा!

तरीपण सगुणाने—लीलेनेच काही सारें संपत नाही या साऱ्या भावावस्थाच्या नंतर आईला म्हणालो, " पण, आई ! या साऱ्याना विच्छेद आहे; जिला विच्छेद नाही अशी माझी अवस्था कर ! " तेव्हा मग अखंड सच्चिदानद अवस्था प्राप्त झाली मन अखंडामधे लीन झालेले असे ! असे किती तरी दिवस गेले ! मनातला सारा भक्तिभाव नाहीसा होऊन गेला ! भक्ताची आठवणहि येईनाशी झाली ! डोके कसे जड होऊन गेले ! असे वाटे की प्राण जातो ! एकदा तर मनात आलें की, रामलालच्या चुलतीला बोलावून घ्यावे ! खोलीतली देवदेवताचीं सारी चित्रे काढून बाहेर फेकून दिलीं ! निर्विकल्प अवस्थेतून मन जेव्हा थोडेसें खाली उतरे तेव्हा प्राण कासावीस होई ! असे वाटायला लागले की, जिवंत तरी कशाच्या आधारावर राहावें ? तेव्हा मग भक्ति-भक्ताकडे मन लागूं लागले मग ज्याला त्याला विचारीत हिंडू लागलो-" हे मला असे काय झाले आहे ? " भोलानाथ म्हणाला-" याचे कारण भारतात सांगितले आहे समाधिस्थ पुरुषाचे मन जेव्हा समाधीमधून परत फिरतें, तेव्हा ते कशाच्या आधाराने राहावे ? म्हणून मग ते भक्ति व भक्त याच्या ठिकाणी रमू लागते तसें न होईल तर तें कशाच्या आधाराने राहावें ? "

आणि खरोखरच श्रीरामकृष्णाच्या महासमाधीच्या पूर्वी दहा वर्षे ( १८७६ सालीं ) ज्यानी श्रीरामकृष्णाना पाहिलें होते, अशांच्याहि तोंडून ऐकले आहे की, त्यावेळी देखील, श्रीरामकृष्णाच्या तोंडचे शब्द त्यांना फार करून ऐकावयास मिळत नसत चोवीस तास भावसमाधि लागलेलीच असे—मग बोलायचे कोणी ? नेपाळ दरबारचे कलकत्त्याचे वकील श्रीयुत विश्वनाथ उपाध्याय—याना श्रीरामकृष्ण कप्तान म्हणत असत—याच्या तोंडून ऐकले आहे की, त्यानी एकदा लागोपाठ तीन अहोरात्रीं श्रीरामकृष्णाना एकसारखे समाधिमग्न होऊन राहिलेले पाहिले आहे ! ते म्हणत, " त्याची समाधि जर अशी लांबली, तर त्यावेळी त्याच्या मानेपासून खाली माकडहाडापर्यंत आणि गुडघ्यापासून खाली

तळव्यापर्यंत, गाईचे तूप चोळून अंग खूप मर्दावे लागे, म्हणजे त्याची समाधि उतरून ते शुद्धीवर येत ! ”

श्रीरामकृष्णानी स्वत कित्येकदा तरी आमच्याजवळ म्हणून दाखविले आहे की “ माझ्या मनाची स्वाभाविक गति ऊर्ध्व दिशेकडे ( निर्विकल्प अवस्थेकडे ) आहे एकदा समाधि लागली म्हणजे तीतून उतरण्याची त्याची इच्छा नसते म्हणून तुमच्यासाठी त्याला जबरदस्तीने खाली आणावे लागते ! परंतु काही एखादी वासना शिल्लक असल्याशिवाय तर त्याला खाली आणता येत नाही म्हणून “ तमाखु पाहिजे ” “ पाणी प्यायचे आहे ” “ अमक्याला भेटायचे आहे ” अशी एखादी लहानसान वासना मनात जेव्हा काही वेळ एकसारखी घोळत ठेवावी, तेव्हा कुठे ते हळूहळू खाली उतरते ! एखादे वेळी खाली उतरता उतरता ते मधेच पुन्हा आपले मूळपदाकडे ( निर्विकल्प अवस्थेकडे धाव घेते मग पुन्हा एखाद्या वासनेचा जप करावा आणि पुन्हा त्याला खाली ओढावे ! ” असो

श्रीरामकृष्णाना रक्तअमांश होण्याचे सुमारास एक विशेष गोष्ट घडून आली मथुरानाथाची त्याच्यावर अपार भक्ति आणि अलौकिक प्रेम होतेच परतु या गोष्टीने तर त्याची भक्ति आणि प्रेम ही सहस्त्रपट वाढली मथुरानाथाच्या पत्नीला—श्रीमती जगदंबादासीला—या वेळी ग्रहणी रोग झाला मोठमोठ्या वैद्याची आणि डॉक्टराची औषधे देऊनहि काही फायदा न होता रोग उलट वाढत जाऊन असाध्य म्हणून ठरला.

श्रीरामकृष्ण सागत असत की, मथुरानाथ हे स्वरूपाने सुंदर होते त्यांचा जन्म दरिद्री कुळात झाला होता व त्याचें रूप आणि गुण पाहूनच राणी रासमणीने त्याना आपला जावई केले होते. अर्थातच विवाह झाल्यानंतरच त्याचे दारिद्रय नाहीसे झाले होतें आणि ते आपल्या बुद्धिबळाने आणि हुशारीनेच राणीचे उजवे हात होऊन बसले होते राणीच्या मृत्यूनंतर, ओघानेच, तिच्या

सर्व इस्टेटीची व्यवस्था त्याचेकडे आली होती आणि आता, जगदंबादासीचा या असाध्य दुखण्यात अंत झाल्यास त्याची राणीच्या इस्टेटीवरची मालकीहि जाण्याची वेळ आली होती यामुळे त्याचें मन यावेळी अत्यत अस्वस्थ होऊन गेलें.

रोग असाध्य आहे असें सागून डॉक्टर निघून गेल्यावर, मथुरानाथाच्या काळजाने ठाव सोडला व घरी बिलकुल चैन पडेनासे होऊन त्यानी एकदम दक्षिणेश्वर गाठले श्रीजगदबेचे दर्शन घेऊन श्रीरामकृष्णाना शोधीत शोधीत, ते पंचवटीपाशी आले तेथे श्रीरामकृष्ण होते त्याचें ते उतरलेले तोंड पाहून श्रीरामकृष्णानी त्याना आपल्या जवळ बसवून असे उदास होण्याचें कारण विचारले मथुरानाथाना दुःख आवरेनासे होऊन त्यानी श्रीरामकृष्णाच्या पायावर लोळण घातली आणि सद्गदित होऊन, अश्रु गाळीत, सर्व हकीगत त्याना सागत हुंदके देत म्हणाले, "माझे काय व्हायचे आहे ते तर होतच आहे, पण बाबा ! आता यापुढे तुमची सेवा मात्र मला अतरणार अस दिसते !" मथुरानाथाची ही दीनवाणी अवस्था पाहून श्रीरामकृष्णाचे हृदय कळवळले ते भावाविष्ट होऊन त्याना म्हणाले, "भिऊ नको, तुझी पत्नी बरी होईल" ! श्रीरामकृष्णाच्या तोडचे हे अभयवाक्य ऐकून मथुरानाथाच्या जीवात जीव आला ? कारण श्रीरामकृष्णाचे बोलणे कधीहि खोटे व्हावयाचे नाही असे त्याना माहीत होते घरी परत गेल्यावर त्याना समजले की, जगदंबादासीच्या आजाराची आणीबाणीची वेळ टळली असून तिच्या अवस्थेंत परिवर्तन झाले आहे ! श्रीरामकृष्ण म्हणत, "त्या दिवसापासून जगदंबादासीची प्रकृति सुधारत चालली आणि तिचा सारा रोग ( स्वत कडे बोट करून ) या शरीरावर येऊन बसला ती बरी झाल्यावर मला मात्र सहा महिनेपर्यंत, पोटशूळ, रक्तअमाश आणि इतरहि व्याधी यानी तळमळत पडावें लागलें !"

अशा रीतीने सहा महिनेपर्यंत श्रीरामकृष्ण आजारी होते हृदय सदोदित त्याची सेवाशुश्रूषा करण्यात मग्न असे. मथुरबाबूंनी त्याना सुप्रसिद्ध वैद्य

गंगाप्रसाद सेन याचे औषध सुरू करून, त्याच्या पथ्यपाण्याचा नीट बंदोबस्त केला श्रीरामकृष्णाचे शरीर आपला भोग भोगीत होते आणि मन आपल्या दिव्यानंदात निमग्न होतें साधारण बाह्यजगताकडे मन नुकते कोठे येण्याला सुरुवात झाली होती परंतु त्याची स्वाभाविक गति अजून निर्विकल्प अवस्थेकडे धाव घेण्याचीच असल्यामुळे, अगदी लहानसहान कारणाने सुद्धा त्याची एकदम समाधि लागे याच सुमारास दक्षिणेश्वरी सन्यासी मंडळीचे मेळेच्या मेळे येण्यास सुरुवात झाली रात्रंदिवस या मंडळीचा वेदातविषयक वादविवाद चाले आणि आपला शरीरभोग भोगीत असता, श्रीरामकृष्ण तो वाद ऐकत असत आणि एखाद्या प्रश्नाचा नीट निकाल लागेनासा झाल्यास, दोन चार सोप्या सोप्या गोष्टीनी त्याचा ते असा निकाल लावीत की, त्या मंडळीचें त्यायोगें समाधान होऊन त्याचा वाद मिटून जाई !

अद्वैत भावभूमीत वास्तव्य करून या वेळी श्रीरामकृष्णाना एक तत्त्व, पूर्णपणे कळून आले ते हे की, अद्वैतभावामधे स्थिर होणे, हेच सर्व प्रकारच्या साधन-भजनादिकाचे अंतिम ध्येय आहे. कारण आतापर्यत भारतवर्षातील सर्व प्रचलित धर्मसप्रदायाप्रमाणे साधना करून त्याना असा प्रत्यक्ष अनुभव आला होता की, यापैकी कोणत्याहि मताच्या साधना केल्या तरी शेवटी साधकाला एकाच प्रकारची अवस्था प्राप्त होते व ती अवस्था म्हणजे अद्वैत अवस्था या अवस्थेसबधी त्याना कधी विचारले असता ते म्हणत, “ ती म्हणजे अगदी अखेरची स्थिति आहे ईश्वरप्रेमाच्या अत्युच्च अवस्थेमध्ये साधकाला ती आपोआप प्राप्त होते सर्व मताचे अंतिम ध्येय तीच अवस्था आहे आणि हेहि लक्षात ठेवा की जितकीं मते तितके मार्ग ” असो

पोटशूळ आणि रक्तआमाश यांनी सहा महिनेपर्यंत अत्यंत क्लेश भोग-ल्यावर हळूहळू श्रीरामकृष्णांची प्रकृति सुधारत चालली व कांही दिवसानी

ते पहिल्यासारखे झाले त्याची प्रकृति नीट सुधारल्यावर, थोड्याच दिवसात आणखी एक विशेष महत्त्वाची गोष्ट घडून आली ती म्हणजे गोविंदराय नामक एका मुसलमानी साधकाचें दक्षिणेश्वरी आगमन ही होय. (सन १८६६-६७)

---

## २. इस्लामधर्मसाधना व जन्मभूमिदर्शन
### ( १८६६–६७ )

गोविंदराय हे मूळचे जातीने क्षत्रिय होते त्याना अरबी व फारसी या भाषा चागल्या अवगत होत्या निरनिराळ्या धर्माचा अभ्यास करता करता, त्याचे लक्ष मुसलमानी धर्माकडे वेधले व सर्व धर्मात तोच धर्म पसत पडून, त्यानी मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली व तेव्हापासून ते कुराणाचे वाचन व त्यात सागितल्याप्रमाणे साधनाचे अनुष्ठान, यातच निमग्न होऊन राहू लागले त्याचा स्वभाव अत्यत प्रेमळ असे बहुधा ते इस्लाम धर्माच्या, सुफी सप्रदायाचे अनुयायी असावेत दक्षिणेश्वरी येण्याचे त्याना काय कारण होते हे काही सागवत नाही तरी पण या सुमारास ते दक्षिणेश्वरी आले व कालीमदिराजवळच्या पंचवटीखाली त्यानी आपले आसन माडलें त्यावेळी राणी रासमणीच्या अतिथिशालेत हिंदु सन्याशाप्रमाणे मुसलमान फकीराचीहि व्यवस्था होत असे, म्हणून भिक्षेबद्दलची सर्व काळजी नाहीशी होऊन, गोविदराय तेथे मोठया आनंदाने दिवस काढू लागले

प्रेमळ स्वभावाच्या गोविदरायाची व श्रीरामकृष्णाची लवकरच गट्टी जमली व गोविंदरायाचा सरळ विश्वास व ईश्वरप्रेम पाहून, ते फार मोहित झाले. अशा रीतीने श्रीरामकृष्णाची इस्लाम धर्माशी ओळख झाली गोविंदरायाच्या सगतींत काही दिवस घालविल्यावर त्याना वाटू लागले की, “ हा सुद्धा ईश्वरप्राप्तीचाच एक मार्ग नाही का ? अनंतलीलामयी जगदबा, या मार्गाने सुद्धा कितीएक लोकाना आपले दर्शन देऊन धन्य करीत नाही काय ? तर मग या मार्गाने जाणाऱ्याना, ती कशा रीतीने कृतार्थ करते, हें अवश्य पाहिले पाहिजे.

कदाचित् गोविंदरायानासुद्धा तिने याच उद्देशाने येथे आणले असेल ! त्याच्याच जवळ या मार्गाची दीक्षा घ्यावी म्हणजे झाले "

मनामध्ये एखादी इच्छा उत्पन्न झाली व ती त्यानी पूर्ण करून घेतली नाही, असे कधीच झाले नाही त्यानी लगेच आपली इच्छा गोविंदराया-जवळ प्रदर्शित केली आणि इस्लाम धर्माची दीक्षा घेऊन यथाविधि साधना-नाहि सुरुवात केली ! श्रीरामकृष्ण म्हणत, " त्यावेळी मी 'अल्ला' मन्त्राचा जप करीत असे, कासोटा न घालता धोतर नेसत असे, तीन वेळां नमाज पढत असे त्यावेळी मनातील हिंदुभाव निःशेष नाहीसा झाला होता आणि हिंदु देवदेवताना प्रणाम करणे दूरच राहिलें पण, त्याचे दर्शनसुद्धा घेण्याकडे मनाची प्रवृत्ति होत नसे ! अशा रीतीने तीन दिवस गेल्यावर इस्लाम धर्माचें अंतिम ध्येय मला प्राप्त झाले प्रथम एका लांब दाढी वाढलेल्या गंभीर, भव्य आणि ज्योतिर्मय दिव्य पुरुषाचें दर्शन होऊन, मग माझे मन अद्वैत भावामधे लीन होऊन गेले ! "

हृदय सांगत असे, ' इस्लामधर्मसाधनेचे वेळी खाणे पिणे सुद्धा अगदी थेट मुसलमानाप्रमाणे करण्याची श्रीरामकृष्णाना उत्कट इच्छा उत्पन्न झाली ! एवढेच काय पण त्याना गोमांससुद्धा खाण्याची प्रबल इच्छा उत्पन्न झाली होती ! ! केवळ मथुरबाबूंच्या अत्याग्रहावरून आणि विनंतीवरून, आपली ही इच्छा त्यानी दाबून टाकली परंतु बालकस्वभाव श्रीरामकृष्ण एखादा हट्ट धरून बसल्यास तो पूर्ण केल्यावाचून गत्यंतर नाही, असें जाणून मथुरबाबूंनी एक मुसलमानी आचारी आणविला आणि त्याच्या देखरेखीखाली एका ब्राह्मण स्वयंपाक्याकडून त्याच्यासाठी मुसलमानी पद्धतीचें जेवण तयार करविण्याची व्यवस्था केली ! त्या तीन दिवसात श्रीरामकृष्णानी कालीमंदिराच्या आवारात एकदाहि पाऊल टाकले नाही ! आवाराच्या बाहेर असलेल्या मथुरानाथाच्या नेहमीच्या उतरण्याच्या जागेंत ते राहात असत. "

इस्लामधर्मसाधनेसंबंधी एवढीच माहिती आम्ही श्रीरामकृष्ण व हृदय याच्या तोडून ऐकली आहे इस्लामधर्मसाधनेचे अंतिम फल प्राप्त करण्यास श्रीरामकृष्णाना तीनच दिवस लागले!

श्रीरामकृष्णाची प्रकृति नुकतीच कोठे सुधारली होती व इतक्यात पुन पावसाळ्याचे दिवस आले त्या दिवसात गगेचें पाणी गढूळ असल्यामुळे, पिण्याला स्वच्छ पाणी न मिळाल्यास, त्याच्या पोटात पुनः काही बिघाड होईल, या भीतीने त्यानी काही दिवस कामारपुकुरासच जाऊन राहावें असे मथुरबाबू वगैरे मडळीनी ठरविले तयारीला सुरुवात झाली. कामारपुकुरचा श्रीरामकृष्णाचा ससार म्हणजे शिवाचा ससार, ही गोष्ट मथुरबाबू व त्याची भक्तिमती पत्नी जगदंबादासी या दोघानाहि पूर्ण माहीत होती. म्हणून, तेथे असताना "बाबा" ना कोणत्याहि प्रकाराने त्रास होऊ नये व त्याची सर्व व्यवस्था नीट व्हावी म्हणून त्या दोघानीहि आठवण करकरून, संसाराला लागणारे सर्व प्रकारचे सामान व बाबाना लागणाऱ्या सर्व वस्तु जमवून, त्या त्याच्याबरोबर दिल्या! शुभ मुहूर्त पाहून, मडळी गावी जाण्यास निघाली श्रीरामकृष्णाबरोबर हृदय व ब्राह्मणी ही दोघे होती श्रीरामकृष्णाच्या वृद्ध मातोश्रीनी दक्षिणेश्वरासच जन्मभर राहाण्याचे ठरविल्यामुळे त्या या मंडळीबरोबर गेल्या नाहीत

यापूर्वी आठ वर्षे श्रीरामकृष्ण कधीच आपल्या गावी गेले नव्हते. अर्थातच त्याची भेट होऊन इतकीं वर्षे झाल्यामुळे त्याची आप्त मडळी व गावातील सर्व लोक त्याच्या भेटीविषयी फार उत्सुक झाले होते या आठ वर्षात त्याच्या कानावर श्रीरामकृष्णाच्या सबंधाने तऱ्हेतऱ्हेच्या बातम्या गेल्या होत्या, कधी काय तर बायकाचाच वेष घेऊन "हरि हरि" म्हणत असतात, तर कधी "अल्ला अल्ला" असे म्हणत असतात, आज काय रामाच्याच नांवाचा गजर, तर उद्यां काय "आई आई" असाच एकसारखा आक्रोश, असा काही तरी निरनिराळा प्रकार एकसारखा चालू असतो—असें त्या मंडळींना कळले होतें.

अर्थातच, आता ते स्वत च येथे येत आहेत, तेव्हा खरा प्रकार काय आहे तो प्रत्यक्षच पाहावयास सापडेल, म्हणून लोकाना त्याच्या भेटीची मोठी उत्कंठा लागली होती

श्रीरामकृष्ण आपल्या गावीं पोहोचले, परंतु काय? मंडळीना तर त्याच्या पूर्वीच्या आणि आताच्या वर्तनात आणि स्वभावात काहीच फरक दिसेना! तोच प्रेमळ विनोदी स्वभाव, तीच सत्यनिष्ठा, तीच धर्मपरायणता, तोच ईश्वराच्या नामस्मरणी उल्हास—सर्व काही पूर्वीसारखेच होतें बदल झाला होता तो इतकाच, की ते पूर्वीपेक्षा जास्त अंतर्मुख वृत्तीने राहात असत व त्याच्या तोंडावर एक प्रकारचें गाभीर्य झळके, यामुळे त्याच्यासमोर एकदम येण्याचा अथवा त्याच्याशी क्षुद्र सासारिक गोष्टी बोलण्याचा लोकानाच सकोच वाटूं लागला होता ते कसेंहि असो, परतु श्रीरामकृष्ण आपल्या गावात राहूं लागल्यापासून, तेथे पूर्वीसारखा आनंदाचा बाजार भरू लागला! श्रीरामकृष्ण पुष्कळ दिवसानी आल्यामुळे घरच्या मंडळीनी, त्याच्या पत्नीसहि तेथे आणण्यासाठी जयरामवाटीस माणसे धाडली या गोष्टीबद्दल स्वत श्रीरामकृष्णानी काहीच समति अगर नाखुषी प्रदर्शित केली नाही विवाह झाल्यापासून फक्त एकदाच त्याच्या पत्नीने त्याना पाहिलें होते तिला सातवे वर्ष लागल्यावर, कुळातल्या चालीप्रमाणे, श्रीरामकृष्ण आपल्या सासुरवाडीस एक दिवस जाऊन आले होते, तेव्हाच काय ते तिने त्याना पाहिले होते परंतु तेव्हा तरी काय, ती अगदीच लहान होती आणि त्यावेळची तिला एवढीच आठवण होती की, श्रीरामकृष्ण आल्यानंतर घरात कोठे तरी दडून बसावे, असे वाटून तिने पुष्कळ खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाही कारण घराजवळच्या एका तळ्यातून हृदयने त्यावेळी कांही कमळें आणलीं व तिला घरांतून हुडकून काढले व त्य कमळांनी तिला श्रीरामकृष्णांच्या पादपद्माची पूजा करावी लागली! यानंतर पुढे सहा वर्षांनी, तिला तेरावे वर्ष लागल्यावर, कामारपुकुरास एक महिनाभर राहाण्यास नेलें होते; परतु त्यावेळीं श्रीरामकृष्ण व त्याची मातोश्री ही दोघेहि

दक्षिणेश्वरीच असल्यामुळे, तिने त्यावेळीं या दोघापैकी कोणासच पाहिले नाही. त्यानंतर सहा महिन्यानी पुन दीड महिनाभर ती कामारपुकुरास सासरी राहिली होती, परतु तेव्हाहि असेच झाले म्हणून तिची व श्रीरामकृष्णाची ही लग्नानंतर पहिलीच भेट म्हणावयास हरकत नाही

या खेपेस कामारपुकुरास श्रीरामकृष्ण सहा सात महिने राहिले त्याची लहानपणची तेथे असलेली सर्व मित्रमडळी त्याच्याभोवती जमा झाली व त्याना पाहून श्रीरामकृष्णानाहि आनद झाला एखादा मनुष्य दिवसभर काबाडकष्ट करून घरी आपल्या मुलामाणसात आला म्हणजे त्याला जसा आनद होतो, तसाच प्रकार, आज आठ वर्षाच्या कठोर तपश्चर्येनतर आपल्या गावी येऊन श्रीरामकृष्णाचा झाला तरी पण, ऐहिक सुखाच्या नश्वरतेचे त्याना आता पूर्ण ज्ञान झाले असल्यामुळे, हास्यविनोदाच्या भरातहि, आपल्याकडे येणाऱ्या मडळीचे ईश्वरप्राप्तीकडे कसे लक्ष लागेल, इकडे त्याची सदोदित दृष्टि असे त्याच्याभोवती यावेळी सदोदित माणसाचा गराडा पडलेला असे. लहानापासून म्हाताऱ्यापर्यंत, गरीबापासून श्रीमतापर्यंत, सर्वजणाना त्याच्या सगतीत असावे असे वाटे धर्मदास लाहाची भक्तिमती विधवा भगिनी प्रसन्न, कुमारी, तिचा मुलगा व श्रीरामकृष्णाचा लहानपणचा सोबती गयाविष्णु लाहा, सरळ स्वभावाचा आणि श्रद्धावान श्रीनिवास शाखारी, पाईनबाबूच्या घरच्या भक्तिपरायण स्त्रिया, श्रीरामकृष्णाची भिक्षामाता धनी, वगैरे मडळी नेहमी त्याच्याजवळ असत त्याची भक्ति, सरळ स्वभाव, श्रद्धा वगैरेसबंधी अनेक गोष्टी श्रीरामकृष्ण आम्हाला नेहमी सागत या मडळीशिवाय ज्या कोणाला त्याच्याजवळ नेहमी राहणे शक्य नसे, ते लोक सकाळी अथवा दुपारी अथवा सध्याकाळी वेळ सापडताच, त्याच्याकडे येऊन चार गोष्टी बोलून जात कोणाच्या घरी काही विशेष कारणाने पक्वान्न केल्यास त्यातील काही भाग श्रीरामकृष्णासाठी निराळा काढून ठेवून, तो ती मडळी मोठया प्रेमाने आणि भक्तीने त्याना आणून देत !

त्यानी स्वत इच्छा अनिच्छा काहीएक न दर्शविता, मंडळीनी जेव्हा त्याच्या पत्नीस कामारपुकुरास आणले, तेव्हा पत्नीला नीट शिक्षण देण्याचे आपले कर्तव्य, व्यवस्थित रीतीने पार पाडण्याचा त्यानी निश्चय केला श्रीरामकृष्णाचा विवाह झालेला आहे, असे जाणून त्याचे सन्यासाश्रमाचे गुरु श्रीमत् तोतापुरी त्याना एकदा म्हणाले होते की, “ विवाह झाला असला म्हणून काय झाले ? स्त्री जवळ असताना सुद्धा ज्याचा त्याग, वैराग्य, विवेक, विज्ञान जसेच्या तसे राहतात, तोच खराखरा ब्रह्मज्ञानी आणि त्याच्यामधेच ब्रह्मज्ञान खरे खरे बाणले स्त्री व पुरुष ही भेदभावाची कल्पनाच ज्याच्या मनातून समूळ नाहीशी झाली त्याच्याच अगी ब्रह्मज्ञान खरे खरे बाणले ज्याच्या मनातील स्त्री व पुरुष हा भेदभाव नष्ट झाला नाही, त्याला ब्रह्मज्ञान होण्याला अजून अवकाश आहे असे समजावे ” श्रीरामकृष्णाना, आपली इतके दिवसाची तपश्चर्या कसाला लावण्याची ही चागली सधि चालून आली असे वाटले व त्याबरोबर आपल्या पत्नीला योग्य ते शिक्षणहि देण्याचा त्यानी निश्चय केला.

गृहकर्मे कशी करावी एथून आरंभ करून, लोकाचा स्वभाव कसा ओळखावा, पैशाचा सद्व्यय कसा करावा, व्यवहारात कोणाशी, कोठे, केव्हा कसे वागावे आणि परमेश्वराच्या चरणी आपला सर्व भार समर्पण करून कसे राहावे, वगैरे गोष्टीचे आपल्या पत्नीला नीट शिक्षण देण्यास एव्हापासून त्यानी सुरुवात केली स्वत श्रीमाताजी यासबंधाने काय म्हणत असत, ते मागे सागितलेच आहे ( भाग १ पान २१३ ) यावरून असे स्पष्ट दिसून येईल की, श्रीरामकृष्णानी आपले या बाबतीतले कर्तव्य अगदी पूर्णपणे पार पाडले येथे एवढेच सागितले म्हणजे पुरे की, श्रीरामकृष्णाच्या या शिक्षणाने आणि कामगंधहीन दिव्य प्रेमाने, श्रीमाताजीची पारमार्थिक उन्नति झपाट्याने होत जाऊन प्रत्यक्ष निर्विकल्पसमाधीपर्यंत त्यानी मजल गाठली आणि श्रीरामकृष्णाची इष्टदेवताज्ञानाने त्या आमरण पूजा करीत राहिल्या

श्रीरामकृष्णानी आपल्या पत्नीला सर्व प्रकारचे शिक्षण देण्यास सुरुवात केली परंतु श्रीरामकृष्णाच्या ह्या कृतीचा ब्राह्मणीस समज पडेना संन्यासदीक्षा घेण्याचे वेळीहि असेच झाले होते तिला वाटले होते की, संन्यास घेतल्यास श्रीरामकृष्णाचे ईश्वरप्रेम समूळ नाहीसे होईल तशीच यावेळींहि तिची अशी चुकीची समजूत झाली की, आपल्या पत्नीशीं श्रीरामकृष्णानी जर अधिक संबंध ठेवला तर त्यांच्या ब्रह्मचर्याची हानि होईल व तसे तिने श्रीरामकृष्णाना म्हणूनहि दाखविलें परंतु यावेळींहि श्रीरामकृष्णानी, पूर्वीप्रमाणेच, तिच्या म्हणण्याकडे लक्ष दिलें नाही यामुळे तिला त्यांचा रागहि आला व पुढे पुढे तर तिचा अभिमान जागृत होऊन, श्रीरामकृष्णावरील तिची श्रद्धा काही काळपर्यंत नाहीशीहि झाली होती ! हृदय सांगत असे की, हा तिचा स्वभाव कधी कधी उघडपणे दिसूनहि येई उदाहरणार्थ—एखादा आध्यात्मिक विषय तिच्याजवळ काढून, जर कोणी म्हणाला की, "याविषयी श्रीरामकृष्ण देवाचें मत काय आहे ते पाहिलें पाहिजे," तर यावर ती रागावून म्हणे, "तो आणीक काय जास्त सांगणार! त्याला तरी ज्ञान कोणी मीच दिलें ना?" अथवा एखाद्या क्षुल्लक कारणावरून अथवा काही कारण नसता, घरातील बायकामंडळीवर तिने उगीच रागवावे श्रीरामकृष्णानी मात्र तिकडे मुळीच लक्ष दिले नाही आणि तिच्याशीं आपले भक्तीचे व प्रेमाचें वर्तन पूर्वीप्रमाणेच कायम ठेविलें श्रीरामकृष्णाच्या सांगण्यावरून माताजीहि ब्राह्मणीचा आपल्या सासूसारखा मान ठेवीत आणि सदैव तिच्या आज्ञेंत वागत

> क्रोधात् भवति संमोहः संमोहात् स्मृतिविभ्रमः
> स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशो—

असेंच या सुमारास ब्राह्मणीचें होऊ लागले, कोठे कसें वागावे हे तिला समजेनासे होऊ लागलें कामारपुकुरासारख्या लहानशा खेड्यात समाजबंधनें शिथिल नसल्यामुळें, मनुष्याला—त्याचा हेतु कितीहि चांगला व शुद्ध असला तरी—वाटेल तसें वागता येत नाही, हें तिच्या लक्षात न राहिल्यामुळे त्यावेळीं एक दिवस चांगलाच भांडाभांडीचा प्रसंग आला

श्रीनिवास शाखारीचा मागेच उल्लेख आला आहे त्याची जात जरी उच्च नसली, तरी ईश्वरभक्तीत तो अनेक ब्राह्मणापेक्षाहि श्रेष्ठ होता एक दिवस तो श्रीरामकृष्णाच्या घरी जेवावयास आला होता दोन प्रहरपर्यंत भक्तिविषयक अनेक गोष्टी झाल्या प्रत्यक्ष ब्राह्मणीलाहि त्याची भक्ति आणि विश्वास पाहून फार संतोष झाला. श्रीनिवासचें जेवण झाल्यावर, खेडयातील रिवाजाप्रमाणें, श्रीनिवास आपले उष्टे काढून टाकूं लागला, परंतु ब्राह्मणी त्याला तसे करू देईना ती म्हणाली, “ तू स्वस्थ बैस तुझें उष्टें मी काढून टाकते ” अर्थातच ब्राह्मणीसमोर त्याला काही बोलवेना व तो आपले उष्टे न काढताच आपल्या घरी निघून गेला श्रीनिवासचे उष्टें ब्राह्मणी काढणार आहे, अशी बातमी बायकामध्ये तेव्हाच पसरली व बायकामध्ये याविषयी वाद सुरू झाला जवळपासच्याहि बऱ्याचशा बायका तेथे जमल्या आणि वादाला भलताच रंग चढला ही गोष्ट हृदयच्या कानावर गेली व “ या वादाचा भलताच परिणाम होईल, तुम्ही त्याचें उष्टे काढू नका, ” असें त्याने परोपरीने ब्राह्मणीला समजावून सांगितलें, तरी ती आपला हट्ट सोडीना हृदयलाहि खूप संताप आला व त्याचे आणि ब्राह्मणीचे कडाक्याचें भांडण जुंपलें. शेवटी तो म्हणाला, “ तुम्हाला आपलाच हट्ट चालवायचा असेल तर मी तुम्हांला या घरात काही राहू देणार नाही ” ब्राह्मणीनेहि उत्तर दिलें, “ नाही तर नाही तुझ्या घरावाचून काही माझे नडायचें नाही, समजलास ? शीतलादेवीचें मंदिर तर नाही कुठे गेलें ? मी तिथे जाऊन राहीन !” एवढया थरावर जेव्हा गोष्ट गेली, तेव्हा घरातली सारी मंडळी मध्ये पडली व त्यानी ब्राह्मणीची कशीबशी समजूत घालून हा वाद एकदाचा मिटविला

ब्राह्मणी गप्प बसली खरी, पण तिच्या मनाला ही गोष्ट फार लागली रागाचा भर ओसरल्यावर, या घडलेल्या प्रकाराचा, तिने शांतपणे आपल्या मनाशीच विचार केला व एकंदरीने झाली ही गोष्ट काही ठीक झाली नाही, असे तिला समजून चुकलें आणि इतके भांडण झाल्यावर व एकमेकाचीं मने इतकीं कलुषित

झाल्याकर, याउपर येथे राहगे योग्य नाही, असे तिने जागले तसेच श्रीराम-कृष्णाविषयीचे आपल्या मनातील प्रेम आणि भक्ति हींहि कमी होण्यास मूळ कारण काय, तेहि तिच्या लक्षात येऊन तिला स्वत चाच राग आला आणि आपल्या वर्तनाचा तिला अतिशय पश्चात्ताप झाला

यानंतर थोडयाच दिवसानी, एक दिवस तिने अत्यत भक्तिभावाने श्रीरामकृष्णाची श्रीगौरागज्ञानाने पूजा केली आणि आपल्या सर्व अपराधा-बद्दल त्याची क्षमा मागून, तेथून जाण्याविषयी त्याचा निरोप घेतला यात्रमाणे श्रीरामकृष्णाच्या दिव्य संगतीत सहा वर्षे राहून भैरवी ब्राह्मणीने काशीस प्रयाण केले

याप्रमाणे सहासात महिने कामारपुकुरास राहून श्रीरामकृष्ण १८६७ च्या आक्टोबर अथवा नोव्हेबर महिन्यात दक्षिणेश्वरी परत आले परत आल्यावर थोडयाच दिवसात त्याच्या आयुष्यात आणखी एक विशेष गोष्ट घडून आली ती गोष्ट म्हणजे श्रीरामकृष्णाची तीर्थयात्रा

# ३. श्रीरामकृष्णांची तीर्थयात्रा

( १८६८ )

" ज्याच्या हृदयात भक्तिभाव असतो, तो तीर्थयात्रेस गेला तर त्याचा तो भाव अधिकच वाढतो ज्याच्या हृदयात भक्तिभावच नाही, त्याला तीर्थयात्रेपासून काही फायदा होणार नाही "

" देवस्थाने, तीर्थे याच्या दर्शनानंतर ' रवंथ ' करीत जावी "

" मथुरबाबूने तीर्थयात्रेसाठी एक लक्ष रुपयाहून अधिक खर्च केला. "

—श्रीरामकृष्ण

---

श्रीरामकृष्णांच्या आयुष्यांतील अगदी सामान्य गोष्टीचाहि नीट विचार केला तर त्या अर्थपूर्ण दिसतात त्यातील एकहि उद्देशविहीन दिसत नाही मग मोठमोठ्या गोष्टीविषयी तर बोलावयासच नको श्रीरामकृष्णाची तीर्थयात्रा हा एक त्याच्या आयुष्यातील विशेष प्रसंग आहे म्हणून या त्याच्या तीर्थयात्रामधे काय अर्थ भरलेला आहे त्याचा येथे थोडक्यात विचार करू

श्रीरामकृष्णाच्या दिव्य ईश्वरप्रेमाचा, त्याच्या अलौकिक चारित्र्याचा व त्याच्या अपूर्व आणि उदार आध्यात्मिक उपलब्धीचा व शक्तिसंचयाचा सर्व जगामधे विस्तार होण्याला सुरुवात प्रथम त्याच्या साधनाकालापासूनच

झाली मागें आपण पाहिलेच आहे की, ज्या वेळी श्रीरामकृष्ण एखाद्या भावा-मधे सिद्ध होत, त्यावेळी त्या त्या भावाचे अनेक साधक तेथे येऊन, त्या त्या भावाचा पूर्णादर्श श्रीरामकृष्णाच्या ठिकाणी पाहून व आपल्या साधनेमधे त्याच्या कडून साहाय्य मिळवून आपापल्या वाटेने निघून जात या साधनाकाला-नंतर, त्याच्या अलौकिक दिव्य शक्तीचा विस्तार त्याच्या तीर्थयात्रेच्या वेळी झाला त्या वेळीहि श्रीरामकृष्ण अनेक तीर्थाचे ठिकाणी गेले असता, तेथेहि त्याच्या आध्यात्मिक शक्तिसचयाचा तेथील साधकावर परिणाम झाला म्हणून असे वाटते की, निरनिराळ्या ठिकाणच्या यथार्थ साधकाना आपापल्या भावाचा पूर्णादर्श दिसावा असाहि कदाचित् त्याच्या तीर्थयात्राचा उद्देश असेल

श्रीरामकृष्ण म्हणत असत, " सोगटी पटाची घरें जेव्हा फिरून येते, तेव्हाच ती पक्कन आपल्या घरी निजते एखादा अगदी हलक्या दर्जाच्या मनु-ष्यापासून तों सार्वभौम बादशहापर्यत ससारातील सर्व प्रकारच्या लोकाच्या अवस्था पाहून, ऐकून, अनुभव घेऊन, मग या सर्व तुच्छ, असार आहेत अशी जेव्हा मनाची दृढ धारणा होते, तेव्हाच साधकाला परमहंस अवस्था प्राप्त होते व तो यथार्थ ज्ञानी होतो " ही झाली साधारण साधकाची स्वत पुरती गोष्ट मग ज्याला जगद्गुरु व्हावयाचें असतें, त्याला आणखी केवढा प्रयास करावा लागत असेल ? श्रीरामकृष्ण यासबंधाने म्हणत, " आत्महत्या करायला एखादी सुई सुद्धा पुरी होते, पण तेच जर दुसऱ्याला मारायचें असेल तर ढाल अन् तलवार वगैरे सगळीं आयुधे पाहिजेत ! " हीच गोष्ट, जो जगद्गुरु होणार असतो त्याला लागू आहे त्याला सर्व प्रकारच्या आध्यात्मिक अवस्थाचें पूर्ण ज्ञान पाहिजे, तरच तो दुसऱ्याचे संशय निवारण करून, त्याना योग्य मार्ग दाखवील यासाठी पूर्वीच्या अवतारानी आणि आचार्यानी घालून दिलेल्या उन्नतीच्या सर्व मार्गांची नीट माहिती करून घेऊन, लोक त्याप्रमाणे चालत आहेत की नाही हें पाहून, नसल्यास तसें असण्याची कारणें शोधून काढून, मग सध्याच्या कालाला योग्य असा मार्ग त्याला काढावयाचा असतो आणि याचसाठी

सांप्रत युगावतार श्रीरामकृष्ण, यांना देशाची आध्यात्मिक स्थिति सध्या कशी काय आहे, हे माहीत असणे आवश्यक होते व हें कार्य त्यांच्या तीर्थयात्रांनी बरेचसे साध्य झाले

याशिवाय शास्त्रदृष्टीने पाहिले असताहि त्यांच्या तीर्थयात्रांचे आणखी एक कारण दिसून येते शास्त्रें सांगतात की, ईश्वरदर्शनाने धन्य झालेल्या महापुरुषांच्या आगमनाने तीर्थांचे तीर्थत्व कायम राहते असे महापुरुष त्या ईश्वराच्या एखाद्या विशेष प्रकारच्या दर्शनासाठी व्याकुळ होऊन येतात व त्या ठिकाणीं राहतात, म्हणून त्या जागी नवीन नवीन ईश्वरीय भाव उत्पन्न होत असतात अथवा पूर्वीचे असलेले भाव अधिक जागृत होत असतात आणि म्हणून अशा ठिकाणी साधारण मनुष्य गेल्यास, तेथील त्या ईश्वरीय भावाचा त्याचेवर काही ना काही परिणाम होतोच होतो तीर्थांचा विषय निघाल्यामुळे चाललेल्या विषयाशी जरी साक्षात् संबंध नसला, तरी, तीर्थासंबंधी श्रीरामकृष्ण काय म्हणत हे येथे थोडक्यात सांगितल्यास अस्थानीं होणार नाही तीर्थासंबधी श्रीरामकृष्ण म्हणत असत, “ईश्वराच्या दर्शनाची तळमळ लागून ज्या ठिकाणीं अनेक साधक जप, तप, अनुष्ठान इत्यादि करीत आले, त्या ठिकाणी ईश्वराचा प्रकाश निःसंशय आहे असे समजा त्या ठिकाणी, साधकाच्या भक्तीच्या उत्कट-तेने ईश्वरीय भावना एकत्रित होऊन त्यांच्या योगाने तेथील वातावरण सुद्धा भरून गेलेले असते! म्हणून, अशा ठिकाणी साधकाचे ईश्वरीय भाव तेव्हाच जागृत होतात ईश्वराचें दर्शन घेण्याच्या हेतूने, त्या ठिकाणी, पुरातन काळा-पासून किती साधु, किती भक्त, किती सिद्ध पुरुष येऊन गेलेले असतात, साऱ्या वासना सोडून देऊन, त्या ठिकाणी त्यांनी ईश्वराची एकाग्र चित्ताने भक्ति केलेली असते, म्हणून इतरहि सर्व ठिकाणी ईश्वर सारखाच भरून राहि-लेला असला तरी, अशा जागीं त्याचा अधिक अंश प्रकाशित असतो पाणी पाहिजे असेल तर जमीन कोठेहि खणली तरी ते मिळूं शकतें तरीपण ज्या ठिकाणी डबकें, विहीर, तळे अथवा सरोवर असतें, त्या ठिकाणी मुळी जमीन खणायचेंच कारण पडत नाही, जरा हात खाली केला की, हवें

तितके पागी मिळू शकने-नाही बरे ? ” तसेच, “ ईश्वराच्या विशेष प्रकाशाने युक्त अशा या तीर्थांच्या दर्शनानतर, रवथ करीत जावे, ” असे श्रीरामकृष्ण सागत ते म्हणत, “ ज्याप्रमाणे गुरे प्रथम खूप खाऊन घेतात आणि मग एका जागी निश्चिंतपणे बसून ते खाल्लेले पुन्हा तोंडात आणून चघळीत बसतात, त्याप्रमाणे, देवस्थाने तीर्थस्थाने वगैरेंचे दर्शन घेतल्यावर मनामध्ये ज्या पवित्र भावना उत्पन्न होतात, त्या सर्व घेऊन, निश्चितपणे एकातात बसून, त्याच्यावर पुन्हा पुन्हा विचार करावा, त्यात बुडया माराव्या नाही तर घरी येताच त्या टाकून देऊन जर, ‘ येरे माझ्या मागल्या ’ केले आगि पुन्हा मनामध्ये सारे प्रापचिक, सासारिक विचार घोळत ठेवले, तर मग या देवस्थानाच्या आणि तीर्थस्थानाच्या दर्शनापासून काय फायदा ? मग या ईश्वरीय भावना मनामध्ये स्थिर व्हाव्या कशा ? ”

एकदा श्रीरामकृष्णाबरोबर कालीघाटावर श्रीजगदबेच्या दर्शनास बरीच शिष्यमंडळी गेली होती तेथून परत येत असता, त्याच्यापैकी एकजणाची सासुरवाडी वाटेंतच असल्यामुळे, तो तेथे गेला व तेथील मंडळीच्या आग्रहावरून रात्रीहि तेथेच राहिला दुसरे दिवशी श्रीरामकृष्णाच्या दर्शनास गेला असता “ तूं रात्री कोठे होतास ? ” असे श्रीरामकृष्णानी त्याला विचारले. त्याने सर्व हकीगत सागितल्यावर श्रीरामकृष्ण त्याला म्हणाले, “ हे रे काय ? जगदंबेचे दर्शन घेऊन आलास, तर तिच्या चिंतनात मग्न होऊन रवंथ करावयाचें, तें तर दिले सोडून आणि एखाद्या विषयी माणसासारखा रात्रभर सासुरवाडीं राहिलास ? काय म्हणावे तुला ! देवाचे दर्शन घेऊन आल्यावर, तेथे उत्पन्न झालेल्या पवित्र भावनाचें जर रवथ केले नाही, तर त्या भावना मनात स्थिर रे कशा व्हाव्या ? ” असो

श्रीरामकृष्णाच्या या तीर्थयात्रेमध्ये इतके निरनिराळे उद्देश दिसून येतात. कामारपुकुराहून श्रीरामकृष्ण परत आल्यानंतर मथुरानाथाना तीर्थयात्रा

करण्याची इच्छा झाली माघ महिन्यात निघण्याचा मुहूर्त ठरविला मथुरा-नाथाच्या कुलगुरूच्या पुत्राचे त्याच्या बरोबर यात्रेस जाण्याचें ठरले सर्व बेत निश्चित झाल्यावर, मथुरबाबूनी श्रीरामकृष्णासहि आपल्याबरोबर चलण्याची विनती केली व श्रीरामकृष्णानीहि आपली वृद्ध मातोश्री व हृदय बरोबर येत असल्यास आपली हरकत नसल्याचे त्यास सागितले त्या दोघानीहि यात्रेस जाण्याचे कबूल केले व श्रीरामकृष्णाचे मथुरबाबूपरोबर जाणे निश्चित झालें. श्रीरामकृष्ण आपल्या बरोबर येणार म्हणून मथुरबाबूंना अतिशय आनद झाला व यात्रेची सर्व तयारी त्यानी मोठ्या झपाट्याने व उत्साहाने चालविली

सर्व तयारी झाल्यावर मडळी यात्रेला निघाली मथुरानाथाबरोबर त्याची पत्नी, श्रीरामकृष्ण व त्याची मातोश्री, हृदय, मथुरानाथाच्या गुरूचा मुलगा, कारभारी, कारकून, आचारी, पाणके व इतर चाकर नोकर मिळून जवळ जवळ एकशेपचवीस मडळी होती सेकंड क्लासचा एक व थर्ड क्लासचे तीन असे चार डबे रिझर्व्ह करून, कलकत्त्यापासून काशीपर्यंत, वाटेत कोणत्याहि स्टेशनवर, हे चार डबे सोडून थाबवून ठेवता यावे, अशी रेल्वेकपनीकडून मथुरानाथानी व्यवस्था करून घेतली

सर्व मडळी प्रथम वैद्यनाथाच्या दर्शनास जाऊन तेथे काही दिवस राहिली. या क्षेत्राजवळ एका लहानशा खेड्यात लोकाची हीन दीन दशा पाहून श्रीराम-कृष्णानी मथुरबाबूकडून त्या सर्वास एक दिवस पोटभर जेवण घालून प्रत्येकास एकेक वस्त्र देवविले, ही हकीगत मागे "श्रीरामकृष्ण व मथुरबाबू" या प्रकरणात आलीच आहे (भाग १, पान १५३)

वैद्यनाथहून मंडळी एकदम काशीस गेली वाटेत सांगण्यासारखें काही विशेष घडलें नाही काशीच्या जवळ मात्र एका स्टेशनवर एक गमत झाली. स्टेशनवर गाडी थाबल्यावर, हृदय व श्रीरामकृष्ण गाडी सुटण्यास थोडा अवकाश आहे असे पाहून, स्टेशनबाहेर इकडे तिकडे हिंडत होते इकडे गाडीची वेळ

होताच गाडी सुटली व हे दोघे तसेच मागे राहिले ! मथुरबाबू पुढील स्टेशनवर पाहतात तो गाडीत श्रीरामकृष्ण व हृदय नाहीत ! तेव्हा एकदम त्याच्या लक्षात आले की, मागल्या स्टेशनवर हे दोघे उतरले होते व ते तसेच तेथे राहिले असावेत ! आता काय करावे अशी त्याना पचाईत पाडली, परतु हृदय श्रीरामकृष्णाबरोबर आहे या विचाराने त्याची काळजी जरा कमी झाली त्यानी लगेच मागल्या स्टेशनमास्तराना तार केली की, आता जी गाडी येईल तीत त्या दोघाना बसवून द्यावे प इकडे श्रीरामकृष्णाना फार वेळ थाबावे लागले नाही राजेद्रलाल वद्योपाध्याय या नावाचे रेल्वेचे एक अधिकारी स्पेशल गाडीने काशीसच चालले होते, त्याची गाडी थोडयाच वेळात तेथे आली व त्यानी त्या दोघाना आपल्या गाडीत बसवून काशीस नेले

काशीस मथुरबाबूनी केदार घाटाजवळ दोन मोठमोठे वाडे भाडयाने घेतले होते काशीस मथुरबाबूचा थाट एखाद्या राजाप्रमाणे असे बाहेर जाताना रुप्याचे छत्र त्यांच्यावर धरून एक नोकर चाले आणि मागे व पुढे भालदार चोपदार रुप्याच्या काठया घेऊन चालत

काशीस आल्यापासून मथुरबाबूंनी पडित, विद्वान्, सन्यासी वगैरे लोकास अन्नदान सुरु केले होते एक दिवस त्यानी मुक्तद्वार भोजनहि घातले व भोजनास आलेल्या प्रत्येकजणास एकेक वस्त्र व रुपया दक्षिणा दिली तसेच, वृदावन वगैरे यात्रेहून परत आल्यावर, श्रीरामकृष्णाच्या सागण्यावरून एक दिवस त्यानी “ कल्पतरु ” होऊन, नित्य व्यवहार्य वस्तूपैकी जो जी मागेल ती त्यास दिली माधुकरी वाटण्याचे वेळी, जमलेल्या मडळीत भाडणे आणि तंटे होत एखादे वेळी मारामारी सुद्धा होई ! इतर ठिकाणाप्रमाणेच असा प्रकार काशीसारख्या क्षेत्री आणि तो माधुकरी घेण्याकरिता आलेल्या ब्राह्मण मडळीत व्हावा, याचे श्रीरामकृष्णाना वाईट वाटले व इथे सुद्धा असे कामकाचनासक्त लोक आहेत हे पाहून त्याच्या सरळ हृदयास फार दु ख होऊन, त्याचे डोळे पाण्याने भरून येऊन ते म्हणाले, “ आई ! तू मला येथे कशाला आणलेस ? यापेक्षा मी दक्षिणेश्वरी होतो ते काय वाईट होते ? ”

ईश्वरीय भाव मनात नसताना तीर्थास गेले अथवा तेथे वास्तव्य केले तरी त्यापासून काही फलप्राप्ति होत नाही, असे श्रीरामकृष्ण वरचेवर म्हणत असत कोणास तीर्थयात्रा करण्याची इच्छा झाल्याचे त्यास कळताच ते म्हणत, " बाबारे, ज्याला इथे भक्ति आहे त्याला तेथेहि भक्ति मिळेल आणि ज्याला इथे नाही, त्याला तेथेहि पण मिळणार नाही " आणखी असेहि म्हणत, " ज्याच्या हृदयात भक्तिभाव आहे, तो तीर्थास गेला तर, त्याचा तो भक्तिभाव अधिकच वाढतो, पण ज्याच्या हृदयात भक्तिभावच नाही, तो तीर्थाला गेला तरी त्याला काही फायदा होणार नाही पुष्कळ वेळा आपल्या कानावर गोष्टी येतात की, अमक्याचा मुलगा काशीला पळून गेला आहे पुढे काही दिवसानी अशी बातमी येते की, त्याने खटपट करून एक चाकरी मिळविली आहे आणि त्याचेकडून दरमहिन्यास, आपल्या घरी पैसेहि येत असतात! तीर्थाच्या ठिकाणी म्हणून राहायला जाऊन काही लोक तेथे दुकाने उघडून रोजगारहि सुरू करतात! अशाने का कुठे भक्तीचा लाभ होत असतो, ही तर स्वत ची फसवणूक झाली! मथुरबाबूबरोबर काशीस जाऊन पाहिले तो काय! जे इथे तेच तिथे इथे जशी आंब्याची झाडे, चिंचची झाडे, कळकाची बेटें, तशीच तेथेहि हे पाहून हृदयला म्हणालो, " का रे हृदू! आपण येथे येऊन एवढे विशेष ते काय पाहिले? नाही म्हणायला, घाटावरच्या विष्ठेवरून एवढें दिसते बुवा, की, येथल्या लोकाची पचनशक्ति आपल्यापेक्षा मोठी जबर आहे!"

काशीत असेपर्यंत श्रीरामकृष्ण दररोज पालखीत बसून श्रीविश्वेश्वराच्या दर्शनास जात हृदय नेहमी त्याच्याबरोबर असे जाता जाता वाटेतच श्रीरामकृष्ण भावाविष्ट होऊन जात! देवदर्शनाच्या वेळी तर बोलायलाच नको सगळ्या देवाच्या दर्शनाचे वेळी हाच प्रकार होई त्यातल्या त्यात श्रीकेदारनाथाच्या दर्शनाचे वेळी त्याना विशेष भावावेश होई

देवाच्या शिवाय, निरनिराळ्या साधुसताच्या दर्शनासहि ते जात हृदय त्याचेबरोबर असेच श्रीमत् परमहस त्रैलिंग स्वामीच्या दर्शनास ते अनेकदा

गेलें होते. श्रीमत् त्रैलिंग स्वामी तेव्हा श्रीमणिकर्णिका घाटावर मौन व्रताने राहात असत पहिल्या दर्शनाच्या दिवशीं स्वामीजीनी आपली तपकीरीची डबी श्रीरामकृष्णाच्या पुढे ठेवून त्याचे स्वागत केले श्रीरामकृष्णानी त्याच्या शरीरावरील सर्व लक्षणें नीट न्याहाळून पाहून, हृदयला म्हटले, " हृदू, याच्या ठिकाणी यथार्थ परमहंसाची सर्व लक्षणे दिसतात, हे साक्षात् विश्वेश्वर आहेत !" मणिकर्णिका घाटाजवळच एक घाट बाधण्याचा त्यावेळी स्वामीजीनी सकल्प केला होता श्रीरामकृष्णाच्या सागण्यावरून हृदयने काही पाट्या माती तेथे टाकून त्याकामी आपली मदत दिली श्रीरामकृष्णानी एक दिवस स्वामीजीना आपल्या घरी बोलावून आपल्या हातानी त्याना जेवूं घातले !

त्रैलिंग स्वामीसंबंधाने श्रीरामकृष्ण आम्हाला अनेकदा काही काही गोष्टी सागत ते म्हणत, " असे दिसले की, साक्षात् विश्वेश्वर त्याच्या शरीराच्या आश्रयाने राहिला आहे ! त्याच्या योगाने सारी काशी उज्ज्वल झाली आहे ! ज्ञानाची अत्यंत उच्च अवस्था ! शरीराकडे बिलकुल लक्ष नाही ! प्रखर उन्हाने तीरावरली वाळू इतकी तापली होती की, उघड्या पायाने चार पावले सुद्धा चालण्याची मुष्कील,—तिथे खुशाल मजेंत निजले होते ! तेव्हा ते बोलत नसत. मी त्याना खुणेने विचारले 'ईश्वर एक की अनेक ?' त्यानीहि खुणेनेच उत्तर दिले, 'समाधिस्थ होऊन पाहाल तर एक, नाही तर जोपर्यंत मी, तूं, जीव, जगत् इत्यादि नानाप्रकारचे ज्ञान शिल्लक आहे तोंपर्यंत अनेक ' असो

इतर ठिकाणाप्रमाणेच काशींतहि संसारासक्त लोक आहेतच, हें पाहून श्रीरामकृष्णाना दु ख झाले, तरी या ठिकाणी त्याना अनेक अद्भुत दर्शनें होऊन, शिव–महिमा आणि काशीमाहात्म्य याच्या संबधाने त्याची धारणा दृढ झाली. नौकेमध्ये बसून वाराणशीमध्ये प्रवेश करण्याचे वेळेपासूनच भावावेशात श्रीरामकृष्णाना दिसूं लागलें होते की, काशी खरोखर सुवर्णाची आहे. प्राचीन काळापासून साधुसंत, महात्मे त्याच्या हृदयातील उज्ज्वल काचनतुल्य आणि अमूल्य अशा भावराशीचे काशीमध्ये थरावर थर बसले असून त्याच्या राशी

बनल्या आहेत ! ती ज्योतिर्मय भावघन मूर्ति हेच काशीचे नित्य आणि सत्य स्वरूप आहे बाह्य दृष्टीस दिसणारे स्वरूप त्याची छाया मात्र आहे काशी सुवर्णाची असल्याचे भावावस्थेंत पाहिल्यामुळे, काशीच्या सीमेच्या आत शौचादि केल्यास, सुवर्ग अपवित्र होईल, असे बालक-स्वभावी, सरल-हृदयी श्रीरामकृष्णास वाटून, त्याना हे विधि काशीत करण्यास फार सकोच वाटे ! त्याच्या स्वत च्या तोंडून ऐकले आहे की, या कारगास्तव, त्याना शौचादि विधि करण्यास वाराणशीच्या सीमेबाहेर नेण्यासाठी मथुरबाबूनी पालखीची व्यवस्था करून ठेवली होती ! काही दिवसपर्यंत, श्रीरामकृष्ग वाराणशीच्या सीमेबाहेर जाऊन विधि उरकत असत पुढे या भावाची उत्कटता कमी झाल्यावर सीमेबाहेर जाणे त्यानी सोडलें

काशीस असता त्याना आणखी एक विशेष प्रकारचे दर्शन झाल्याचें आम्ही श्रीरामकृष्णाच्याच तोंडून ऐकले आहे मणिकर्णिका वगैरे पंचतीर्थाची यात्रा कोणी कोणी नौकेने जाऊन करतात मथुरबाबूनीहि ही यात्रा श्रीरामकृष्णाना बरोबर घेऊन नौकेनेच केली मणिकर्णिकेजवळच काशी क्षेत्राची मुख्य स्मशानभूमि आहे मथुरबाबूची नौका मणिकर्णिकेच्या घाटासमोर आली त्या वेळी सारे स्मशान चितानी भरून गेलें होतें व तेथे अनेक प्रेते जळत होती. भावमय श्रीरामकृष्णाची दृष्टि सहज तिकडे गेली आणि त्याबरोबर नौकेंतून बाहेरच्या बाजूस धावतच येऊन नौकेच्या अगदी काठावर ते एकदम समाधि-मग्न झाले ! आता हे नदीत पडतात, असें वाटून मथुरबाबूचा पंड्या आणि नौकेंतील खलाशी लोक त्याना सावरून धरण्यासाठी धावले, पण त्याचें काही कारण पडले नाही श्रीरामकृष्ग तेथेच स्थिर उभे होते त्याच्या वदनमंडळावर अपूर्व तेज झळकत असून त्यावर स्मिताची छायाहि पसरली होती धावून आलेली मंडळी ते अपूर्व तेज पुज वदनमडळ पाहून दूरच थबकली व त्याचीं हृदयें भक्तिभावाने भरून गेली बऱ्याच वेळाने श्रीरामकृष्णाची समाधि उतरली व मग नौका मणिकर्णिकेच्या घाटाला लावून मंडळी स्नाने वगैरे करण्यात निमग्न झाली.

काही वेळाने, नुकतेच समाधीत झालेले दर्शन, श्रीरामकृष्ण मथुरबाबू वगैरे मंडळीना सागू लागले ते म्हणाले, " मला असे दिसले की, एक पिगट जटा असलेला श्वेत वर्णाचा उंच व भव्य पुरुष, अत्यत शात आणि गंभीर चालीने स्मशानातील, प्रत्येक चितेजवळ जात आहे आणि तिजवरील प्रेतास थोडे वर उचलून त्याच्या कानात प्रणव मंत्राचा उच्चार करीत आहे ! स्वत: सर्व शक्तिमयी श्रीजगदबा ही महाकाली रूपाने चितेवर त्या जीवाच्या जवळ दुसऱ्या बाजूला बसून, त्याची स्थूल,सूक्ष्म, कारण, वगैरे सर्व प्रकारची सस्कार-बधनं तोडून टाकून, निर्वाणाचे दार उघडून, आपल्या हातानी अखडाच्या घरी त्याचा प्रवेश करवीत आहे ! अशा रीतीने अनेक जन्माच्या योगतपस्येने जो अद्वैतानुभवाचा भूमानंद जीवाला प्राप्त होत असतो, तो काशीमध्ये देह ठेवणाऱ्या प्रत्येकाला देऊन श्रीविश्वनाथ त्याला कृतार्थ करीत आहेत ! ! "

मथुरबाबूंबरोबर जे शास्त्रज्ञ, पडित होते, ते श्रीरामकृष्णाचे हे अद्भुत दर्शन ऐकून म्हणाले, " काशीखडात नुसते एवढेच म्हटले आहे की, काशीत मृत्यु प्राप्त झाल्यास, श्रीविश्वनाथ त्या जीवाला निर्वाण पदवी प्राप्त करून देतो परतु ती कशी हे कोठेच सागितले नाही आपल्या या दर्शनावरून त्याचा उलगडा होतो आपली दर्शने आणि उपलब्धि शास्त्राच्याहि पुढे गेली आहेत ! "

हृदय सागत असे की, काशीस भैरवी ब्राह्मणीची व त्याची पुन्हा गाठ पडली व त्यावेळी काशीस असेतो, तिच्या घरी ते नेहमी जात येत असत. काशीत, " चौसष्ट योगिनी " नावाच्या गल्लीत, " मोक्षदा " नामक एका बाईच्या घरी ब्राह्मणी राहात असे मोक्षदेची ईश्वरभक्ति पाहून श्रीरामकृष्णाना फार आनद झाला ब्राह्मणी श्रीरामकृष्णाबरोबर वृंदावनयात्रेस गेली व श्रीरामकृष्णाच्या सागण्यावरून ती तेथेच राहू लागली वृंदावनाहून श्रीरामकृष्ण परत आल्यावर थोडयाच दिवसात वृंदावनास ब्राह्मणीचे देहावसान झाले असो

काशीस पाच सात दिवस राहून मंडळी प्रयागास गेली व तेथे तीन दिवस राहिली मथुरबाबू वगैरेंनी तेथे यथाविधि मुडण केले, पण श्रीराम-

कृष्णानी केले नाही ते म्हणाले, " मला मुंडण करण्याची आवश्यकता वाटत नाही " प्रयागहून मडळी पुन्हा काशीस परतली व तेथे पंधरा दिवस राहून श्रीवृंदावनच्या यात्रेस निघाली

वृंदावनास निधुवनाजवळ एका वाड्यात मंडळीचा मुक्काम होता या ठिकाणीहि मथुरबाबू काशीतल्याप्रमाणेच मोठ्या थाटाने आणि ऐश्वर्याने राहात असत तेथे असताना सर्व मडळीसह त्यानी तेथील सर्व देवस्थानांचे दर्शन घेतले प्रत्येक ठिकाणी देवापुढे ते मोहोरा ठेवीत ! निधुवनाशिवाय या ठिकाणी श्रीरामकृष्णानी राधाकुंड, श्यामकुंड आणि गोवर्धन पर्वत यांचे दर्शन घेतले गोवर्धनावर ते भावावेशातच चढून गेले ! वृंदावनास असताना सुद्धा, एखाद्या साधकाचे, भक्ताचे नाव त्याच्या कानावर येताच ते त्याच्या दर्शनास जात श्रीरामकृष्णाना देवदर्शनास अगर साधुसत-दर्शनास जाण्यासाठी मथुरबाबूनी पालखीची व्यवस्था करून ठेविली होती हृदय नेहमी बरोबर असेच देवापुढे आणि वाटेत भिकाऱ्याना दान करण्यासाठी म्हणून, पालखीत एका बाजूला एक वस्त्र आथरून त्यावर, मथुरबाबू रुपये, अधेल्या, पावल्या, चवल्या, यांच्या चवडी करून ठेवीत असत ! ! परतु या सर्व ठिकाणी जात असताना श्रीरामकृष्ण भावावेशाने इतके विव्हल झालेले असत की, त्या चवडी उचलून त्यातील एकेक नाणे निरनिराळे दान करण्याचेहि त्याच्या हातून होत नसे ! अर्थातच मग भिकाऱ्याची फार गर्दी झाली, म्हणजे त्यानी त्या वस्त्राचे एक टोक धरून ओढावे व ती सारी नाणी त्या गर्दीत पिस्करून टाकावी !

बाकेबिहारी कृष्णाच्या दर्शनास गेले असता, श्रीरामकृष्णाना अद्भुत भावावेश उत्पन्न होऊन, ते एकदम त्या मूर्तीला आलिंगन देण्यास धावून गेले ! तसेच एक दिवस संध्याकाळी, गुराख्याची मुले, रानातून गुरे घेऊन परत घरी येत असता, त्याच्या मेळ्यात त्याना गोपालकृष्णाचे दर्शन होऊन, ते प्रेमाने तन्मय होऊन गभीर समाधिमग्न झाले ! वृंदावनापेक्षा व्रज त्याना अधिक आवडले व त्या ठिकाणी त्याना श्रीकृष्णाचे व राधेचे अनेक रूपात दर्शन झाले.

व्रजात असताना, वैराग्यसपन्न अनेक साधक, लहान लहान झोपडयात, दरवाज्याकडे पाठ करून, एकाग्र चित्ताने जपध्यानात निमग्न असलेले, त्यानी पाहिले व्रजाचे स्वाभाविक सृष्टिसौदर्य, फल–फुलानी सुशोभित दिसणारा छोटासा गोवर्धनगिरि, वनात नि सकोचपणे स्वैरसचार करणारे मोर आणि हरणे, जपध्यानादिकात निमग्न असणारे साधुसत आणि व्रजातील सरल स्वभावाचे लोक याच्या योगाने व्रजावर त्याचे फार प्रेम जडले आणि त्यातहि तपस्विनी गगामाता हिचे दर्शन आणि तिच्या संगतीचा लाभ होऊन तर, त्याना वाटले की, आता येथून दुसरीकडे कोठेच न जाता आयुष्याचे बाकीचे दिवस येथेच घालवावे !

गंगामातेचें वय त्यावेळीं साठाच्या घरात असावें तिचें श्रीकृष्णावरचें आणि श्रीमती राधेवरचे अपार प्रेम पाहून व तिची अलौकिक भक्ति पाहून, लोकाना वाटे की, श्रीराधेची मुख्य सखी ललिता, हीच जीवाना भक्तिप्रेमाचें शिक्षण देण्यासाठी म्हणून, गगामातेच्या रूपाने या जगात अवतीर्ण झाली आहे ! श्रीरामकृष्ण सागत असत की " मला पाहिल्याबरोबर माझ्या अगी श्रीमती राधेसारखीच महाभावाची लक्षणें आहेत, असें तिने ओळखिले व म्हणून मला राधेचाच अवतार मानून तिने मला ' दुलाली ' म्हणून हाक मारली ! " दुलालीचे असे सहजासहजी दर्शन झाल्यामुळे, गंगामाता आपल्याला अत्यत धन्य मानू लागली व आज इतक्या दिवसाच्या आपल्या प्रेमाचे आणि भक्तीचें फल आपल्याला प्राप्त झाले असे तिला वाटले श्रीरामकृष्णहि तिला पाहिल्याबरोबर तिच्याशी अगदी ओळखीच्या माणसासारखे वागूं लागले आणि इतर सर्व गोष्टी विसरून, तिच्याच आश्रमात तिच्याच संगतींत राहूं लागले. दोघानाही एकमेकांच्या सगतीत इतका आनंद वाटूं लागला की, श्रीरामकृष्ण आता येथेच कायमचे राहणार की काय आणि आपल्याबरोबर दक्षिणेश्वरी परत फिरणार नाहीत की काय, अशी मथुरबाबू वगैरे मडळीस भीति वाटूं लागली परंतु शेवटी श्रीरामकृष्णाच्या मातृभक्तीचाच विजय झाला आणि त्याचा गंगामाते-

जवळच राहण्याचा विचार बदलला श्रीरामकृष्ण सागत, " व्रजामध्ये असताना सर्व गोष्टीचें पूर्ण विस्मरण झाले होते मनात वाटे की, आता येथून परत फिरूंच नये पग काही दिवसानी आईची आठवग झाली आणि वाटले की, मी जर येथे राहिलो तर तिला फार दु ख होईल आणि या वृद्धापकालात तिची सेवाशुश्रूषा तरी कोण करील ? असा विचार मनात आल्यावर मात्र मग मला तेथे राहवेना ! "

खरोखरच विचार करून पाहता, या अलौकिक महापुरुषाच्या सर्वच गोष्टी काही विलक्षग वाटतात ! आणि परस्परविरोधी अशा सद्गुणांचे त्याचे ठिकाणी मिश्रग झालेले पाहून, मन आश्चर्याने चकित होऊन जाते हेच पाहाना, त्यानी लग्न केलें, पग कधीहि ससार केला नाही, बरे, स्वत च्या पत्नीचा त्यागहि केला नाही ! अथवा तिच्याशी कधी शरीरसबधहि ठेवला नाही ! ! ईश्वरप्राप्तीसाठी सर्वस्वाचा त्याग केला, पग मातेविषयीचें व पत्नीविषयीचे आपले कर्तव्य ते कधीहि विसरले नाहीत ! अद्वैत ज्ञानाच्या अत्युच्च शिखरावर आरोहण करून सदैव तेथे वास करीत असताहि, ईश्वराबरोबरचा आपला भक्ताचा—अपत्याचा—प्रेमळ सबंध त्यानी कधीहि सोडला नाही ! अशा किती तरी गोष्टी सागता येतील आपल्या मातेशी त्याचा असाच अलौकिक सबंध होता त्याची वृद्ध माता आपल्या आयुष्याची अखेरची वर्षे दक्षिणेश्वरीच त्याच्याजवळ राहात असे व श्रीरामकृष्ण तिची सर्व प्रकारची सेवा आपल्या हातानी करून स्वत ला धन्य मानीत ! आणि पुढे जेव्हा त्याच्या परमपूज्य मातेला देवाज्ञा झाली, तेव्हा त्याना इतकें दु ख झाले व त्यानी रडून इतका आकात केला की, अशा प्रकारचा शोक क्वचितच कोणी करीत असेल ! बरे त्यानी इतका शोक केला, पग आपग सन्यासी आहो, ही गोष्ट ते केव्हाहि विसरले नाहीत सन्यासी असल्यामुळे आपल्याला आपल्या मातेचे और्ध्वदेहिक व श्राद्ध वगैरे करण्यास अधिकार नाही, असे जाणून त्यानी ते सर्व, आपला पुतण्या रामलाल याचे-कडून करविलें आणि आपग स्वत एकीकडे बसून मातेसाठी रडून तिच्या ऋगांतून थोडे फार मुक्त झाले ! श्रीरामकृष्ण यासबधाने म्हणत-" ससारात

बाप आणि आई हेच परमगुरु, ते जिवंत असेपर्यंत त्याची सेवा केली पाहिजे आणि त्याच्या मृत्यूनतर, त्याचे श्राद्ध वगैरे केले पाहिजे जो दरिद्री असेल, श्राद्धहि करण्याची ज्याची ऐपत नसेल, त्याने त्याचे स्मरण करून निदान अश्रू गाळले पाहिजेत, तेव्हाच मनुष्य त्याच्या ऋणातून मुक्त होतो ! आईबापाची आज्ञा कधीहि उल्लघन करू नये,—ईश्वरासाठीच म्हणून उल्लघन केली तर चालेल—त्याने दोष लागणार नाही उदाहरणार्थ प्रल्हाद,—बापाने सागितलें तरी त्याने श्रीकृष्णाचे नामस्मरण करणे सोडलें नाही—अथवा ध्रुव,—आई ' नको नको ' म्हणत असता सुद्धा तप करण्यासाठी वनात गेला,—ईश्वरासाठीच त्यानी आईबापाची आज्ञा मोडली, म्हणून त्याना आज्ञाभंगाचा दोष लागला नाही " असो

गंगामातेची मोठ्या कष्टाने परवानगी घेऊन मथुरबाबूसह श्रीरामकृष्ण परत आले वृदावनास असताना श्रीरामकृष्णाना सतार ऐकण्याची फार इच्छा झाली होती परंतु तेथे कोणी नामाकित सतार वाजविणारा नसल्यामुळे, त्याना तेथे काही ऐकावयाला सापडले नाही काशीस परत आल्यावर पुन्हा त्याना सतार ऐकण्याची फार इच्छा झाली मदनपुरा नामक आळीत श्रीयुत महेशचद्र सरकार या नावाचे कोणी गृहस्थ सतार अत्यत उत्तम वाजवितात, असे त्याना समजताच, एक दिवस आपण होऊन त्याचे घरी जाऊन, त्यानी महेशबाबूंना सतार वाजविण्याची विनंति केली ! महेशबाबूनी त्याची विनती मोठ्या आनंदाने मान्य करून त्याना त्या दिवशी बराच वेळ सतार ऐकविली महेशबाबूंचें ते अप्रतिम वादन सुरू होताच, श्रीरामकृष्ण भावाविष्ट झाले काही वेळाने थोडी अर्ध बाह्य दशा प्राप्त झाल्यावर, " आई, मला शुद्धीवर आण, मला सतार नीट ऐकूं दे ! " अशी, ते आईची प्रार्थना करीत असल्याचें ऐकूं आलें ! त्यानंतर ते चागले शुद्धीवर आले व मोठ्या आनंदाने सतारीचे मधुर बोल ऐकत व मधे मधे सतारीच्या सुरांत आपलाहि सूर मिळवून गाणी गात, तेथे बराच वेळ बसले सध्याकाळीं पाच वाजल्यापासून तों रात्रीं आठ वाजेपर्यंत, अशा रीतीने मोठ्या आनंदाने सतार ऐकून, महेशबाबूंच्या आग्रहावरून

तेथे थोडा फराळ करून श्रीरामकृष्ण परत आपल्या घरी आले त्या दिवसापासून महेशबाबूच श्रीरामकृष्णाच्या दर्शनास दररोज येऊन, त्याना सतार वाजवून ऐकवीत असत श्रीरामकृष्ण म्हणत, " सतार वाजवताना महेश-बाबू देहभानहि विसरून जात ! "

काशीत पधरा दिवस राहिल्यानतर श्रीक्षेत्र गयेची यात्रा करण्याचें मथुरबाबूंनी मनात आणले, परतु श्रीरामकृष्णानी तेथे येण्याचे नाकबूल केल्यामुळे मथुरबाबूंनी तेथे जाण्याचा विचार सोडून दिला श्रीरामकृष्णच सागत असत की, " गयेसच माझ्या पित्याला स्वप्नात श्रीगदाधरानी सागितले की, मी तुझ्या पोटी जन्माला येणार आहे, म्हणूनच माझ्या पित्याने माझे नाव गदाधर असे ठेवले " ' गयेस जाऊन श्रीगदाधराचे दर्शन घेताना मी कदाचित् इतका बेहोष आणि प्रेमोन्मत्त होऊन जाईन की, गदाधराशीच चिरकाल एकरूप होऊन राहीन, असे वाटून मी चिरसमाधिमग्न होऊन जाईन, असा विचार मनात येऊनच मथुरबाबूबरोबर गयेस जाण्याचे मी नाकारले, " असे आपल्या शिष्य-मडळीपैकी कोणा कोणाजवळ श्रीरामकृष्णानी म्हणून दाखविलें आहे ' पूर्वी जो श्रीराम, श्रीकृष्ण, श्रीगौराग इत्यादि रूपानी अवतीर्ण झाला होता, तोच साप्रत आपल्या शरीराचा आश्रय करून पुन्हा अवतीर्ण झाला आहे,' अशी श्रीरामकृष्णाची दृढ भावना होती म्हणून आपल्या सध्याच्या शरीर-मनाचें उत्पत्तिस्थल श्रीक्षेत्र गया आणि ज्या ज्या ठिकाणी इतर अवतारिक पुरुषानी आपली इहलोकची यात्रा सपविली, त्या त्या क्षेत्राचे दर्शन घेण्याच्या विचाराने त्याच्या मनात एक प्रकारचा विलक्षण सकोच उत्पन्न होई ! श्रीरामकृष्ण म्हणत असत, " अशा ठिकाणी गेलो तर मला अशी गभीर समाधि लागेल, की पुन्हा काही केले तरी ती उतरणार नाही आणि अशा रीतीने शरीरच टिकणें अशक्य होईल ! " अशा प्रकारचा विलक्षण सकोच त्याना स्वत सबधानेच उत्पन्न होत असे असे नाही, तर आपल्या भक्तमडळीसबधानेहि होत असे ! आपला भक्त अमुक एका देवतेच्या अशापासून उत्पन्न झाला आहे, असे त्याना दिव्य-दृष्टीने समजल्यास, त्या देवतेच्या लीलाभूमीच्या दर्शनास जाण्यापासून ते त्याला

परावृत्त करीत ! या विलक्षण संकोचाला काय म्हणावें ? भय असेंहि त्याला नाव देता येत नाही कारण ब्रह्मज्ञ सिद्ध अवतारिक पुरुषाना भय कशाचे ? सर्व चराचरात एकच ब्रह्म भरून राहिले आहे.—त्यावाचून दुसरी वस्तूच नाही, असा ज्यानी साक्षात् अनुभव घेतला आहे, त्याना भय कशाचे ? बरे, इतर लोकाच्यासारखी वाचण्याची इच्छा असेंहि त्या सकोचाला म्हणवत नाही कारण लोकाच्या मनात वाचण्याची जी इच्छा असते, ती स्वार्थासाठी अगर सुखोपभोगासाठी असते, परतु ज्याच्या अंत करणात स्वार्थसुखाचा नामगंधहि दिसून येत नाही, त्याच्यासबंधाने असेंहि विधान करवत नाही, मग या सकोचाला काय म्हणावे ? व याची कल्पना तरी इतराना कशी यावी ? आमच्या मनात जे भाव व जे कल्पनातरग उत्पन्न होतात, ते व्यक्त करण्यास उपयोगी असेच शब्दसमूह आम्हाला मिळू शकतात श्रीरामकृष्णासारख्या महापुरुषाच्या मनातील अत्युच्य दिव्य भाव व्यक्त करण्यास योग्य शब्द तरी कसे सापडावे ? म्हणून या सर्व विषयासबंधी श्रीरामकृष्ण काय म्हणत असत ते श्रद्धा व विश्वासपूर्वक ऐकून, सर्व उच्च भाव आपल्या कल्पनेने समजून घेण्याचा यथाशक्ति प्रयत्न करणे, यावाचून दुसरें काही करणे शक्य दिसत नाही

वर सागितलेंच आहे की, गयेस जाण्याचें श्रीरामकृष्णानी नाकारल्यामुळे, मथुरबाबूनी तिकडे जाण्याचा बेत रहित केला सर्व मडळी वैद्यनाथास जाऊन, तेथून कलकत्त्यास परतली

श्रीवृदावनाहून राधाकुड व श्यामकुंड यातील माती श्रीरामकृष्णानी आपल्याबरोबर आणली होती, त्यातील काही पंचवटीखाली व बाकीची आपल्या साधनाकुटीरात चोहोकडे पसरून श्रीरामकृष्ण म्हणाले, “ यापुढे ही जागा श्रीवृदावनासारखीच पवित्र होईल ! ” यानतर थोडयाच दिवसानी, त्यांनी मथुरबाबूंना सांगून, त्याचेकडून ठिकठिकाणचे सत, महंत, साधु, भक्त वगैरे बोलावून आणून पंचवटीखाली एक महोत्सव केला मथुरबाबूंनी या प्रसंगीं प्रत्येकास एक रुपयापासून सोळा रुपयांपर्यंत दक्षिणा दिली.

श्रीरामकृष्ण सांगत असत की, या सर्व यात्रेला मथुरबाबूंनी एकंदर एक लक्ष रुपयाहूनहि जास्त खर्च केला !

काशीवृंदावनाशिवाय, श्रीरामकृष्ण एकदा मथुरबाबूंबरोबर श्रीचैतन्य-देवाच्या जन्मस्थानास–नवद्वीपास–गेले होते श्रीचैतन्यदेवाना श्रीरामकृष्णाच्या शिष्यापैकी पुष्कळजण अवतार समजत नसत एवढेच नव्हे, पण वैष्णव या शब्दाचा "दीन दुबळे लोक" असा अर्थ समजत श्रीचैतन्यदेवाच्या अवतारत्वा-संबधाने श्रीरामकृष्णाचेहि मत विचारण्यास त्यानी कमी केलें नाही श्रीराम-कृष्णानी एक दिवस त्याच्या प्रश्नाचे उत्तर दिले ते म्हणाले, " काय सांगू रे, तेव्हा तेव्हा मला सुद्धा वाटत असे की पुराणात, भागवतात कोठे सुद्धा नाम-निर्देश नाही आणि चैतन्य अवतार ? हे कसे ? काही तरी अवाच्या सवा वर्णन करून रजाचा गज केला आहे झाले ! काही केल्या चैतन्य अवतार म्हणून पटेना मथुरबाबूबरोबर नवद्वीपास गेलो आणि वाटले की, जर खरोखरच चैतन्य अवतार असेल, तर तेथे काहीना काही तरी साक्षात्कार होईलच होईल आणि आपोआप सगळा खुलासा होईल असा काही साक्षात्कार व्हावा म्हणून इकडे तिकडे, मोठया महताच्या, छोट्या महंताच्या घरी, या देवळात त्या देव-ळात—सारे साऱ्या नवद्वीपभर फिरलो, पण कुठे म्हणता कुठे सुद्धा काही एक साक्षात्कार नाही ! जिकडे पाहावे तिकडे आपले हात वर करून नाचत आहेत, अशा साऱ्या चैतन्यदेवाच्या लाकडी मूर्ति ! हे सारे पाहून प्राण व्याकुळ झाला, वाटले इथे कशाला आलो ! नंतर आता तेथून निघावें म्हणून नौकेत निघणार, तों एक अद्‌भुत दर्शन झालें ! दोन सुंदर मुले—रूप तर असे की, कुठे कधीच पाहिले नाही, तापलेल्या सुवर्णासारखा रंग—वयाने तेरा चवदा वर्षांची, मुखमंडळासभोवती तेजाची वलये असलेली—हात वर करून माझ्याकडे पाहून हासत हासत, आकाशपंथाने माझ्याकडे वेगाने येत आहेत ! त्याबरोबर ' हा बघ, आलो रे आलों ! ' असे मी एकदम ओरडलो ! पण इतक्यात तीं मुले माझ्याजवळ येऊन ( स्वत कडे बोट करून ) या शरीरात अंतर्धान पावलीं आणि मी एकदम समाधिस्थ होऊन पडलों नदींतच पडायचा, पण हृदू

जवळ होता, त्याने धरून आत ओढलें ! असेंच आणखीहि काही काही दाखवून खात्री केली की खरोखरच चैतन्य अवतार ! ”

नवद्वीपाजवळच्या नदीतीराच्या वाळवंटात श्रीरामकृष्णाना जितका भावावेश झाला तितका खुद्द नवद्वीपात झाला नाही, याचें कारण विचारता ते म्हणाले, “ श्रीचैतन्यदेवाचें जुनें नवद्वीप गंगेमध्ये बुडून गेलें आहे व त्याची जागा त्या वाळवंटाखालीच असावी म्हणूनच त्या ठिकाणीं मला भावावेश झाला ”

काशी, वृंदावन व नवद्वीप याशिवाय, मथुरबाबूंबरोबर, श्रीरामकृष्ण एकदा खुलना येथील प्रख्यात सत्पुरुष भगवानदास बाबाजी यांच्या भेटीसाठी गेले होते ( १८७१ ) श्रीचैतन्यदेवाच्या पादस्पर्शाने पवित्र झालेल्या अनेक स्थानापैकी खुलना हें एक स्थान असून तेथील एकशे आठ शिवमंदिरें प्रख्यात आहेत

भगवानदास बाबाजीचे वय त्यावेळी ऐंशी वर्षांहून अधिक असून त्याचें तीव्र वैराग्य आणि अलौकिक भगवद्भक्ति साऱ्या बंगालभर गाजत होती रात्रंदिवस एकाच जागी बसून जप, ध्यान-धारणादि करीत राहिल्याने वृद्धापकाळीं त्याचे दोन्ही पाय अगदी नि शक्त आणि लुळे होऊन गेले होते तरी पण ऐंशी पेक्षाहि आधिक वर्षे वयाला होऊन गेलीं असतांहि आणि शरीर असें परावलंबी होऊन उठण्याचीहि शक्ति अंगांत नसताहि, या वृद्ध साधुपुरुषाचा हरिनामस्मरणाचा उद्दाम उत्साह आणि ईश्वरभक्ति आणि ईश्वरप्रेम, एखाद्या तरुणालाहि लाजवील असे होतें नामस्मरण करता करता ते देहभान विसरून जात आणि त्याच्या डोळ्यातून एकसारख्या अश्रुधारा वाहात ! निर्जीव झालेला वैष्णवसमाज त्याच्यामुळे सजीव झाला होता आणि बाबाजीच्या उदाहरणाने आणि उपदेशाने अनेक लोक सन्मार्गाकडे वळूं लागले होते त्याच्या दर्शनास जे कोणी जात, त्यांच्यावर बाबाजींच्या—तीव्र वैराग्य, तपस्या, ईश्वरप्रेम, पवित्रता वगैरे—अनेक

सद्गुणांचा फार परिणाम होई आणि त्याच्या आयुष्यास एक प्रकारचे निराळेच वळण लागे महाप्रभु श्रीचैतन्यदेव याच्या प्रेमधर्मासबंधीच्या एखाद्या विषया-बद्दल काही वाद उत्पन्न झाल्यास, सर्वजण भगवानदास बाबाजीचेच मत ग्राह्य धरून त्यावरून वादाचा निकाल लावीत बाबाजी नुसत्या साधन-भजनातच गुतलेले नसत, तर वैष्णव समाजात कोठे काय चालले आहे, वैष्णव समाजाची उन्नति कशाने होईल, श्रीचैतन्यदेवाचा प्रेमधर्म आणि त्याचें अलौकिक चरित्र याचेकडे लोकाचे लक्ष कसे वेधेल,—वगैरे गोष्टीची त्याना नेहमी काळजी लागलेली असे ढोंगी साधूंच्या आचरणाची सर्व हकीगत लोक त्याचेजवळ सागत व अशा बाबतीत काय केले पाहिजे याविषयी त्याचें मत घेऊन, लोक त्याप्रमाणे नि शकपणे आचरण करीत यामुळे बाबाजीचा सर्व वैष्णव समाजावर एक प्रकारचा दरारा असे आणि ढोंगी स्वार्थपरायण साधूना त्याची एक प्रकारची विलक्षण दहशत वाटे

श्रीरामकृष्णानी आपल्या तपश्चर्येस आरंभ केला, त्या सुमारास उत्तर हिंदुस्थानात अनेक ठिकाणी धर्मविषयक खळबळ उडण्यास सुरुवात झाली होती कलकत्ता व त्याच्या आसपासच्या ठिकाणी हरिसभा आणि ब्राह्मोसमाजाची चळ-वळ, सयुक्तप्रात, पंजाब या बाजूस स्वामी दयानद सरस्वतीचा वैदिक धर्माचा प्रचार, बंगाल्यात वेदात, कर्ताभजा सप्रदाय, राधाश्यामी सप्रदायाची चळवळ वगैरे धार्मिक चळवळी त्या सुमारास सुरू झाल्या होत्या त्या सर्वांचा आपल्या साप्रतच्या विषयाशी सबंध नाही, फक्त कलकत्त्यातील कलूटोला नामक आळीत नेहमी भरणाऱ्या एका हरिसभेमध्ये, जी हकीगत घडून आली होती ती सागा-वयाची आहे, कारण भगवानदास बाबाजीच्या व श्रीरामकृष्णाच्या भेटीशीं तिचा सबंध आहे

एक दिवस कलूटोल्याच्या हरिसभेस श्रीरामकृष्णाना निमत्रण असल्या-मुळे ते तेथे गेले हृदय त्याच्याबरोबर होता श्रीरामकृष्ण तेथे गेले, तेव्हा पुराण रंगात आलें असून श्रोतृसमाज ते ऐकण्यात अगदी तल्लीन होऊन

गेलेला होता श्रोतेमंडळींतच एका बाजूस श्रीरामकृष्ण बसले आणि पुराण ऐकूं लागले

त्या ठिकाणची मडळी आपणाला श्रीचैतन्यदेवाचे एकनिष्ठ भक्त समजत असत आणि म्हणून त्याचे स्मरण सदैव राहावे याकरिता श्रीचैतन्य देवासाठी तेथे एक निराळे आसन माडीत असत त्या आसनावर साक्षात् श्रीचैतन्यदेव बसलेले आहेत असे समजून सर्वजण त्यास मान देत, त्याची पूजा अर्चा करीत, त्यापुढे साष्टाग नमस्कार घालीत आणि कोणालाहि त्या आसनावर बसू देत नसत प्रत्यक्ष श्रीचैतन्यदेव ऐकत आहेत असेच समजून पुराणीक बुवा आपले पुराण सागत असो

त्या दिवशी पुराण ऐकता ऐकता श्रीरामकृष्ण एकाएकी भावाविष्ट झाले आणि त्या भावाच्याच भरात एकदम ताडकन् उठून त्या आसनावरच जाऊन उभे राहिले आणि तसे उभे असताच त्यांना अत्यंत गाढ समाधि लागली ! हे सर्व इतक्या थोडया वेळात घडून आले की, हा सर्व प्रकार एकदम कोणाच्याच लक्षात आला नाही परंतु श्रीरामकृष्णाना तेथे उभे पाहिल्यावर मात्र सभेत जिकडे तिकडे एकच खळबळ उडाली ! जो तो त्याच्याकडे पाहूं लागला त्या समाधि अवस्थेनच, चैतन्यदेवांप्रमाणेच श्रीरामकृष्णाचेहि हात वर झालेले होते आणि त्याच्या वदनमडळावर अपूर्व तेज झळकत होते, ती त्याची दिव्य आणि तेज पुंज मूर्ति पाहून, त्या सभेतील कोणा भक्ताना तर ते साक्षात् चैतन्यदेवच वाटले पुराणिकाचे पुराण बंद पडले, श्रीरामकृष्ण त्या आसनावर उभे राहिले ही गोष्ट चागली झाली की वाईट झाली, हेहि त्या श्रोतृमडळीस समजेनासे झाले श्रीरामकृष्णाच्या त्या दिव्य तेजाने, ती सारी मंडळी दिपून गेली आणि सर्वांना एकच स्फूर्ति होऊन त्यानी एकदम मोठमोठयाने जयजयकार आणि भजन करण्यास सुरवात केली ! बऱ्याच वेळाने श्रीरामकृष्ण अर्धवट शुद्धीवर आले आणि तेहि त्या मडळीत मिसळून नृत्य करीत भजन करूं लागले व मधे मधे समाधिमग्नहि होऊं लागले !

सर्वांनाच आवेश चढला आणि सर्वजण देहभान विसरून उन्मत्तासारखे मोठमोठ्याने भजन करू लागले असें भजन किती तरी वेळ चालले ! कोणा-लाच कशाची शुद्ध उरली नाही ! बऱ्याच वेळाने श्रीचैतन्यदेवाच्या नावाचा जयजयकार होऊन भजन समाप्त झाले व थोडयाच वेळाने श्रीरामकृष्ण हृदय-बरोबर दक्षिणेश्वरी परतले

श्रीरामकृष्ण निघून गेल्यानंतर, जसा एखादा निजलेला मनुष्य दचकून जागा व्हावा, तशी ही मंडळी जागी झाली आणि मग आजचा प्रकार चांगला झाला की वाईट झाला याबद्दल त्यांच्यात भवति न भवति सुरू झाली. श्रीरामकृष्णाची समाधि, त्यांचें तें दिव्य तेज पुंज रूप आणि त्यांचे ते अलौकिक नृत्य व भजन हे पाहून काही मंडळी, त्यांनी चैतन्यदेवाचें आसन ग्रहण केलें यात काही एक वाईट झाले नाही, असे म्हणूं लागली व काहीजण ही गोष्ट वाईट झाली, असे म्हणूं लागले उभयपक्षामध्ये खूप कडाक्याचा वाद झाला. पण वादाचा निकाल त्या दिवशी काहीच लागला नाही

हळूहळू ही हकीगत सर्व ठिकाणी पसरली आणि यामुळे साऱ्या वैष्णव समाजात खळबळ उडून गेली ही हकीगत भगवानदास बाबाजीच्याहि कानावर गेली व उगीच एखाद्या य:कश्चित् माणसाने चैतन्यदेवाच्या आसनाचा असा अपमान करावा व स्वत:च्या भक्तिभावाचें असे ढोंग माजवावे, याचा त्यांना फार राग आला एवढेंच काय, पण रागाच्या भरात त्या ढोंगी माणसाविषयी वाटेल तसे अद्वातद्वा उद्गार काढण्यालाहि त्यांनी कमी केलें नाही त्या दिवशीच्या प्रकाराने वैष्णव समाजात बरीच खळबळ उडून गेली आहे, यापलीकडे श्रीरामकृष्णांना मात्र याविषयी आणखी काही माहिती झाली नाही

यानंतर थोडयाच दिवसांत, श्रीरामकृष्ण मथुरबाबूंबरोबर खुल्ना येथे गेले. दिवस उजाडण्याचे सुमारासच त्यांची नौका घाटाला लागली व मथुर-

बाबू सामानसुमानाची व्यवस्था लावण्यांत गढून गेले इकडे हृदयला बरोबर घेऊन श्रीरामकृष्ण शहर बघण्यास निघाले व चौकशी करीत करीत भगवानदास बाबाजीच्या आश्रमाजवळ येऊन पोहोचले

एखाद्या अपरिचित व्यक्तीची भेट घेण्याचा प्रसंग आल्यास, प्रथम बालकस्वभाव श्रीरामकृष्णाच्या मनात नेहमी खरोखरच भीतीने धडकी भरत असे आणि हा त्याचा स्वभाव आम्ही प्रत्यक्ष आपल्या डोळ्यानी पाहिला आहे. भगवानदास बाबाजीच्या भेटीच्या वेळीहि प्रथम असेच झाले हृदयला पुढे करून, आपले सर्वांग वस्त्राच्छादित करून, त्यानी बाबाजीच्या आश्रमात प्रवेश केला हृदय पुढे होऊन, बाबाजीना नमस्कार करून म्हणाला, ' माझे मामा मोठे भगवद्भक्त आहेत, ते आपल्या दर्शनास येत आहेत. ''

हृदय सागत असे की त्याना प्रणाम करून मी बोलूं लागण्याच्या पूर्वीच बाबाजी म्हणूं लागले, " आज आश्रमात कोणातरी महापुरुषाचे आगमन झाले आहे असें वाटते ! " असे म्हणून ते इकडे तिकडे पाहूहि लागले परतु माझ्याशिवाय दुसरे कोणी न दिसल्यामुळे, ते आपल्या चालू कामास लागले काही मडळी एका वैष्णव साधूच्या दुर्वर्तनाची हकीगत सागत असून, त्यासंबधानं आता काय केले पाहिजे, असे त्याना विचारीत होती बाबाजीहि त्याची खूप निर्भर्त्सना करून, " त्याची माळ हिसकाऊन घेऊन, त्याला सप्रदायांतून हाकून देईन, " वगैरे गोष्टी बोलत होते इतक्यात, श्रीरामकृष्णहि तेथे आले व बाबाजीना प्रणाम करून नम्रपणे एका बाजूला गुपचुप बसून राहिले सर्वांग वस्त्राच्छादित असल्यामुळे त्याचे तोड कोणाच्याहि नजरेस पडले नाही. हृदयने त्याच्याकडे बोट दाखवून, " हेच माझे मामा " अशी त्याची ओळख करून दिली व बाबाजीहि इतर गोष्टी बंद करून श्रीरामकृष्णाशी, " कोठून आलात, केव्हा आलात, " वगैरे कुशल गोष्टी करूं लागले

आपल्याशीं बोलत असताना सुद्धा, बाबाजी माळ फिरवीत आहेत, असें पाहून चतुर हृदयने त्याना विचारलें, " बाबाजी, आपण अजून सुद्धा माळ

कशासाठी ठेवली आहे बरे ? आपण तर सिद्ध झाला आहात, मग आपल्याला आता माळेची काय जरूर ?" बाबाजीनी नम्रपणे उत्तर दिले, "स्वत ला मोठीशी आवश्यकता नाही, तरी लोकासाठी माळ ठेवावी लागते नाही तर लोकहि माझे पाहून तसेंच वागू लागतील !"

श्रीजगदबेवरच सर्व विषयात सर्वकाळ एखाद्या बालकाप्रमाणे निर्भर ठेवणे, ही गोष्ट श्रीरामकृष्णाच्या इतकी हाडीमासी खिळून गेली होती की, स्वपणाने स्वत च्या प्रेरणेने एखादी गोष्ट करणे बाजूलाच राहो, पण, दुसरा कोणी जरी तसे करीत असल्याचे त्यानी पाहिले तरी त्याच्या अंत करणाला अत्यत वेदना होत ! आपल्या अहंकाराचा त्यानी इतका समूळ नाश केला होता की, त्याच्या तोडून स्वत बद्दल "मी अमुक केले अथवा करीन," असा प्रयोग कधीहि बाहेर पडत नसे ! कधीहि पडलाच तर, "मी" शब्दाचा "जगदबेचें बालक" अथवा "दास मी" असाच अर्थ अभिप्रेत असे स्वत सबंधी ते नेहमी "इथले मत" "इथली अवस्था" "ह्या देहाची स्थिति," अशा शब्दाचा उपयोग करीत ! हा त्याचा स्वभाव अगदी अल्प सहवासाच्या व्यक्तीच्याहि लक्षात आल्यावांचून राहात नसे व एखाद्याच्या "मी करीन" वगैरे गोष्टीचा श्रीरामकृष्णाना राग आलेला पाहून त्याला मोठा विस्मय वाटे व तो मनात म्हणे, "असा काय एवढा अपराध या माणसाने केला की त्यामुळे श्रीरामकृष्णाना त्याचा राग यावा ?" येथेहि हाच प्रकार झाला श्रीरामकृष्ण येतात न येतात तोच "त्या साधूची माळ हिसकावून घेऊन त्याला वैष्णव संप्रदायातून हाकून देईन," हे बाबाजीच्या तोडचे शब्द त्यानी ऐकलें, थोडक्याच वेळात पुन्हा, "लोकासाठी म्हणून मी माळ सोडीत नाही," हे शब्द त्याच्या कानावर आले ' मी हांकून देईन," "मी माळ सोडली नाही" "मी लोकाना शिकवीन" वगैरे बाबाजीच्या तोडचे "मी" पणा दाखविणारे शब्द ऐकून, सभ्यासभ्यतेच्या भीतीने आपल्या मनातील राग श्रीरामकृष्ण आमच्यासारखा लपवून ठेवूं शकले नाहीत ते एकदम उठून उभे राहिले

आणि बाबाजींच्याकडे पाहून म्हणाले, " काय ? अजूनहि तुम्हांला इतका अहंकार आहे ? तुम्ही लोकाना शिक्षण देणार ? तुम्ही हांकून देणार ? लोकाना शिक्षण देणारे तुम्ही कोण ! हें सारें जग ज्याचें आहे, त्याने शिकविल्यावाचून तुम्ही कोण शिकविणार ? " असे म्हणत असताच त्याच्या अंगावरील वस्त्र व नेसलेलें धोतरहि गळून खाली पडलें ! आपण कोणाला काय म्हणत आहो याचें त्याना भान उरलें नाही पाहता पाहता भावातिशयाने त्याना समाधि लागली आणि त्याच्या मुखमंडलावर दिव्य तेज चमकूं लागले ते खाली पडूं नयेत म्हणून हृदयहि त्याना धरून उभा राहिला !

सिद्ध बाबाजीना आजपर्यंत सर्वजण मानच देत आलेले होते त्यांना उलट उत्तर देण्याचें अगर त्याचे दोष काढण्याचे आजपर्यंत कोणीहि साहस केलें नव्हतें अर्थातच श्रीरामकृष्णाच्या या बोलण्याने ते चकित होऊन गेले परंतु तेहि थोरच पुरुष असल्यामुळे, क्रोधवश न होतां स्तब्ध बसून राहिले थोडया वेळाने त्याना श्रीरामकृष्णाच्या या बोलण्याचा अर्थ समजला व " मी असुक करीन, तमुक करीन " असे म्हणणें हाहि अहंकार होय असे त्याच्या लक्षात आलें श्रीरामकृष्णाच्या अहंकारराहित्याचें त्याना कौतुक वाटलें व त्याची समाधिस्थिति आणि अंगावरील लक्षणें व अंगाची दिव्य कांति पाहून हे काही सामान्य पुरुष नव्हत, अशी त्याची खात्री झाली

समाधि उतरल्यानंतर, बाबाजींची नम्रवृत्ति पाहून श्रीरामकृष्णाना आनंद वाटला आणि मग या दोघा थोर पुरुषाच्या ईश्वरविषयक गोष्टी सुरू होऊन, त्याच्या आनंदसागराला जी काही भरती आली, तिचें वर्णन करणें अशक्य आहे ईश्वरविषयक गोष्टी बोलत असता त्यावेळचें श्रीरामकृष्णाचें तन्मयत्व आणि वरचेवर होणारा भावावेश आणि भजनप्रसंगीचा त्याचा उद्दाम आनंद हा सर्व प्रत्यक्ष पाहून, बाबाजींना श्रीरामकृष्णाची धन्यता वाटली आणि इतके दिवस महाभावाच्या शास्त्रीय विवेचनातच आपण गढून जात होतों, पण आज तर, महाभावाचीं सर्व लक्षणें ज्याच्या ठिकाणीं आहेत अशा महापुरुषाचें आप-

त्याला दर्शन होत आहे, म्हणून त्याना अत्यत आनंद झाला व श्रीरामकृष्णा-विषयी त्याच्या मनात आदर आणि भक्ति उत्पन्न झाली पुढे, गोष्टीवरून गोष्ट निघता जेव्हां त्याना समजलें की, कलुटोल्याच्या चैतन्यआसनाचें भावावेशात ग्रहण करणारे हेच ते दक्षिणेश्वरचे परमहस, तेव्हा तर, " अशा महापुरुषालाच आपण भलतेसलते बोललो," या विचाराने त्याना अत्यत वाईट वाटलें व त्यानी अत्यत नम्रपणाने त्याबद्दल श्रीरामकृष्णाची माफी मागितली

अशा रीतीने या दोघा थोर पुरुषाची भेट झाली थोडयाच वेळाने, बाबा-जींचा निरोप घेऊन श्रीरामकृष्ण हृदयबरोबर परत आले आणि मथुरबाबूंजवळ त्यानी बाबाजीच्या उच्च आध्यात्मिक अवस्थेची पुष्कळ प्रशंसा केली ती ऐकून मथुरबाबूहि बाबाजीच्या दर्शनास गेले व आश्रमातील देवताची नित्य पूजा अर्चा व वार्षिक महोत्सव, याच्यासाठी त्यानी काही वार्षिक नेमणूक करून दिली

---

# ४. हृदयरामाची हकीगत

" तूं माझी सेवा नीट केलीस म्हणजे झाले, तुला दुसरी तपश्चर्या नको "

—श्रीरामकृष्ण

---

तीर्थयात्रा आटोपून मथुरबाबू वगैरे मंडळी परत आल्यावर थोड्याच दिवसात, हृदयरामाच्या पत्नीस देवाज्ञा झाली (१८६९) व त्यामुळे काही काळपर्यंत त्याचे मन संसारातून उडाले मागे सागितलेच आहे की, हृदय भाविक नव्हता श्रीरामकृष्णाच्या सेवेमध्ये आणि दिव्य सगतीत तो इतके दिवस राहिल्याने, त्याच्या मनात कधी कधी पारमार्थिक विचार येत, परंतु ते कायम टिकत नसत ससारयात्रा नीट चालवून, साधल्यास परमार्थ करावयाचा, हे त्याच्या जीवनाचे ध्येय होते त्यामुळे श्रीरामकृष्णाची आध्यात्मिक उन्नति त्याच्या डोळ्यासमोर झपाट्याने होत असताहि, तो समुद्रात पडूनहि कोरडाच्या कोरडाच राहिला आपल्या मामाचा अपूर्व शक्तिविकास पाहून त्याला वाटावे की, परमार्थ परमार्थ म्हणजे काय गोष्ट आहे ? मी माझ्या मामापाशी जर धरणें धरून बसलो तर ते मला सर्व देवदेवताची दर्शनें सहज करून देतील म्हणून, त्यासबंधाने आपल्याला उगीच एव्हापासूनच काळजी करावयाला नको अगोदर संसारसुख भोगूं, मग वेळ आली म्हणजे परमार्थाकडे बघूं !" आता पत्नीस देवाज्ञा झाल्यामुळे हृदयरामाला वाटलें की, आता तशी वेळ आली आहे तो आता पूर्वीपेक्षा अधिक मन लावून व निष्ठापूर्वक श्रीजगदंबेची पूजा अर्चा करूं लागला, नेसलेले धोतर व जानवें वगैरे काढून ठेवून, मधे मधे ध्यान करूं

लागला व श्रीरामकृष्णाच्या जवळ धरणे धरून बसला की, "मला तुमच्या-सारखे सारे आध्यात्मिक अनुभव तुम्ही प्राप्त करून दिले पाहिजेत " श्रीराम-कृष्णानी यावर त्याची पुष्कळ समजूत घातली की, "तुला असे करायची आवश्य-कता नाही, तूं माझी सेवा नीट केलीस म्हणजे झाले तुला दुसरी तपश्चर्या नको आणि तूं व मी दोघेहि, रात्रंदिवस जर असे ध्यानधारणेत निमग्न होऊन राहूं लागलो, तर मग आपली काळजी कोण घेईल ?" पण हृदय काही केल्या ऐकेना मग श्रीरामकृष्ण म्हणाले, " आईची इच्छा असेल तसे होईल, माझ्या इच्छेने कुठे काही होते का रे ? आईनेच तर माझी बुद्धि फिरवून माझी अशी अवस्था केली तिची इच्छा असेल, तर ती तुझीहि तशी अवस्था करील ! "

यानंतर काही दिवसानी पूजा व ध्यान करीत असताना हृदयला थोडी फार अद्भुत दर्शने व मधून मधून अर्धबाह्यदशा प्राप्त होऊ लागली ! हृदयची अशी भावावस्था पाहून एक दिवस मथुरबाबू श्रीरामकृष्णाना म्हणाले, " बाबा, हृदयची आणखी ही काय अवस्था झाली आहे ? " श्रीरामकृष्ण म्हणाले, " हृदय ढोंग करीत नाही, त्याची खरोखरच तशी अवस्था होऊ लागली आहे " मला दर्शने होऊ देत, " अशी त्याने आईजवळ प्रार्थना केल्यामुळे हे सारे होत आहे असेंच काही तरी थोडें फार दाखवून त्याचे मन आई लौकरच शात करील ! " मथुरबाबू म्हणाले, " बाबा, कुठली आई व कुठले काय ? हा सारा तुमचाच खेळ आहे ! तुम्हीच हृदयची अशी अवस्था केली आहे आणि आता तुम्हीच त्याचे मन शात करा ! आम्ही दोघे शृंगीभृंगीसारखे, तुमच्या चरणा-पाशी सदोदित राहून तुमची सेवा करणारे ! आम्हाला या असल्या अवस्था कशाला पाहिजेत ? " हे ऐकून श्रीरामकृष्ण हसूं लागले

या गोष्टीनतर काही दिवसानी, एक दिवस रात्री, श्रीरामकृष्ण उठून पच-वटीकडे चालले आहेत, असे पाहून, हृदयहि उठला व श्रीरामकृष्णांचा तांब्या व हातरुमाल घेऊन त्याच्या मागोमाग जाऊ लागला तो काही पावलें जातो न जातो, तोच त्याला एक अद्भुत दर्शन झाले त्याला दिसले की, श्रीरामकृष्ण

माणूस नसून कोणी दिव्यदेहधारी पुरुष असून, त्याच्या तेजाने साऱ्या पंचवटी-भर प्रकाश पडला आहे व चालताना त्याचे पाय जमीनीला लागत नसून, ते अधातरींच चालत आहेत! कदाचित् हा आपला दृष्टिभ्रम असेल, असें वाटून डोळे चोळून, हृदय पुन्हा पाहूं लागला, तरी तेंच हे पाहून मात्र तो चकित झाला व ' आपल्यामधे असा काय फरक झाला असावा, म्हणून आपल्याला हा असा विचित्र देखावा दिसत आहे, ' असे वाटून तो आपल्या स्वत कडे पाहूं लागला तों काय आश्चर्य ! त्याला आपलेंहि शरीर ज्योतिर्मयच असल्याचे दिसूं लागलें व कळून आलें की " आपणहि दिव्य पुरुष आहोत, प्रत्यक्ष परमेश्वराच्याच सेवेत आपण काल घालवीत आहोत, त्याच्याच सेवेसाठी आपला जन्म आहे, वास्तविक ते व आपण एकच आहोत, फक्त त्याच्या सेवेसाठी म्हणून आपण निराळें शरीर धारण केलें आहे ! " असे कळून येऊन व आपल्या जीवनाचें हे रहस्य समजून येऊन, त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला ! त्याला ससाराचा विसर पडला, स्वत चाहि विसर पडला आणि आनंदातिशयाच्या भरात, बेहोष होऊन, तो एकदम ओरडून म्हणाला, " ए रामकृष्णा, रामकृष्णा, आपण तर माणसे नाही, मग आपण इथे रे कशाला आलों ? चल, आपण देशोदेशी हिंडू आणि जीवाचा उद्धार करू ! तूं व मी एकच आहोंत ! "

श्रीरामकृष्ण सागत असत, " अशी त्याची आरडाओरड ऐकून मी त्याला म्हणालो, " हृदू, अरे केवढयाने ओरडतोस ? तुला झालें आहे तरी काय ? या तुझ्या ओरडण्याने सारे लोक धावून येतील ना ? " पण ऐकतो कोण ? त्याचें आपलें ओरडणें सुरूच ! तेव्हा मात्र मग त्याच्याकडे धावत गेलो आणि त्याच्या वक्ष स्थलावर हात ठेऊन म्हणालों, " आई ! आई ! या मूर्खाला जड करून टाक ! '

हृदय म्हणे, " त्यांनी माझ्या छातीला स्पर्श करून असे म्हटल्याबरोबर, माझी ती दिव्य दृष्टि आणि तो सारा आनंद नाहीसा झाला आणि मी आपला पुन्हा जशाच्या तसाच झालों ! मला फार दु ख झालें आणि रडत रडत मी म्हणालों,

" मामा, तुम्ही असें का केले बरे ? मला असा जड का केलात बरे ? आता मला तो दिव्य आनंद पुन्हा मिळणार नाही " हे ऐकून श्रीरामकृष्ण म्हणाले, ' मी काय तुला कायमचा जड हो म्हणून म्हणालो ? तूं आता गप्प बसावेंस, म्हणून मी तसे केले जरा कुठे एवढे तेवढेसे दर्शन झाले, तर तूं केवढा आरडा-ओरडा केलास ? म्हणून मग मला तसं करावे लागलें ! आणि मी पाहा बरे ? चोविस तास मी किती अद्भुत अद्भुत गोष्टी पाहात असतो, पण म्हणून, मी कधी असा कल्ला केला आहे ? अशा प्रकारची दर्शनें बघण्याची अजून तुझी वेळ आली नाही. सध्या शांत हो, वेळ आली म्हणजे आणखी किती तरी तुझ्या दृष्टीस पडेल "

हे श्रीरामकृष्णाचे बोलणे ऐकून हृदय गप्प बसला, पण ही गोष्ट त्याच्या मनाला फार लागली त्याने असा विचार केला की, काही होवो, पण परवा-सारखा साक्षात्कार आणखी एकदा प्राप्त करून घेतला पाहिजे आता याबद्दल श्रीरामकृष्णाजवळ बोलण्याची सोयच नव्हती, म्हणून तो त्याना न कळ-विताच, पुन्हा दररोज खूप जप आणि ध्यान करू लागला त्याने रात्रीं उठावें आणि पंचवटीखाली जाऊन, श्रीरामकृष्ण जेथे जपध्यान करीत, तेथे बसून जप ध्यान करावें एक दिवस तो असाच तेथे बसून ध्यान करीत होता रात्रीची वेळ–अंधार काळाकुट्ट पडला होता त्या दिवशी श्रीरामकृष्णानाहि पंचवटीकडे जाण्याची इच्छा होऊन, ते तिकडे जाण्यास निघाले पंचवटीपर्यंत पोहोचतात न पोहोचतात, तोच, " मामा ! धावा हो धावा ! मी आता भाजून मरतो !" असे शब्द त्याच्या कानावर पडले ! हा हृदयचा आवाज आहे असे ओळखून घाईघाईने तेथे जाऊन श्रीरामकृष्ण म्हणाले, " भिऊ नको, हा मी इथे आहे. काय झाले तुला ? " वेदनानी किंचाळत हृदय म्हणाला, " मामा, इथे येऊन ध्यान करायला बसलों आणि एकाएकी अंगाचा असा भडका उडाला की, जशी काही अंगाला आग लागली आहे ! या वेदना सहन करवत नाहीत ! " हे ऐकून त्याच्या अंगावर हात फिरवीत श्रीरामकृष्ण म्हणाले, " रडूं नको, आत्ता वेदना

नाहीशा होतील बरें ! तूं कशाला असे करीत होतास बरें ? मी एकदा तुला सांगितलें ना, की, तुला ह्या साऱ्या गोष्टींची जरूर नाही तू माझी सेवा केलीस म्हणजे झालें म्हणून ? " हृदय सांगत असे की, श्रीरामकृष्णाच्या त्या हस्त-स्पर्शाने त्याच्या वेदना खरोखरच नाहीशा झाल्या श्रीरामकृष्ण सांगतात त्याप्रमाणे वागण्यातच आपले हित आहे असे जाणून, यानंतर तो पुन्हा कधी पंचवटीखाली ध्यान वगैरे करण्यास गेला नाही

त्याच वर्षी अश्विन महिन्यांत, श्री दुर्गापूजा उत्सव करण्याची हृदयला फार इच्छा झाली मथुरबाबूंनी त्याला द्रव्याचें साहाय्य केलें, परंतु श्रीराम-कृष्णांना मात्र आपल्याच घरी ठेवणार असल्याचे त्यास सांगितलें हृदयची अशी इच्छा होती की, उत्सव आपल्या गावी करावा व बरोबर आपल्या मामा-नाहि घेऊन जावे तेव्हा मथुरबाबू त्यांना सोडत नाहीत, हे पाहून त्याचा फार विरस झाला हृदय सांगे की, " मी असा उदासीन चित्ताने गावाला जाण्याला निघालेला पाहून, श्रीरामकृष्ण माझी समजूत करून म्हणाले, ' हृदू, तुला असे वाईट वाटू देऊ नको, मी दररोज तुझ्या घरी तुझी पूजा पाहण्यास येत जाईन, म्हणजे तर झाले ? तू आपल्या मनाप्रमाणे पूजा करीत जा उगीच सारा दिवस उपास करू नको मधे दुपारी थोडा फराळ करीत जा ' असे सांगून श्रीरामकृष्णांनी पूजेसंबंधी काय काय व्यवस्था करावयाची, तें सर्व मला नीट समजावून दिलें व मीहि मोठया हर्षाने आपल्या गावीं गेलों "

गावाला गेल्यावर त्याने श्रीरामकृष्णांनी सांगितल्याप्रमाणे सर्व तयारी करून अश्विन शुद्ध षष्ठीपासून पूजेची सुरुवात केली सप्तमीच्या दिवशीं रात्रीं पूजा वगैरे करून आरती करीत असतांना त्याला दिसले की, ज्योतिर्मय शरीर धारण करून श्रीरामकृष्ण देवीच्या मागे भावावेशांत उभे आहेत ! श्रीरामकृष्णांना पाहून त्याला अत्यंत हर्ष झाला व आपल्या पूजेचें आज सार्थक झालें असे वाटून त्याला धन्यता वाटली.

पूजेचे दिवस सपल्यानंतर दक्षिणेश्वरी परत आल्यावर, त्याने श्रीराम-कृष्णांना ही हकीकत सागितली त्यावर श्रीरामकृष्ण म्हणाले, "त्या दिवशीं रात्रीं आरतीचे वेळी, तुझी पूजा पाहण्याची मला खरोखरच उत्कंठा लागून भावावेश झाला व त्यात मीं असे पाहिले की, ज्योतिर्मय शरीर धारण करून ज्योतिर्मय मार्गाने, मी तुम्या घरी गेलों असून, तुझी पूजा पाहात आहे!"

श्रीरामकृष्ण एकदा भावावेशात हृदयला म्हणाले, "तू तीन वर्षे दुर्गापूजा उत्सव करशील,"—आणि गोष्टहि खरोखरच तशी घडली श्रीरामकृष्णाच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून, चौथ्या वर्षीं तो पूजेची तयारी करू लागला असतां त्यात इतकी विघ्नें आली की, अखेरीस त्याला तो नाद सोडून द्यावा लागला पहिल्या वर्षीचा उत्सव समाप्त झाल्यानतर त्याने दुसरे लग्न केले ( १८६९-७० ) व दक्षिणेश्वरी येऊन आपल्या कामास व श्रीरामकृष्णाच्या सेवेस त्याने पुन्हा पहिल्यासारखी सुरुवात केली

यानंतरची हृदयची हकीगत म्हणजे मनुष्याच्या अधःपतनाचें एक अत्यंत विलक्षण उदाहरण आहे महामायेचा प्रभाव काही अजब आहे श्रीराम-कृष्णाच्या सर्व साधना त्याच्या नजरेसमोर झाल्या, त्याचा अद्‌भुत शक्तिविकास त्याच्या दृष्टीसमोर झाला, त्याच्या व आपल्या जीवनाचें रहस्य काय हेहि त्याला समजलें, परंतु तोच हृदय प्रत्यक्ष समुद्रात पडूनहि कोरडाच राहिला! त्याच्या अंगची भाविकता वाढली नाही, एवढच नव्हें, तर श्रीरामकृष्णाच्या दिव्य सहवासाने उत्पन्न झालेला थोडाफार भक्तिभावहि उत्तरोत्तर कमी कमीच होत जाऊन त्याच्या अंगी पराकाष्ठेची स्वार्थबुद्धि आली!! श्रीरामकृष्णाच्या दर्शनास उत्तरोत्तर अधिक अधिक लोक येऊ लागल्यामुळे हृदयला द्रव्याचा लोभ सुटला! हृदय सर्वकाळ श्रीरामकृष्णाच्या जवळ असावयाचा, पुढे पुढे असें होऊं लागले की, हृदयला खूष केल्याशिवाय कोणालाहि, मनास येईल तेव्हा आणि वाटेल तितका वेळ, मन मोकळे करून श्रीरामकृष्णाशीं बोलतांहि

येणें अशक्य झाले ! ! अर्थातच शिवदर्शन घेण्यापूर्वी प्रत्येकाला अगोदर या नंदीची यथाशक्ति पाद्यपूजा केल्याशिवाय गत्यंतर उरेनासे झाले ! हळूहळू हृदयचा लोभ वाढूं लागला असा प्रकार होत असल्याची श्रीरामकृष्णाना कुण-कुण लागताच त्यानी त्याला नानातऱ्हेने समजावले व उपदेश केला, काही वेळ रागावलेहि, पण व्यर्थ पण पुढे तर हृदय श्रीरामकृष्णावरच रागावूं लागला व मधून मधून त्यानाहि प्रत्युत्तरें देऊ लागला ! ! श्रीरामकृष्णावरील त्याचा भक्तिभावहि कमी झाला त्याच्या वर्तनामुळे श्रीरामकृष्णाना फार त्रास होऊ लागला व त्याची ही अधोगति पाहून त्याना फार दु ख झाले एखाद्या दिवशीं तर त्याना इतका त्रास होई की, तो असह्य होऊन बालक-स्वभाव श्रीरामकृष्ण एखाद्या मुलासारखे रडत व हात जोडून त्याच्या विन-वण्या करीत !

हृदय हळूहळू श्रीरामकृष्णाची नक्कल करूं लागला त्याने श्रीराम-कृष्णाच्या सारखींच गाणी म्हणावी, नृत्य करावे व भावावेश दाखवावा ! हें त्याचे वर्तन इतक्या थराला गेले की, प्रत्यक्ष श्रीरामकृष्ण व त्याची भक्त-मंडळी याच्यासमोर तो श्रीरामकृष्णाना उलट बोलूं लागला व प्रसंगविशेषी चेष्टाहि करूं लागला ! सर्वांनाच यामुळे अत्यत वाईट वाटे व हृदयचा संतापहि येई, पण उपयोग काय ? एक दिवस असेच काही कारणावरून तो श्रीराम-कृष्णांना इतका बोलला की, श्रीरामकृष्ण रडूं लागले व म्हणाले, " आई ! तूं माझें सारें ससारबंधन तोडून टाकलेस, बाबा गेले, आई गेली, भाऊ गेले, सगळ्याची वाट लागली आणि शेवटी आता काय हृदयकडून माझी अशी दुर्दशा व्हायची बाकी राहिली होती का ग ?" असे म्हणता म्हणता त्याना समाधि लागली ! समाधीतून थोडेसे देहभानावर येऊन हासत हासत ते पुन्हा म्हणूं लागले, " आई ! तो माझ्यावर खरेच प्रेम करतो, म्हणून वाटेल तसे बडबडतो, अजाण माणूस, त्याला काय कळते आई ? त्याच्यावर असे रागवायचे कशाला बरें ?" असे म्हणून ते पुन्हा समाधिमग्न झाले ! इतके झालें तरी सुद्धा हृदयची बडबड चालूच होती

पुढे एक दिवस हृदयची गोष्ट निघाली असतां मागील सर्व गोष्टी आठवून श्रीरामकृष्ण म्हणाले, " त्याने प्रथम माझी सेवा जशी केली, अखेरीस त्रासहि पण तसाच दिला. पोटशूलाने मी आजारी होतों, काही सुद्धा खाववत नसे, पाठपोट एक होऊन अंगाची नुसती हाडे उरलीं होतीं, तेव्हा एक दिवस मला काय म्हणाला, 'हें पहा, मी कसा चागला खातों पितों ? तुमच्या नशिबांतच नाही, त्याला तुम्ही काय करणार ?' आणखी एक दिवस म्हणाला, 'बुवाजी, मी नसतों तर तुमची साधुगिरी कशी काय चालती ती पाहिली असती ?' एक दिवस तर त्याने असें काही छळलें की, वैतागून जीव द्यायला गंगेच्या घाटावर गेलों ! ! ( थोडा वेळ थाबून ) पण प्रथम त्याने सेवाहि तशीच केली आई जशी एखाद्या लहान मुलाची काळजी घेते, तशी त्याने माझी काळजी घेतली. मला तर देहाचीहि शुद्ध नसे, पण त्यानेच माझी सर्व व्यवस्था नीट ठेवावी त्याने ऊठ म्हटले की मीं उठावें, बस म्हटलें की बसावे आईच्या इच्छेने तो जर त्यावेळी इथे नसता, तर माझे शरीरच टिकलें नसतें ! !" असो

पुढे पुढे तर कालीमंदिरातील नोकरचाकराना सुद्धा हृदयपासून त्रास होऊ लागला " याचा परिणाम चागला होणार नाही, तूं आपले वर्तन सुधार," असें श्रीरामकृष्णानी त्याला कितीकदा बजावलें, पण त्याने तिकडे लक्षच दिले नाही, उलट श्रीरामकृष्णानाच एखादे वेळी म्हणावें–" रासमणीच्या अन्नावाचून तुम्हांला दुसरी गति नाही, तेव्हां तुम्ही वाटल्यास सगळ्याना भिऊन वागा, मला काय कोणाची पर्वा आहे ? फार तर इथून जायला सागतीलना ? जाईन निघून ! "

हृदयची अरेरावी अधिकाधिक वाढूं लागली व सर्वांना विशेषतः श्रीरामकृष्णांना, त्याच्यापासून फार त्रास होऊ लागला, " ही ब्याद इथून कुठे काळें करील तर बरे, " असे ज्याला त्याला वाटूं लागलें हृदयच्या पापाचा घडा भरत आला. कालीमंदिर स्थापन झाले त्या दिवसाचा दक्षिणेश्वरीं दरवर्षी

उत्सव होत असे १८८१ सालच्या उत्सवाच्या दिवशी त्रैलोक्य बाबू ( मथुर-बाबूंचे पुत्र ) सर्व मंडळीसह तेथे आले होते त्या दिवशीं सकाळी देवीची पूजा करण्यास हृदय कालीमंदिरात गेला तेथे त्रैलोक्य बाबूंची दहा-अकरा वर्षांची लहान मुलगी उभी होती. हृदयने तिच्या पायावर गंध फुलें वाहून तिची पूजा केली ! साधनाकाली श्रीरामकृष्ग असेच लहान मुलींची जगदंबाज्ञानाने पूजा करीत असत, तसेच हृदयहि करू गेला ! थोडयाच वेळात त्रैलोक्य-बाबूंच्या कानावर ही गोष्ट गेली आणि त्याना हृदयचा अत्यंत संताप येऊन त्यानी आपल्या नोकराकडून हृदयला धक्के मारून कालीमंदिरातून बाहेर हाकून दिलें आणि त्याला पुन्हा कालीमंदिरात येण्याची मनाई केली !

अशा प्रकारें श्रीरामकृष्णाचा व हृदयचा संबंध संपला यानंतर हृदय कालीमंदिराच्या जवळच असलेल्या यदुनाथ मल्लिकाच्या बगीचात राहात असे श्रीरामकृष्गाकडे कालीमातेच्या प्रसादाचीं दोन ताटें येत असत. श्रीरामकृष्ग दररोज दोन्ही वेळा त्यातील एक एक ताट हृदयकडे पाठवून देत व मधून मधून स्वत त्याचेकडे जाऊन त्याचा समाचार घेत इतकें झालें तरी अजून हृदयचा लोभ कमी झाला नव्हता. एक दिवस तो श्रीराम-कृष्णाना म्हणाला, “मामा, काय तुम्ही या देवळांत राहून करता ? चला आपण कुठे तरी दुसरीकडे जाऊन एक कालीमंदिर बांधू आणि दोघेजण सुखात राहूं !” हें ऐकून श्रीरामकृष्ण संतापून म्हणाले, “साल्या, तूं मला घेऊन आता काय दारोदारीं माझें प्रदर्शन करीत हिंडणार आहेस वाटतें ?”

पुढे पुढे मात्र त्याला आपल्या वर्तनाचा फार पश्चात्ताप झाला. श्रीराम-कृष्ण समाधिस्थ झाल्यानंतर पोट भरण्यासाठी तो कापडविक्याचा धंदा करीत असे श्रीरामकृष्णासारख्या महापुरुषाच्या आश्रयाला राहून सुद्धा आपण त्यांच्या-पासून कांही एक फायदा करून घेतला नाही याचें त्याला अत्यंत दु ख होई व श्रीरामकृष्गाच्या शिष्यमडळींत मिळून मिसळून तो आपले दु:ख कमी करण्याचा

प्रयत्न करी. अशी मंडळी जमली म्हणजे तो आपलें मन मोकळें करून श्रीराम-कृष्णांच्या गोष्टी सांगत बसे. श्रीरामकृष्णांच्या साधनाकालापासून तो त्यांच्या अत्यंत निकट सहवासांस असल्यामुळे, श्रीरामकृष्णांच्या चरित्रांतील कित्येक गोष्टींची माहिती लोकांना त्याच्याचकडून मिळाली आहे. श्रीरामकृष्णांची शिष्यमंडळी त्याचा यथाशक्ति परामर्ष घेत व श्रीरामकृष्णांची त्याने मनोभावाने केलेली सेवा आठवून त्याला योग्य तो मान देत. श्रीरामकृष्ण समाधिस्थ झाल्यानंतर तेरा वर्षांनी, आपल्या वयाच्या ६२-६३ व्या वर्षी हृदय आपल्या गावीं मृत्यु पावला. ( १८९९ )

---

# ५. मथुरबाबूंचा मृत्यु व षोडशी पूजा
## ( १८७१ ) ( १८७३–७४ )

"( मथुर ) कोठे तरी एखाद्या राजकुळात जन्माला गेला असेल त्याची भोगवासना नष्ट झाली नव्हती "

" तीच ( स्वत ची पत्नी ) जर इतकी शुद्ध व पवित्र नसती तर आमच्या संयमाचा बाध भंगून जाऊन, मनात क्षुद्र देहबुद्धीचा उदय झाला असता की नाही,—हे कोणी सागावे ? "

—श्रीरामकृष्ण

---

तीर्थयात्रेहून परत आल्यानंतर दोन अडीच वर्षे विशेष काही घडले नाही स १८७७ साली श्रीरामकृष्णांचा पुतण्या ( रामकुमारांचा मुलगा ) अक्षय यास दक्षिणेश्वरीं देवाज्ञा झाली तो १८६५ सालापासून १८७० पर्यंत श्रीराधा-काताच्या पूजकपदावर होता त्याचा स्वभाव फारच सरळ व प्रेमळ असे तो अत्यंत भक्तिमान असून, आपला बहुतेक वेळा पूजा, जप, ध्यान यातच घालवी या त्याच्या गुणामुळे श्रीरामकृष्णाचे त्याचेवर अत्यंत प्रेम असे त्याच्या मृत्यूने त्याना फार दु ख झाले व ज्या खोलींत त्याचे प्राणोत्क्रमण झालें, त्या खोलींत त्यानी पुन्हा कधीहि पाऊल टाकले नाही अक्षयच्या मृत्यूनंतर श्रीराम-कृष्णाचा मधला भाऊ रामेश्वर* याची त्याच्या जागीं नेमणूक झाली.

---

* रामेश्वर १८७४ पर्यंत पूजकपदावर होता त्या वर्षीं आपल्या गावी परत गेला असता त्याला देवाज्ञा झाली त्याच्या मृत्यूच्या बातमीने आपल्या वृद्ध मातेला फार दु ख होईल असे जाणून, श्रीरामकृष्णांनी " माझ्या आईला हे

अक्षयच्या दु खाचा श्रीरामकृष्णाना विसर पडावा, म्हणून मथुरबाबू त्यांना, आपल्या जमीनदारीच्या गावी आणि आपल्या कुलगुरूंच्या गावीं घेऊन गेले व तेथे कांही दिवस घालवून त्याना बरोबर घेऊन दक्षिणेश्वरी परत आले.

मथुरबाबू आपल्या जमीनदारीच्या गावाहून परत आल्यावर थोड्याच दिवसांत मथुरबाबूंचीहि प्रकृति बिघडून ते आजारी पडले त्यांचें अवतारकृत्य समाप्त होण्याची वेळ आली श्रीरामकृष्णानी पूजकपद ग्रहण केल्यापासून आज पुरी चवदा वर्षे मथुरबाबूनी त्याची एकनिष्ठतेने सेवा केली श्रीजगदंबेच्या अचित्य लीलेने, वर्तमान युगावतार श्रीरामकृष्ण याच्या अद्भुत शक्तिविकासाला साहाय्य करण्याचा थोर मान त्याना मिळाला होता, त्यानी आपले काम किती चोख रीतीने बजावलें होते, हे आतापर्यंतच्या त्याच्या हकीगतीवरून समजून आले असेल अखेर अखेरच्या दिवसात त्याना श्रीरामकृष्णाच्या सेवेवाचून दुसरें काही सुचतच नव्हते असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ॥
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्व मम ( रामकृष्ण ) ॥

असे त्याचे मन श्रीरामकृष्णमय होऊन गेले होते

---

दु ख सहन करण्याची शक्ति दे," अशी जगदबेची प्रार्थना केली व आपल्या मातेकडे जाऊन रडत रडत त्यानी ही दु खदायक बातमी तिला सागितली. श्रीरामकृष्ण सागत असत–" मला वाटलें, की, ही बातमी ऐकून आईला धक्का बसेल, पण काय आश्चर्य–' सर्वांनाच एक दिवस जाणे आहे म्हणून व्यर्थ शोक करूं नये, ' अशी, उलट तीच माझी समजूत करूं लागली ! ! हा प्रकार पाहून मी चकित होऊन गेलों व श्रीजगदंबेला वरचेवर नमस्कार करूं लागलों ! "

श्रीरामकृष्णासारख्या महापुरुषाची सेवा अनन्य भावाने करून त्यांचें मन सहजच अतिशय उन्नत व निष्काम झाले होते श्रीरामकृष्णांवर त्याची इतकी भक्तिनिष्ठा आणि इतका विश्वास जडला होता की, तेच त्याचे सारात्सार, परात्पर होऊन गेले होते पारलौकिक सद्गतिसाठी श्रीरामकृष्णाच्या सेवेवाचून आपल्याला इतर काही एक करणें नको, असा दृढविश्वास त्यांना उत्पन्न झाला होता त्याच्या नेहमीच्या व्यवहारात सुद्धा या अपूर्व भक्तिविश्वासाची उदाहरणें पाहावयास सापडत

एकदा मथुरबाबूना एक मोठें गळूं झाले व त्याने ते अगदी अंथरुणाला खिळून पडले पाच सहा दिवसात श्रीरामकृष्णाचे दर्शनहि न झाल्यामुळे त्यानी हृदयबरोबर त्याना बोलावणें पाठविले श्रीरामकृष्ण म्हणाले –“ मी तेथे जाऊन काय करू ? मी कोणी वैद्य आहे की काय, म्हणून मला त्याचे गळू बरें करता येईल ? ” श्रीरामकृष्ण येत नाहीत असे पाहून, मथुरबाबूंनी त्याचेकडे बोलावण्यावर बोलावणी पाठवली त्याचा फारच आग्रह पाहून, श्रीरामकृष्णाना अर्थातच गेल्यावाचून राहवेना ते हृदयला घेऊन त्यांच्याकडे गेले श्रीरामकृष्ण आलेले पाहून मथुरबाबूंचा आनंद गगनात मावेना त्या आनंदाच्या भरात ते एकदम ताडकन उठून बसले व म्हणाले, “ बाबा, मला तुमच्या पायाची धूळ घेऊ द्या !” श्रीरामकृष्ण हासत हासत म्हणाले, “अहारे वेडया ! माझ्या पायाची धूळ घेऊन रे तुला काय उपयोग ? तिने तुझे गळू बरे होईल का रे ? ” हें ऐकून मथुरबाबू म्हणाले–“ बाबा, इतका मी वेडा आहे का, की हे गळूं बरें करण्यासाठी तुमच्या पायाची धूळ मागीन ? त्यासाठी तर हे डॉक्टर लोक आहेत मी हा भवसागर तरून जाण्यासाठी तुमच्या पायाची धूळ मागत आहे ” मथुरबाबूचे हे अलौकिक भक्तिविश्वासाचे शब्द ऐकून श्रीरामकृष्णाना गहिवर येऊन ते एकदम समाधिमग्न झाले आणि मथुरबाबू त्याचे चरण आपल्या मस्तकीं धारण करून आनंदातिशयाने अश्रू गाळूं लागले ! मथुरबाबूचे गळू थोडया दिवसात बरें झाले

एक दिवस भावाविष्ट होऊन श्रीरामकृष्ण मथुरबाबूंना म्हणाले, " मथुर, तूं ( जिवत ) असेपर्यंत मी येथे ( दक्षिणेश्वरी ) राहीन " हें ऐकून मथुरबाबू भयचकित झाले, कारण त्याना पूर्ण माहीत झाले होतें की, साक्षात् जगदंबाच बाबाच्या रूपाने आपलें व आपल्या परिवाराचें सर्वदा रक्षण करीत आहे ! ते मोठ्या नम्रपणाने श्रीरामकृष्णाना म्हणाले, "असें का बरे बाबा ? माझी पत्नी आणि द्वारकानाथ (पुत्र) याचीहि तुमच्यावर फार भक्ति आहे त्याना मी कोणाच्या हवाली करून जाऊ ? तें काही नाही, बाबा ! त्याच्यासाठी तुम्हाला येथे राहिलेंच पाहिजे " मथुरबाबूंचें हें बोलणें ऐकून श्रीरामकृष्ण म्हणाले, " बरं तर, तुझी पत्नी आणि द्वारका असेपर्यंत मी येथे राहीन, मग तर झालें ना ? " आणि गोष्टहि पण खरोखर अशीच घडून आली जगदंबादासी व द्वारकानाथ याच्या मृत्यूनंतर थोडयाच दिवसात श्रीरामकृष्ण गळ्याच्या रोगाने आजारी पडून दक्षिणेश्वराहून कायमचे दुसरीकडे राहण्यास निघून गेले असो

अशा रीतीने चवदा वर्षपर्यंत श्रीरामकृष्णाची अश्रुतपूर्व सेवा करून मथुरबाबू १८७१ मध्ये जुलै महिन्यात आजारी पडले. सात आठ दिवसातच त्याची प्रकृति अत्यवस्थ झाली बोलण्याने सुद्धा त्याना फार कष्ट होऊं लागले. श्रीरामकृष्णाना अगोदरच समजून चुकले होते की, मथुरबाबूंच्या अलौकिक सेवाव्रताच्या उद्यापनाची वेळ अगदी नजीक आली आहे या आजारात त्याच्या समाचारास ते स्वत गेले नाहीत, हृदयला मात्र दररोज पाठवीत शेवटच्या दिवशी तर त्यानी हृदयलाहि पाठविलें नाही मथुरबाबूंचा अंतकाळ समीप आला असे पाहून त्याना गंगेवर नेण्यात आले त्या दिवशी दुपारी (ता १६ जुलै) श्रीरामकृष्ण समाधिमग्न होऊन बसले त्याचे स्थूल शरीर दक्षिणेश्वरीं आपल्या खोलींत होते, परंतु तिकडे आपल्या दिव्य शरीराने, ते आपल्या परम-भक्ताच्या मागे उभे राहून, त्याना ज्योतिर्मय मार्गाने, अत्यंत थोर पुण्याईने प्राप्त होणाऱ्या स्वर्गलोकीं स्वत चढवीत होते ! !

श्रीरामकृष्णाची समाधि उतरली, तो पाच वाजून गेले होते श्रीराम-कृष्ण हृदयला हाक मारून म्हणाले–" मथुर दिव्य रथामध्ये बसून गेला.

श्रीजगदंबेच्या सख्यानी त्याला मोठ्या आदराने रथांत बसविलें. मथुर देवी-लोकाला गेला ”

पुढे रात्री नऊ-दहा वाजता देवालयातील चाकर-नोकर, पुजारी वगैरे मंडळी परत आली व संध्याकाळी पाच वाजता * मथुरबाबूंचें देहावसान झाल्याचें त्यानी सागितलें

मथुरबाबूंच्या मृत्यूनंतर सहा महिने लोटले दक्षिणेश्वरची सर्व व्यवस्था त्याच्या मागेहि ठीक चालली होती याच सुमारास श्रीरामकृष्णाच्या साधनेतिहासात एक विशेष गोष्ट घडून आली, तिची थोडी सविस्तर हकीगत येथ द्यावयाची आहे

मागे सागितलेच आहे की, वेदातसाधना झाल्यानंतर काही दिवसपर्यंत श्रीरामकृष्ण आपल्या गावी जाऊन राहिले होते व तेथे त्याची पत्नीहि माहेराहून आली होती श्रीरामकृष्णानी तेथे असेपर्यंत तिला नानाप्रकारचें शिक्षण दिलें होतें व लहान वय असलें तरी तिची समजूत मोठी असल्यामुळे, त्याचा तिच्या मनावर फार परिणाम झाला होता तिचें पवित्र व शुद्ध मन श्रीरामकृष्णांच्या

---

* राणी रासमणी मृत्युशय्येवर असता ज्या भीतीने अस्वस्थ झाली होती, (भाग १ ला पान, २२३) ती भीति अखेर खरी ठरली मथुरबाबू हयात असतानाच पद्ममणी व जगदंबादासी याच्यात देवालयाच्या संपत्तीबद्दल वाद सुरू झाले होते मथुरबाबूंच्या मृत्यूनंतर तर हा वाद फारच माजून तो हायकोर्टापर्यंत गेला हायकोर्टात त्याचा निवाडा होऊन तो उभयपक्षाना मान्यहि झाला. पुढे पद्ममणी व जगदबादासी याच्या मृत्यूनंतर १८८८ मध्ये तो वाद पुन्हा त्याच्या मुलात (राणी रासमणीच्या नातवात) सुरू झाला. या सर्व वादात देवालयाची सपत्ति गहाण पडली असून, अजून सुद्धा ती ऋणमुक्त झाली नाही ! !

दिव्य समतीने आनंदपूर्ण झाले होते श्रीरामकृष्ण परत आल्यावर, ती जेव्हां आपल्या माहेरीं परत गेली, तेव्हां तिचा पूर्वीचा स्वभाव बदलून गेलेला पाहून, तिच्या घरच्या मंडळीस आश्चर्य वाटलें, परंतु याचें कारण मात्र त्याच्या लक्षात आले नाही

या गोष्टीसहि आता चार वर्षे होत आलीं होती व तिला अठरावे वर्ष लागले होते आपल्या पतीचे आपल्यावर प्रेम आहे, या आनंदात ती जरी मग्न असे तरी, साऱ्या गावातील मंडळी त्याच्याविषयी तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी सागत, त्याचा तिच्या मनावर थोडा फार परिणाम होईच तिला वाटे, " तर मग त्यांचा स्वभाव खरोखरच बदलला आहे काय ? त्याना खरोखरच वेड लागलें आहे की काय ? " तिच्या मैत्रिणी तिला " वेडयाची बायको, " म्हणून चिडवीत, तेव्हां तिला अत्यंत दु ख होई व मधे मधे वाटे की, " आपण स्वत दक्षिणेश्वराला जाऊन खरा प्रकार काय आहे तो पाहिला पाहिजे बरे, जर त्याना खरोखरच वेड लागले असेल, तर आपल्यालाहि येथे राहून काय करावयाचें आहे ? तेथेच त्याच्याजवळ राहून, त्याची सेवा केली पाहिजे " असा विचार करून शक्य तितक्या लवकर दक्षिणेश्वरीं जाण्याचा तिने निश्चय केला

फाल्गुनी पौर्णिमेस गंगास्नानासाठी म्हणून ठिकठिकाणचे लोक कलकत्त्यास येत असतात जयरामवटीहून त्या वर्षी, पौर्णिमेस, स्नानासाठी पुष्कळ मंडळी कलकत्त्यास जाणार होती त्यातच तिच्या नात्यातीलहि काही स्त्रिया होत्या त्यांच्याबरोबर जाण्याची संधि चागली आहे, असें पाहून तिने आपल्या वडिलाची परवानगी विचारली रामचंद्र मुखोपाध्यायानी तिच्या मनातील हेतु ताडला व आपणच तिच्याबरोबर कलकत्त्यास जाण्याचें ठरविलें

निघण्याचा दिवस उजाडताच मंडळी निघाली. त्यावेळी रेल्वे नसल्यामुळे साधारण स्थितीतले लोक पायीच प्रवास करीत. दिवसा प्रवास करावा व रात्रीं

एखाद्या खेड्यात अगर धर्मशाळेंत मुक्काम करावा, असा क्रम असे. एकमेकांच्या संगतीत मोठ्या आनंदात मंडळी चालली असता, मध्येच एक विघ्न उपस्थित झालें चालण्याची संवय नसल्यामुळे, श्रीरामकृष्णाची पत्नी वाटेंतच आजारी पडली व रामचंद्र बाबूंना वाटेंतच एका धर्मशाळेत राहावे लागलें

अशा रीतीने भलत्याच ठिकाणी आजारी पडल्यामुळे श्रीरामकृष्णाच्या पत्नीला व इतरहि मंडळींना बराच त्रास झाला तरी त्या धर्मशाळेंत असताना तिला एक अद्‌भुत दर्शन प्राप्त झाले व त्यामुळे तिला बराच धीर आला. यासंबंधाने श्रीरामकृष्णाच्या स्त्री-भक्त मंडळींना त्या एकदा म्हणाल्या, " अंग तापाने फणफणत होते व जवळ जवळ बेशुद्ध होऊन पडले होते, अशा वेळी असे दिसलें की, एक बाई येऊन माझ्या उशाशी बसली आहे तिचा वर्ण काळा होता, तरी रूप मात्र अत्यंत सुंदर होते जवळ बसून, ती माझ्या डोक्यावरून हात फिरवूं लागली आणि त्या थंड व कोमल हस्तस्पर्शाने माझी तलखीहि कमी होऊ लागली ! मी तिला विचारले, ' बाई, तुम्ही कोठून आलात ? ' ती म्हणाली, ' दक्षिणेश्वराहून ! ' मी आश्चर्यचकित होऊन म्हणाले, ' काय ? दक्षिणेश्वराहून तुम्ही आलात ? मी सुद्धा तिकडेच जायला निघालें आहे, मनात विचार केला आहे की, तेथे जावे, त्याचे (श्रीरामकृष्णाचें) दर्शन घ्यावे आणि त्याच्या सेवेंत काळ घालवावा, पण ते सारें बाजूला राहिले नि मी ही येथे आजारी होऊन पडले आहे ! त्याचे दर्शन होण्याचें माझ्या भाग्यात आहे का हो बाई ? ' ती बाई म्हणाली, ' आहे म्हणजे ? खास आहे ! तूं आता बरी होशील, तिथे जाशील, त्याचें दर्शन घेशील, सारं काही होईल बरे ! तुझ्यासाठी तर त्याना तेथे अडकवून ठेवलें आहे ! ' मी म्हटलें, ' खरंच का ? पण, तुम्ही कोण माझ्या ? ' ती बाई म्हणाली, ' मी तुझी बहीण आहे ' हें ऐकून मी म्हटलें, ' अस्सं का ? म्हणूनच तुम्ही आलात, बर का ! ' इतका संवाद झाल्यावर मी शुद्धीवर आलें "

दुसऱ्या दिवसापासून त्याचा ताप हटला व मग एक दोन दिवस तेथेच राहून, मंडळी हळूहळू कलकत्त्याकडे जाऊ लागली वाटेंत एक वाहनहि मिळाले अशा रीतीने मुक्काम करीत करीत, मंडळी दक्षिणेश्वरी येऊन पोहोचली रात्री नवाचे सुमारास माताजी काली मदिरात येऊन पोहोचल्या आपली पत्नी आजारीपणातच तेथे आल्याचे पाहून, श्रीरामकृष्णाना फार वाईट वाटले. थंडी वगैरे लागून ताप उलटेल, या भीतीने तिला आपल्या खोलीतच, एका बाजूला, निराळा बिछाना घालून देऊन, दु खाने ते वरचेवर म्हणू लागले, " अरेरे ! तू इतक्या दिवसानी का आलीस ? आता काय माझा मथुर जिवत आहे, म्हणून तो तुझी नीट व्यवस्था ठेवील ? " दुसऱ्या दिवशी सकाळीच त्यानी वैद्याना बोलावून आणवून त्याचें औषध सुरू केले तीन चार दिवस औषधपाण्याची नीट व्यवस्था करून, ताप हटल्यावर नौबतखान्यात आपल्या मातोश्रीच्याकडे राहण्याची तिची व्यवस्था श्रीरामकृष्णानी करून दिली

त्याच्या पत्नीचा सशय दूर झाला आणि त्याची खात्री झाली की, आपले पति जसे पूर्वी होते, तसेच आताहि आहेत त्याच्या आनदाला आता पारावार नाहीसा झाला व त्या नौबतखान्यात राहून, आपल्या पत्नीची व आपल्या सासूची मनोभावाने सेवाशुश्रूषा करण्यात काळ घालवूं लागल्या आपल्या कन्येला आनंदात असल्याचे पाहून, त्याच्या पित्याने, तेथे काही दिवस राहून आपल्या गावी प्रयाण केलें

कामारपुकुरास असता श्रीरामकृष्णानी आपल्या पत्नीस शिक्षण देण्यास सुरवात केली होती, असे मागे सागितलेच आहे परतु काही दिवसानी ते दक्षिणेश्वरी परत आल्यामुळे, तें काम आपली तपश्चर्या कसोटीस लावण्याचा त्यांचा उद्देश अर्धवटच राहून गेला होता आपण होऊन कोणतेच काम करण्यात पुढाकार घ्यावयाचा नाही, श्री जगदबेच्या इच्छेने जे काही प्राप्त होईल, तें मन.पूर्वक पार पाडावयाचें, अशा प्रकारचा स्वभाव त्याच्या हाडीमासी खिळून गेल्यामुळे, आपली तपश्चर्या कसोटीस लावण्याचा विचार, पत्नी आपण होऊन

तेथे येईपर्यंत त्यानी कधी केला नाही. पत्नीला शिक्षण देण्यासाठी अथवा आपली तपश्चर्या कसोटीस लावण्यासाठी त्यानी स्वत होऊन पत्नीस बोलाविले नाही. आता पत्नी दक्षिणेश्वरासच आल्यामुळे हे कार्य पुरें करण्याचा त्यानी निश्चय केला व सर्व प्रकारच्या प्रापंचिक गोष्टीपासून तो गहन आध्यात्मिक विषयापर्यंत सर्व गोष्टीसबंधाने तिला शिक्षण देण्यास सुरुवात केली त्यानी तिला सागितलें, " चादोबा ज्याप्रमाणे साऱ्याच मुलाचा मामा, त्याचप्रमाणे ईश्वरहि आपणा सर्वांचाच आहे त्याची भक्ति करण्याचा सर्वांचाच अधिकार आहे जो त्याची भक्ति करील त्याला तो दर्शन देऊन कृतार्थ करील तू त्याची भक्ति करशील, तर तो तुलाहि दर्शन देईल ! " श्रीरामकृष्णाची शिक्षणपद्धति अशी असे की, शिष्यावर अपार प्रेम करून ते प्रथम त्यास अगदी आपलासा करून घेत व मग त्याला ते नुसता उपदेश करूनच थाबत नसत, तर आपल्या उपदेशानुसार शिष्य वागतो की नाही, इकडे बारकाईने लक्ष देऊन पाहात व त्याची कोठे चूक होत असेल तर, त्याला ती समजावून देऊन त्याला पुन्हा योग्य मार्गाला लावीत आपल्या पत्नीसबधानेहि त्यानी हीच पद्धति अमलात आणली पत्नी दक्षिणेश्वरी येताच त्यानी ती आजारी आहे असें पाहून तिला आपल्या खोलीतच जागा दिली व ती बरी होऊन नौबतखान्यात आपल्या सासूजवळ राहूं लागल्यावरहि रात्रीं तिला आपल्या शय्येवर शयन करण्याचीहि अनुमति दिली! यावरून पत्नीला त्याचेविषयी किती आपलेपणा वाटला असेल व त्याचे सर्व उपदेश ती किती तत्परतेने मान्य करीत असेल, याची वाचकानीच कल्पना करावी यावेळच्या, श्रीरामकृष्णाच्या दिव्य आचरणाची हकीगत आम्ही मागेच ( विवाहप्रकरण ) वाचकाना सागितली आहे, फक्त एकदोनच नवीन गोष्टी येथे सागावयाच्या आहेत

यावेळी एक दिवस, त्याचे पाय चेपीत असता माताजीनी त्याना एकदम विचारलें, " मी कोण आहे असें तुम्हास वाटतें ? " श्रीरामकृष्ण म्हणाले, " जी माता त्या कालीमदिरात आहे, तिनेच या शरीराला जन्म दिला असून, सध्या

नौबतखान्यात राहात आहे आणि तीच आत्ता येथे माझे पाय चेपीत आहे! तूं मला खरोखरच नेहमी साक्षात् आनंदमयीच्या स्वरूपातच दिसत असतेस!!"

आणखी एक दिवस आपल्या पत्नीला आपल्या जवळच निद्रित असलेली पाहून, आपल्या मनाला संबोधून श्रीरामकृष्ण विचार करूं लागले, "मना, ह्यालाच स्त्रीशरीर म्हणतात सारें जग यालाच परमभोग्य वस्तु समजून, त्याच्या प्राप्तीसाठी सर्वदा लाळ घोटीत असते परंतु ह्याचे ग्रहण केल्यास देहासक्तीमधे सर्वदा गुतून पडावें लागते आणि त्यामुळे सच्चिदानंद ईश्वराचा लाभ करून घेता येत नाही मना! खरें खरें साग, पोटात एक, बाहेर एक असे करू नको,—तुला हे शरीर पाहिजे की ईश्वर पाहिजे? हे शरीर पाहिजे असेल, तर हे पाहा तुझ्या शेजारीच पडलें आहे, ग्रहण कर!" असा विचार करून श्रीरामकृष्ण आपल्या पत्नीच्या शरीरास स्पर्श करण्यास तयार होणार, तोच, मन कुंठित होऊन श्रीरामकृष्णाना इतकी गाढ समाधि लागली, की त्या रात्रीं ते देहभानावर आलेच नाहीत! सकाळ झाल्यानंतर त्याच्या कानात किती वेळ तरी ईश्वराचें नामस्मरण केल्यावर, मग त्याची ती समाधि उतरली!

अशा रीतीते पूर्णयौवन श्रीरामकृष्ण आणि त्याची नवयौवनसपन्न पत्नी, याच्या या दिव्य लीलाविलासाच्या, श्रीरामकृष्णाच्याच तोडून ऐकलेल्या गोष्टी, साऱ्या जगताच्या आध्यात्मिक इतिहासात केवळ अपूर्व आहेत! कोणत्याहि थोर अवतारी पुरुषाच्या अशा अलौकिक आचरणाच्या गोष्टी ऐकिवात नाहीत! ह्या सर्व ऐकून मन अगदी चकित होऊन जाते. त्या काळी श्रीरामकृष्णाच्या रात्रीच्या रात्री समाधीमधेच जात व समाधि उतरल्यानंतरहि मन इतक्या उच्च अवस्थेत असे, की त्यामधे एक क्षणभरहि साधारण देहबुद्धीचा उदय होत नसे!

या रीतीने दिवसामागून दिवस, महिन्यांमागून महिने लोटून गेले, एक वर्षापेक्षाहि अधिक काळ लोटून गेला, तरी ते अद्‌भुत श्रीरामकृष्ण व त्याची ती अद्‌भुत पत्नी, याच्या मन संयमाचा बाध यत्किंचितहि भगला नाही!! एक

क्षणभर सुद्धा तुच्छ कामकल्पनेचा त्याच्या मनात उदय झाला नाही! यावेळच्या गोष्टीचें स्मरण करून पुढे श्रीरामकृष्ण कधी कधी आमचेजवळ म्हणत असत, "तीच (पत्नी) जर इतकी शुद्ध व पवित्र नसती व कामासक्तीने विवेकहीन बनती, तर आमच्या सयमाचा बाध भंगून जाऊन मनात देहबुद्धीचा उदय झाला असता की नाही, हें कोणी सागावें? तिच्याबरोबर एकत्र वास करीत असताना माझी खात्री झाली की, विवाह झाल्यानंतर, श्री जगदंबेची मी अत्यंत व्याकुळतेने जी प्रार्थना केली होती, की "आई! हिच्या मनातील सर्व कामभाव नष्ट करून टाक!" ती आईने खचित ऐकली होती!"

एक वर्षापेक्षा जास्त काळ याप्रमाणे पत्नीबरोबर एकत्र राहूनहि, जेव्हां कामकल्पनेचा यत्किंचितहि उदय श्रीरामकृष्णाच्या मनात झाला नाही, तेव्हां त्याची खात्री झाली की, आपण श्रीजगदंबेच्या कृपेने या खडतर परिक्षेंत उत्तीर्ण झालों व आपल्या मनात आता यापुढे कामकल्पनेचा उदय होणे अशक्य आहे! या खात्रीमुळे त्याच्या मनात एक अद्भुत इच्छा उत्पन्न झाली व त्याप्रमाणे लगेच अनुष्ठान करण्याचाहि त्यानी निश्चय केला यासंबंधाने आम्ही श्रीरामकृष्ण व श्रीमाताजी या उभयताच्या तोडून जें ऐकलें आहे, तें येथे वाचकाना सागावयाचें योजलें आहे.

आज ज्येष्ठ अमावस्या, फलहारिणी कालिकापूजेचा पुण्य दिवस अर्थातच दक्षिणेश्वरीं, कालीमंदिरात आज महोत्सव होता आज श्रीजगदंबेची पूजा स्वत करण्याचें मनात आणून त्याप्रमाणे सामानाची जमवाजमव श्रीरामकृष्णांनी चालविली होती, परंतु आज ही पूजेची तयारी मंदिरात न होतां त्याच्याच खोलींत, त्याच्याच इच्छेप्रमाणे गुप्तपणे चालली होती देवीला बसण्यासाठी, एक सुंदर चौरंग तयार करून ठेवला होता हळूहळू दिवस मावळला, रात्र झाली अमावास्येचा काळोख जिकडे तिकडे पसरला आज मंदिरांत देवीची विशेष पूजा असल्यामुळे, श्रीरामकृष्णांच्या पूजेची सर्व तयारी नीट रीतीने करून ठेऊन, हृदय श्रीजगदंबेच्या मंदिरांत निघून गेला. राधाकांताच्या मंदिरातील

रात्रीची पूजा आटोपून तेथील पुजारी श्रीरामकृष्णाच्या मदतीस आला पूजेची सर्व तयारी होता होता नऊ वाजले पूजेच्या वेळीं आपल्या खोलींत हजर राहण्यासाठी, श्रीरामकृष्णानी आपल्या पत्नीला निरोप पाठविला होता, त्याप्रमाणे तीहि आली होती सर्व तयारी झालेली पाहून श्रीरामकृष्ण पूजेस बसले.

सर्व पूजासाहित्याचें प्रोक्षण झाल्यानंतर, श्रीजगदंबेसाठी तयार केलेल्या चौरंगावर बसण्याची, आपल्या पत्नीस श्रीरामकृष्णानी खूण केली ! श्रीरामकृष्णाच्या या कृतीचा थोडाफार अर्थ, अगोदरच तिच्या लक्षात येऊन, तिला अर्धबाह्य दशा प्राप्त झाली होती अर्थातच, आपण काय करतों हें नीटसें लक्षात न येऊन, मोहनी घातल्याप्रमाणे, ती चौरंग'वर उत्तराभिमुख होऊन बसली ! जवळच असलेल्या कलशातील पाण्याने श्रीरामकृष्णानी आपल्या पत्नीला यथाविधि सिंचन केलें नंतर मंत्रोच्चारण झाल्यावर ते प्रार्थनामंत्र म्हणूं लागले —

"हे बाले ! हे सर्वशक्ति-अधीश्वरी माते, त्रिपुरासुंदरी ! सिद्धीचें द्वार मोकळें कर आणि हिचे ( पत्नीचें ) शरीर व मन पवित्र करून, हिच्या ठिकाणीं आविर्भूत हो आणि सर्वांचें कल्याणसाधन कर !"

यानंतर श्रीरामकृष्णानी आपल्या पत्नीची साक्षात् श्रीजगदंबाज्ञानाने षोडशोपचार पूजा केली व नैवेद्य दाखवून त्यातील पदार्थांचा थोडा थोडा अंश आपल्या हाताने तिच्या मुखी घातला ! हा सर्व विधि पूर्ण होतो न होतो तोंच, त्याच्या पत्नीस समाधि लागली ! अर्धबाह्य दशेंत मंत्रोच्चार करता करता श्रीरामकृष्णहि समाधिमग्न झाले ! देवी आणि तिचा पूजक दोघेहि एकरूप झाले ! !

किती तरी वेळ निघून गेला ! रात्रीचा दुसरा प्रहरहि लोटून बराच वेळ झाला, तेव्हा कुठे श्रीरामकृष्णाची समाधि उतरली ! पूर्वीप्रमाणे अर्धबाह्य दशा प्राप्त झाल्यावर त्यानी देवीला आत्मनिवेदन केलें नंतर आपली

जपाची माळ, आपल्या साधनाचें फल आणि आपल्या स्वत ला देवीच्या पादपद्मी कायमचें वाहून टाकून पुन्हा मंत्रोच्चार करीत ते तिला नमस्कार करूं लागले:—

"हे सर्व मंगलाच्या मंगलस्वरूपे ! हे सर्वकर्मनिष्पन्नकारिणी ! हे शरणदायिनी, त्रिनयने, शिवगेहिनी गौरी ! हे नारायणि, तुला शतश· प्रणाम असोत ! "

पूजा संपली मनुष्यदेहधारिणी श्रीजगदंबेची पूजा करून श्रीरामकृष्णांनी आपल्या अलौकिक साधनाची इतिश्री केली !

या षोडशीपूजेनंतर अजमासें पाच महिनेपर्यंत माताजी श्रीरामकृष्णाच्या जवळ राहिल्या होत्या पूर्वीप्रमाणेच त्या, दिवसा नौबतखान्यात आपल्या सासूच्या सेवेंत काळ घालवीत व रात्रीं श्रीरामकृष्णाच्या शेजारीच शयन करीत. श्रीरामकृष्ण रात्रंदिवस समाधिमग्न असत व केव्हां केव्हां त्याना अशी गाढ समाधि लागे की, त्याच्या शरीरावर मृताची लक्षणें दिसून येत ! श्रीरामकृष्णाना केव्हां कशी समाधि लागेल, या भीतीने माताजीना सारी रात्र झोप नसे ! एक दिवस तर किती वेळ झाला, अजून का समाधि उतरत नाही, या भीतीने त्यानी हृदयलाहि झोपेंतून उठवून आणले आल्यावर हृदयने त्यांच्या कानात किती वेळ तरी नामोच्चार केल्यावर मग त्यांची समाधि उतरली ! ही हकीगत समजल्यावर, रोज रात्रीं आपल्या पत्नीला आपल्यामुळे झोप येत नाही असें पाहून, श्रीरामकृष्णानी तिला आपल्या मातेजवळ नौबतखान्यात रात्रीं निजत जाण्यास सांगितले अशा रीतीने एक वर्ष आणि चार महिने इतका काळ दक्षिणेश्वरीं राहून, श्रीमाताजी कार्तिक महिन्यात कामारपुकुरास परतल्या

---

# ६. साधकभावासंबंधी आणखी कांही गोष्टी

" तो एकच पुरुष बुडी मारून इकडे बाहेर निघून कृष्ण झाला, तिकडे बाहेर निघून येशू झाला ! "

" शीखाचे दहा गुरु, जनक राजाचे अवतार "

" साधना करून सर्वानाच अशा अवस्था प्राप्त होतात असे नाही "

" ( स्वत कडे बोट करून ) इथे काही तरी विशेष आहे "

—श्रीरामकृष्ण

---

षोडशीपूजा समाप्त झाल्यावर श्रीरामकृष्णाचा अलौकिक साधना-यज्ञ समाप्त झाला ईश्वरानुरागाचा जो पुण्याग्नि त्याच्या हृदयात निरतर बारा वर्षपर्यंत धडाडून पेटला होता व ज्याच्या दारुण दाहक शक्तीने त्याच्या मनात इतके दिवस प्रचड खळबळ उडवून देऊन त्याना एकसारखे अस्थिर करून टाकून त्याच्याकडून नानाप्रकारच्या साधना करविल्या होत्या व यानतरहि कांही दिवसपर्यंत ज्याने त्याना सपूर्ण शाति लाभू दिली नाही, तो पवित्र अग्नि, षोडशी-पूजेच्या पूर्णाहुतीने, इतके दिवसानी थोडाफार शात झाला आणि शात न होईल तर होईल तरी काय ? श्रीरामकृष्णापाशी आता मुळी शिल्लकच काय उरले होते की, ज्याची त्यानी यापूर्वीच त्या अग्नीमध्ये आहुति दिली नव्हती ? धन, मान, नाम, यश वगैरे सर्व ऐहिक भोगा-कांक्षाचा तर त्यानी कधीच त्या अग्नीत होम करून टाकला होता ! मन, बुद्धि, अहंकार वगैरे सर्वांचीहि त्यानी त्या अग्नीच्या विकाळ मुखात एका-

मागून एक आहुति दिली होती ! नाही म्हणायला, नाना प्रकारच्या साधना करून, नानारूपानी जगदंबेला पाहाण्याची एक इच्छा, त्याच्या मनात इतके दिवस शिल्लक राहिली होती ती सुद्धा आता त्यानी या अग्नीला समर्पण करून टाकली ! मग आता तो अग्नि शात व्हावा, नाही तर व्हावें तरी काय ?

परंतु षोडशीपूजेला एक वर्ष कसे बसे लोटते न लोटतें तोच त्याच्या मनात आणखी एका मताची साधना करण्याचे आलें ( १८७५ ) त्या सुमारास त्याचा श्रीशंभूचंद्र मल्लिक याच्याशी परिचय झाला होता व त्याच्या तोंडून बायबलातील श्रीयेशुख्रिस्ताच्या पवित्र जीवनाची व सप्रदायाची, त्याना थोडी-फार माहिती झाली होती या ख्रिस्तमताचे अवलबन करून त्या मार्गांतील अत्युच्च ध्येय हस्तगत करण्याची त्याना उत्कठा लागली व श्रीजगदबेनेहि आपल्या बालकाची इच्छा, आपल्या अचित्य लीलेने, अद्भुत उपायाने, पूर्णहि केली ! तो प्रकार असा —

कालीमदिराच्या आवाराच्या दक्षिणेस यदुनाथ मल्लिक यांचा बगीचा व बगला असे श्रीरामकृष्ण कधी कधी तेथे फिरत फिरत जात असत श्रीयुत यदुनाथ व त्याची माता या दोघाची श्रीरामकृष्णावर फार भक्ति असे व ती दोघे नेहमी श्रीरामकृष्णाच्या बरोबर ईश्वरीय गोष्टी बोलत आनंद करीत असत. एखाद्या वेळीं, त्याच्यापैकी कोणीहि घरीं नसले तरी श्रीरामकृष्ण तेथे गेल्यावर तेथील नोकरचाकर त्याना दिवाणखान्यात बसण्याची विनंति करीत त्या दिवाणखान्यातील भिंतीना अनेक सुंदर सुंदर तैलचित्रें लाविलेली असत त्यातच, आपल्या आईच्या माडीवर बसलेल्या श्रीयेशुख्रिस्ताचेहि एक सुदर चित्र होते श्रीरामकृष्ण सागत असत की, एक दिवस ते त्या दिवाणखान्यात बसले असतांना, अत्यत तन्मय होऊन त्या चित्राकडे पाहात मनात येशुख्रिस्ताच्या चरित्राचा विचार करीत होते, इतक्यात त्यांना असें दिसलें की, तें चित्र जिवंत–ज्योतिर्मय झाले असून, मेरी आणि येशु यांच्या अंगांतून तेजाचे

किरण बाहेर पडून, ते आपल्या अंगात शिरून, आपल्या सर्व मानसिक भावाचें आमूल परिवर्तन करून टाकीत आहेत ! आपल्या अंत करणातील सगळे हिंदु सस्कार कोठच्या कोठे नाहीसे होऊन, त्यांच्या जागी निराळेच सस्कार उत्पन्न होत असल्याचे पाहून, श्रीरामकृष्णानी स्वत ला सावरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला व अधीर होऊन जगदबेला म्हणूं लागले, “ आई ! आई ! मला आज हें तू काय करीत आहेस ? ” पण कशाचाच काही उपयोग झाला नाही अत्यत प्रबल वेगाने ते नवीन सस्कार उत्पन्न होऊन, त्यानी त्याच्या मनातील सारे हिंदु सस्कार बुडवून टाकले देवदेवतावरील त्याचे भक्तिप्रेम कोठच्या कोठे नाहीसें झालें व त्याच्या जागी येशुख्रिस्ताच्या सप्रदायावर भक्ति व विश्वास त्याच्या मनात उत्पन्न झाला व एका चर्चमध्ये आपण येशूच्या मूर्तीसमोर उभे राहून त्याला धूपदीप दाखवून त्याच्या दर्शनासाठी त्याची व्याकुळतेने प्रार्थना करीत आहो, असें त्याना दिसूं लागले ! दक्षिणेश्वरीं परत आल्यावर सुद्धा, याच ध्यानात ते निमग्न होऊन राहिले व श्रीजगदबेचे दर्शन घेणे वगैरे गोष्टीचा त्याना पूर्ण विसर पडला ! तिसरे दिवशी सध्याकाळीं पंचवटीखाली सहज हिंडत असता, त्याना दिसले की, एक अपूर्व तेज संपन्न गौर वर्णाचा भव्य पुरुष स्थिर दृष्टीने पाहात आपल्याकडे येत आहे ! त्यानी त्याला पाहताच ओळखले की, हा पुरुष कोणी तरी विदेशीय असावा. त्याचे डोळे विशाल असून, त्याचे नाक जरी थोडेसें चपट होतें, तरी त्यामुळे त्याच्या मुखमंडलाची अपूर्व शोभा काही कमी नव्हती त्या पुरुषाकडे पाहून, “ हा देवासारखा दिसणारा पुरुष कोण असावा ? ” असा श्रीरामकृष्ण विचार करू लागले. तो पुरुष अगदी जवळ येऊन ठेपला व एकाएकी श्रीरामकृष्णाच्या अंत करणातून ध्वनि निघाला की, अरे हा पुरुष येशुख्रिस्तच ! ” इतक्यात श्रीरामकृष्णाना आलिंगन देऊन तो पुरुष त्याच्या शरीरात अंतर्धान पावला आणि त्याबरोबर श्रीरामकृष्णाना गाढ समाधि लागली ! अशा रीतीने ख्रिस्ती धर्माचें अंतिम ध्येय श्रीरामकृष्णाना हस्तगत झालें.

पुढे एक दिवस सहज बोलत असता, श्रीरामकृष्ण आम्हाला म्हणाले, " का रे ? तुम्ही मंडळींनी तर बायबल वाचलें आहे, मग त्यात येशु-ख्रिस्ताच्या शरीराचे वर्णन कसे केले आहे सागा पाहूं ? " आम्ही उत्तर दिले, " महाराज, त्याच्या शरीराचे वर्णन बायबलात कोठे केल्याचे पाहण्यात नाही, तरी पण येशु जातीने यहुदी असल्यामुळे गौरवर्णाचे होते, त्याचे डोळे मोठे होते व त्याचे नाकहि चागले लाबट होते, यात संशय नाही " हें ऐकून श्रीरामकृष्ण म्हणाले, " पण मी तर त्याचें नाक चपटें असल्याचें पाहिले मग असे कसे मला दिसले कोण जाणे ! " यावर आम्हीं काहीच उत्तर दिलें नाही, तरी पण आम्हाला येवढे मात्र वाटल्यावाचून राहिले नाही की, श्रीरामकृष्णानी भावावेशात पाहिलेली येशु ख्रिस्ताची मूर्ति, खरोखरच त्याच्या-सारखी कशी असावी ? असो श्रीरामकृष्ण समाधिस्थ झाल्यावर आम्हाला असे कळले की, येशु ख्रिस्ताच्या शारीरिक घडगीसबधाने तीन प्रकारचीं मते प्रचलित आहेत व त्यातच एक मत असे आहे की त्याचें नाक चपटे होतें !

बुद्धदेवासबधी इतर हिंदूंच्याप्रमाणेच त्याचाहि विश्वास होता, की बुद्ध-देव हे साक्षात् परमेश्वराचेच अवतार होऊन गेले पुरीक्षेत्राच्या श्रीजगन्नाथ मूर्तीमध्ये श्रीबुद्धदेवाचा प्रकाश अद्यापहि आहे अशी त्याची दृढ धारणा होती. श्रीजगन्नाथ क्षेत्री गेल्यास जातिभेदाची भावना नष्ट होऊन जाते, असे त्या क्षेत्राचे माहात्म्य ऐकून, तेथे जाण्याची त्याना फार उत्कठा लागली होती पण तेथे गेल्यास आपले शरीर राहणार नाही, या भीतीने त्यानी तेथे जाण्याचा बेत रहित केला ! श्रीजगन्नाथाचा प्रसाद ग्रहण केल्यास मनुष्याचे मन तत्क्षणींच पवित्र होऊन जाते असा त्याचा दृढ विश्वास होता विषयी लोकाच्या संगतींत कांही काल गेल्यास, ते स्वत थोडेसें गंगेचें पाणी व श्रीजगन्नाथदेवाचा थोडासा प्रसाद ग्रहण करीत व आपल्या शिष्य मंडळीसहि तसेंच करावयास सांगत ! श्रीरामकृष्णाचे परमभक्त श्रीयुत गिरीशचंद्र घोष यांनी बुद्धचरित्रावर रच-लेलं नाटक पाहून श्रीरामकृष्ण म्हणाले, " श्रीबुद्धदेव ईश्वरावतार होते यात

मुळीच संशय नाही त्यांनी उपदेशिलेल्या मतात व वैदिक ज्ञानमार्गात काही सुद्धा फरक नाही ! "

श्रीरामकृष्णांची जैन धर्मावर व शीख धर्मावरहि भक्ति असे त्यांच्या खोलीत, इतर देवदेवतांच्या चित्राबरोबरच महावीर तीर्थंकराची एक पाषाण-मूर्ति व येशु ख्रिस्ताची एक तसबीर असे दररोज सकाळ संध्याकाळी, इतर देवदेवतांच्या चित्राबरोबरच, याहि चित्रांना ते धूपदीप दाखवीत ! जैन व शीख धर्माविषयी त्यांच्या मनात भक्ति होती, तरी पण तीर्थंकरांपैकी अथवा शिखांच्या दहा गुरूंपैकी कोणालाहि त्यांनी ईश्वरावतार म्हटल्याचे आमच्या ऐकिवात नाही शीखांच्या दहा गुरूंसबंधाने ते म्हणत, " ते सारे जनक ऋषींचे अवतार होते शीख मंडळीच्या तोंडून मी असे ऐकले आहे की, देहत्यागाचे वेळी, जनक राजाच्या मनात लोककल्याण करण्याची इच्छा उत्पन्न झाली होती व म्हणून त्याने नानकापासून गुरु गोविंदापर्यंत दहा गुरूंच्या रूपाने अवतार घेऊन, शीख लोकांत धर्मसंस्थापना केली

या रीतीने जगातील सर्व मुख्य मुख्य धर्मांशी श्रीरामकृष्णांचा परिचय झालेला होता व त्यांपैकी बहुतेकांचे त्यांनी अनुष्ठान करून त्या त्या धर्मात सांगितलेले ध्येय हस्तगत करून घेतले होते अशा प्रकाराने निरनिराळ्या धर्मांचे अनुष्ठान स्वत करून आणि प्रत्येक धर्माचे अंतिम ध्येय एकच असल्याचें प्रत्यक्ष अनुभव घेऊन, त्यांची दृढ धारणा झाली, की " जितकीं मतें तितके मार्ग " कोणत्याहि मार्गाने गेल्यास, ईश्वराची नि संशय प्राप्ति होते अंत करणात बळकट श्रद्धा-विश्वास आणि भक्ति असली म्हणजे झाले. श्रीरामकृष्णांच्या ह्या सिद्धांताला आध्यात्मिक राज्यामध्ये काही अपूर्व किंमत आहे कारण हा सिद्धांत जरी पूर्वकालींहि सांगितला गेला होता, तरी श्रीराम-कृष्णांच्या वेळेपर्यंत कोणाहि एका व्यक्तीने, निरनिराळ्या धर्मांचे स्वत अनुष्ठान करून, त्या अनुभवाच्या जोरावर ह्या सिद्धांताचें प्रतिपादन केलेले नव्हते श्रीरामकृष्णांनी स्वत अनुष्ठान करून, आपल्या अधिकारयुक्त वाणीने " मतें

तितके मार्ग," हा सिद्धात प्रतिपादला असल्यामुळे आध्यात्मिक जगतात त्याला केवढी मोठी किमत आहे, हे सागावयास नको

द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत ही तीन निरनिराळी मते नसून मनुष्याच्या आध्यात्मिक उन्नतीच्या त्या केवळ तीन पायऱ्या आहेत व प्रत्येकाला या तिन्ही पायऱ्यावरून जावे लागतें असा सिद्धात, प्रत्यक्ष अनुभवावरून श्रीरामकृष्णानीच प्रथम लोकापुढे माडला उपनिषदादि शास्त्रामध्ये, पूर्वोक्त तिन्ही मतें ऋषीनी प्रतिपादिली असल्यामुळे, शास्त्रोक्त धर्ममार्गामध्ये अतिशय गोंधळ होऊन, तो किती गुतागुतीचा होऊन बसला आहे हे नव्याने सागावयास नको प्रत्येक संप्रदायाच्या आचार्यानी दुसऱ्या सप्रदायाचे मत खडण करून, आपले मत प्रस्थापित करण्यासाठी आटोकाट प्रयत्न करावा, शब्दाचे अर्थ उलटे सुलटे करावे व अशा रीतीने एकदर धर्ममार्गच गुतागुंतीचा करून ठेवावा, असा प्रकार झाल्यामुळे "शास्त्रविचार" अथवा "शास्त्रोक्त धर्ममार्ग" असे शब्द उच्चारताच साधारण लोकाच्या मनात धडकीच भरावी यात आश्चर्य कोणते ? अशा भीतीचाच परिणाम म्हणजे शास्त्रावर अविश्वास उत्पन्न होणे व भारतवर्षाची साप्रतची आध्यात्मिक अवनति हा होय. युगावतार श्रीरामकृष्णाना हा अविश्वास नाहीसा करण्यासाठीच, सर्व प्रकारच्या अवस्थाचा स्वत अनुभव घेऊन, त्याचा परस्पर सबंध प्रस्थापित करणे भाग पडले यासबधी श्रीरामकृष्णाच्या खालील उक्ती लक्षात ठेवण्यासारख्या आहेत —

"विषयासक्त साधारण मनुष्याला द्वैतभावच प्रशस्त"

"मनबुद्धिसाहाय्याने विशिष्टाद्वैतापर्यंत बोलता व समजता येते त्या वेळीं ईश्वर ज्याप्रमाणे सत्य, त्याप्रमाणेच जीव जगत हेहि सत्य"

"अद्वैतभाव ही अखेरची पायरी असे समजावें. अद्वैतभाव हा वाक्यमनातीत उपलब्धीचा विषय आहे."

श्रीरामकृष्णाच्या आणखी एका अद्भुत दर्शनाची हकीकत देऊन साधकभावाची इतिश्री करू सन १८७५ मध्ये, एकदा श्रीरामकृष्णाना श्रीचैतन्यदेवाचें सर्वजनमनोहर नगरसंकीर्तन कसे असे, ते पाहण्याची फार इच्छा झाली व ही त्याची इच्छा जगदंबेने पूर्णहि केली एक दिवस, श्रीरामकृष्ण आपल्या खोलीच्या बाहेर उभे राहून, पंचवटीकडे सहज पाहत असता, त्याना असे दिसले की, तिकडून आपल्या खोलीच्या बाजूने, दक्षिणेश्वर बागेच्या मुख्य फाटकाकडे एक प्रचंड जनसमूह भजन करीत चालला आहे ! असे दिसले की, श्रीनित्यानंद व श्रीअद्वैत, याना बरोबर घेऊन, त्या जनसमुदायाच्या मध्यभागी श्रीगौरागदेव स्वत भावावेशात नृत्य भजन करीत असून आजूबाजूची मडळीहि देहभान विसरून, त्याच्याबरोबर नाचत मोठमोठ्याने हरिनामाचा गजर करीत आहेत ! त्या मेळ्यात इतके लोक होते की, त्या मेळ्याचा आरभ व शेवट कोठे आहे हेहि दिसत नव्हते ! या मेळ्यातील काही लोकाची तोंडे श्रीरामकृष्णाच्या पक्की लक्षात राहून गेली व पुढे ते लोक आपले भक्त म्हणून येऊ लागलेले पाहून त्याची खात्री झाली की, पूर्वजन्मीं ते लोक चैतन्यदेवाचे भक्त होते !

या अद्भुत दर्शनानतर काही दिवसानी श्रीरामकृष्ण आपल्या कामारपुकुर गावी व हृदयच्या शिऊडगावी काही दिवस राहण्यास गेले होते शिऊडजवळच श्यामबाजार म्हणून एक गाव असून तेथे पुष्कळ वैष्णवाची वस्ती असे त्या ठिकाणी नित्य भजन वगैरे चालते असे ऐकून तेथे जाण्याची श्रीरामकृष्णाना इच्छा झाली श्यामबाजार जवळच बेलटे म्हणून एक गाव आहे, तेथील श्रीयुत नटवर गोस्वामीनी यापूर्वीच श्रीरामकृष्णाना पाहिले होते श्रीरामकृष्ण शिऊडला आल्याचे ऐकून, त्यानी त्याना आपल्या घरी येण्याचे आमत्रण पाठविले हृदयला बरोबर घेऊन श्रीरामकृष्ण तेथे गेले व तेथे सात दिवस राहून श्यामबाजारच्या वैष्णव मडळीचे भजन त्यानी ऐकले श्यामबाजारच्या ईशानचद्र मल्लिकाची त्याचेवर भक्ति जडली व त्यानी श्रीरामकृष्णाना आपल्या घरी भजनास बोलाविले भजनाचे वेळचा त्याचा भावावेश आणि मधुर नृत्य पाहून, जमलेली सर्व मंडळी तल्लीन होऊन गेली. लौकरच श्रीरामकृष्णाच्या अद्भुत भज-

नाची कीर्ति त्या व जवळपासच्या गावात पसरली हळूहळू त्यांचें भजन ऐकण्यास व त्याचेबरोबर भजन करण्यास, जवळपासच्या गावातून लोकाच्या झुंडीच्याझुंडी श्यामबाजार गावात येऊ लागल्या व त्या गावात रात्रंदिवस भजनें सुरू झाली हळूहळू लोकात अशी बातमी पसरली की, एकजण मोठा सुदर भजन करणारा भगवद्भक्त आहे, तो भजन करताना काही वेळ मरून जातो व पुन्हा काही वेळाने जिवत होतो ! मग काय विचारावे ? श्रीरामकृष्णाचें दर्शन घेण्यास लोकाची इतकी गर्दी लोटली की, काही विचारूं नये झाडावर चढून, घरावर बसून, जिथे जागा सापडेल तिथे जाऊन लोक त्याचे दर्शन घेऊं लागले त्याच्या चरणावर मस्तक ठेवण्यासाठी तर याहूनहि अधिक गर्दी होऊ लागली ! लोक दर्शन घेण्यास व पाया पडण्यास जसे काही वेडे होऊन गेले होते ! हा प्रकार एकसारखा तीन दिवस चालला होता ! श्रीरामकृष्णाना जेवणाखाण्यास की विश्राति घेण्यासहि वेळ सापडेना हे पाहून, हृदयने चलाखी करून, त्याना लपवून घराच्या मागच्या दाराने शिऊडास नेले, तेव्हा कोठे श्यामबाजारची गर्दी मोडली व श्रीरामकृष्णाना विश्राति मिळाली ! काही दिवस शिऊडला राहून हृदयसह श्रीरामकृष्ण दक्षिणेश्वरी परत आले

# ७. गुरुभाव आणि गुरु
## ( प्रास्ताविक )

“ साचा तयार झाला आहे, तुम्ही आपापली जीवने त्यात घालून घडवून घ्या ! ”

“ धर्मलाभ कसा होईल, ईश्वरलाभ कसा होईल, अशी तळमळ लागून जे येथे येतील, त्यांचे मनोरथ पूर्ण होतील ”

“ साधक जन्मभर परिश्रम करून मोठ्या कष्टाने एक दोन भावात सिद्ध होऊ शकतो, इथे एकाच वेळी एकाधारें तसले एकोणवीस भाव वसत आहेत ! ”

“ आम्ही सरकारी माणसे, आईच्या जमीनदारीत जिथे कुठे गोधळ झाला असेल, तिथे आम्हाला धावून जावे लागते ! ”

“ प्रात काळी माझे मन सर्व जग व्यापून राहते, म्हणून त्यावेळी माझे स्मरण करीत जा ”

“ आई म्हणते की, ‘ गावोगावी, घरोघरी तुझें आसन होईल ! ’ ”

“ जो राम आणि कृष्ण ( झाला होता ) तोच आता राम-कृष्ण होऊन आला आहे ”

“ आणखी दोनशे वर्षांनी वायव्य दिशेकडे यावें लागणार आहे ”

—श्रीरामकृष्ण

---

श्रीरामकृष्णाच्या ठिकाणी गुरुभावाचा प्रकाश अगदी लहानपणापासून असल्याचे दिसून येते, तरीपण तरुणपणी निर्विकल्प समाधिलाभानंतर त्याचा पूर्ण विकास झाला हे खरे थोर थोर अवतारी पुरुषाच्या जीवनाकडे पाहिल्यास असे दिसून येते की, त्याच्या ठिकाणी ज्ञानाचा प्रकाश लहानपणापासूनच होता. ज्ञानलाभानंतर जसे वर्तन असावे, तसे वर्तन त्याचे लहानपणापासूनच होतें. जो यथार्थ गुरु असतो त्याच्या ठिकाणी ते गुरुत्व लहाणपणी सुद्धा असल्याचें दिसून येते स्वामी विवेकानद म्हणत असत की, मनुष्य एखाद्याला आपला गुरु अगर पुढारी म्हणून निवडत नाही, जो गुरु अथवा पुढारी असतो, तो गुरुत्वाचा अधिकार घेऊनच जन्मास येत असतो, असो

श्रीरामकृष्णाच्या साधनायज्ञाची परिसमाप्ति होऊन ते गुरुपदवीवर अधिष्ठित झाल्यानतर त्याच्या हातून लोककल्याणाचे महत्कृत्य कसे सहज लीलेने होत गेलें हे सागण्यापूर्वी, श्रीरामकृष्णाच्या अलौकिक गुरुभावाचे रहस्य यथार्थ रीतीने समजावे म्हणून काही गोष्टीचा येथ विचार केला पाहिजे गुरुभाव म्हणजे काय, एखाद्या महापुरुषाच्या ठिकाणी त्याचा पूर्ण विकास होणे केव्हा सभवतें, निर्विकल्प समाधि म्हणजे काय व तिच्या लाभानंतर मनुष्याची स्थिति कशा प्रकारची असते, इत्यादि गोष्टीची आपल्या कारणापुरती मीमासा करणे आवश्यक आहे

ज्यानी श्रीरामकृष्णाना एक दोन वेळा ओझरतेच पाहिलेलें असे व ज्याचा त्याच्याशी विशेषसा परिचय झालेला नसे, त्यानी श्रीरामकृष्णाच्या अलौकिकत्वाच्या काही गोष्टी त्याच्या शिष्य मडळीकडून ऐकल्यास, ते चकित होत व त्याना त्या गोष्टी एकदम खऱ्याहि वाटत नसत त्याना वाटे की, "आम्ही सुद्धा त्याना पाहिलें आहे, मग आम्हाला त्याच्यात काही अलौकिक असे दिसले नाही ते ? ते तर अगदी गरीब, नम्र दिसतात, जो दिसेल त्याला प्रथम नमस्कार करतात, कोणी त्याना गुरु म्हटल्यास त्याना ते खपत नाही, लगेच म्हणतात, 'कोण कुणाचा गुरु ? एक ईश्वरच गुरु, तोच कर्ता करविता,

मी तर हीनाहून हीन, तुमच्या दासाचा दास, तुमच्या अंगावरल्या एखाद्या लहान केसासारखा मी ! ' —असे म्हणून लगेच त्याच्या पाया पडण्यासहि कमी करीत नाहीत, अशा दीन गरीब माणसाला तुम्ही सर्वशक्तिमान म्हणता, तेव्हां याला काय म्हणावें व यावर विश्वास तरी कसा बसावा ? ”

आणि खरोखरच, श्रीरामकृष्ण जेव्हा साधारण देहभानावर असत, तेव्हा सर्व प्राणिमात्रात ईश्वर भरलेला आहे, ही त्याची इतकी दृढ धारणा असे की, ते आपल्याला मनुष्याचा तर काय, पण सर्व प्राणिमात्राचा दास असे समजत ! आणि खरोखरच या भावनेने सर्वांच्या पायाची धूळ सुद्धा घेण्यास ते कमी करीत नसत !! त्यावेळी त्याना गुरु म्हटलेले बिलकुल खपत नसे, परतु भावावस्थेतील अथवा समाधि-अवस्थेतील त्याचे तेजोमय वदन-मडळ पाहून, “ हेच ते मघाशी स्वत ला दीनाहून दीन, दासाचे दास म्हणून घणारे श्रीरामकृष्ण, ” असे कोण म्हणाले असते ? त्या अद्भुत भावावेशात श्रीजगदबेच्या हातातील यत्ररूप होऊन, जेव्हा ते स्पर्शाने अगर नुसत्या इच्छामात्रेकरून एखाद्याचे देहभान नष्ट करून त्याला समाधि लावीत अगर भगवत्प्रेमाचा प्रचड प्रवाह त्याच्या हृदयात उत्पन्न करीत अथवा आपल्या अलौकिक शक्तिबलाने त्याच्या मनाची मलीनता आणि ससारासक्ति नष्ट करून त्याचे मन मागे कधीहि झाले नव्हतें असे ईश्वर-चितनात तल्लीन ीत, तेव्हा त्याची ती अपूर्व शक्ति पाहून नि सशय वाटे की, हे मघाचे श्रीरामकृष्ण नव्हत ! हे खरोखरच, अज्ञानाने अंध झालेल्या, त्रिविध तापाने तापलेल्या, भवरोगाने ग्रासलेल्या, असहाय, दीन, अनाथ मानवाचे गुरु व त्राते होत ! आणि याच त्याच्या दिव्य शक्तीला उद्देशून त्याचे भक्त त्याना गुरु, कृपासागर, भगवान् इत्यादि नावानी सबोधीत दिसण्यात परस्परविरुद्ध अशा दोन गोष्टी—दीनपणा व सर्वशक्तिसंपन्नता—श्रीराम-कृष्णांवाचून इतर कोणाचेहि ठिकाणीं आम्हाला कधीहि दिसल्या नाहीत ह्या दोन परस्परविरुद्ध गोष्टी एकाच ठिकाणी कशा संभवतात, हें पाहण्यासाठी

निर्विकल्प समाधि व सर्वात्मभाव याच्याविषयी थोडासा विचार येथे करणें प्राप्त आहे

**प्र** —निर्विकल्प समाधि म्हणजे काय ?

**उ** —मनाला सकल्पविकल्परहित अशा अवस्थेत आणणें, याला ' निर्विकल्प समाधि अवस्था ' असे म्हणतात

**प्र** —सकल्प-विकल्प म्हणजे काय ?

**उ** —बाह्य जगतातील रूपरसादि विषयाचे ज्ञान अथवा त्याचा अनुभव, सुखदुःखादि ऊर्मि, कल्पना, विचार, अनुमान, इत्यादि मानसिक व्यापार आणि ' मी हे करीन, ' ' ते समजून घेईन, ' ' याचा भोग घेईन, ' ' त्याचा त्याग करीन, ' इत्यादि मनाच्या विविध वृत्ति, याना सकल्पविकल्प म्हणतात

**प्र** —या वृत्ति कशामुळे उत्पन्न होतात ?

**उ** —' मी ' ' मी ' हे ज्ञान अथवा बोध असला म्हणजे जर हे ' मी ' पणाचें ज्ञान, हा ' अहं 'कार कायमचा नष्ट झाला अथवा काही वेळापुरता तरी नाहीसा झाला, तर त्यावेळी मनामध्ये कोणतीच वृत्ति उत्पन्न होत नाही.

**प्र** —मूर्च्छेमध्ये अथवा गाढ निद्रेमध्ये सुद्धा हा मीपणाचा बोध उरत नाही मग निर्विकल्प समाधि म्हणजे अशी एखादी अवस्था आहे की काय ?

**उ** —नाही, मूर्च्छा अथवा गाढ निद्रा या अवस्थात मीपणाचा बोध नसतो असे नव्हे, तो असतोच इतकेच की, ज्या मेंदुरूप यन्त्राच्या साहाय्याने मन ' मी ' ' मी ' करीत असते, त्या यंत्राची क्रिया काही वेळपर्यंत थोडीफार बंद पडलेली असते, इतकेंच परंतु सर्व वृत्ति आत गजबजलेल्या असतातच.

श्रीरामकृष्ण याला एक सुंदर दृष्टांत देत,-' खबूतरें वाटाणे खाऊन, गळा फुगवून, " गटर्र घुम् " असा आवाज करीत असतात, एखाद्याला अगदी वाटेल की, याच्या तोंडात काही सुद्धा नाही पण त्याच्या गळ्याला हात लावून पाहा बरें ?--असे दिसेल की, त्याच्या तोंडात वाटाणे जसे नुसते ठेचून भरलेले आहेत ! '

**प्र** —मूर्च्छा अगर सुषुप्तीमधे तुम्ही म्हणता त्याप्रमाणे ' मी ' पणाचा बोध असतो, हे समजावें कशावरून ?

**उ** —प्रत्यक्ष फळ पाहून मूर्च्छेमधे अथवा सुषुप्तीमधे हृदयाचे स्पंदन, हातापायाच्या नाड्या, रुधिराभिसरण वगैरे सर्व शारीरिक क्रिया सुरूच असतात, त्या बंद पडत नाहीत, कारण या क्रिया सुद्धा, मीपणाच्या बोधाच्या आश्रयानेच घडत असतात दुसरी गोष्ट -मूर्च्छेची अगर सुषुप्तीची बाह्य लक्षणें काही अंशी समाधीसारखीच असली, तरी त्यातून मनुष्य जेव्हा सावध होतो तेव्हां त्याचे ज्ञान अथवा आनंद जशाचा तसाच असतो, तो मुळीच वाढलेला अथवा कमी झालेला नसतो त्याच्या वृत्तीहि जशाच्या तशाच असतात, उदाहरणार्थ, कामी मनुष्याचा काम जशाचा तसा असतो, लोभी मनुष्याचा लोभ, जशाचा तसा असतो, इत्यादि निर्विकल्प समाधि-अवस्थेचा अनुभव प्राप्त झाल्यावर ह्या सर्व वृत्ति नाहीशा होतात, अंतःकरण अपार आनंदाने भरून जाते व जगत्कारण भगवानाच्या साक्षात् दर्शनाने, ' ईश्वर आहे की नाही, ' वगैरे संशय पार नाहीसे होऊन जातात.

**प्रः**—बरे, समजले की, निर्विकल्प अवस्था प्राप्त होऊन काही काळपर्यंत श्रीरामकृष्णाच्या मीपणाचा लोप झाला होता मग पुढे काय झालें ?

**उः**—याप्रमाणे मीपणाच्या बोधाचा लोप झाल्यावर, कारणस्वरूपिणी श्रीजगदंबेचें साक्षात् दर्शन श्रीरामकृष्णाना झाले पण तेवढयानेच तृप्ति न होऊन, सदासर्वकाळ तसेच दर्शन व्हावें म्हणून त्याच अवस्थेत राहण्याचा ते प्रयत्न करू लागले हा प्रयत्न चालू असतां, केव्हा केव्हा त्याच्या मीपणाचा

पूर्ण लोप होऊन शरीरावर मृताची सर्व लक्षणे दिसून यावी, आत मात्र श्रीजगदंबेचें पूर्ण दर्शन घडत असावे, केव्हां केव्हां मीपणाचा अल्पांश मात्र शिल्लक राहून शरीरावर जिवतपणाची थोडीफार लक्षणें दिसून यावी व आत त्याच्या शुद्ध सत्वगुणमय मनाच्या पडद्यातून श्रीजगदंबेचें किंचित् बाधायुक्त दर्शन होत असावे—अशा रीतीने कधी मीपणाचा पूर्ण लोप व मनाच्या सर्व वृत्तींचा पूर्ण लय होऊन जगदंबेचे पूर्ण दर्शन व्हावे, तर कधी मीपणाचा थोडासा अंश उरून थोड्याशा चित्तवृत्तीहि उरून श्रीजगदंबेचे ओझरते दर्शन व्हावें, असा प्रकार एकसारखा सहा महिने सुरू होता! त्यानंतर, श्रीजगदंबेने म्हणा, की श्रीभगवानांनी म्हणा, की जें विराट् चैतन्य अथवा जी विराट् शक्ति, जगद्रूपाने प्रकाशित असून सर्व चराचरांत ओतप्रोत भरून उरून निरनिराळ्या नामरूपांनी नटलेली आहे तिने म्हणा, त्यांना "अरे! तूं भावमुखी राहा," असा आदेश केला! "भावमुखी राहा," म्हणजे, "अहंकाराचा पूर्ण लोप करून निर्गुण भावामधे अवस्थान करू नको, तर, 'ज्यापासून या अनंत भावांची उत्पत्ति होत असते तो विराट् अहंकारच मी, त्याची इच्छा तीच माझी इच्छा, त्याचे कार्य तेंच माझें कार्य,' ही भावना सदासर्वकाळ मनांत वागवून आपले आयुष्य घाल व लोककल्याण साध," असा आदेश केला. या अवस्थेला पोहोचल्यावर मी अमक्याचा मुलगा, मी तमक्याचा पिता, मी ब्राह्मण, इत्यादि सर्व गोष्टी मनांतून अगदी धुवून, पुसून काढल्या जातात व 'मी' तो 'विश्वव्यापी मी' आहे,' याच गोष्टीचा बोध सदासर्वकाळ जागृत राहातो. श्रीरामकृष्ण वरचेवर म्हणत, "बाबांनो, मी अमक्याचा मुलगा, मी तमक्याचा बाप, मी ब्राह्मण अथवा मी शूद्र, मी पंडित अथवा मी श्रीमंत, हा सगळा 'कच्चा' अहंकार, यानेच मनुष्य बंधनांत पडतो, या अहंकाराचा त्याग करावा आणि 'मी भगवंताचा दास, मी त्याचा भक्त, मी त्याचें अपत्य, मी त्याचा अंश,' हा 'पक्का' अहंकार, हाच सदैव मनांत वागवावा."

याप्रमाणे निरंतर भावमुखी राहून विराट अहंकाराशी आपलें ऐक्य असल्याचा ते जेव्हा अनुभव घेत, तेव्हां अर्थातच ते श्रीजगदंबेच्या निर्गुण

भावापासून काही पायऱ्या खाली उतरलेले असत, हें सागावयास नकोच परंतु या अवस्थेंतसुद्धा त्यांचा एकत्वाचा अनुभव इतका दृढ असे की, या ब्रह्माडातील सर्व व्यवहार आपणच करीत आहो, असा त्याना प्रत्यक्ष अनुभव येई ! या अवस्थेचा अत्यत अल्प अनुभव सुद्धा अथवा तिची नुसती कल्पना सुद्धा अतिशय अद्भुत असते या त्याच्या सर्वात्मभावासंबंधाचीं एक दोन उदाहरणे येथे सागितल्यास वाचकाना त्याची थोडीशी कल्पना येईल

एका पावसाळ्यात, कालीमदिराच्या आवारातील एका बाजूला, सुदर हिरवेगार गवत उगवले होते एक दिवस, त्या सुदर जागेकडे पाहात असता श्रीरामकृष्ण इतके तन्मय होऊन गेले की, त्या जागेशी एकरूप होऊन ती जागा आपल्या शरीराचाच एक भाग आहे, असे त्याना वाटू लागले होते, इतक्यात एक मनुष्य त्या जागेतील गवतावरून चालत पलीकडे गेला श्रीरामकृष्ण सागत, " आपल्या छातीवरून कोणी चालत गेल्यास जशा वेदना होतील, तशा वेदना मला त्यावेळी झाल्या आणि छाती काही वेळ लाल होऊन गेली ! ! "

तसेंच आणखी एक दिवस, कालीवाडीच्या घाटावर उभे राहून श्रीरामकृष्ण भावावेशात गंगेकडे पाहात होते त्यावेळी दोन नावा घाटाला लागल्या होत्या व त्यातील एका नावेत दोघा कोळ्याचे एकमेकात खूप भाडण चालले होते भाडण हळूहळू हातघाईवर येऊन, त्या दोघात मारामारी सुरू झाली हा प्रकार भावावेशात तन्मय होऊन पाहात असता, श्रीरामकृष्ण मोठमोठ्याने ओरडूं लागले त्याचे ओरडणें कालीमंदिरात हृदयचें कानावर जाऊन तो एकदम धावतच तेथे आला व पहातो तो श्रीरामकृष्णाची पाठ लाल झाली असून तिच्यावर काठ्याचे वळ उठले आहेत ! ! हें पाहून क्रोधाने लाल होऊन थरथर कापत, दात ओठ खात, हृदय ओरडून म्हणाला-" मामा मामा ! तुम्हाला कोणी मारले मला सागा मी आताच्या आता जाऊन त्याचा जीव घेऊन येतों ! " मग, थोड्या

वेळाने जरा शात झाल्यावर पाठीवर वळ उठण्याचें कारण श्रीरामकृष्णांनी हृदयला सागितले, तें ऐकून त्याच्या आश्चर्यास सीमा उरली नाही !

ह्याहि सर्वात्मभावाच्या खाली मायेच्या राज्यात जेव्हा श्रीरामकृष्णाचे मन उतरे, तेव्हा त्याच्या मनात, मी श्रीजगदंबेचा दास, मी तिचा भक्त अथवा मी तिचे अपत्य अथवा मी तिचा अंश, हाच भाव सदैव जागृत असे या अवस्थेच्या फार खालच्या बाजूला अविद्या मायेचे, काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादिकाच्या बळावर चाललेले राज्य निरंतर अभ्यासाने आणि ईश्वरचिंतनाने या राज्याचा सर्वस्वी त्याग केला असल्यामुळे, श्रीरामकृष्णाचें मन त्या राज्याच्या सीमेंत कधीहि उतरत नसे अथवा श्रीजगदम्बाच त्याना त्यात उतरू देत नसे, कारण ते नेहमी म्हणत,-" ज्याने आपला सर्व भार आईवर टाकला, त्याचा पाय आई कधीहि बेताल पडूं देत नाही "

या सर्व विवेचनावरून दिसून येईल की, निर्विकल्प समाधिलाभानंतर श्रीरामकृष्णाच्या कच्च्या अहंकाराचा पूर्णपणे लोप झाला होता व अहकाराचा जो काय थोडाफार अंश त्याच्यामधे शिल्लक उरला होता, तो विराट् अथवा पक्क्या अहंकाराशी चिरसंयुक्त झालेला होता याच कारणाने सर्व प्रकारच्या लोकाच्या सर्व प्रकारच्या भावाचे त्याना सहज आकलन होई कारण, मानव मनातील सर्व भावतरग तरी याच विराट् अहंकाराच्या आश्रयाने उत्पन्न होत असतात अशा प्रकारच्या उच्च अवस्थेमध्ये, ' भगवानाचा अंश-अथवा अपत्य मी, ' हा सुद्धा त्याच्या मनातील भाव हळूहळू लुप्त होऊन जाऊन, त्याच्या जागी विराट् अहकार अथवा श्रीजगदंबेचा अहकार स्फुरण पावूं लागून, त्याच्या मधील निग्रहानुग्रह सामर्थ्य गुरुरूपाने प्रगट होई ! अशा वेळी ते ' दीनाहून दीन, ' ' दासाचे दास, ' राहात नसत त्यावेळी त्याचें बोलगे, चालगें, दुसऱ्याशीं वर्तन वगैरे व्यवहार अगदी निराळ्या तऱ्हेचे होऊन जात ! त्यावेळी ते साक्षात् कल्पतरूच होऊन, " तुला काय पाहिजे ? " असे आपल्या भक्ताला मोठ्या प्रेमाने विचारीत ! जणु काय, आपल्या भक्ताच्या सर्व इच्छा आपल्या

अमानुष शक्तीच्या जोरावर पूर्ण करण्यासच ते बसले आहेत ! ! दक्षिणेश्वरी दर शनिवारी आणि मंगळवारी आणि विशेष विशेष पर्वकाळी, असे भावापन्न होऊन, निरनिराळ्या भक्तावर त्यानी कृपा केल्याची किती तरी उदाहरणें आहेत या त्यांच्या अमानुष शक्तीचे १८८६ च्या जानेवारीत काशीपुरास घडलेलें एक उदाहरण अत्यंत अद्भुत असल्यामुळे, तो प्रसग येथे सविस्तर वर्णन करू.

श्रीरामकृष्णाच्या गळ्याला काही रोग झाल्यामुळे, डॉक्टर महेंद्रलाल सरकार याच्या सागण्यावरून, औषधाच्या सोयीसाठी व बागेतील हवा शुद्ध म्हणून भक्तमडळींनी कलकत्याजवळच काशीपुरातील गोपाळबाबूंच्या बगीच्यातील बगला भाडयाने घेऊन, त्यात श्रीरामकृष्णाना ठेविले होतें येथे डॉक्टरांचें औषध सुरू केले होते व त्यापासून थोडा फार गुणहि दिसत होता तरीपण या जागेत आल्यापासून एक दिवस सुद्धा श्रीरामकृष्ण वरच्या मजल्यावरून खाली, बागेत फिरण्यास वगैरे उतरले नव्हते. आज त्याना रोजच्यापेक्षा बरे वाटत असल्या-मुळ, बागेत हिंडण्याची इच्छा त्यानी प्रदर्शित केली होती अर्थातच आज श्रीरामकृष्ण खाली येणार, म्हणून मडळींना आनंद झाला होता.

श्रीरामकृष्णाच्या सेवेला सन्यासी भक्तमडळी तेथे सर्वकाळ राहात गृही भक्ताच्या मागे संसाराचा व्याप असल्यामुळे ते नेहमीच तेथे राहात नसत, ते येऊन जाऊन तेथे असत व श्रीरामकृष्णाच्या सेवेत असलेल्या मंडळीचा सर्व बंदोबस्त ठेवीत

आज जानेवारी पहिली तारीख ( १८८६ ). सुट्टी असल्यामुळे आज काशीपुरात पुष्कळ भक्तमंडळी जमली होती दुपारी तीन वाजण्याचा सुमार होता श्रीरामकृष्ण रेशीमकाठी धोतर नेसून, अंगात एक सदरा घालून व अगा-वर एक लाल किनारीची चादर घेऊन, डोक्याला एक कानटोपी व पायात जोडा घालून, स्वामी अद्भुतानंदाबरोबर, वरून हळूहळू खाली उतरले व पश्चिमेच्या दाराने बगीच्यात फिरण्यास निघाले गृहीभक्तापैकी काहीजण

मोठ्या आनंदाने त्यांच्या मागून मागून चालूं लागले नरेंद्र वगैरे तरुण भक्तांनी रात्रभर भजन, जपध्यान वगैरे करून जागरण केले असल्यामुळे ते एका खोलींत निजले होते. श्रीरामकृष्णाच्या बरोबर बरीचशी मंडळी असल्यामुळे त्यांच्या बरोबर जाण्याची आवश्यकता नाही, असे पाहून, स्वामी अद्भुतानंद काही वेळाने परत घरात गेले व श्रीरामकृष्णाचा बिछाना, खोली वगैरे झाडून साफ करण्याच्या कामास लागले.

गृही भक्तमंडळीपैकी श्रीयुत गिरीशचंद्र घोष यांचा ईश्वरानुराग त्यावेळीं अत्यत प्रबल होता त्यांच्या अद्भुत विश्वासाची अतिशय प्रशंसा करून, एकदा श्रीरामकृष्ण म्हणाले, " गिरीशचा पाच रुपये पाच आणे विश्वास आहे! त्याची अवस्था पाहून पुढे लोक चकित होतील! "

विश्वास व भक्ति यांच्या प्रबल प्रेरणेने, गिरीशचंद्र श्रीरामकृष्णांना साक्षात् परमेश्वर समजत असत! ते म्हणत, " जीवांच्या उद्धारासाठी भगवानांनी कृपाळूपणाने हा अवतार घेतला आहे! " आणि हा आपला दृढ विश्वास मोकळेपणाने, उघड उघड, वाटेल त्यापाशी ते बोलूनहि दाखवीत! श्रीरामकृष्णांनी याचा निषेध केला, तरी तिकडे ते लक्षच देत नसत

त्या दिवशी इतर मंडळीबरोबर गिरीशहि तेथे आले होते व बागेतच एका आंब्याच्या झाडाखाली मंडळीबरोबर गप्पा गोष्टी बोलत बसले होते फिरत फिरत श्रीरामकृष्णहि त्या ठिकाणीं येऊन पोहोचले व तेथील मंडळींत गिरीश आहेत असे पाहून त्याना म्हणाले, " गिरीश, तू माझे असे काय पाहिलें आहेस, म्हणून ज्याला त्याला ह्या गोष्टी ( मी अवतार इत्यादि ) सांगत असतोस रे ? "

हा एकाएकी केलेला प्रश्न ऐकूनहि, गिरीशचंद्र बिलकुल गोंधळले नाहीत. ते लगबगीने उठून रस्त्यावर आले व हात जोडून श्रीरामकृष्णाच्या पायापाशी गुडघे टेकून बसून, त्यांच्या तोंडाकडे पाहात सद्गदित कंठाने म्हणाले, " व्यास, वाल्मीकि अशासारखे महर्षी सुद्धा ज्याचा महिमा वर्णन करता करता

थकून गेले, त्याच्यासंबंधाने मी य कश्चित् पामर आणखी जास्त ते काय सांगणार ? "

गिरीशचंद्राचे हे असे अदभुत विश्वासाचे उद्गार ऐकून श्रीरामकृष्णांचें सर्वांग रोमांचित झाले. हृदय उचंबळून आले आणि मन एकाएकी उच्च भूमीवर आरूढ होऊन त्याना गाढ समाधि लागली ! त्याच्या वदनमंडलावर अपूर्व तेज झळकूं लागले ! त्याचे ते तेज पुंज मुखमंडळ पाहून, गिरीशचंद्राच्याहि भक्तीला भरते आलें व "जय रामकृष्ण !" "जय रामकृष्ण !" असा मोठमोठ्याने जयघोष करीत, ते त्याची पदधूलि आपल्या मस्तकावर घेऊं लागले !

हा प्रकार चालू असताना, श्रीरामकृष्णाना अर्धबाह्य दशा प्राप्त होऊन, त्याच्या तेज पुंज मुखमंडलावर हास्य झळकू लागले व जवळ उभे असलेल्या भक्तमंडळीकडे पाहून ते म्हणाले, "तुम्हाला आणिक काय सांगूं? तुम्हा सगळ्याना चैतन्य प्राप्त होवो !" ही वरप्रदानाची वाणी ऐकून, मंडळींहि आनंदातिशयाने "जय रामकृष्ण !" "जय रामकृष्ण !" असा जयघोष करून कोणी त्याना नमस्कार घालू लागले, कोणी त्याच्यावर फुले उधळू लागले, तर कोणी त्याची पदधूलि ग्रहण करू लागले ! एकजण त्याच्या पायावर डोके ठेवून उभा राहिला, त्याबरोबर त्या अर्धबाह्य अवस्थेतच त्याच्या वक्ष स्थळावर खालून वर हात फिरवून, श्रीरामकृष्ण म्हणाले, "तुला चैतन्य प्राप्त होवो !" दुसरा, त्याच्या पायावर डोके ठेऊन उभा राहताक्षणीच, श्रीरामकृष्णानी पुन्हा तसेच केले तिसऱ्यालाहि तसेच, चवथ्यालाहि तसेच ! अशा रीतीने पायावर डोके ठेवणाऱ्या प्रत्येकाला, असाच स्पर्श करून आशीर्वाद देऊ लागले आणि त्या अद्भुत स्पर्शाने प्रत्येकाच्या अंत करणात काही अपूर्व भावान्तर उपस्थित होऊन, कोणी हसूं लागला, तर कोणी रडू लागला, तर कोणी ध्यानामधेच निमग्न झाला, तर कोणाचे हृदय आनंदाने पूर्ण होऊन, त्या अहेतुककृपासिंधु श्रीरामकृष्णाच्या कृपालाभाने धन्य होण्यासाठी, बाकीच्या सगळ्याना मोठमोठ्याने

हाका मारू लागला ' त्या आरडाओरडीने आणि जयजयकाराने, निजलेली भक्त मडळी जागी होऊन, त्या रमण्याच्या जागी धावत जाऊन पाहतात, तों रस्त्यातच श्रीरामकृष्णाना वेढून, एक वेडयाची माळच्या माळ उभी ! ! तो देखावा पाहताच त्यानी ताडले की, दक्षिणेश्वरी विशेष व्यक्तीवर कृपा करण्या-साठी, श्रीरामकृष्णाची दिव्य भावावेशात लीला होत असे, आज तीच लीला, इथे सरसकट सर्वांवर कृपा करण्यासाठी होत आहे ! ही मंडळी येतात तोच श्रीरामकृष्णाचा तो दिव्य भावावेश कमी होऊन त्याना साधारण भाव प्राप्त झाला होता नतर श्रीरामकृष्णाच्या त्या हस्तस्पर्शाने व आशीर्वादाने, कोणाला काय अनुभव प्राप्त झाला होता, त्याची चौकशी करिता, असे समजले की, कोणाच्या हृदयात आनदाचे प्रचड तुफान एकाएकी सुटून, कोणी बेहोष होऊन गेले, कोणाकोणाला आपल्या इष्ट देवतेचें दर्शन झाले, कोणाला काही एक अपूर्व शक्ति आपल्या हृदयात संचार करीत असल्याचाच अनुभव प्राप्त झाला, कोणाच्या मनाचा चचलपणाच नष्ट होऊन, ते अगदी एकाग्र झाले, तर डोळे मिटल्याबरोबर कोणाला एका अद्भुत ज्योतीचेच दर्शन झाले ! या निर-निराळ्या दर्शनाशिवाय, स्वत चे मन अत्यंत शाति व अपूर्व आनद यानी भरून गेल्याचा प्रत्येकाला अनुभव आला ! या सगळ्या मडळीत फक्त दोघा-नाच* त्यावेळीं, “ एव्हाशीच नको, ” असे म्हणून श्रीरामकृष्णानी स्पर्श केला नाही आणि ते दोघेच केवळ, त्या महापर्वणीच्या दिवशी कोरडेच राहिले असो

अशा प्रकारची अनेक उदाहरणे सागता येतील या सर्वांवरून असे दिसून येते की, कच्च्या अहंकाराचा सर्वस्वी त्याग केल्यामुळेच श्रीरामकृष्णाच्या ठिकाणी ही असली दिव्य शक्ति पूर्णपणे आविर्भूत झालेली होती आणि कच्च्या अहकाराचा सर्वस्वी त्याग केल्यामुळेच त्याच्या ठिकाणी “ लोकगुरु,” “ जगद्गुरु ” या भावाचा इतका अपूर्व व पूर्ण विकास झाला होता मायाबद्ध मानवाच्या मनातील सर्व प्रकारची अज्ञान–मलिनता नाहीशी करणारी जी दिव्य शक्ति

---

* पुढे एक दिवस त्यांच्यावरहि श्रीरामकृष्णानी कृपा केली

तिलाच " गुरुभाव " आणि ही शक्ति ज्या शरीराच्या आश्रयाने प्रकट होते, त्याला ' गुरु, ' असे शास्त्रात म्हटलें आहे.

वर सागितल्याप्रमाणे, मानवाची अज्ञान-मलिनता दूर करणारी शक्ति साक्षात् परमेश्वराचीच असल्यामुळे, ती ज्या शरीराच्या आश्रयाने प्रकट होत असते, त्या शरीराला म्हणजे गुरूला, साक्षात् परमेश्वरच समजावे, असे शास्त्रानी सागितले आहे अग्नि आणि त्याची दाहक शक्ति ज्याप्रमाणे एकच, ती ज्याप्रमाणे पृथक करिता येत नाहीत, त्याप्रमाणेच ही ईश्वरी शक्ति व ज्याच्या आश्रयाने ती प्रकट होते ते शरीर, हीहि एकच आणि हीच गोष्ट स्पष्ट करण्यासाठी —

**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वर ।**
**गुरुस्साक्षात् परब्रह्म . . . . .**

वगैरे, गुरु व परमेश्वर याचे ऐक्य दाखविणारी वचनें सागून, शास्त्रानी गुरुभक्तीचे एवढें महत्व वर्णन केले आहे

परंतु भक्तिमार्गात नवीनच प्रविष्ट झालेल्या साधकाला गुरुविषयी साक्षात् परमेश्वरासारखा आदर एकदम वाटत नाही त्याला वाटतें — " गुरुभावावर श्रद्धा ठेवून गुरुभावाची भक्ति करिता येईल, पण ज्या देहाच्या आश्रयाने हा भाव प्रकट होतो, त्याविषयी आमच्या मनात परमेश्वरासारखी श्रद्धा कशी उत्पन्न व्हावी ? " परंतु अशा लोकाना एवढेंच सागणे आहे की, असें तुम्हाला करता येत नसेल तर करू नका, परतु स्वत ची फसवणूक मात्र करून घेऊ नका, इतकेंच शक्ति अथवा भाव आणि ज्याच्या आश्रयाने हीं दोन्ही प्रकाशित होतात तो आधार—, या दोन गोष्टी कोणी कधी वेगवेगळ्या अस्तित्वात असलेल्या पाहिल्या आहेत काय ? तर मग, अग्नि व त्याची दाहक शक्ति ह्या दोन गोष्टी वेगवेगळ्या करून, एकीचे ग्रहण व दुसरीचा त्याग तुम्ही कसे करू पाहता ? आपण व्यवहारात सुद्धा प्रत्यक्ष पाहतों

की, आपले एखाद्यावर प्रेम असल्यास त्याच्या सामान्य वस्तूविषयी सुद्धा आपल्याला अत्यंत प्रेम वाटते व ती आपण शिरावर धारण करतो तो ज्या जागेवरून चालत गेला असेल तेथील मातीसुद्धा आपल्याला पवित्र वाटते तर मग, ज्या शरीराच्या आश्रयाने साक्षात् परमेश्वर आपली पूजा ग्रहण करून आपल्यावर कृपा करतो आणि आपले सारे अज्ञानमालिन्य दूर करून आपल्याला चिरशांतिसुखाचे अधिकारी करतो, त्या शरीरावर साक्षात परमेश्वरासारखी भक्तिश्रद्धा ठेवावी असे शास्त्रे सांगतात, यात आश्चर्य ते काय ?

श्रीरामकृष्ण म्हणत असत, " अत्यंत एकनिष्ठ भक्ताला आपल्या गुरु-विषयी प्रेम वाटेलच, पण गुरूचा एखादा नातेवाईक अगर गुरूच्या गावचा एखादा मनुष्य भेटला, तरी एकदम गुरूची आठवण होऊन, त्यालाच गुरु म्हणून तो नमस्कार करील! भक्ताची गुरुभक्ति इतक्या उच्च अवस्थेला पोहोचली, म्हणजे त्याला आपल्या गुरूत एकहि दोष दिसत नाही गुरू जे सांगेल ते त्याला प्रमाण,—त्याची दृष्टीच तशी होऊन जाते काविळ झालेल्या माणसाला जसे सर्व काही पिवळेच दिसते, तसे त्याचे होऊन जाते, त्याला जिकडे तिकडे ' ईश्वरच सर्व काही झालेला आहे, ' असे दिसूं लागते "

दक्षिणेश्वरीं एक दिवस श्रीरामकृष्ण, एका सरल पण वादप्रिय स्वभा-वाच्या एका शिष्याला, काही गोष्ट समजावून सांगत होते, पण त्याच्या विचार-शक्तीला ती गोष्ट काही केल्या पटेना श्रीरामकृष्णांनी त्याला तीन चार वेळ ती गोष्ट सांगूनहि जेव्हा त्याचा तर्क आणि विचार संपेना, तेव्हा किंचित् रागावल्यासारखे करून पण गोड शब्दांनी ते त्याला म्हणतात, " तूं कसा मनुष्य आहेस रे ? मी स्वत सांगत आहे आणि तरी सुद्धा हे तुला पटत नाही ? " तेव्हां मात्र त्या शिष्याचे गुरुप्रेम एकदम जागृत झाले व तो किंचित लाजून म्हणाला, " महाराज! चूक झाली आपणच प्रत्यक्ष सांगतां आणि

मला हे पटणार नाही असें कसे होईल ? इतका वेळ मी आपल्या विचार-शक्तीच्या जोरावर उगीच वाद घालीत होतो " हे ऐकून प्रसन्न होऊन हसत हसत श्रीरामकृष्ण म्हणतात—" गुरुभक्ति कशी असावी सांगू ? गुरु जसे सांगेल तसे लागलीच दिसू लागले पाहिजे अशी भक्ति अर्जुनाची होती एक दिवस रथात बसून अर्जुनाबरोबर श्रीकृष्ण सहज फिरत चालले असता मधेच आकाशाकडे पाहून म्हणाले, 'अहाहा ! अर्जुना, हा पाहिलास का, कसा एक सुंदर पायरा उडत चालला आहे तो !' आकाशाकडे पाहून अर्जुन लागलीच म्हणाला, 'खरंच, कृष्णा, किती सुंदर पायरा आहे हा !' पण पुन्हा श्रीकृष्ण वर पाहून म्हणाले, 'छे, छे, अर्जुना ! अरे हा पायरा नव्हे !' अर्जुन तिकडे पाहून पुन्हा म्हणाला, 'खरेंच, कृष्णा ! अरे हा पायरा दिसत नाही !' आता, हे तू लक्षात घे की, अर्जुन महान् सत्यनिष्ठ, उगीच कृष्णाची खुशामत करण्यासाठी तर तो असें म्हणाला नाही ? पण श्रीकृष्णाच्या शब्दावर त्याचा इतका विश्वास आणि भक्ति की, कृष्णाने जे काही सांगितलें ते अर्जुनाला अगदी तसें दिसू लागले !" असो

ही ईश्वरी शक्ति सर्व मनुष्याच्या मनात कमी अधिक प्रमाणात वास करीत असल्यामुळे, गुरुभक्तिपरायण साधक अखेरीस अशा अवस्थेला जाऊन पोहोचतो की, त्यावेळी ही शक्ति त्याच्या स्वत मधेच आविर्भूत होऊन, त्याच्या मनातील सर्व संशयाचा उलगडा करून गूढ गूढ आध्यात्मिक तत्वे त्याला समजावून देते मग आपले संशय दूर करून घेण्यासाठी त्याला त्यावेळी कोठेहि दुसरीकडे जावे लागत नाही या अवस्थेसंबंधाने श्रीरामकृष्ण म्हणत असत—" शेवटी मनच गुरु होते " परंतु ते मन व आपले नेहमीचें मन यात फार फरक आपले नेहमीचे मन म्हणजे अशुद्ध व अपवित्र असून भोगसुखाच्या, कामकांचना-सक्तीच्या मागे लागलेले असते आणि हे मन शुद्ध व पवित्र असून ईश्वरी शक्ति प्रकट होण्याचे यंत्रस्वरूप बनलेले असतें. तसेच ते म्हणत,

"गुरु म्हणजे जशी सखी, जोंपर्यंत राधेची व कृष्णाची भेट झालेली नसते, तोंपर्यंत सखीचे काम सपत नाही श्रीगुरु आपल्या शिष्याचा हात धरून, त्याला उच्च उच्चतर भावप्रदेशात नेत नेत त्याच्या इष्टदेवतेसमोर आणून, 'हं, शिष्या! हे बघ तुझे इष्ट दैवत!' असे म्हणून स्वत' अंतर्धान पावतात!"

एक दिवस, श्रीरामकृष्णाच्या तोंडून गुरुभावाचे याप्रमाणे रहस्य ऐकून, त्याचा एक अत्यत अनुगत भक्त, "तर मग अखेरीस, एक दिवस, श्रीगुरूची व आपली ताटातूट होणारच अं?" असे वाटून, व्यथित अत करणाने त्याना म्हणाला, "महाराज, तेव्हा गुरु कोठे जातात बरे?" श्रीरामकृष्ण म्हणाले, "गुरु त्या इष्टदेवतेशी एकरूप होऊन जातात, गुरु, कृष्ण, वैष्णव हे तीनहि एकच—एकाचीच ही तीन रूपे!"

## ८. श्रीरामकृष्णांचा गुरुभाव

तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळिंत के असे सावन ? ।
हे जाणोनि मिथ्या नमन । निवात केले ॥—ज्ञानेश्वरी

" गौरी म्हणे, " तुमचे अनुभव वेद-वेदात सोडून फार पुढे गेले आहेत !"

—श्रीरामकृष्ण

---

शास्त्रात म्हटले आहे की, क्षुद्र मीपणाचा सर्वस्वी त्याग करून, ईश्वरीय भावातच सदा सर्वकाळ राहून जगद्गुरु व ब्रह्मज्ञ पदवीला पोहोचलेला पुरुष सर्वज्ञ होतो " साधारण मानवाप्रमाणे, त्याच्या मनात कधी मिथ्या सकल्प उदय पावत नाहीत त्याच्या मनात, ज्यावेळी जो विषय जाणण्याची इच्छा होते, तो विषय त्यावेळी त्याच्या अतर्दृष्टीपुढे प्रकाशित होतो आणि त्या विषयाचे तत्व ते सहज रीतीने जाणू शकतात " हे ऐकून, शास्त्राचा हे म्हणण्याचा भाव न समजून, आमच्या मनात कितीतरी तर्कवितर्क उत्पन्न होत असतात आम्ही म्हणतो, ' हे जर खरं असेल तर, पूर्वकालीन ऋषि जडविज्ञानासबधी इतके अज्ञ का होते ? हायड्रोजन व ऑक्सिजन हे दोन वायु काही विशिष्ट प्रमाणात एकत्र झाले म्हणजे पाणी होते, ही गोष्ट कितीशा ब्रह्मज्ञ ऋषींना माहीत होती ? चार पाच महिन्याचा मार्ग विजेच्या साहाय्याने केवळ चार पाच सेकंदात आक्रमिता येतो, या गोष्टीची शक्यता कितीशा ऋषींच्या लक्षात आली होती ? अथवा इतरहि शास्त्रीय शोध कितीशा ऋषींनी लावले होते ? अथवा लावून ठेवण्याचा प्रयत्न कितीशा ऋषींनी केला होता ? "

श्रीरामकृष्णाच्या चरणाच्या आश्रयाचा लाभ झाल्यावरच आम्हाला समजून आले की, शास्त्रानी सागितलेली ही गोष्ट अशा भावाने समजू गेल्यास तिचा काहीच अर्थ लागत नाही, परंतु शास्त्रानी ज्या भावाने ही गोष्ट सागितली आहे, त्या भावाने तिचा विचार केल्यास तिचा अर्थ बरोबर लागतो श्रीरामकृष्ण यासबंधाने म्हणत, “ चुलीवर भात शिजत आहे, तो नीट शिजला की नाही, हे पाहण्यासाठी तुम्ही काय करता ? पळीच्या दाडयावर त्यातील चारपाच शिते काढून घेऊन चाचपून पाहता, नाही ? मग सारा भात शिजला हे कशावरून ठरवता ? त्याचप्रमाणे, हा सर्व जगत्ससार नित्य की अनित्य, सत् की असत, हे मुद्दा, त्यातीलच चारपाच गोष्टी तपासून पाहून ठरविता येते पाहाना, मनुष्य जन्मला, काही दिवस वाचला, नतर मरून गेला जनावराचे बघावे तो असेच, झाडाझुडपाचे पाहावे तो असेच,—झाले ! अशा रीतीने पाहता पाहता समजले की, ज्या वस्तूला म्हणून नाम आहे, रूप आहे, त्या सर्वांची हीच वाट ! अशा रीतीने कळून आले की, या साऱ्या जगत्ससाराचा हाच स्वभाव आहे पृथ्वी, सूर्यलोक, चद्रलोक, या सर्वांना नाव आहे, अर्थात् याचीहि हीच वाट ! मग तुम्हाला जगतातील सर्व वस्तूचा स्वभाव समजला की नाही ? याप्रमाणे, ससार हा अनित्य आहे, असत् आहे, असे निसशय समजले की, मग तुमचे मन ससारावरून उडून जाऊन तुमच्या सर्व सासारिक वासना नष्ट होतील आणि ससाराची अनित्यता पटून तुम्ही त्याचा त्याग केला की, तुम्हाला जगत्कारण ईश्वराचा साक्षात्कार होईल अशा रीतीने ज्याला ईश्वराचे दर्शन झाले, तो सर्वज्ञ झाला नाही, तर काय झाले सागा पाहू !

श्रीरामकृष्णाच्या या गोष्टीवरून समजले की, खरेच, एका अर्थाने तो सर्वज्ञच झाला खरा ज्ञान ज्ञान म्हणजे तरी काय ? एखाद्या पदार्थाचा आदि, मध्य व अंत पाहता येणे अगर त्याची माहिती होणे व त्या पदार्थाची उत्पत्ति ज्यापासून झाली असेल, तेहि पाहता येणे अथवा ते जाणता येणे, यालाच आपण त्या पदार्थाचे ज्ञान असे म्हणत असतो, नव्हे काय ? तर मग पूर्वोक्त

रूपाने जगत्संसाराला जाणणे अथवा समजणे, यालाच ज्ञान म्हणावयाचे नाही तर कशाला ? शिवाय हे ज्ञान जगदंतर्गत सर्व पदार्थासंबंधाने सारखेच सत्य आहे अर्थातच त्याला जगदंतर्गत सर्व पदार्थाचे ज्ञान झाले, असेंच म्हटलें पाहिजे व या प्रकारचे ज्ञान ज्याला झाले, त्याला खरोखरच सर्वज्ञ म्हटले पाहिजे ' तर मग शास्त्रानी सांगितलें आहे, ते काही खोटे नव्हे !

शास्त्राचा सांगण्याचा भावार्थ, हा अशा प्रकारचा आहे कोणत्याहि विषयावर मनाची एकाग्रता केली, म्हणजे त्या विषयाचे ज्ञान आपणाला प्राप्त होते. ही गोष्ट आपल्या नित्याच्या अनुभवातली आहे तर, मग आपल्या मनाचे ज्यानी पूर्णपणे आकलन करून, त्यास आपल्या ताब्यात ठेविलेले असते, अशा ब्रह्मज्ञ पुरुषाना, कोणताहि एखादा विषय जाणण्याची इच्छा होताच, त्या विषयावर आपल्या मनाची सर्व शक्ति एकत्रित करून तो विषय सहज जाणता यावा, यात काय आश्चर्य आहे ? प्रश्न एवढाच आहे की, सर्वजगत्संसार अनित्य आहे, अशी ज्याची दृढ धारणा झालेली असते आणि सर्व शक्तिमान् जगत्कारण ईश्वराचा, ज्यानी आपल्या भक्ति-प्रेम-तपस्येच्या बळावर साक्षात्कार करून घेतलेला असतो, त्याच्या मनात आगगाडी चालविण्याचा, कारखाने काढण्याचा अथवा शास्त्रीय शोध लावण्याचा संकल्पच अथवा प्रवृत्तीच उत्पन्न होते की नाही ? शास्त्रीय शोध लावण्याचे बाजूलाच राहो, पण त्याचे आपल्या शरीराकडे तरी लक्ष असते की नाही ? जर त्याच्या मनात अशा प्रकारच्या संकल्पाचा अथवा प्रवृत्तीचा उदय होणेच असंभवनीय होऊन जात असेल, तर मग त्याच्याकडून या गोष्टी न घडाव्या हे ठीकच आहे. श्रीरामकृष्णाच्या दिव्य सहवासाच्या लाभाने आम्ही असे प्रत्यक्ष पाहिलें की, खरोखरच ब्रह्मज्ञ पुरुषाच्या मनात, अशा प्रकारचा संकल्पच उदय पावत नाही ! या संबंधाने श्रीरामकृष्णाच्या चरित्रातील एकदोन गोष्टी येथे सांगितल्यास बरे पडेल

अखेरच्या वर्षी काशीपुरातील बगीचात, श्रीरामकृष्ण गळ्याच्या रोगाने अत्यवस्थ असून, रोग दिवसेंदिवस वाढतच होता ते आजारी असल्याचे ऐकून,

श्रीयुत शशधर तर्कचूडामणि व आणखी काही मंडळी, एक दिवस त्यांच्या समाचारास आली बोलता बोलता पंडितजी श्रीरामकृष्णांना म्हणाले, "महाराज, शास्त्रात वाचले आहे की, आपल्यासारखे पुरुष इच्छामात्रेकरून शारीरिक रोग सहज बरे करूं शकतात मन काही वेळ रोगाच्या जागी एकाग्र करून 'आराम होवो,' अशी इच्छा करताच, रोग बरा होऊन जातो तर मग, आपण एकदा असे करून पाहिल्यास चालायचे नाही काय ?" श्रीरामकृष्ण म्हणाले, "तुम्ही पंडित असून ही काय गोष्ट बोललात हो ? जे मन एकदा सच्चिदानंदाला अर्पण केले, त्याला तेथून उठवून या भगलेल्या हाडामासाच्या सापळ्यावर आणण्याची प्रवृत्ति होईल काय ?"

या भाषणाने पंडितजी निरुत्तर झाले परंतु स्वामी विवेकानंद प्रभृति भक्तमंडळींना स्वस्थ बसवेना पंडितजी निघून गेल्यावर, त्यांनी पंडितजींच्या म्हणण्याप्रमाणे करण्याविषयी, श्रीरामकृष्णांना अत्यंत आग्रह केला ते म्हणाले, "महाराज, आपणाला रोग नाहीसा केलाच पाहिजे निदान आमच्याकडे तरी पाहून, आपला रोग बरा केला पाहिजे !"

**श्रीरामकृष्ण**—माझी काय अशी इच्छा आहे होय रे की, मी रोग भोगत बसावे ? मी तर खूप म्हणतो की, रोग बरा व्हावा, पण तसे होतंय कुठे ? बरे होणें न होणें ह्या साऱ्या आईच्या हातातल्या गोष्टी आहेत !

**स्वामी विवेकानंदः**—तर मग आईलाच सांगा ना, रोग बरा करायला ? ती आपले खचित ऐकेल !

**श्रीरामकृष्णः**—तुम्ही तर पुष्कळ सांगता रे. पण ही गोष्ट माझ्या तोंडातून बाहेरच पडत नाही त्याला मी काय करूं ?

**स्वामी विवेकानंद**—तें काही नाही, महाराज, आपणाला ही गोष्ट आईजवळ काढलीच पाहिजे !

**श्रीरामकृष्ण**—बर बुवा, बघीन शक्य असेल तर काढीन

काही तासानी, स्वामीजी श्रीरामकृष्णाच्या जवळ जाऊन म्हणाले, " महाराज आपण आईजवळ गोष्ट काढली काय ? आई काय म्हणाली ? "

**श्रीरामकृष्ण**—आईला म्हणालो, ' आई, ( गळ्याकडे बोट दाखवून ) याच्यामुळे काही खाता येत नाही तरी दोन घास खाता येतील असे काही कर ' यावर तुम्हा साऱ्याकडे बोट दाखवून आई म्हणाली, ' का बरं ! या इतक्याच्या तोंडानी तू खात नाहीस का ? ' हे ऐकून मला लाज वाटली माझी छाती धाड् धाड् उडूं लागली व मी मग आणिक काही बोलू शकलो नाही ! "

किती हा देहबुद्धीचा अद्भुत अभाव ! आणि अद्वैतज्ञानाची ही किती पराकाष्ठा ! त्यावेळी, सहा महिने, श्रीरामकृष्णाचा रोजचा आहार म्हणजे केवळ पावशेर दीड पावशेर साबूदाणा मात्र होता, आणि अशा अवस्थेत, " का बरं या इतक्याच्या तोंडानी तू खात नाहीस का ? " असे जगदंबेने म्हटल्याबरोबर, " या क्षुद्र शरीराला, ' मी ' म्हणालो हे मी केवढे पाप केले ! " असे वाटून श्रीरामकृष्ण लज्जेने तोंड खाली करून निरुत्तर झाले व रोग बरा करण्याची कल्पना सुद्धा मनात आणू शकले नाहीत !

तसेच आणखी एक दिवस, बागबाजारातील श्रीयुत बलराम बसूंच्या घरी श्रीरामकृष्ण आले होते त्यावेळी दहाचा सुमार असावा श्रीरामकृष्ण त्या दिवशी यावयाचे अगोदरच ठरलें होते व म्हणून नरेंद्र वगैरे अनेक भक्त-मंडळी तेथे जमून, श्रीरामकृष्णाशी व आपापसात गोष्टी बोलत बसली होती गोष्टी निघता निघता मायक्रॉस्कोपची गोष्ट निघाली व डोळ्याला मुळीच न दिसणाऱ्या अनेक गोष्टी त्यातून पाहिले असता दिसतात अंगावरचा एखादा लहानसा केस एखाद्या काठीएवढा दिसतो, अगदी लहान वरतूचे सुद्धा

निरनिराळे भाग दिसून येतात—वगैरे गोष्टी ऐकून, श्रीरामकृष्णाना एखाद्या लहान मुलासारखे कौतुक वाटले व ते यत्र पाहण्याची त्यानी इच्छा प्रदर्शित केली अर्थातच त्याच दिवशीं दुपारी ते यंत्र कोठून तरी आणून श्रीरामकृष्णाना दाखवावयाचें, असे भक्त मडळीनी ठरविले

तपास करता करता स्वामी प्रेमानदजीचे बंधु डॉ बिपिन बिहारी घोष याच्यापाशी एक मायक्रॉस्कोप असल्याचें मडळीना कळले व त्यानी लगेच तो त्याच्याकडून आणवून त्यातून कसे काय दिसते, ते दाखविण्यासाठी श्रीरामकृष्णाच्या जवळ तो नेला श्रीरामकृष्ण उठले, पाहण्यासाठी पुढे झाले, परंतु काही एक न पाहताच मागे सरले! सर्वाना याचा मोठा अचंबा वाटून, तसे करण्याचे कारण विचारता श्रीरामकृष्ण म्हणाले, " या वेळी मन इतक्या उच्च अवस्थेवर आरूढ झाले आहे की, काही केल्या त्याला आता तेथून उतरविता येत नाही!" आम्ही त्याच्या मनाच्या उतरण्याची पुष्कळ वाट पाहिली, परंतु व्यर्थ त्याचे मन त्या दिवशी साधारण अवस्थेवर आलेच नाही व अर्थातच मग त्यानी ते यत्रहि पाहिले नाही!

वरील दोन्ही गोष्टीवरून स्पष्ट दिसून येईल की श्रीरामकृष्णासारख्या ब्रह्मानदात रंगून गेलेल्या पुरुषाचे आपल्या शरीराकडेहि लक्ष नसते, मग इतर विषयाकडे त्याचे लक्ष न गेल्यास व त्या विषयावर मन एकाग्र करून त्या विषयाचे ज्ञान त्यानी प्राप्त करून न घेतल्यास त्यात आश्चर्य कोणते? असो

देहादि साधारण भाव सोडून श्रीरामकृष्णाचे मन जेव्हा उच्च उच्चतर भावभूमीवर आरोहण करीत जाई, तेव्हा त्या त्या अवस्थेमध्ये प्राप्त होणारे सर्व असाधारण दर्शनसमूह त्याना प्राप्त होत आणि देहबुद्धीचा सर्वस्वी त्याग करून, जेव्हा त्याचे मन अद्वैत भावात लीन होऊन जाई, तेव्हा तर त्याच्या इंद्रियाचे सर्व व्यापार अजीबात बंद होऊन जात, हृदयाचे स्पदन सुद्धा बंद होई व काही

कालपर्यंत त्याचा पार्थिव देह मृतवत् पडून जाई ! त्यावेळीं त्याच्या बुबुळाना स्पर्श केला तरी पापण्या हालत नसत ! या अत्यंत उच्चावस्थेत, त्याना पृथ्वीवरील सर्व गोष्टीचा व सर्व विषयाचा पूर्ण विसर पडे, तो इतका की, या अवस्थेतून नेहमीच्या साधारण अवस्थेत मन आल्यानंतर सुद्धा काही काळपर्यंत, त्याना नित्य परिचयातील वस्तु व व्यक्ति याची सुद्धा ओळख पटत नसे व आपण ही काही तरी नवीन सृष्टि पाहात आहो, असा भास होऊन, आपण या वस्तु व व्यक्ति, मागे केव्हा तरी पाहिल्या होत्या की काय, अशी ते आठवण करू लागत ! ! मग आपल्या समजुतीमधे काही चूक तर होत नाहीना, हे पाहण्यासाठी जवळच्या एखाद्या व्यक्तीकडे बोट दाखवून " नरेंद्र ? " ( हा नरेंद्रच आहे की काय ? ) " राखाल ? " व एखाद्दुसऱ्या वस्तूकडे बोट दाखवून " गडू ? " " धोतर ? " असे विचारीत व जवळच्या मडळीनी " होय, महाराज नरेंद्र, " " होय, महाराज गडू, " असे उत्तर दिले, म्हणजे जणु काय ओळख पटली, असे वाटून मग इतर गोष्टी बोलावयास लागत "

वरील विवेचनावरून दिसून आले असेल की, या ससारातील निरनिराळ्या वस्तु व व्यक्ति याचेकडे श्रीरामकृष्ण दोन दृष्टींनी पाहात एक, विराट अहकारामध्ये त्याचे मन एकरस होऊन गेल्यावर, त्या उच्च अवस्थेवरून व साधारण भावभूमीवरून या कारणाने कोणत्याहि वस्तू व व्यक्तीच्या बद्दल त्याचे एकदेशी मत कधीहि होत नसे व याच कारणाने ते दुसऱ्याच्या मनातील सर्व भाव जाणू शकत आम्ही म्हणजे माणसाला माणूस, जनावराला जनावर, झाडाला झाड अशाच दृष्टीने जाणतो, परतु श्रीरामकृष्णाना माणूस, जनावर, झाड, हे सर्व माणूस, जनावर, झाड, असे तर दिसेच, शिवाय असेंहि दिसे की, या सर्वांमध्ये तो जगत्कारण सच्चिदानंद भरलेला आहे ! कोणामध्ये त्याचा प्रकाश अधिक तर कोणामध्ये कमी, इतकाच फरक ! ते म्हणत, " असे पाहातो की, माणूस, जनावर, झाड, प्राणी, ह्या जणु काय निरनिराळ्या खोळी

आहेत उशीच्या, तक्क्याच्या पिशव्या असतात की नाही ? एखादी चिटाची, एखादी खादीची, एखादी आणखी दुसऱ्या कशाची, एखादी चौकोनी, एखादी वाटोळी, अशा निरनिराळ्या कापडाच्या व तऱ्हेच्या असतात पण या साऱ्या पिशव्यात एकच पदार्थ भरलेला असतो,—कापूस ! त्याचप्रमाणे माणूस, जनावर वगैरे सर्वांत तो एकच अखंड सच्चिदानंद भरलेला आहे ! खरोखरच मला दिसत रे, की आई ह्या साऱ्या निरनिराळ्या चादरी अंगावर घेऊन आतून डोका-वून पाहात आहे ! एकदा अशी अवस्था होती की, जेव्हा सर्व काळ असेच दिसते असे ! माझी ही अवस्था पाहून, ती नीट न समजल्यामुळे, सगळेजण मला शिकवायला, शांत करायला आले रामलालच्या आईने मला किती तरी सांगितले आणि शेवटी आपण रडायला लागली ! त्या साऱ्याकडे पाहिले तो असे दिसले की, ( मंदिराकडे बोट दाखवून ) ही आईच तऱ्हेतऱ्हेने सजून, या साऱ्या गोष्टी करीत आहे ! हे तिचे ढंग पाहून हसता हसता माझी मुरकुंडी वळली व म्हणूं लागलो, " वा ! आई ! काय सजली आहेस पण ! " आणखी एक दिवस, मंदिरात आसनावर बसून आईचे ध्यान करू लागलो, पण काही केल्या आईची मूर्ति काही ध्यानात येईना ! हे असे का होते म्हणून पाहतो, तो कालीघाटावर रमणी म्हणून एक वेश्या नेहमी स्नान करायला येत असे, तिच्या-सारखे नटून देव्हाऱ्याच्या जवळच उभी राहून आई डोकावून पाहात आहे ! हे पाहून मला हसूं आले व म्हणालो, " वाहवा ! आई ! आज तुला रमणी व्हायची इच्छा झाली होय ? तरीहि बरं आता याच रूपाने आज आपली पूजा घे ! " रमणीसारखे नटून आईने दाखविले की, वेश्या देखील मीच, माझ्या-शिवाय दुसरे काही नाही ! आणखी एक दिवस मच्छीबाजारातून गाडीत बसून चाललो होतो पाहिले की, चांगली नटून सजून, भांग काढून, सुंदर लुगडे नेसून व्हराड्यात उभी राहून गुडगुडी ओढीत एक वेश्या लोकांची मने भुल-वीत आहे !' हे पाहून चकित होऊन म्हणालो, " वाहवा ! आई ! आज तुला हे रूप घ्यावेसे वाटले होय ! व तिला नमस्कार केला ! " उच्च भाव-भूमीवर आरोहण करून जगतातील वस्तुमात्राकडे या दृष्टीने पाहण्याचे आम्ही

साफ विसरून गेलो असल्यामुळे, श्रीरामकृष्णाच्या या अद्भुत उपलब्धीचे स्वारस्य आम्हाला कळावे कसे ? असो

ही झाली उच्च भावभूमीवरून पाहण्याची तऱ्हा, आणि श्रीरामकृष्ण जेव्हा साधारण भावभूमीवर येत, तेव्हा त्यांच्या मनात स्वार्थसुखाची अथवा भोगसुखाची लेशमात्रहि इच्छा नसल्यामुळे त्यांच्या शुद्ध बुद्धीला व दृष्टीला आमच्यापेक्षा किती तरी अधिक विषय समजून येत व किती तरी सूक्ष्म आणि गुतागुतीच्या गोष्टी त्याना सहज समजून येत! अद्वैत भाव पूर्णपणे बाणून घेतल्यामुळे, त्याना जगात ईश्वराच्या स्वरूपावाचून काही दिसत नसे, आणि त्यांच्या या अद्वैत ज्ञानाचे गाभीर्य इतके होते की अगदी थोड्याशा उद्दीपनाने देखील त्याना एकदम समाधि लागे! अशा प्रकारची उदाहरणे नित्य घडत

एक दिवस ते आपल्या खोलीच्या व्हराड्यात बसले असता तेथे एक पतग उडत आला त्याच्या अगात एक भला मोठा काटा घुसला असून तो बिचारा पतग, त्याला काढण्यासाठीच खूप धडपड करीत होता त्याची ती अवस्था पाहून श्रीरामकृष्णाचे अग थरारले व "रामा! काय रे तुझी ही शोचनीय अवस्था!" असे म्हणत म्हणत ते समाधिमग्न झाले!

एक दिवस गाडीत बसून, कलकत्त्याहून दक्षिणेश्वरी परत येत असता, एका मोठ्या रस्त्यावर एका पानवाल्याचे दुकान त्यांच्या नजरेस पडले दुसऱ्या एका मोठ्या दुकानाच्या पायऱ्याजवळ, नाल्याला लागून एक कमान असून, तिच्या खाली एकच मनुष्य कसाबसा बसेल इतकीच जागा होती तेथे नाल्यावरच एक चौरंग माडून, त्या कमानीखाली, त्या अडचणीच्या जागेत पानवाल्याने आपले दुकान थाटले होते! त्या बिचाऱ्याला नीट उठता बसता येण्याची मारामार होती! हा त्याचा ससार पाहून श्रीरामकृष्णाच्या डोळ्याना पाणी आले आणि, "आई! आई! तुझ्या मायेचा प्रभाव काही विलक्षण आहे," असें म्हणत म्हणत ते समाधिमग्न झाले!

आणखी एक दिवस, कलकत्त्याहून दक्षिणेश्वरी परत येत असता, त्यांची बग्गी एका दारूच्या गुत्त्याजवळून गेली तेथे गिऱ्हाइकाची खूप गर्दी असून, सुरापानाच्या आनंदाने बेहोष होऊन कोणी मोठमोठ्याने बोलत होते, कोणी गात होते, कोणी नाचत होते,—असा एकच गोंधळ त्यांनी तेथे माजविला होता ! हा त्यांचा आनंद पाहून श्रीरामकृष्णांना, ब्रह्मानंदाचे उद्दीपन झाले आणि एकदम गाडीतल्या गाडीत उभे राहून त्यांच्याकडे पाहात, " वा ! ठीक ! छान चालले आहे ! " असे म्हणत म्हणत ते समाधिमग्न झाले !

कित्येकदा तर ' कारण ' ( मद्य ) या शब्दाच्या नुसत्या उच्चाराने त्यांना जगत्कारण ईश्वराचे उद्दीपन होऊन त्या नशेत समाधिनिमग्न झालेले आम्ही त्यांना पाहिले आहे ! स्त्रीपुरुषांच्या ज्या अवयवांचे नुसते नामोच्चारण करणे सुद्धा असभ्य, अश्लील समजले जाते—त्यांचा उच्चार करीत करीत, त्यांनी कित्येकदा समाधिमग्न व्हावे आणि अर्धबाह्य दशा प्राप्त झाल्यावर म्हणावे, " आई ! पन्नास वर्ण म्हणजे तरी तुझेच स्वरूप ना ग ? मग ज्या वर्णांच्या जुळणीने वेदवेदांत झाले आहेत, ते सुद्धा सारे अश्लीलच ! तुझ्या वेदवेदांचा ' क ' ' ख ' निराळा आणि अश्लील भाषेचा ' क ' ' ख ' निराळा असे तर नाहीना ! वेदवेदांतहि तूच आणि शिव्यागाळीहि तूच ! " आणि असें म्हणत म्हणत पुन्हा समाधिनिमग्न व्हावें ! ! जगतातील सारे चांगले वाईट, हें त्यांच्या पवित्र दृष्टीला केवळ जगन्मातेचे स्वरूप दिसे ! केवढे हे मनाचे पावित्र्य !

तसेच श्यामपुकुरातील बगीच्यात असण्याचे वेळी एक दिवस एकाने त्यांना साकार व निराकार ध्यानाला उपयोगी अशी आसने विचारली असता, तीं त्याला श्रीरामकृष्ण समजावून देत होते पद्मासन घालून डाव्या हाताच्या पंजाच्या तळावर उजव्या हाताच्या पंजाचा पृष्ठभाग ठेवून, ते दोन्ही हात आपल्या वक्ष स्थळावर धारण करून, डोळे मिटून ते म्हणाले, " सर्व प्रकारच्या

साकार ध्यानाला हे आसन प्रशस्त आहे " नतर त्याच आसनावर बसून, डाव्या गुडघ्यावर डावा व उजव्या गुडघ्यावर उजवा पंजा उताणा ठेवून, आगठा व तर्जनी याची टोके एकमेकाना मिळवून, बाकीची बोटे सरळ ठेवून, दृष्टि भुवयामध्ये स्थिर करून म्हणाल, " निराकार ध्यानाला हेच आसन प्रशस्त आहे ' परतु असे म्हणता म्हणता त्याना समाधि लागली ! ! समाधीतून उतरल्यावर ते म्हणाले, " आता आणखी काही सागत नाही कारण अशा रीतीने या आसनावर बसताक्षणीच उद्दीपन होते व मन तन्मय व समाधिलीन होऊन जाते ! "

सदैव ईश्वराचेच चिंतन व सदैव भाव व समाधि यामध्ये निमग्न राहात गेल्याने, त्याचे ठिकाणी अद्वैत भावाची पराकाष्ठा होऊन गेली होती आणि ते यथार्थ दिव्य भावारूढ झाले होते ईश्वराशी आपले पृथगस्तित्व ते पूर्णपणे विसरून गेल्यामुळे आणि ' अह ' चा लवलेशहि त्याच्या मनात न राहिल्यामुळे, त्याची इच्छा तीच ईश्वराची इच्छा, अशी त्याची अवस्था होऊन गेली होती त्याच्या सर्व व्यवहारात, त्याच्या बोलण्याचालण्यात, मानवी दुर्बलता अगर असपूर्णता यत्किंचितहि राहिली नव्हती त्याचे शरीर चैतन्यमय होऊन गेले असून, अमानुष ईश्वरी शक्ति प्रकट होण्याचे ते एक प्रचड यत्र बनून गेले होते हा त्याचा अमानुष दिव्य भाव दाखविणारी उदाहरणे त्याच्या जीवनात प्रत्यहि घडत आणि त्याच्या अमानुष शक्तीचा परिचय सर्वांस करून देत

अवतारिक महापुरुषाच्या ठिकाणी, दुसऱ्याला स्पर्श करून अथवा त्याच्याकडे पाहून अथवा नुसत्या इच्छेने, त्याचे मनोमालिन्य बदलून, त्याची वृत्ति ईश्वराभिमुख करण्याची शक्ति असते ही शक्ति श्रीरामकृष्णाच्या ठिकाणी पूर्णपणे वास करीत होती असे दिसून येई की, कित्येक वेळी, एखाद्याने त्याच्याहून विरुद्ध मताचे अवलबन करून, त्याच्याशी खूप वादविवाद करीत असावें ' श्रीरामकृष्णाचें म्हणणें मान्य करायचेच नाही,' असा जणु त्याने निश्चयच

केलेला असावा आणि अशा वेळी त्याच्याशी बोलता बोलता मोठ्या कुशलतेने, श्रीरामकृष्णानी त्याच्या अंगाला स्पर्श करावा ! त्याबरोबर असे होई की, त्या वेळेपासून त्याच्या विचारप्रवाहाची गति जणु बदलून जाई आणि तो मनुष्य श्रीरामकृष्णाचा सिद्धात पूर्णपणे मान्य करी ! श्रीरामकृष्ण स्वत कधी कधी म्हणत, “मंडळीशी बोलत असता, मवेच असा एखाद्याला स्पर्श का करतो, तुम्हाला माहीत आहे ? ज्या अविद्या शक्तीने त्याच्या मनावर आच्छादन घातलेले असते, त्या शक्तीचा जोर कमी होऊन, त्याला सत्य काय ते समजावे म्हणून !” आपल्या भक्तमडळीपैकी अनेकाना ते ध्यानस्थ होण्यास सागून, त्यान्च्या वक्ष स्थलाला, जिव्हेला स्पर्श करीत त्या शक्तिपूर्ण स्पर्शाने त्याच्या मनातील बाह्य विषयचिंतन नाहीसे होई आणि वृत्ति अतर्मुख होऊन जाई ! आणि निरनिराळ्या व्यक्तीना निरनिराळी दर्शने आणि अनुभव प्राप्त होत ! नरेद्र, छोटा नरेद्र, तारक, तेजचद्र वगैरे बहुतेक सर्व भक्तमडळीच्या आयुष्यात या त्याच्या दिव्य शक्तिपूर्ण स्पर्शाने क्राति घडवून आणली नरेद्रनाथाच्या सबधात तर, या योगाने केवढी उलथापालथ करून टाकली, ह्याचे वर्णन पुढे येईलच स्वामी विवेकानद म्हणत असत, “मनाच्या बाहेर असणाऱ्या शक्तीना काही उपायानी वश करून घेऊन, त्याच्या जोरावर काही चमत्कार घडवून आणणे ही काही विशेषशी गोष्ट नाही, पण हा दक्षिणेश्वराच्या देवळातला अशिक्षित पुजारी, एखाद्या चिखलाच्या गोळ्याला जसे वाटेल तसे आकार द्यावे, तसे, लोकाच्या मनाला वाटेल तसे आकार देई, त्याची वाटेल तशी घडामोड करी, स्पर्शाने अथवा नुसत्या इच्छेने त्याच्या मनातील विचार प्रवाह वाटेल तसे बदलून टाकी. यापेक्षा अधिक आश्चर्यकारक चमत्कार, मी कुठेहि कधीहि पाहिला नाही !”

या त्याच्या दिव्य शक्तीची बरीचशी उदाहरणे मागे येऊन गेली आहेत काशीपुरातील बगीचात, अखेरच्या दिवसात, गळ्याच्या रोगाने अत्यवस्थ होऊन पडले असता, श्रीरामकृष्ण एक दिवस आम्हाला म्हणाले, “आई मला असे दाखवीत आहे की, (स्वत कडे बोट करून) या शरीरात

सध्या एक अशी शक्ति आविर्भूत झाली आहे की, आता कोणाला स्पर्शहि करण्याचं कारण नाही, 'तू त्याला स्पर्श कर,' असं मा एखाद्याला सांगितलं व त्यानं स्पर्श केला म्हणजे झालं, तेवढ्यानेच त्या दुसऱ्याला चैतन्यप्राप्ति होईल! जर यावेळी आईनं हा रोग बरा केला, तर इथं लोकांची अशी गर्दी होईल की, ती आवरता आवरता तुमच्या नाकी नऊ येतील आणि मलाहि इतके श्रम करावे लागतील की, औषध घेऊन प्रकृति ठीक ठेवावी लागेल!" असो.

विशेष विशेष पर्वकाळी श्रीरामकृष्णांच्या शरीर व मनामध्ये विशेष विशेष प्रकारचा देवभाव उत्पन्न होत असे वैष्णवांच्या पर्वदिवशी वैष्णवभाव, शाक्तांच्या पर्वदिवशी शक्तिभाव—त्यांच्या ठिकाणी विशेष प्रमाणात दिसून येई. जसे—दुर्गापूजेच्या अथवा कालीपूजेच्या दिवशी ते श्रीजगदंबेच्या भावात इतके तन्मय होत, की त्यांच्या शरीराची ठेवण सुद्धा श्रीजगदंबेच्या वराभयकर मूर्तीसमान होऊन जाई! जन्माष्टमीच्या व इतर वैष्णव पर्वदिवशी श्रीकृष्ण व राधा यांच्या भावात तन्मय होऊन त्यांच्या अंगावर कम्पपुलकादि अष्ट सात्विक भावांची लक्षणं दिसून येत! आणि हे निरनिराळे भावावेश, इतक्या साहजिकपणे त्यांच्या ठिकाणी उत्पन्न होत की, तसे उत्पन्न होण्यास त्यांना काही एक श्रम पडत नसावेत, असं वाटे. एवढंच नव्हे, तर उलट कित्येक वेळा असंहि दिसून आले आहे की, अशा एखाद्या पर्वदिवशी ईश्वरीय कथाप्रसंगात अत्यंत तन्मय होऊन जाऊन, आज म्हणजे अमुक एक पर्व दिवस आहे, ही गोष्टहि ते विसरून गेले असावे आणि इतक्यात त्यांच्या बाह्यकथावार्ता बंद होऊन जाव्या आणि त्या दिवशीच्या पर्वाला उचित अशा प्रकारचा भाव एकदम त्यांच्या ठिकाणी उत्पन्न व्हावा! जणु काय कोणी तरी जबरदस्तीने त्यांच्या मनातील भावप्रवाह बदलून टाकीत आहे! कलकत्त्यात शामपुकुर येथे राहात असताना, डाक्टर सरकार वगैरे मंडळीशी दुर्गापूजेच्या दिवशी बोलत असता, श्रीरामकृष्णांना एकाएकी भावावेश उत्पन्न झाला. त्या वेळचे त्यांचे तेज पुंज

आणि सस्मित वदनमंडळ पाहून कोणी म्हटले असते की, त्यांना काही आजार झाला आहे ?

ज्या वेळी जो भाव त्यांच्या मनात प्रबल असे, त्यामधेच ते इतके तन्मय होऊन गेलेले असत की, इतर कोणताहि विचार त्यावेळी त्यांच्या मनात येत नसे आणि त्यांच्या स्वभावाचे हे विशेषत्व आतापर्यंत वर्णिलेल्या त्यांच्या चरित्रावरून स्पष्ट दिसून आलेच असेल भावावेशात जर ते चालत असले, तर इकडे तिकडे सभोवती त्यांचे मुळीच लक्ष नसे व एखाद्या झिंगलेल्या माणसाप्रमाणे त्यांची पावले पडत ! एकसारखी बारा वर्षेपर्यंत खडतर तपश्चर्या केल्यामुळे, त्यांच्या मनाला एकाग्रतेची इतकी सवय झाली होती की, हातातल्या कामावाचून अथवा मनात त्यावेळी असलेल्या विचारावाचून दुसरे काम अथवा विचार, त्यांच्याने होणेच अशक्य होई ! उदाहरणार्थ, दक्षिणेश्वरी देवीच्या देवळातील आपल्या खोलीतून श्रीजगदंबेच्या दर्शनासाठी, जगदंबेच्या देवळाकडे ते निघाले आहेत, असे समजा त्यांच्या खोलीतून जगदंबेच्या देवळास जाताना वाटेत श्रीराधागोविंदजीचे मंदिर लागते, तेव्हा खरे पाहिले तर, जाता जाता श्रीराधागोविंदजीचे दर्शन घेऊन मग श्रीजगदंबेच्या मंदिराकडे त्यांनी जावे पण त्यांच्याने असे कधीच होत नसे खोलीतून निघाले की त्यांनी सपाट्याने प्रथम श्रीजगदंबेचे मंदिर गाठावे व मातेला प्रणाम करून, परत येताना श्रीराधागोविंदाच्या दर्शनास जावे ! प्रथम प्रथम आम्हाला वाटे की, यांची श्रीजगदंबेवर विशेष भक्ति आहे, म्हणून ते असे करीत असावेत पण एक दिवस श्रीरामकृष्णच स्वत म्हणाले, “ हे असे का होते बरे ? मातेच्या दर्शनास जायचे मनात आले की सरळ मातेच्याच मंदिराकडे जावे लागते, राधागोविंदजीचे दर्शन घेऊन जावे अगर इकडे तिकडे करीत जावे म्हटले, तर सोय नाही ! पायच इकडे तिकडे वळत नाहीत ! मातेचे दर्शन घेतले, म्हणजे मग वाटेल तिथे जाता येते हें असे का व्हावे बुवा ? ” याचे कारण ते स्वतःच कित्येकदा सांगत, ते म्हणत, “ असें आहे की, अमुक

एक करायचे असे मनात आले की, लागलीच तसे झालेच पाहिजे, मग त्याला इतका सुद्धा विलंब खपत नाही निर्विकल्प अवस्था प्राप्त झाली म्हणजे तिथे तर काही ' मी, ' ' तूं, ' बोलणे चालणे, वगैरे काही उरत नाही तेथून दोन तीन पायऱ्या उतरल्यानंतर सुद्धा मनाची अशी स्थिति असते की, त्यावेळीहि अनेक वस्तु अथवा व्यक्ति याच्याशी व्यवहार करता येत नाही समजा, त्या- वेळीं जेवायला बसलो आणि पानात पन्नास प्रकारच्या भाज्या असल्या तरी, हातच मुळी त्याच्याकडे जात नाही जे काही खायचे असेल, ते सारे मिसळून, एक करून एकाच जागेवरून उचलून खावे लागते ! "

भावावेशात शरीरज्ञानाचा पूर्णपणे लोप झाल्यामुळे, त्याचे हात, पाय, मान वगैरे भाग वाकडेतिकडे होऊन जात व कधी कधी तर सारे शरीरच हालूं लागून हे आता पडतात की काय असें वाटे ! म्हणून अशा वेळी जवळ पास असलेली भक्तमडळी, हें त्याचे वेडेवाकडे झालेले अवयव हळूहळू जसेच्या तसे करीत व ते पडूं नयेत म्हणून त्याना नीट धरून ठेवीत !! व त्याची समाधि उतरण्यासाठी ज्या देवतेच्या अगर भावाच्या चितनामुळे, त्याना समाधि लागलेली असे, त्या देवतेचे नाव-" काली " " काली, " " कृष्ण " " कृष्ण, " " ॐ " " ॐ, " त्याच्या कानात एकसारखे काही वेळ उच्चा- रीत ! असें केल्यावर मग त्याची समाधि उतरे ! ज्या भावाच्या चितनाने ते तन्मय होऊन समाधिमग्न झालेले असत, त्याशिवाय इतर भावाचे नाम त्याच्या कानी उच्चारल्यास त्याना भयकर वेदना होत !! श्रीरामकृष्ण म्हणत, " अशी एक अवस्था होत असते की, तेव्हा कोणाचाहि स्पर्श झाला, तरी वेदना होतात आणि अशीहि एक अवस्था होते की, तेव्हा केवळ ( बाबूरामाकडे बोट दाख- वून ) ह्याचा स्पर्श झाला तर चालतो व ह्याच्याच हातचे खाल्लेले चालते "

श्रीजगदंबेच्या दर्शनास श्रीरामकृष्ण दररोज जात असत आणि जेव्हा जेव्हा ते जात, तेव्हा तेव्हा त्याना भावावेश उत्पन्न होई व कधी कधी तर गभीर समाधिहि लागे मग ती उतरून बाह्यदशा प्राप्त होईपर्यंत तेथेच त्याना कोणी

तरी धरून उभे असे बराच वेळ त्याच्या कानात नामोच्चार केला म्हणजे हळू-हळू त्याची समाधि उतरे व ते आपल्या खोलीकडे यावयास निघत अशा वेळीं कोणी तरी त्याना धरून चालविणे अवश्य असे व चालताना त्याची एखाद्या लहान मुलासारखी काळजी घ्यावी लागे ! नाही तर, भावावस्थेच्या नशेत ते पडण्याची भीति असे म्हणून त्याना धरून चालणारा मनुष्य,-" हं इथे पायरी आहे बरे का, जरा खाली पाय टाका, " " ह, इथे पायरी चढायची आहे, जरा उचलून पाय टाका ! " असे सावध करीत करीत, त्याना त्याच्या खोली-कडे घेऊन जाई ! !

एक दिवस, कलकत्त्याहून परत आल्यावर, श्रीरामकृष्ण थेट कालीमंदि-रात गेले व देवीचे दर्शन घेऊन बाहेर सभामंडपात उभे राहून, एक स्तुतिपर पद म्हणता म्हणता समाधिमग्न झाले ! भोवती बरीच भक्तमंडळीहि होती श्रीरामकृष्ण समाधिमग्न होऊन उभे असल्याचे पाहून, कदाचित त्याचा झोक जाऊन खाली पडतील, म्हणून छोटा नरेन्द्र त्याना धरून ठेवण्यास पुढे सरसावला, परंतु त्याच्या हाताचा स्पर्श होताच, श्रीरामकृष्णानी एकदम किंकाळी फोडली ! या वेळीं आपला स्पर्श श्रीरामकृष्णाना खपत नाही, असे पाहून बिचारा नरेन्द्र हिरमुसला होऊन जरा दूर जाऊन उभा राहिला गाभाऱ्यात श्रीरामकृष्णाचा पुतण्या रामलाल होता श्रीरामकृष्णाची किंकाळी ऐकताच तो एकदम धावून आला व श्रीरामकृष्णाना धरून उभा राहिला बराच वेळ श्रीरामकृष्णाच्या कानात नामोच्चार केल्यावर त्याची समाधि उतरली, तरी सुद्धा पाय इतके लटपटत होते की, त्याना नीट उभें राहता येत नव्हते.

काही वेळाने सभामंडपाच्या पायऱ्यावरून ते अंगणात उतरूं लागले व उतरत असता एखाद्या लहान मुलाप्रमाणे म्हणूं लागले, " आई ! मला जरा नीट धर ना, नाही तर पडेन की ग ! " आणि खरोखरच त्याच्याकडे पाहून असें वाटूं लागलें की, श्रीरामकृष्ण म्हणजे एक लहान बालक असून ते आपल्या आईच्या तोंडाकडे पाहूनच असे बोलत आहेत आणि स्वत आईनेच हात धरला असल्यामुळे

जरा धीर येऊन, त्या पायऱ्या उतरत आहेत! लहानसहान गोष्टीत सुद्धा केवढा विलक्षण निर्भर हा! आपल्या खोलीत पोहोचले, तरी त्यांचा भावावेश जशाचा तसाच होता कही वेळ जरा कमी व्हावा, पुन्हा काही वेळ वाढावा, असें एकसारखे चालले होते थोडया वेळाने त्यांची समाधि पूर्णपणे उतरली मग छोटा नरेंद्र त्यांना धरू लागला असता त्यांनी किंकाळी का फोडली, याचा उलगडा झाला नरेंद्राच्या डोक्यात डाव्या बाजूला एक फोड झाला होता व डॉक्टरांनी तो नुकताच कापून काढला होता 'क्षतशरीराने देवमूर्तीला स्पर्श करू नये,' असे आमच्या ऐकिवात होते खरे, परतु या म्हणण्याची सत्यता, अशा विलक्षण रीतीने आमच्या डोळ्यांसमोर प्रमाणित होईल, ही कल्पना कोणाला होती? देवभावामध्ये तन्मयत्व प्राप्त होऊन बाह्यज्ञान सर्वत्री लुप्त झालेलें असले तरी सुद्धा, कोणत्या अंतर्ज्ञानाने श्रीरामकृष्णांना ही गोष्ट समजली, कोणी सांगावें? तरी नरेंद्राने त्यांना स्पर्श करताच त्यांना वेदना झाल्या, ही गोष्ट मात्र निःसंशय आहे छोट्या नरेंद्राला ते किती शुद्ध स्वभावाचा समजत असत, हें सर्वांना ठाऊक होते आणि त्याच्या अंगावर जखम असूनहि साधारण अवस्थेत इतर सर्वांप्रमाणेच, ते त्याला स्वतःस स्पर्श करू देत व त्याच्याबरोबर एकत्र बसत उठतहि असत म्हणून त्याला तरी कसे समजावे की भावावस्थेत श्रीरामकृष्णांना आपल्या स्पर्शापासून त्रास होईल? असो तेव्हापासून मात्र, जखम नीट बरी होईपर्यंत त्याने पुन्हा श्रीरामकृष्णांच्या शरीराला स्पर्श केला नाही! श्रीरामकृष्णांच्या ठिकाणी दिव्य भावाचा किती अद्भुत विकास झाला होता, हे वरील गोष्टीवरून समजेल

नुसत्या स्पर्शाने अथवा इच्छेने दुसऱ्याचे विचार बदलून टाकण्याचें जसे अद्भुत सामर्थ्य त्यांच्या अंगी होते, त्याचप्रमाणे दुसऱ्याचे रोग सुद्धा स्वतःच्या अंगी ओढून घेण्याचे विचित्र सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी असे! तरी पण या सर्व सामर्थ्यांचा ते क्वचितच उपयोग करीत मथुरबाबूंच्या पत्नीचा—जगदंबादासीचा—संग्रहणी रोग त्यांनी स्वतःवर ओढून घेतल्याचे मागे आलेच आहे आणखी

एका वेळी एकजण अंगावर कोड असलेला मनुष्य त्याच्याकडे आला व "माझ्या अंगावरून आपण एकवार नुसता हात फिरविला, म्हणजे माझा रोग नाहीसा होईल," असे म्हणून हात फिरविण्याबद्दल, फार काकुळतीस येऊन त्याची प्रार्थना करू लागला श्रीरामकृष्णाना त्या माणसाची फार दया आली व ते म्हणाले, "मला तर बुवा काही माहीत नाही, तरी पण तू म्हणतच आहेस, तर फिरवितो बापडा तुझ्या अगावरून हात ! आईची इच्छा असेल, तर रोग बरा होईल !" असे म्हणून त्यानी त्याच्या अंगावरून हात फिरविला त्या साऱ्या दिवसभर श्रीरामकृष्णाच्या हाताला अशा वेदना होत होत्या की, त्याना त्या सहन करवेनात ! अखेरीस ते म्हणू लागले, "आई ! पुन्हा असले काम मी कधी करणार नाही, मला क्षमा कर" श्रीरामकृष्ण सागत असत, "त्याचा रोग बरा झाला, पण त्याचा भोग मला भोगावा लागला !"

श्रीयुत विजयकृष्ण गोस्वामी हे ढाका येथे राहात असता एक दिवस, घराचे दार बद करून ध्यान करीत होते काही वेळाने त्याना असा भास झाला की, श्रीरामकृष्ण आपल्यासमोर बसले आहेत ! कदाचित् आपल्याच डोक्याचा हा खेळ असेल असे वाटून, समोरील मूर्तीकडे सरसावून, त्यानी त्या मूर्तीला स्पर्श केला व हात पाय वगैरे नीट चाचपूनहि पाहिले तेव्हा त्याची खात्री झाली की, हे प्रत्यक्ष श्रीरामकृष्णदेवच आहेत !

कलकत्त्यास आल्यानंतर, एक दिवस ते दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णांच्या दर्शनास आले असता, त्यानी वरील घटना सर्वासमक्ष श्रीरामकृष्णाना सागितली. ते म्हणाले, "देश, विदेश, पहाड, पर्वत खूप हिंडून अनेक साधु महात्मे पाहिले, पण (श्रीरामकृष्णाकडे बोट करून) याच्यासारखा एकहि पुरुष पाहण्यात आला नाही ! इथे ज्या भावाचा पूर्ण प्रकाश दिसून येतो, त्यापैकी कुठे पै, तर कुठे पैसा, तर कुठे आणा, फार फार तर दोन आणे इतकाच प्रकाश पाहिला, चार आणे सुद्धा कुठे पाहिला नाही !" आमच्याकडे पाहून थोडे थोडे

हसत श्रीरामकृष्ण म्हणतात, " काय ? म्हणतो तरी काय हा ? " विजयकृष्ण -- " त्या दिवशी डाक्यात जे काही मी पाहिले, ते आपल्याला नाकबूल करून सोयच नाही आपण नाही म्हणालात तरी मी ऐकणार नाही ! आपण दिसायला साधे भोळे दिसता, म्हणूनच आम्हाला असे गोधळात पाडता आणि काही पत्ताच लागू देत नाही ! आपले दर्शन घेण्यालाहि काही मोठा त्रास पडत नाही,—दक्षिणेश्वर म्हणजे काय ? एक दीड तासाचा रस्ता ! बरे, वाहनाचीहि कमतरता नाही,—नौका आहेत, बग्गया आहेत, गाड्या आहेत, वाटेल तेव्हा सहज येता येते इतके अगदी आमच्या घराच्या जवळ येऊन बसला आहा, म्हणूनच आम्ही आपल्याला ओळखले नाही ! आणि हेच जर आपण एखाद्या पहाडावर, एखाद्या दुर्गम गुहेत जाऊन बसला असता आणि आपल्या दर्शनासाठी, आम्हाला उपाशीतापाशी, दिवसचे दिवस रानावनात भटकावे लागले असते, म्हणजे मग आम्ही आपला योग्य मान ठेऊं लागलो असतो ! आता म्हणजे असें वाटते की आपल्या घराजवळ जर इतके आहे, तर दूर रानावनात आणि गिरिकंदरात याच्याहून किती तरी असेल ! म्हणून आपल्याला टाकून देऊन, उगीच इकडे तिकडे धावपळ करून मरत असतो झाले ! "

अशा प्रकारे यथार्थ गुरुपदवीवर आरूढ होऊनहि श्रीरामकृष्णाच्या ठिकाणी आपल्या असाधारण शक्तीबद्दल यत्किंचित सुद्धा अहंकार नव्हता किंबहुना त्याच्या ठिकाणी अहंकाराचा लवलेश सुद्धा नव्हता, म्हणूनच त्याना श्रीजगदंबेने गुरुपदवीवर आरूढ केले होते असेच म्हटले तर अधिक शोभेल अद्वैताच्या अत्युच्च अवस्थेचा सदासर्वकाळ प्रत्यक्ष अनुभव घेत असताहि, परमेश्वराशी आपला आई-लेकराच्या जिव्हाळ्याचा प्रेमसबंध त्यानी सदैव कायम ठेवला होता " आपण अजाण लेकरू, आपल्या आईला सर्व काही समजते—ती सर्वशक्तिमति—आपण आपले नेहमी तिला आळवत असावे ती काय करायचे ते करील, " असा त्याचा विलक्षण निर्भर असे !! ते नित्य पहाटे व साय-

काळी परमेश्वराचे नामस्मरण करीत हा नित्य नेम त्यानी कधीहि चुकू दिला नाही त्यांचें नेहमी सागणे असे की, “ कलियुगात नामस्मरणासारखे दुसरे सोपे साधन नाही ” “ नामस्मरणाने मनुष्याचे मन व शरीरहि शुद्ध होतें ” त्याच्या खोलीत श्रीचैतन्य, श्रीबुद्धदेव, श्रीयेशुख्रिस्त वगैरेच्या तसबिरी असत. पहाटे उठून, भावावेशात प्रत्येक तसबिरीजवळ जाऊन, अत्यत तन्मयतेने नाचत नाचत, टाळ्या वाजवीत वाजवीत, आपल्या गधर्वासारख्या मधुर आवाजाने ते नामस्मरण करीत सायकाळीहि असेच त्यावेळी ते कलकत्त्यास एखाद्या भक्ताच्या घरी असोत, की दक्षिणेश्वरी आपल्या खोलीत असोत, सायकाळ होताच, एकदम सर्व गोष्टी बद करून ते नामस्मरण करू लागत ! खऱ्या खऱ्या तळमळीने, अंत करणापासून ईश्वराची प्रार्थना कशी करावी, हेच जणु काय, ते यावेळी लोकाना शिकवीत !

त्याच्या या नामस्मरणाचे व प्रार्थनेचे एकच स्वरूप ठरलेले नसे. ज्या वेळी जो भाव उत्कट असेल त्याच भावाची प्रार्थना होई आणि ती कोणत्याहि देवाची असली, तरी ती अगदी अत करणापासून होत असल्यामुळे, त्याचे शब्द, ऐकणाऱ्याच्या मनावर आपला ठसा कायमचा उठवीत

उदाहरणार्थ खालील प्रसंग पहा —

× × × ×

पहाट झाली आहे अजून भक्तमडळी आली नाहीत श्रीरामकृष्ण तोड धुवून, आपल्या खोलीच्या पश्चिमेकडील दाराजवळ उभे राहून मधुर स्वराने ईश्वराचें नामस्मरण करीत आहेत जवळ “ एम ” उभे आहेत इतक्यात, “ गोपाळची आई ” व आणखी एकदोन स्त्रिया येऊन श्रीरामकृष्णाच्या दर्शनासाठी एका बाजूला उभ्या आहेत.

श्रीरामचंद्राचें नामस्मरग करून, श्रीरामकृष्ग श्रीकृष्गाचे नामस्मरण करीत आहेत –कृष्ग कृष्ग ! गोपीकृष्ग ! गोपी गोपी ! राखालजीवन कृष्ण ! नंद-नंदन कृष्ग ! गोविद गोविद !!

काही वेळाने श्रीगौरागाचे नामस्मरण करीत आहेत —श्रीकृष्गचैतन्य प्रभु नित्यानद । हरे कृष्ग, हरे राम, राधे गोविद !

मग थोडया वेळाने म्हगत आहेत –आलेख निरंजन ! ' निरंजन ' म्हणून ते रडत आहेत ! त्याच्या रडण्याचा आवाज ऐकून जवळ उभे असलेल्या मंड-ळीच्या डोळ्याना पाणी आले आहे ! श्रीरामकृष्ण अश्रु गाळीत, सद्गदित स्वराने म्हणत आहेत —" निरंजना ! ये रे माझ्या बाबा ! तुला आपल्या हाताने भरवून मी कधी आपला जन्म सफल करीन ? तू माझ्यासाठी देह धारण करून नररूपाने आला आहेस ! "

मग जगन्नाथाजवळ जाऊन म्हणू लागले —" जगन्नाथ ! जगब्द्बंधो ! हे दीनबधो ! मी तर कोणी जगाच्या बाहेरचा नाही, नाथ ! माझ्यावर दया कर ! " थोडया वेळाने प्रेमोन्मत्त होऊन म्हणू लागले —

" उडिष्या जगन्नाथ भज विराज जी ! "

आता नाचत पुन्हा नामस्मरण करू लागले – " श्रीमन्नारायग ! नारायग नारायण ! नारायग ! " नाचता नाचता गाऊ लागले —

हलाम[१] यार[२] जन्य[३] पागल तारे कई पेलाम[३] सई[४] ।
ब्रह्मा पागल विष्णु पागल आर पागल शिव ।
तिन पागल युक्ति करे भागले[५] नवद्वीप ॥
आर एक पागल देखे[६] एैलाम[६] वृंदावनेर[७] माझे ।
राइके राजा साजाये[८] आपनि कोटाल[९] साजे ॥

---

१ झाले २ ज्याच्यासाठी ३ मिळवलें ३ सखि ५ मोडले ६ पाहून आले ७ वृंदावनामध्ये ८ सजवून ९ नोकर

धोतर गळून पडल्याची शुद्ध नाही ! काही वेळाने आपल्या पलंगावर येऊन बसले

× × × ×

पहाट झाली भक्तमडळी उठून पाहातात तों श्रीरामकृष्ण परमेश्वराचे नामस्मरण करीत, आपल्या खोलींत नाचत आहेत ! कमरेला धोतर नाही ! मधेच गंगेला नमस्कार करीत आहेत मधेच देवादिकाच्या तसबिरीजवळ जाऊन नमस्कार करीत आहेत, तर मधेच एखादे पद अत्यत तन्मयतेने म्हणत, टाळ्या वाजवीत, नाचत आहेत ! काही वेळाने म्हणत आहेत, “ सहजानंद !” “ प्राण हे गोविंद मम जीवन ! ” अखेरीस म्हणत आहेत, “ वेद, पुराण, तत्र, गीता, गायत्री, भागवत भक्त भगवान, ( गीतेला उद्देशून म्हणत आहेत ) “ त्यागी, त्यागी, त्यागी, त्यागी ! ” तूच ब्रह्म, तूच शक्ति, तूंच पुरुष, तूच प्रकृति तूंच नित्य, तूच लीलामयी, तूच चतुर्विंशति तत्व ! ”

× × × ×

सध्याकाळ झाली जवळ बसलेल्या मडळीबरोबर चाललेले बोलणें बंद करून श्रीरामकृष्ण एकदम नामस्मरण करू लागले टाळ्या वाजवीत अत्यत मधुर स्वराने म्हणत आहेत –“ हरि बोल, हरि बोल, हरिमय हरि बोल, हरि हरि हरि बोल ! ” काही वेळाने श्रीरामचद्राचें नामस्मरण करीत आहेत –‘ राम राम राम राम, राम राम राम राम ’ नामस्मरणानंतर श्रीरामाची प्रार्थना करीत आहेत –

“ रामा, रामा, मी तुला शरण आलो आहे रामा ! मी भजनहीन साधनहीन, रामा कृपा कर, मला देहसुख नको, लोकमान्यता नको, अष्टसिद्धि नकोत ! केवळ तुझ्या पादपद्मीं शुद्धा भक्ति दे तुझ्या भुवन-मोहिनी मायेने मला गुरफटून टाकू नको ! रामा, मी तुला शरण आलों आहे, कृपा कर ! ”

प्रार्थना इतक्या करुणस्वराने करीत आहेत की, कसल्याहि पाषाणहृदयी माणसाच्या अंत करणाला पाझरच फुटावा !

× × × ×

गोष्टी बोलता बोलता सध्याकाळ झाली श्रीरामकृष्ण मधुर स्वराने नामस्मरण करु लागले त्याच्या त्या मधुर स्वराला उपमा नाही ! सर्व मंडळी चित्रासारखी तटस्थ होऊन, श्रीरामकृष्णाचे ते नामस्मरण ऐकत आहेत कोणाकोणाला तर असे वाटत आहे की साक्षात् परमेश्वरच, प्रेममय शरीर धारण करून, " प्रार्थना कशी करावी, " हेच जीवाना शिकवीत आहे की काय ? श्रीरामकृष्ण म्हणत आहेत –" आई ! मी तुला शरण आलो आहे आई ! मला देहसुख नको, लोकमान्यता नको, अष्टसिद्धि नकोत, मला फक्त तुझ्या पादपद्मी शुद्धा भक्ति दे—निष्काम अमला, अहेतुक भक्ति दे म्हणजे झाले तुझ्या भुवनमोहिनी मायेने मी गुरफटून जाणार नाही आणि तुझ्या मायामय ससारावर, कामकाचनावर, माझे कधीहि प्रेम जडणार नाही, असे कर ! आई ! तुझ्यावाचून मला दुसरे कोणी सुद्धा नाही, मी भजनहीन, साधनहीन, ज्ञान भक्ति वैराग्यहीन,—माझ्यावर दया कर आणि मला तुझ्या पादपद्मी शुद्धा भक्ति दे ! "

× × × ×

आपण काय, आपल्या आईच्या हातातले एक यंत्र इतकेंच, ती वागवील तसे वागावयाचे, ती सागेल ते करावयाचे, असा त्याचा सदाचा विलक्षण निर्भर असे ! पुढे पुढे, जेव्हा त्याच्याकडे धर्मपिपासु मंडळी येऊं लागली, तेव्हा त्याच्याशी बोलण्यात, त्याचे शंकासमाधान करून, त्याना ईश्वरलाभाचा योग्य तो मार्ग दाखवून देण्यात त्याचा सारा वेळ खर्च होऊ लागून त्याना एका क्षणाचीहि फुरसत सापडेनाशी झाली व त्याना फार त्रास होऊ लागला निरभिमानी आणि निरहकार वृत्तीचे श्रीरामकृष्ण, आईचे काम आईच करू जाणें, तिने आपल्यामागे उगीच ही दगदग कशाला लावावी, असें म्हणून एखाद्या

दिवशी एखाद्या लहान मुलासारखे अडून बसून आपल्या आईशी भाडत !!
एक दिवस आपल्या भक्तमंडळीशी बोलत असता त्याना भावावेश प्राप्त होऊन, त्या भरात ते आपल्या आईशी भाडूं लागले ते म्हणाले—" आई, तुझ्या मनात आहे तरी काय ? इतकी का कुठे गर्दी जमवावयाची असते ? ( केविलवाण्या स्वराने ) खायला की जरा बसायला सुद्धा फुरसत नाही ! (स्वत - कडे बोट करून ) हें तर काय ? एक फुटके ढोलगे आणि तू जर त्याला असे एकसारखे धोपटूं लागलीस, तर ते कधी फुटेल याचा काही नेम आहे ? आणि मग तूं काय करशील ग ? "

आणखी एक दिवस दक्षिणेश्वरी भावावेशात ते आईला म्हणूं लागले—" आई ! तू इथे इतकी गर्दी कशाला जमवतेस ? ( काही वेळ गप्प बसून ) माझ्याच्याने हे नाही सारे सहन होत ! शेरभर दुधात अर्धापाव पाणी,—चालेल, पण ते नाही, एक शेर दुधात पाच शेर पाणी ! फुकता फुकता माझे प्राण कासावीस होऊन गेले ! तूं जाणे आणि तुझे काम जाणे माझ्याने हे नाही होत ! इतकी माणसें येथे आणत जाऊ नकोस ! "

तसेच आणखी एक दिवस भावावेशात ते म्हणत होते, " आई, तूं राम, केदार, मास्टर ( एम् ) याना थोडी थोडी शक्ति दे, म्हणजे लोक प्रथम त्याच्याकडे जाऊन धर्मतत्वे समजून घेतील आणि इथे आले म्हणजे मग एक-दोन गोष्टीतच त्याचे समाधान होईल !! "

वरील उदाहरणावरून श्रीरामकृष्णाना यत्किंचितहि अहकार नसून ते श्रीजगदंबेचें काम तिच्याच प्रेरणेने कसें यत्रवत् करीत होते हे दिसेल, असो,

अहंकाराचा लवलेशहि नसल्यामुळे त्याना लोकमान्यता, कीर्ति वगैरेची बिलकुल पर्वा नसे स्वामी प्रेमानंद सागत असत—" एक दिवस रात्रीं बारा-एक वाजण्याचे सुमारास मी जागा होऊन पाहातों तो, श्रीरामकृष्ण कावरी-

बावरी मुद्रा करून, ‘ आई, मला कीर्ति देऊं नको, ’ ‘ आई, मला कीर्ति देऊ नको, ’ असे म्हणत ‘ थू ’ ‘ थू ’ करीत, गडबडीने साऱ्या घरभर धावपळ करीत आहेत ! ! कमरेला धोतरहि नाही ! ! थोडया वेळाने ते देहभानावर आल्यावर, त्याना विचारता ते म्हणाले, — “ आज मघाशी एकाएकी झोपमोड झाली व पाहातों तों, एका टोपलीत कीर्तीचे गाठोंड घेऊन, आई माझ्या बिछान्यापाशी उभी असून ते स्वीकारण्यास मला सागत होती, पण त्या गाठोडयाकडे नजर जाताच मला त्याची अत्यत किळस येऊन, आई फार आग्रह करीत असतानाहि, ते घेण्याचे मी साफ नाकारले तेव्हा थोडेसे हसून आई निघून गेली ! ”

गुरुपदवीवर आरूढ होऊन, मागे सागितल्याप्रमाणे, प्रत्येक वस्तु व व्यक्तीकडे साधारण भावभूमीवरून व उच्च भावभूमीवरून ते सदैव पाहात असल्यामुळे त्याची दृष्टि आपल्यासारखी एकदेशी नसे व म्हणून एखाद्या गोष्टी-सबंधाने अथवा एखाद्या व्यक्तीसबंधाने त्यानी आपले मत बनविले, की ते नेहमी बिनचूक असे पुढे आपल्या भक्तमंडळीशी त्याचा जो अलौकिक प्रेमसबध होता व आपल्या भक्ताविषयी त्याची जी मतें होतीं, त्याचे यथार्थ रहस्य समजण्यासाठी श्रीरामकृष्णाच्या स्वभावातील उपरोक्त विशेषत्व लक्षात ठेवावे, एवढी सूचना करून श्रीरामकृष्णाच्या गुरुभावातील इतर गोष्टींकडे वळूं

---

# ९. असाधारण गुणोत्कर्ष

जिहीं विशेषणी विशेषिजे । ते दृश्य नव्हे रूप तुझें ।
हे जाणें मी म्हणौनि लाजे । वानणा इही, ॥ ज्ञानेश्वरी, १८, १२.

तरी जितले जैसें भुली । पिसे आलापु घाली ।
तैसे वानू ते माउली । उपसाहावे तुवा ॥ ज्ञा० १८, २६

---

आतापर्यंतच्या श्रीरामकृष्णाच्या चरित्रावरून त्याच्या असाधारण भगवद्भक्ति, पावित्र्य, त्याग, वैराग्य, सरलता, सत्यनिष्ठा, इत्यादि गुणाची वाचकाना कल्पना आलीच असेल असे असता त्याच्या गुणाचे वर्णन करण्यासाठी हे निराळे प्रकरण घालण्याचा हेतु इतकाच की, त्याच्या अंगच्या या गुणाचें उज्ज्वल चित्र वाचकाच्या नजरेस स्पष्टपणे पडावे व एखाद्या सद्गुणाच्या उत्कर्षाची सीमा कोठपर्यंत जाऊ शकते हें प्रत्यक्ष पाहाण्यास सापडावे श्रीरामकृष्णाच्या प्रत्येक इतर गोष्टीप्रमाणे, त्याच्या अंगी त्याग, वैराग्य, सरलता, सत्यनिष्ठा वगैरे गुणाची आश्चर्यकारक आणि अद्‌भुत वाढ झालेली होती त्याच्या आश्रयास येणाऱ्या प्रत्येकाचे लक्ष, या त्याच्या अलौकिक गुणापैकी कोणत्याना कोणत्या तरी गुणाकडे ओढलें जाऊन, त्याचा त्याच्या मनावर योग्य तो परिणाम झाल्यावाचून राहात नसे कोणी त्याच्या सरल स्वभावाने मोहित होई, तर कोणाला त्याच्या ईश्वरनिर्भराचेंच आश्चर्य वाटे, कोणी त्याच्या विलक्षण कामकाचनत्यागानेच चकित होऊन जाई, तर कोणाच्या मनावर त्याच्या सत्यनिष्ठेचाच परिणाम होई,—अशा रीतीने निरनिराळे लोक त्याच्याकडे ओढले जात व त्याच्या मनात श्रीरामकृष्णाबद्दल आदर उत्पन्न होई आणि खरोखरच इतक्या निरनिराळ्या गुणाचा, इतका कमालीचा उत्कर्ष फारच थोडया पुरुषाच्या

ठिकाणी दिसून येईल खालील वर्णन वाचून वरील विधानाची सत्यता वाचकाना पटेल

**निरभिमानता**

श्रीरामकृष्णाच्या ठिकाणी गर्वाचा, मानाचा लवलेशहि नव्हता. मी म्हणजे एक अमुक कोणी आहे, असा अहंकार त्याच्या मनाला कधीहि शिवला नाही 'अवतार' म्हणून चोहोकडे ख्याति होत असता आणि मोठे मोठे विद्वान आणि पडित त्याच्या चरणी लीन झाले असता ते स्वत बालक ते बालकच! यत्किंचितहि अहकार नाही! कोणीहि त्याच्या दर्शनास येवो, तो नमस्कार करण्याच्या अगोदर, त्याला नमस्कार श्रीरामकृष्णाचा! "आपल्याकडून जे काही घडतें ते आपली आईच घडविते. ती चालक आहे, आपण केवळ तिच्या हातातील बाहुले आहो," ही भावना त्याच्या रोमरोमात भिनली होती! 'मी' अशी जर वस्तूच नाही, तर मान करावयाचा तरी कोणी? त्याच्याकडे येणारी मंडळी या त्याच्या अलौकिक गुणाने चकित होऊन जात

दक्षिणेश्वरी एकदा डॉ सरकार काही कामासाठी आले काम झाल्यावर श्रीकालीच्या दर्शनासाठी ते देवळात गेले आवारातील बागेतून जात असता, तेथील नानाप्रकारच्या फुलाच्या ताटव्याच्या परिमलाने त्याना फार आनद झाला श्रीरामकृष्ण त्यावेळी तेथे सहज हिंडत होते त्याना पाहून, हा बागेतीलच कोणी माळी असावा, असें समजून डॉक्टरानी त्याना दोन चार फुलें तोडून देण्यास सागितले श्रीरामकृष्णानी तत्काळ काही सुंदर फुले तोडून, मोठया नम्रतेने त्याच्या हाती दिली! पुढे काही दिवसानी डॉक्टराना आपली चूक समजताच त्याना आपल्या चुकीचें फार वाईट वाटले व त्यानी श्रीरामकृष्णाची माफी मागितली

एकदा एका भक्ताच्या घरी श्रीरामकृष्णाना भक्तमंडळीसह भजनासाठी आमंत्रण होतें. भजनानंतर फराळाचे वेळीं, तो भक्त, इतर कोणी मोठी मडळी

आली होती, त्यांच्याच समाचारात गढून गेला व इकडे श्रीरामकृष्ण तसेच राहिले ! देव सोडून देवळाचीच पूजा चालली ! श्रीरामकृष्णाना मान-अपमान कसचा ? कांही वेळ थाबून, आपल्याकडे कोणीच पाहात नाही असे बघून, ते म्हणतात—" कारे ! आमच्याकडे कोणीच पाहात नाही कायरे ?" त्यांच्या बरोबर आलेल्या भक्तापैकी एकजण रागारागाने म्हणतो —महाराज, चला आपण दक्षिणेश्वरी निघून जाऊं ! " श्रीरामकृष्ण —" अरे बाबा ! असें रागावून कसे चालेल ? जवळ एक पैसासुद्धा नाही आणि फुकट राग ? आणि या इतक्या रात्रीं जायचे तरी कुठे ? गाडीचे भाडे कोण देईल ? थाब जरा, त्या मंडळींची व्यवस्था झाली म्हणजे आपलीहि सोय लागेल ! " इतक्यात त्या घरमालकाला श्रीरामकृष्णाची आठवण झाली व त्याने श्रीरामकृष्णाची योग्य ती सर्व व्यवस्था केली

दक्षिणेश्वरी एकदा एक साधु आला तो अत्यत तामसी वृत्तीचा असे एक दिवस त्याला चिलीम ओढण्याला निखारा पाहिजे होता म्हणून तो श्रीरामकृष्णाच्या खोलीकडे आला श्रीरामकृष्ण भक्तमंडळीशी बोलत बसले होते त्या साधूला पाहाताच ते एकदम उठून, हात जोडून अत्यंत नम्रतेने एका बाजूला उभे राहिले ! ' येथे निखारा नाही, ' असे जवळच्या मंडळीपैकी एकजणाने त्याला सागितल्यावर तो साधु काही पुटपुटत तेथून निघून गेला तो गेल्यावर श्रीरामकृष्ण आपल्या पलगावर बसले. श्रीरामकृष्णाचे हें विलक्षण वर्तन पाहून राखाल हासत हासत म्हणतो, " महाराज, साधुसंताच्या ठिकाणीं आपली केवढी भक्ति आणि आदर ! अहाहा ! " हें ऐकून श्रीरामकृष्ण हासून म्हणाले-" अरे बाबा, तमोमुख नारायण ! त्याचा सुद्धा मान ठेवला पाहिजे, नाही तर आईला राग येतो, काय समजलास ? "

अखेरच्या आजारांत दुखणें कठीण आहे असें पाहून भक्तमंडळीनी जेव्हां डॉ. सरकार याना बोलावण्याचा विचार केला, तेव्हां तो ऐकून

श्रीरामकृष्ण त्याना म्हणाले, 'त्याना बोलवायला माझी हरकत नाही, पण तुम्ही त्याना असे सागा की ' एकजण गरीब मनुष्य आजारी आहे, त्याला पैसे खर्चण्याची शक्ति नाही, तुम्ही कृपा करून त्याला पाहाण्यास चला, ' यावर जर ते येतील तर येऊ द्यात " श्रीरामकृष्णाची भक्तमडळी मोठी श्रीमंत नसली, तरी आपल्या गुरुदेवासाठी आपलें सर्वस्वहि खर्च करण्यास तयार झालेली होती श्रीरामकृष्णानाहि हें माहीत नव्हते असे नाही, पण आपल्याजवळ पैसा नाही, आपण फकीर लोक, आपल्याला एवढा मान हवा कशाला ! असा त्याचा विचार ! ! मंडळीना हे ऐकून फार दु ख झाले व डाक्टराना असे सागण्याची आज्ञा न करण्याविषयी, त्यानी परोपरीने श्रीरामकृष्णाना विनविले. अखेरीस एवढें ठरले, की डॉक्टराना काही एक न सागता बोलावून आणावयाचे श्रीरामकृष्णाचा असा बेत की, ते आल्यावर आपणच स्वत सागू झालं ! डॉक्टर आले व त्यानी आपण होऊन, " मी याच्या औषधाचे पैसे घेणार नाही, " असे मडळीना सागितले, वगैरे हकीकत पुढे येईलच

एक दिवस एक प्रसिद्ध नैय्यायिक पडित श्रीरामकृष्णाना भेटण्यास गेले. त्याना उलट नमस्कार न करता पडित म्हणाले, "आपण आम्हाला प्रणम्य आहा काय ? " श्रीरामकृष्ण म्हणाले, " मी सर्वांचा दास आहे, मला सर्वचजण प्रणम्य आहेत " पडित म्हणाले –" मी विचारलेल्या प्रश्नाचे आपण उत्तर दिले नाही, " आपण आम्हाला प्रणम्य आहा काय ? " श्रीरामकृष्णानी उत्तर दिले, " या विश्वससारातील सर्व वस्तूहून मी कमी योग्यतेचा आहे, मी सर्वांचा दासानुदास, मला सर्वजण प्रणम्य आहेत " पडित पुन्हा म्हणाले,–"मला वाटते, माझे बोलणे आपल्या लक्षात आले नाही आपल्या गळयात यज्ञोपवीत दिसत नाही, म्हणून आपण ब्राह्मणाना प्रणम्य नाही तरी पण, आपण जर संन्यासी असाल, तर आपण आम्हाला प्रणम्य आहा, म्हणून विचारतो, की आपण सन्यासी आहा काय ? " परंतु श्रीरामकृष्णाचें पुन्हा तेंच उत्तर ! " **मी सन्यासी आहे," ही गोष्ट सुद्धा त्याच्याने म्हणवली नाही ! !**

**दंभराहित्य**

श्रीरामकृष्णाना यत्किंचितहि मान, अहंकार नसल्यामुळे त्यांच्यात अर्थातच दांभिकपणा मुळीच नसे दांभिकपणा आणून आपला बडेजावच माजवावयाचा की नाही ? पण ते बडेजाव, कीर्ति वगैरेबद्दलहि पूर्ण उदासीनच होते. त्यानी आपले दोष कधीहि लपवून ठेवले नाहीत अथवा आपल्यामधे नसलेले गुण मुद्दाम आहेत असें भासवून, कोणाचीहि कधीहि त्यानी दिशाभूल केली नाही त्याच्यात लपवाछपव, लटपट यत्किंचितहि नसे मनात उत्पन्न झालेला भाव त्यानी कधीहि लपवून ठेवला नाही अथवा कोणताहि भाव मुद्दाम आणण्याचा खटाटोपहि केला नाही त्याच्या भाषणात स्पष्टपणा आणि आचरणात सरळपणा भरलेला असे

एक दिवस, श्रीरामकृष्णाच्या दर्शनास कलकत्त्याहून काही श्रीमत मारवाडी मडळी आली श्रीरामकृष्ण खोलींत नव्हते, हृदय होता मडळी श्रीरामकृष्णाबद्दल हृदयजवळ चौकशी करीत होती व हृदयहि आपल्या मामाची, त्या मडळीजवळ मनमुराद स्तुति करीत होता इतक्यात श्रीरामकृष्ण तेथे आले, तोंच हृदयचे काही शब्दहि त्याच्या कानी पडले त्याबरोबर ते हृदयकडे वळून त्याची निर्भर्त्सना करीत म्हणतात, “ गाढवा, तुला या पंचायती करायला कोणी सागितल्या ! ही मंडळी श्रीमंत आहेत असे पाहून काही तरी खोटयानाटया गप्पा सागून, त्याच्याकडून काही तरी उपटण्याचा तुझा बेत आहे वाटते? आई असल्या लोभी माणसाना कशाला इथे राहू देते कोणास ठाऊक ! ” असें म्हणत ते गळा काढून रडू लागले ! थोडया वेळाने त्या मडळीकडे वळून ते म्हणतात –“ बाबानो, तुम्ही त्याचें काही एक ऐकू नका तो सागतो तसे काही एक नाही एवढें मात्र खरें की, मी जगदबेची एकनिष्ठपणे भक्ति करीत असतों व तो सांगतो तशी योग्यता यावी अशी माझी इच्छा आहे, इतकेंच ” हें त्याचें विलक्षण आचरण पाहून ती मंडळी अगदी चकित होऊन गेली.

त्याच्या बाह्य वेशावरून हे सन्यासी आहेत असे कोणालाहि समजून येत नसे एखाद्या विशिष्ट प्रकारचाच वेश असणे म्हणजे सांप्रदायिकता आणि त्या बरोबरच थोडाफार दांभिकपणा आलाच या दोन्ही गोष्टींना त्याच्याजवळ बिलकुल थारा नसे

दक्षिणेश्वरी एक परमहंस राहातात, असे एका पंडिताना समजल्यावरून ते एक दिवस दक्षिणेश्वरी गेले श्रीरामकृष्णाच्या खोलीत जाऊन पडित पाहातात, तो ते छोट्या पलगावर बसलेले असून खाली चारी बाजूला अनेक भक्त बसले आहेत तो सर्व थाट पाहून पडितजीना आश्चर्य वाटून ते म्हणतात, "आपणच का ते परमहंस ? वा ! वा ! छान ! " इकडे तिकडे पाहातात तो बिछान्याकडे लक्ष जाऊन पडित म्हणतात, " वा ! मच्छरदाणीहि आहे ! !" इतक्यात श्रीरामकृष्णानी आपल्या जोडयाकडे व चपलाकडे बोट करून, त्या त्याना दाखविल्या पडिताना अधिकच आश्चर्य वाटून ते म्हणतात, " वा ! आणखी बूट चपलाहि आहेत ! ! " श्रीरामकृष्ण त्याना आणखीहि कित्येक वस्तु दाखवूं लागले व पडित अधिकाधिक गोंधळून, " वा ! हेंहि आहे ? छान आहे बुवा ! " असे उद्गार काढूं लागले मग काही वेळाने श्रीरामकृष्णाच्या जवळच पलंगावर बसून म्हणाले, " आज आम्हाला फार छान परमहस पाहायला सापडले बुवा !" नंतर जवळच्या मंडळीकडे वळून म्हणाले, " तुम्ही सारी सरळ, भोळी माणसे, म्हणून मोठया भक्तीने इतक्या दुरून येथे येता, पण, बाबानो ! तुम्ही सपशेल फसला आहा अहो, हे कसचे परमहंस ! परमहसाची लक्षणे शास्त्रानी काय सागितलीं आहेत, माहीत आहे ? " असे म्हणून त्यानी काही शास्त्रोक्त वचने म्हणून दाखविली मग संध्याकाळ झाल्याचें पाहून ते उठले व म्हणाले, " आजचा दिवस फुकट गेला. चला, संध्याविध्या तरी करून यावे ! " असे म्हणून पडितजी घाटावर जाऊन संध्या करून इष्टदेवतेचे ध्यान करूं लागले थोडा वेळ झाला असेल नसेल, तोच पडित ताडकन् उठले व तेथून पळतच श्रीरामकृष्णांच्या खोलीत गेले ! पाहातात तो श्रीरामकृष्ण समाधिमग्न आहेत. पंडित हात

जोडून तेथे उभे राहिले व परमेश्वरज्ञानाने श्रीरामकृष्णाची अनेक तऱ्हेने स्तुति करूं लागले !!

**कोणालाहि न दुखविणं**

श्रीरामकृष्णानी कधी कोणालाहि कृतीने अथवा वाचेने दुखविलें नाही, की कोणाच्या वाईटाचे विचारहि कधी मनात आणले नाहीत आपल्यापासूनच कोणाला कोणत्याहि तऱ्हेने त्रास होऊ नये, याबद्दल ते फार जपत एक दिवस दारावर फळे विकावयास आली असता, ' तीं घेऊं काय,' असे विचारण्यास माताजी आल्या श्रीरामकृष्ण ' नको ' म्हणाले हें ऐकून माताजी थोडे हिरमुसले तोंड करून निघून गेल्या त्याना जाताना पाहून श्रीरामकृष्ण जवळच्या एका शिष्यास म्हणाले, " अरे, जा, तिला साग की, तुला किती फळें घ्यायचीं असतील तितकी घे माझ्या मुळे तिच्या डोळ्याना पाणी आलेलें जर माझ्या दृष्टीस पडले, तर माझी जगदबेवरची भक्ति सुद्धा ढासळून जाईल ! ! जा " त्याच्या तोडीं पुष्कळदा ' साल्या ' हा शब्द येई, परतु त्याचा अर्थ ' मूर्खा ' अथवा ' गाढवा ' इतकाच असून, त्याच्या मनात आपल्याबद्दल काहीहि वाईट नाही, ही गोष्ट सर्वांना माहित असे रात्रंदिवस परमेश्वराच्या चिंतनाच्या तन्मयतेने त्याना स्वत च्या देहाचेहि भान राहात नसे, तरी आपल्या सर्व वस्तूंकडे त्याचे लक्ष असे हेतु हा की, आपल्यापासून कोणालाहि त्रास होऊ नये कलकत्त्यास एखाद्या भक्ताच्या घरीं जाताना ते आपले आवश्यक सर्व जिन्नस,—हातरुमाल, बटवा वगैरे,—बरोबर घेण्यास कधीहि विसरत नसत पुष्कळ वेळा कलकत्त्याहून परत येण्यास फार रात्र होई व बागेचें फाटकहि बंद झालेलें असे, अशा वेळीं तेथील रखवालदारास हाक मारून, त्याच्याशीं ते चार गोड शब्द बोलत व एवढ्या रात्री मुद्दाम फाटक उघडण्याच्या त्याच्या श्रमाबद्दल, ते त्याला काही तरी बक्षीस देण्यास कधी चुकत नसत ! एखाद्याला कांही काम सागावयाचें, त्याला किती सकोच आणि किती आढेवेढे ? न जाणो, आपल्या काम सागण्याने त्याला त्रास झाला तर ?

एक दिवस सकाळीं आघोळ झाल्यावर, रामलालला ( त्यांचा पुतण्या ) हाक मारून ते म्हणतात–कारे ? तुला आज दुपारीं शहरात ( कलकत्त्यास ) जायचें आहे काय ?

**रामलाल** —" नाही, का बरें ? "

**श्रीरामकृष्ण** —" काही विशेष नाही, म्हटल, तू अलिकडे पुष्कळ दिवसात शहरात गेला नाहीस, इथे एकसारखे राहून कंटाळा आला असेल, म्हणून विचारलं, इतकेंच "

**रामलाल** —" मला दुपारी इथे काही काम नाही, आपले काही असेल तर जाऊन येईन "

**श्रीरामकृष्ण** —" नाही नाही, मुद्दाम जाण्यासारखे काही नाही, तरी पण, तू जाणारच असशील तर—"

**रामलाल** —" काही हरकत नाही, मी जाऊन येईन "

**श्रीरामकृष्ण** —" बरं तर.—पण मुद्दाम जाऊ नकोस बरं ? मग असें कर,—जाताना पेटीतून पैसे घे आणि एखादी होडी करून जा खुशाल संध्याकाळपर्यंत इकडे तिकडे कर आणि मग परत ये, आणखी असें कर,—ती तिथे मिठाई व काजू किसमिस आहेत, जाताना त्याचा पुडा बांधून घेऊन जा आणि तेवढे नरेंद्राला नेऊन दे ! समजले ? "

रामलालदादा सांगत असत, " आदल्या दिवशी एका मारवाड्याने ती मिठाई आणि काजू किसमिस आणून दिले होते ते त्यांना नरेंद्राला पाठवावयाचे होते " ' तूं ते नरेंद्राला नेऊन दे, ' असें एकदम कसे सांगावयाचे ? मला त्रास नाही वाटायचा ? म्हणून एवढा संकोच आणि इतके आढेवेढे ! " असो. अशी कित्येक उदाहरणे देता येतील.

अखेरच्या दुखण्यात त्याच्या सेवाशुश्रुषेसाठी त्याची भक्तमडळी रात्रं-दिवस त्याच्यापाशी राहूं लागली आपल्यासाठी इतक्या मंडळीना त्रास होतो असे पाहून त्याना अत्यत वाईट वाटे व वरचेवर ते तसे बोलूनहि दाखवीत. आपल्या सेवेसाठी राहिलेल्या सर्वांची खाण्यापिण्याची नीट व्यवस्था झाली आहे की नाही, याची ते वरचेवर चौकशी करीत कोणी बराच वेळ त्याचे पाय चेपीत बसल्यास अथवा त्याच्यासाठी इतर काही कामे बराच वेळ करीत बसल्यास—त्याला आपल्यासाठी त्रास होत आहे असें पाहून, ते त्याला काही वेळ थाबण्यास अथवा जरा हिडून येण्यास अथवा दुसऱ्या कोणाला पाठवून देण्यास सागत दुसऱ्याच्या सुखसोईकडे त्याचे सदैव लक्ष असे

**शांति, चित्ताची समता**

दुसऱ्याला आपल्यापासून कोणत्याहि तऱ्हेने त्रास होऊ न देण्याविषयी जसे ते जपत, तसेच दुसऱ्याकडून स्वत ला कितीहि त्रास झाला, तरी तो मोठ्या आनंदाने सहन करीत ते नेहमी म्हणत, “सज्जनाचा राग, म्हणजे पाण्याचा डाग,” वस्त्रावर पाण्याचा थेंब उडाला तर तो काही वेळ डागासारखा दिसतो, पण तो खरोखर डागच नसतो व तो लवकरच निघूनहि जातो त्याचे स्वत चे असेच होते त्याना कधीहि राग येत नसे व एखादे वेळी आल्यासारखा दिसला, तरी तो फार वेळ टिकतहि नसे सर्व ठिकाणी परमेश्वर भरून राहिला असून जे काही घडते तें त्याच्याच इच्छेने घडते, अशी जेथे दृढ धारणा झाली, तेथे राग कोणी आणि कोणावर करावा? कसल्याहि बिकट प्रसगी त्याच्या मनाची समता ढळत नसे

मथुरनाथाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र त्रैलाक्यबाबू याचेकडे देवळाची व्यवस्था आली एक दिवस काही कारणावरून हृदयवर रागावून त्रैलोक्यबाबूंनी त्याला देवळातून ताबडतोब निघून जाण्यास सागितले व श्रीरामकृष्णानीहि येथे राहण्याचे कारण नाही, असे कोणाजवळ रागाच्या भरात

उद्गार काढले हे श्रीरामकृष्णाना समजताच, ते जसे होते तसे उठून बाहेर जाण्यास निघाले,—आवाराच्या फाटकापर्यंत गेले सुद्धा, पण ते निघालेले पाहून, त्याचा काही एक अपराध नाही हे लक्षात येऊन व आपलेंच काही अकल्याण होईल या भीतीने, त्रैलोक्यबाबूंनी त्याच्या पाठोपाठ धाव घेतली व त्याना तेथून न जाण्याविषयी विनविले, श्रीरामकृष्णहि, जणु काहीच झाले नाही, अशा मुद्रेने हासत हासत परत आपल्या खोलीत आले !

त्याना स्वत ला कोणी काही म्हटले अथवा त्याची निंदा केली तरी त्याना त्याचे काहीएक वाटत नसे श्रीयुत केशवचद्र सेन यानी ' सुलभ समाचारात ' त्याची हकीगत प्रसिद्ध केल्यापासून त्याच्यासबधी निरनिराळ्या वर्तमानपत्रात वरचेवर लेख येत एखादे पत्र त्याना नावेहि ठेवी ' अमुक वर्तमानपत्राने आपली निंदा केली आहे, ' असे एखाद्याने त्याना सागितले तर ते म्हणत, " केली तर केली ! आपण तिकडे लक्षच कशाला द्यावे ? ज्याला जसे कळेल, तसे तो म्हणेल ! " एक दिवस तर ते केशवचद्राना म्हणाले की, " कायरे केशव, मी काय मानासाठी हपापलेला आहे कायरे, म्हणून तूं वर्तमानपत्रात माझी हकीगत लिहितोस ? झाले ते झाले, यापुढे काही एक लिहू नको " स्वत च्या स्तुतिनिंदेविषयी ते इतके उदासीन होते, तरी श्रीकालीची कोणी निंदा केली तर मात्र त्याचा धीरे सुटे व ते त्याचेवर रागवत स्वामी विवेकानंदाचा प्रथम प्रथम ईश्वराच्या साकार स्वरूपावर विश्वास नसे व त्याबद्दल ते श्रीरामकृष्णाशी वरचेवर वाद घालीत एक दिवस वादाच्या भरात स्वामीजी कालीला काही निंदेचे शब्द बोलून गेले श्रीरामकृष्ण त्याना म्हणाले, " बाबारे, तू मला काय वाटेल ते बोल, माझ्या आईला का ? " तरीहि विवेकानंदाचा पट्टा थाबेना तेव्हा रागारागाने श्रीरामकृष्ण म्हणाले, " साल्या, निघ येथून, जा, माझ्या इथे येऊन माझ्या आईला नावे ठेवतोस ? आजपासून इथे येत जाऊं नकोस ! " हे ऐकून विवेकानदाना वाईट वाटले, परंतु तेथून न जाता, ते तेथेच एका बाजूला जाऊन

बसले. काही वेळाने श्रीरामकृष्णाना राहवेनासे होऊन, ते उठून त्याचे-जवळ गेले व एखाद्या लहान मुलासारखे कुरवाळीत त्याना म्हणाले, " तू माझ्या आईला का बरे नावे ठेवलीस ? म्हणून माझा धीर सुटला ! आईला कोणी नावे ठेवलेली मला सहन होत नाहीत, तुला काय बोलायचें तें मला बोलत जा ! "

त्याच्याकडे नेहमी सकाळपासून तो रात्रीं नउ-दहा वाजेपर्यंत एकसारखी माणसाची रहदारी सुरू असे कित्येकदा तर त्याना चार घास खाण्यालाहि फुरसत मिळू नये ! येणाऱ्या मडळींत सर्व तऱ्हेचे लोक असत आणि प्रत्येकाची ही इच्छा, की श्रीरामकृष्णानी आपल्याशी ज्यास्त वेळ बोलावे ! यामुळे श्रीराम-कृष्णाना फार त्रास होई पण ते कधीहि रागावत नसत व तो सर्व त्रास आनंदाने सहन करीत

**सरलता.** अगदी लहानपणापासून श्रीरामकृष्णाचा स्वभाव अत्यत सरळ असे त्याना छक्केपजे बिलकुल समजत नसत ते म्हणत असत, " अनेक जन्माच्या पुण्याईने मनुष्य सरल व उदार स्वभावाचा होतो, "—" मनुष्य सरळ स्वभावाचा असल्या-शिवाय त्याला ईश्वराचा लाभ होत नाही " असावयाचे एक आणि दाखवा-वयाचें एक, अशी लटपट त्याच्याजवळ मुळीच नस जे करावयाचे ते कायावाचामने करावयाचें, ज्याच्यावर विश्वास ठेवावयाचा, त्याचेवर काया-वाचामने विश्वास ठेवावयाचा, असा त्याचा स्वभाव लहानपणापासूनच असे आणि या सरल विश्वासाच्या जोरावरच, त्यानी ईश्वरलाभ करून घेतला. अमुक गोष्ट करायची असें ठरल्यावर ती अक्षरश तशी करावयाची, ' असेच का ' आणि ' तसेच कां ' असे तर्ककुतर्क काढीत बसावयाचें नाही, असा लहानपणापासूनचा त्याचा स्वभाव असे या चरित्रात आतापर्यंत या त्याच्या विलक्षण सरलतेच्या पुष्कळ गोष्टी आल्या आहेतच,—आणखीहि काही येथे देऊं.

लहानपणीं एके दिवशी आपल्या घराजवळच्या परसात खेळत असता, तेथील गवतात त्याच्या पायाला काही चावले त्याना वाटलें साप चावला ' त्यानी ऐकले होतें की, साप जर पुन्हा चावला, तर विष उतरते म्हणून त्या बिळात हात घालून साप पुन्हा चावण्याची ते वाट पाहूं लागले ! ! इतक्यात तेथून एकजण चालला होता तो म्हणाला, ' अरे बाबा, असे नव्हे साप जर पुन्हा त्याच जागी चावला, तर विष उतरते, भलत्याच जागी चावला तर विष उतरत नाही ! " हे ऐकल्यावर त्यानी आपला हात बाहेर काढला !

साधकावस्थेत ते दक्षिणेश्वर खेडयात एका घरी अध्यात्मरामायण ऐकण्यास जात एक दिवस पुराणिक बोवानी पुराणात सागितले की, ' रामनामाच्या उच्चाराने मनुष्य निर्मल होतो ' पुढे एक दिवस श्रीरामकृष्णानी पुराणिक बोवाना शौचास जाताना पाहिलें, त्याबरोबर त्या दिवशीचे पुराणातील त्याचे उद्गार आठवून, श्रीरामकृष्णाचें मन फार अस्वस्थ झाले त्याना चैन पडेना व ते तसेच पुराणिक बोवाकडे जाऊन त्याना म्हणाले, " महाराज, हे कसे झाले ? रामनामाच्या उच्चाराने आपण अजूनहि निर्मल कसे झाला नाही ? " हा त्याचा बालकासारखा सरल विश्वास पाहून, पुराणिकाचे डोळे पाण्याने भरून आले व ते म्हणाले,--" बाबा, रामनामाने मनातील मळ नाहीसा होतो बरे ! शरीरातील नव्हे " हें ऐकून श्रीरामकृष्णाच्या जीवात जीव आला ! !

श्रीरामकृष्ण सागत,—" मथुर व त्यांची पत्नी जेथे निजत तेथेच मी निजत असे. माझी त्यावेळीं उन्माद अवस्था असे तीं दोघेहि अगदी एखाद्या लहान मुलासारखे मला वागवीत व माझे लाड करीत. त्या दोघाचें सर्व बोलणे मला ऐकूं येई एखादे वेळीं मथुर विचारी-" बाबा, आमच्या गोष्टी तुम्हाला ऐकूं येतात ?" मी म्हणे, " होय येतात ! "

" एकदा त्याच्या पत्नीला, त्याच्याबद्दल काही संशय आला व तिने त्याला सांगितले की, बाहेर कोठेहि जाताना बाबाना बरोबर घेऊन जात जा एके दिवशी त्याने मला आपल्याबरोबर नेलें, एका ठिकाणी आपण माडीवर गेला व मला खालीच बसविले सुमारे अर्ध्या तासाने खाली येऊन मला म्हणाला, ' ह, बाबा चला, आता गाडीत बसून जाऊ ! ' घरी आल्यावर त्याच्या पत्नीने विचारताच मी सर्व सांगितले,—म्हणालों,—याने मला एका गाडींत बसवून कुठेसे नेले—मग मला खाली बसवून आपण माडीवर गेला आणि अर्ध्या तासाने खाली येऊन म्हणाला, ' ह बाबा चला, आता गाडीत बसून जाऊ !' "

वयोवृद्धीबरोबर बालक युवक होतो, युवक वृद्ध होतो आणि बाल्य-कालची मधुरस्मृति हा केवळ कल्पनेचा मात्र विषय होऊन बसतो, हा प्रकृतीचा नियम आहे श्रीरामकृष्णाच्या अद्भुत चरित्रात हा नियम बदलून गेला होता ! ते जन्मभर बालकच होते, आणि त्याच्यात बालकाचा सरळ आणि मोकळा स्वभाव जशाचा तसा कायम राहिला होता ! अगदी अखेरच्या दिवसात सुद्धा त्याचा हा बालकस्वभावच पुष्कळाना मोहून टाकी !

त्याच्या बालकस्वभावाची ज्याना ओळखच पटलेली नसे त्याना कित्येकदा श्रीरामकृष्णाचें वर्तन असभ्यपणाचें अथवा ढोंगीपणाचे वाटे परंतु ज्याना त्याच्या अद्भुत स्वभावाची माहिती झालेली असे, त्याना त्यात विलक्षण असे काहीच दिसत नसे बालकाच्या अंगावर ज्याप्रमाणे वस्त्र फार वेळ टिकत नाही त्याचप्रमाणे श्रीरामकृष्णाचें होई ! त्याचे धोतर बहुतेक मोकळेंच असे व गळून पडलें तरी त्याचे तिकडे लक्षहि नसे ! समोर मोठमोठी विद्वान मडळी अथवा मोठमोठे अधिकारी आणि राजे महाराजे बसलेले असताहि धोतर गळून पडल्यास त्याचे तिकडे तिळमात्रहि लक्ष नसावे, ही गोष्ट कित्येकानी प्रत्यक्ष पाहिली आहे

बालकाचे जसे असते की, भूक लागली की मागून घेऊन खावयाचे तसेच श्रीरामकृष्णाचे असे अनेकदा अनेक ठिकाणीं त्यानी याप्रमाणे भूक लागताच खायला मागून घेऊन खावे !

त्याच्या सहवासात बराच काळ घालविणाऱ्या मंडळीच्या असे लक्षात येई की, देहभानावर असताना सुद्धा श्रीरामकृष्णाना बालकाप्रमाणे चार पावले देखील सरळ चालता येत नसे ! !

नवीन नवीन वस्तु पाहाण्याची मुलाना जशी उत्कठा वाटते व ती पाहिल्यावर त्याना जसा अत्यानद होतो, तीच अवस्था श्रीरामकृष्णाची ! एकदा जहाजाच्या इजिनाचा भकभक आवाज कसा होतो, हे पाहाण्याची त्याना फार इच्छा झाली हे समजल्यावर मडळीनी त्याना जहाजावर नेऊन ती सर्व यत्रे दाखविली, तेव्हा त्याच्या आनदाला सीमा उरली नाही ! !

कलकत्यातील एखाद्या नवीनच रस्त्याने एखादे वेळी त्याची गाडी गेल्यास, त्यातील नवीन नवीन इमारती, नव नवे देखावे पाहून ते आनदाने बेहोष होऊन जात, आणि “ हे काय आहे ? ” “ ते काय आहे ? ” “ याला काय म्हणतात ? ” “ त्याला काय म्हणतात ? ” वगैरे प्रश्नाचा एकसारखा भडिमार करून, जवळ बसलेल्या माणसाला उत्तरें देता देता पुरेवाट करून टाकीत !

नवीन नवीत माहिती व नवीन नवीन विषय जाणण्याची त्याना कधी कधी इच्छा होई, परतु एका परमेश्वराचेच चितन करण्याची त्यानी आपल्या मनाला अशी जबरदस्त शिस्त लावून ठेवली होती की, दुसरा माहितीं सागत असे, तिकडे त्याचे लगेच दुर्लक्ष होऊ लागे !

एक दिवस ते मास्तर महाशयाना म्हणाले, “ का रे ? तुमच्या इग्रजींत न्यायशास्त्रावर काही पुस्तके आहेत काय ? ”

मास्तर महाशयांनी होय म्हटल्यावर, त्याची थोडक्यात माहिती देण्यास त्यानी त्याना सांगितले मास्तर महाशयानी माहिती देण्यास सुरुवात केली, परंतु लवकरच त्याना दिसले की, श्रीरामकृष्णाचे आपल्या बोलण्याकडे मुळीच लक्ष नाही ! हे पाहून त्यानी बोलणे बंद ठेवले

तसेच आणखी एक दिवस, एका ग्रहणाच्या दिवशी, ग्रहणे का लागतात हे समजून घेण्याची त्याना फार इच्छा झाली, म्हणून एकजण त्याना जमीनीवर आकृत्या काढून तो विषय समजावून देऊं लागला थोडयाच वेळात एकदम त्याला थांबावयास सांगून ते म्हणाले, "बस्, बस् पुरे ! माझे डोके भणभणायला लागले ! "

एकदा प्राणिसंग्रहालयात जाऊन तेथील सिंह पाहाण्याची त्याना फार इच्छा झाली मंडळी त्याना गाडींतून तिकडे नेत असता, 'आता आपल्याला आईचे वाहन पाहावयास मिळणार,' या विचारात तल्लीन होऊन त्याना वाटेतच भावावस्था प्राप्त झाली तेव्हा ते म्हणूं लागले, "आई, आई, मला बेहोष करू नकोस, मी तुझे वाहन पाहायला चाललो आहे ! " तेथे गेल्यावर सिंहाला पाहताच त्याची समाधि लागली !

एक दिवस ते आपल्या भक्तमंडळीस बरोबर घेऊन प्रख्यात पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, यांच्या भेटीस गेले होते गाडीतून उतरून वाडयात जाताना, आपल्या कोटाच्या गुंडया मोकळ्याच आहेत, असें पाहून, ते मास्तर महाशयाना विचारतात—"काय रे, कोटाच्या गुंडया अशाच असू देत, की नीट घालू ?" मास्तर महाशय—"महाराज, तशा राहिल्या तरी हरकत नाही !" हें ऐकताच जणु काय त्याची समजूत पटली !

कोणी मोठे पंडित अथवा कोणी एखादी प्रसिद्ध व्यक्ति त्याच्या भेटीस येणार असली, म्हणजे प्रथम त्याना एखाद्या लहान मुलासारखें भय वाटे, त्याना वाटे, आपण तर काही कुठे लिहायला वाचायला शिकलों नाहीं आणि हे तर एवढे

मोठे पंडित तेव्हा आता कसे होईल ? या त्याच्या स्वभावाचा जवळच्या मडळीस मोठा अचबा वाटे, पग कित्येकदा त्याचा व्यवहार नीट लक्ष देऊन पाहिल्यावर असे दिसून येई की, ह्याचे कारग त्याचा बालस्वभावच होय, दुसरे काही नाही एखाद्या अनोळखी माणसाला पाहिल्याबरोबर, लहान मूल जसे प्रथम बिचकते अथवा लाजते, परंतु तोच थोडासा परिचय झाला म्हणजे त्याच्या खाद्यावर चढून त्याचे केस ओढण्यासहि कमी करीत नाही, तशाच प्रकारची अवस्था श्रीरामकृष्णाची !

एकदा पडित शशधर तर्कचूडामणी श्रीरामकृष्णाना भेटण्यास आले होते त्या दिवशीची हकीगत श्रीरामकृष्णानी स्वत च एका भक्ताला सागितली, ते म्हणाले, " तुम्हाला तर ठाऊकच आहे की, इथे लिहिण्या-वाचण्याच्या नावाने पूज्य ! म्हणून तो पडित येणार असल्याचे ऐकून फार भय वाटले इथे तर धोतराचीदेखील शुद्ध राहात नाही मग त्याच्याशी बोलायचे तर दूरच राहिले ! आईला म्हगालो, ' आई ! तुला तर ठाऊक आहे की, मला तुझ्याशिवाय दुसरे कोणी नाही, मला साभाळणारी तूंच आहेस ! ' मग, ह्याला सागितले, ' तू इथेच रहा, ' त्याला सागितले, ' तूं कुठे जाऊ नकोस, तुम्ही सारे जवळ असला म्हणजे तितकाच धीर येईल, म्हणून ! ! ' झाले ! पडितजी आले, समोर बसले, ते बोलू लागले आणि मी आपला त्याच्याकडे पाहतोच आहे ! इतक्यात असे दिसले की, त्याचें अत करणच आई मला दाखवून देत आहे आणि म्हणत आहे की, ' नुसती शास्त्र आणि पुराणें वाचून काय उपयोग ? विवेकवैराग्यावाचून काही एक फायदा नाही ! ' त्या बरोबर माझी भीति आगि कापरे कोठच्या कोठे नाहीसें झाले आणि आतून ज्ञानाच्या लहरी उसळायला लागून तोडाने गोष्टीचा जसा फवारा सुरू झाला ! असे वाटले की, आतली जागा जसजशी रिकामी होत आहे, तसतशी आत कोणी तरी भर घालीत आहे ! तिकडे आमच्या गावाच्या बाजूला धान्य मोजताना, एकजण, ' लाभरे, दोनरे, तीनरे, चाररे, ' करीत मापे मोजत असतो आणि

रास कमी होऊं लागली की, एकजण तीत भर घालीत असतो, तसे झालें ! पण मी काय बोलत होतो, याची मला बिलकुल शुद्ध नव्हती ! जरा देहभानावर आल्यावर पाहतों तों, पंडिताच्या डोळ्यातून एकसारख्या अश्रुधारा वाहात आहेत ! ! मधून मधून अशी अवस्था होते मागं एकदा असेच झाले, केशवने निरोप पाठविला की, ' येथे कुक् म्हणून एक साहेब आले आहेत, त्याना घेऊन मी येत आहे, आपण आमच्या बरोबर नौकेतून फिरायला यावे ' हा निरोप ऐकताच इतके भय वाटलें की, मी लगेच हातात ताब्याच घेतला ! पण मडळी आल्यावर, मी जेव्हा नौकेंत गेलो, तेव्हा कालच्याच सारखें झाले आणि मग किती तरी वेळ बोलत होतों मागून ही सारी मडळी म्हणाली की, आपण आज किती सुंदर उपदेश केला ! मला स्वत ला म्हणशील तर त्यातले काहीच आठ-वत नाही ! " असो.

एकदा झाउतलाकडे शौचास जात असता वाटेंत पडून त्याच्या डाव्या हाताला बरीच दुखापत झाली व हात बरा होण्यास बरेच दिवस लागले हाताच्या दुखण्याने ते आजारी असता, एक दिवस एक गृहस्थ कलकत्त्याहून त्याच्या दर्शनास आले श्रीरामकृष्णानी, " तुम्ही कोण, कोठून आला, " वगैरे त्याची चौकशी केली ते कलकत्त्याहून आले असे समजताच श्रीरामकृष्ण म्हणाले, " हीं देवळें वगैरे पहायला आलात वाटते ? " ते म्हणाले-" नाही महाराज, आपल्यालाच पहायला आलो " हें ऐकतांच एखाद्या लहान मुला-सारखें रडत ते म्हणूं लागले, " आता मला काय बघतोस, बाबा ! माझा हात मोडला आहे ! अग आई गऽऽऽ ! हाताला ठणका लागला आहे ! " हा प्रकार पाहून आता त्याच्याशी काय बोलावें, हेंच त्या गृहस्थाला समजेना ! कांही वेळाने त्याचे सात्वन करण्यासाठी ते म्हणाले, " महाराज ! असें करू नये, हात लवकरच बरा होईल ! " हें ऐकताच एखाद्या मुलासारखें ते उत्कं-ठेने म्हणूं लागले, " अं ? खरंच माझा हात लौकर बरा होईल ? " व जवळ असलेल्या एका मनुष्याला मोठ्या उत्सुकतेने ते म्हणूं लागले, " अरे ऐकलेंस

का ? हे बाबू कलकत्त्याहून आले आहेत, ते म्हणतात माझा हात लवकरच बरा होईल ! ”

एक दिवस रामचंद्र दत्त व मनमोहन मित्र श्रीरामकृष्णाच्या दर्शनास गेले श्रीरामकृष्णाना फुलगोबीची भाजी फार आवडे, म्हणून या मंडळींनी, जाताना बरोबर फुलकोबी नेली होती त्यावेळी पोटशूळाने त्यांचें पोट फार दुखत असे आणि पोटदुखीला ती चांगली नाही म्हणून हृदय त्याना फुलकोबीची भाजी खाऊं देत नसे ती फुलकोबी पाहताच, हृदयला न दिसेल अशा ठिकाणी ती ठेवण्यास श्रीरामकृष्ण त्या मंडळींना सांगत होते, इतक्यात हृदय तेथ आला त्याला पाहताच एखाद्या अपराधी मुलासारखे भयभीत होऊन श्रीरामकृष्ण म्हणतात, “ नाही रे हृदू ! मी नव्हती त्याना आणायला सांगितली, त्यांनी आपण होऊन आणली ! खरंच त्यांनी आपण होऊन आणली ! विचार त्याना पाहिजे तर ! ”

त्यांच्याकडे मोठे मोठे पंडित, विद्वान वगैरे मंडळी येत त्याना पाहून एकदा त्याना वाटलें, “ आपणहि त्यांच्यासारखेच विद्वान् आणि पंडित असतों तर काय मजा झाली असती ! ” त्या दिवशी भावावस्थेत ते आईला म्हणूं लागले, “ आई, तू मला असा निरक्षर,मूर्ख का केलास बरे ? मूर्ख असणे ही मोठी लाजिरवाणी गोष्ट आहे ! ” श्रीरामकृष्ण सांगत असत, “ इतक्यात मला एक डोंगराएवढा केरकचऱ्याचा ढीग दिसला त्याच्याकडे बोट दाखवून आई म्हणाली, ‘ हं, ही इथे विद्या आहे, पाहिजे तुला ? ’ त्याबरोबर मी म्हणालों, ‘ आई, नको मला ही तुझी विद्या ! मला तुझ्या पादपद्मीं शुद्धा भक्ति दे, म्हणजे झाले ! ”

**पावित्र्य.** सदैव ईश्वरचिंतनात तन्मय झाल्यामुळे श्रीरामकृष्णाचें मन अत्यंत पवित्र झाले असून, त्यात अपवित्र विचार येणेंच अशक्य होऊन गेलें होतें, यात आश्चर्य नाही, परंतु या मानसिक पावित्र्याचा त्यांच्या शरीरावरहि केवढा परिणाम झाला होता, हे पाहिलें म्हणजे, मन चकित होऊन जातें ! वाटेल तसल्या मनुष्याच्या हातचें पाणी

सुद्धा त्याना पिववत नसे ! मनुष्य कसा आहे, हे त्याला पाहाताच ते तात्काळ ओळखीत आणि तो काही घेऊन आला असल्यास त्याला वाईट वाटूं नये म्हणून, त्या पदार्थाला नुसता स्पर्श करून तो बाजूला ठेवीत; स्वत कधीहि खात नसत ! कित्येकदा असे होई की, भक्तमडळीशी त्याच्या गोष्टी चालल्या असाव्या आणि मधेच तहान लागल्यास त्यानी पाणी मागावे, ते कोणी आणलें इकडे त्याचे लक्षहि नसावे, परंतु ते पिऊ जाता, त्याचा हातच आखडावा आणि त्याना ते पाणी पिताच येऊ नये ! ! जणु काय त्याच्या शरीरानेच ते अपवित्र पाणी पिण्याचे नाकारावे ! मग त्यानी पुन्हा पाणी मागावे व दुसऱ्या कोणी ते आणून दिल्यावर प्यावे ! स्वामी विवेकानद याच्या समोर अशी गोष्ट एक दिवस घडली व त्यानी आपल्या नेहमीच्या चिकित्सक स्वभावाला अनुसरून, ते पाणी घेऊन आलेल्या मनुष्याच्या वर्तनाची बारकाईने चौकशी केली व तीत त्याना असे आढळून आले की, खरोखरच तो मनुष्य वाईट वर्तनाचा आहे ! !

त्याना अर्पण करण्यासाठी आणलेल्या पदार्थाचा अग्रभाग जर अगोदर दुसऱ्याला दिला असेल, तर तो पदार्थ त्याच्याने ग्रहण करवत नसे !

वर्तमानपत्रास ते कधीहि स्पर्श करीत नसत, कारण, त्यात साऱ्या भाडण-तंट्याच्या आणि प्रपंचाच्या गोष्टी ! एकदा ते एका भक्ताच्या घरी निमंत्रणावरून भोजनास गेले होते, त्याना बसण्यासाठी तयार केलेल्या आसनाजवळ एक वर्तमानपत्र पडले होते ते पाहताच, त्यानी ते तेथून उचलण्यास सागितलें !

तसेच दुसऱ्याच्या घरी गेल्यावर, आसन ग्रहण करण्यापूर्वी ॐ काराचा उच्चार करून ते त्या आसनाला स्पर्श करीत व मग त्यावर बसत !

सदासर्वकाळ परमेश्वरचिंतनात तन्मय होऊन गेल्यामुळे त्याचे मनच शुद्ध व पवित्र होऊन गेले होते, एवढेच नव्हे, तर त्यांचे शरीरहि अत्यंत पवित्र होऊन गेले होते ( मागें पान १३१ पहा )

त्याच्या दर्शनास नेहमी अनेक प्रकारचे लोक येत व सर्वजण त्याची पदधूलि मोठया भक्तिभावाने ग्रहण करीत पण येणाऱ्या मडळीत सर्वजण कोठून पवित्र असणार ? अशुद्ध आचरणाचे आणि अपवित्र विचाराचेहि कित्येक-जण असत, अशा मडळीच्या स्पर्शाने श्रीरामकृष्णाचे शुद्ध व पवित्र देवशरीर विटाळले जाई !! श्यामपुकुरात गळयाच्या रोगाने ते आजारी असता एक दिवस त्याना एक अद्‌भुत दर्शन झाले त्याना दिसले की, आपले सूक्ष्म शरीर आपल्या स्थूल शरीरातून बाहेर येऊन आपल्या समोर हिडत आहे ! श्रीरामकृष्ण सागत असत,-" असे दिसले की, त्याच्या अगावर फोड झाले आहेत ! ! हे पाहून मी आपल्या मनाशीं विचार करू लागलो की, असे का बरे व्हावे ?- इतक्यात आईनेच समजावून दिले की,-' हे इतके लोक वाटेल तसली कामे करून तुझ्याकडे येतात आणि त्याची दुर्दशा पाहून तुला त्याची दया येत, तू त्याना शिवू देतोस, यामुळे त्याच्या कर्माची फले तुला भोगावी लाग-तात,—म्हणून हे असे झाल आहे ! " ( स्वतच्या गळयाकडे बोट करून ) म्हणून तर इथे रोग झाला आहे, नाहीतर या देहाकडून कधी कुणाला त्रास झाला नाही, की कधी कुणाचे वाईट झाले नाही, मग याच्या मागे हे रोग-बीग का लागावे ? "

वरील अद्‌भुत गोष्टीवरून श्रीरामकृष्णाच्या अलौकिक पावित्र्याची वाच-काना कल्पना येईल, असो

**वैराग्य.**

श्रीरामकृष्णाच्या कित्येक असाधारण गुणापैकी तीव्र वैराग्य हा एक प्रमुख गुण होता त्याच्या ठिकाणी त्यागाची पराकाष्ठा दिसून आली ' ज्याचे ग्रहण करावयाचे, त्याचे कायावाचामने ग्रहण करावे व ज्याचा त्याग करावयाचा तोहि तसाच कायावाचामने त्याग करावा, ' हे तत्व त्याच्या ठिकाणी ततोतत बिबल्याचें दिसून येते मानसिक त्यागाबरोबर, कायिक त्यागहि इतक्या विलक्षण रीतीने अंगी बाणू शकतो, हे श्रीरामकृष्णाच्या खेरीज इतरत्र दिसून येणे अशक्य आहे.

साधना-काली श्रीजगदंबेच्या पादपद्मी पुष्पांजलि वाहातांना त्यानी व्याकुळतेने प्रार्थना करावी-" आई, हे घे तुझें पापपुण्य, मला शुद्धा भक्ति दे, हे घे तुझा धर्माधर्म, मला शुद्धा भक्ति दे, ही घे तुझी कीर्ति-अपकीर्ति, मला शुद्धा भक्ति दे, ही घे तुझी शुचिता-अशुचिता, मला शुद्धा भक्ति दे,-' आणि अशा रीतीने या सर्व जोड्याचा श्रीजगदंबेच्या पादपद्मी त्याग करावा याप्रमाणे सर्व भोगवासनाचा ( इहामुत्रफलभोगविराग ) त्यानी सर्वस्वी त्याग केला होता.

श्रीरामकृष्णाच्या अद्भुत चारित्र्याचा 'त्याग' हा मूलमंत्र होता, असे म्हटले तरी चालेल त्याची बुद्धिमत्ता असाधारण असल्यामुळे कोणत्याहि कामात प्राविण्य मिळवून, नाम, यश व संपत्ति सहज मिळवता येण्यासारखी असताहि, त्यानी ईश्वराच्या लाभासाठी तिकडे पूर्ण दुर्लक्ष केले मथुरबाबू-सारख्याच्या आश्रयास राहून हवी तेवढी संपत्ति मिळत असता, ईश्वरलाभाच्या मार्गातील तो एक अडथळा आहे, असे पाहून त्यानी तिला लाथाडून दिले ! पुढेहि लोभाला बळी पडण्यासारखे अनेक प्रसंग आले असता, त्यानी आपले मन आपल्या ध्येयापासून बिलकुल ढळूं दिले नाही, एवढेच काय, पण मानसिक त्यागानेच संतुष्ट होऊन त्याग हा मानसिक तसाच कायिक असणेहि शक्य आहे,हे जगु काय जगाला दाखविण्यासाठी म्हणून त्यानी तोहि आचरून दाखविला ! ! या त्याच्या अद्भुत त्यागाची थोडीं फार उदाहरणे मागे (भाग १ला, पृ १९०-१९२) आलींच आहेत, येथे आणखी थोडीशी देऊ

श्रीरामकृष्णानी पूजक-पदाचा स्वीकार केल्यावर लवकरच त्याच्या अंगी दिव्योन्माद अवस्था बाणून, देवीची पूजाअर्चा, यथासांग रीतीने पार पाडणे त्याना अशक्य होऊन गेलें त्या सुमारास एका महि-न्याच्या पगारासाठी त्याना इतर नोकराबरोबरच बोलावणें आले असता, त्यानी, ' पैसा ईश्वरदर्शनाच्या मार्गातील अडथळा आहे, ' असे म्हणून पगारच घेण्याचे नाकारले ! आणि तेव्हापासून त्यानी पगारपटावर कधीहि सही केली नाही !

श्रीरामकृष्णाच्या वडिलाना सुखलाल गोस्वामी यानी दिलेल्या दीड बिघा जमीनीचे रजिस्टरपत्र करण्याचे काही कारण पडलें, म्हणून १८७८ सालीं त्याना त्याच्या नातेवाइकानी कामारपुकुरास बोलाविले श्रीरामकृष्ण सागत असत– " रघुवीराच्या नावाची जमीन रजिस्टर करायला आपल्या गावी गेलों तिथे कोर्टात रजिस्टर पत्रावर मला सही करायला सागितले पण माझ्या हातून ते झाले नाही ' माझी जमीन ' असे म्हणायची सोयच नाही ! केशव सेनचे गुरु म्हणून मंडळीनी कोर्टात माझा खूप सन्मान केला आणि घरी परत येताना बरोबर काही आबे दिले, पण ते बरोबर घेण्याची सोय नाही ! संन्याशाने सचय करायचा नाही ! ! "

' संन्याशाने द्रव्य ग्रहण करू नये, ' असे आपल्या भक्तमंडळीना सागत असता, एक दिवस श्रीरामकृष्ण म्हणाले,—" काही दिवसापूर्वी महेद्र इथे आला होता परत जाताना त्याने रामलालजवळ ( श्रीरामकृष्णाचा पुतण्या ) पाच रुपये दिले मला काहीच माहीत नाही तो गेल्यावर रामलालने मला सागितले, मी म्हणालो, ' हे पैसे तो कोणासाठी देऊन गेला ? ' रामलाल म्हणाला, ' आपल्याचसाठी ' प्रथम मला वाटले, ' बरे, झालें दुधाचे पैसे द्यायचे आहेत, तेवढे तरी देऊन टाकूं ! ' पण काय ? रात्री जरा कुठे डोळा लागतो न लागतो तोंच झोपेतून धडपडतच उठलो ! छातीवर जणु काय एखादे माजर ओरबडत आहे !! तसाच रामलालकडे गेलो आणि त्याला विचारले,—" अरे ते पैसे तुझ्या चुलतीसाठी ( श्रीरामकृष्णाची पत्नी ) तर नाही दिले ? " तो म्हणाला, ' नाही ' तेव्हा त्याला म्हणालो,—' तूं आताच्या आता ते पैसे त्याला परत नेऊन दे बघूं ? ' ते पैसे त्याने परत दिले तेव्हा वाचलो ! ! "

हा काचनत्याग श्रीरामकृष्णाच्या हाडीमासी इतका खिळला होता की त्याना पैशाला स्पर्शहि करण्याची सोय नसे ! स्पर्श केल्यास श्वास गुदमरल्या-

सारखा होऊन त्यांच्या अंगाला विंचवाने नागी मारल्यासारख्या वेदना होत व हात पाय वाकडेतिकडे होऊन जात ! पैशाचेंच काय, पण अखेरच्या दिवसात कसलेंहि भाडेसुद्धा त्याना हातात घेववत नसे ! ! एक दिवस भक्तमडळीशी बोलत असता ते म्हणाले,–" अलीकडे मला हे असे का झाले आहे बरे ? धातूच्या भाड्याला हात लावायची सोय नाही ! एकदा एका वाटीला हात लागला तर विचवाने नागी मारल्याप्रमाणे वेदना झाल्या ! बरे गडव्या-वाचून कसे चालायचे ? म्हणून विचार केला की, हातरुमालाने तो झाकून हातात घ्यावा तरीपण काय ? त्याला हात लावला मात्र, तोच हाताला एकदम कळा लागल्या ! शेवटी आईला म्हणालो, ' आई, एवढी वेळ क्षमा कर पुन्हा कधी असे करणार नाही ! ' तेव्हा त्या वेदना थाबल्या ! " अशी विल-क्षण अवस्था होऊन गेल्यामुळे, ते केळीच्या पानावर जेवीत व मातीच्या भाड्याने पाणी पीत !!

जी गोष्ट काचनत्यागाची तीच गोष्ट सचयाची " सन्याशाने सचय करा-वयाचा नाही, " ही गोष्ट त्याच्या रोमारोमात भिनली होती कलकत्त्यास भक्त मडळीकडे गेल्यावर, कोणी काही जिन्नस त्याच्याबरोबर देण्याचे मनात आणले, तर व्यर्थ जाई कारण एखादा जिन्नस बरोबर घ्यावयाचा म्हणजे सचायाची कल्पना आली ! ! भक्तमंडळीनी प्रेमाने त्याना फार आग्रह करावा, पण त्याचा काही उपयोग होत नसे यामुळे कोणा कोणाला फार वाईट वाटे एक दिवस एका भक्ताच्या घरीं ते गेले असता, भजन वगैरे झाल्यावर, परत फिरताना त्याने त्याच्याबरोबर थोडीशी मिठाई देण्याचा विचार केला श्रीरामकृष्ण काही केल्या ती घेईनात व तो तर फार आग्रह करू लागला तेव्हा श्रीरामकृष्ण अत्यत केविलवाण्या स्वराने म्हणाले, " बाबू, माझ्यावर दया करा तुम्ही ते काहीहि माझ्याबरोबर देऊ नका त्यात मला दोष आहे मी आपल्याबरोबर एखादा जिन्नस सचय करून कसा नेऊ ? तुम्ही याबद्दल काही वाईट वाटून घेऊ नका ! "

एक दिवस संचयासंबंधाने गोष्टी चालल्या असता ते म्हणाले—" साधु आणि पक्षी संचय करीत नाहीत इथली ( माझी ) तर अशी स्थिति आहे की, बटव्यात घालून पाने वागवण्याची सोय नाही, की शौचाला गेल्यास, हाताला लावायला म्हणून तेथून मातीसुद्धा आणायची सोय नाही !! " आणि अत्यंत आश्चर्याची गोष्ट ही की, त्यांच्या अंगावरील वस्त्रास कुठे एखाद्या टोकालासुद्धा, एखादी लहानशी गाठ मारावयाची सोय नसे ! कारण गाठ म्हटलें की, संचयाची कल्पना आलीच !! कुठे गाठ मारल्यास त्यांचा श्वास गुदमरून जाई व हातपाय वाकडेतिकडे होऊन जात !!! काय विलक्षण त्याग हा ! त्यागाच्या या असल्या धगधगीत अग्नीजवळ येणाऱ्या मंडळींचे डोळे त्याच्या तेजाने दिपून जावे आणि त्यांच्या मनावर त्याचा परिणाम व्हावा यात मुळीच आश्चर्य नाही असो

**काम-त्याग.**

साधनाकालाच्या सुरवातीपासूनच—अथवा असेंहि म्हटले तरी चालेल की, त्यांना समजावयास लागल्यापासूनच,—त्यांच्या मनाची अगदी पक्की भावना झाली होती की, काम आणि कांचन हे ईश्वरदर्शनाच्या मार्गातील दोन अत्यंत जबरदस्त अडथळे आहेत ही गोष्ट त्यांच्या मनावर पक्की ठसताच, ते आपल्या नेहमीच्या स्वभावाप्रमाणे, हे दोन्ही अडथळे आपल्या मार्गातून दूर करण्याच्या मागे लागले कोणतीहि गोष्ट अर्धवट करणे हे त्यांच्या स्वभावाला ठाऊकच नसे. कांचनासक्तीचा त्यांनी किती पुरा नायनाट केला होता, याचे थोडेसे वर्णन आतापर्यंत झाले आता त्यांनी कामासक्ति किती पूर्णपणे नाहीशी केली होती, हे पाहू

पुरुष आणि स्त्री असा भेदभावच नष्ट झाल्यावर सहजच कामाला जिंकल्यासारखे होईल, असे जाणून, साधनाकाळी, हा भेदभावच नष्ट होण्यासाठी म्हणून, श्रीरामकृष्ण प्रत्यक्ष स्त्रीवेशातच सहा महिने राहिले, आणि त्यावेळीं त्यांच्या ठिकाणी स्त्रीभावच किती अद्भुत रीतीने भिनला होता

याचे मधुरभावसाधन–प्रकरणात वर्णन आलेच आहे (भाग१ला,पान ३२०-२३) पुरुष आणि स्त्री असा भेदभाव, त्यानी विचाराने नष्ट करून टाकला होता आणि स्वत च्या ठिकाणचा ' मी पुरुष, ' असा भावहि पूर्णपणे नाहीसा केलेला होता, तरी ते आजन्म स्त्रियापासून दूरच राहत ते म्हणत, " सन्यासी जितेद्रिय असला तरी त्याने लोकशिक्षणासाठी स्त्रियापासून नेहमी दूर असावे "

एक दिवस मंडळी बसली असता, " कामिनीकाचनत्याग केल्याशिवाय ईश्वराची प्राप्ति व्हावयाची नाही, " असे श्रीरामकृष्णाचे उदगार ऐकून एकजण म्हणाला —" पग महाराज, कामिनीकाचनावाचून चालायचे कसे ? " यावर श्रीरामकृष्ग आपल्या अंतरग भक्ताकडे वळून म्हणाले—" ही मंडळी म्हणतात की, कामिनीकाचनावाचून चालायचे कसे ? पग इथली ( माझी ) अवस्था त्याना काय ठाऊक आहे ? एखाद्या स्त्रीचा नुसता स्पर्श झाला नर हात वाकडातिकडा होऊन, विचवाने नागी मारावी तशा वेदना होतात ! ।"

" एखादी स्त्री विशेष भक्तिमती आहे असे पाहून, आपलेपणाने तिच्याशी ईश्वरीय गोष्टी बोलायला जावें, तर, मवे जणु काय एखादा आड-पडदा पडावा तसे होते ! ! त्या पडद्यापलीकडे जायची सोय नाही ! !"

" एखादे वेळी खोलीत एकटेच असावे इतक्यात एखादी स्त्री आली, तर एकदम माझी अवस्था एखाद्या बालकाप्रमाणे होऊन जाते आणि ती स्त्री आपली आई आहे अशी एकदम धारणा होऊन जाते ! !"

आगखी एक दिवस कामिनीत्यागासबवी गोष्टी चालल्या असता आपल्या साधनाकालाची आठवण होऊन ते म्हणाले,—" तेव्हा तेव्हा, मला बायकाचे अत्यत भय वाटे असें वाटे की, जणु काय एखादी वाघीणच खायला येत आहे ! ! आणि तिचे अंग-प्रत्यग खूप मोठमोठे दिसे जणु काय एखादी राक्षसीणच ! ! "

“ मागे मागे फार भय वाटे—कोणाहि स्त्रीला जवळ येऊंच देत नसे आता ती अवस्था राहिली नाही आता मनाला पुष्कळ शिकवून समजावून इतके झालें आहे, की आता स्त्रियाकडे—‘ आई आनदमयीची निरनिराळी रूपे, ’ या दृष्टीने पाहातो तरीपण, जरी स्त्रिया जगदबेचा अश आहेत, तरी, साधकाला--साधूला—त्या त्याज्यच !

“ म्हणून एखादी स्त्री जरी फार भक्तिमती असली, तरी तिला मी फार वेळ जवळ बसूच देत नाही, थोडक्याच वेळात तिला म्हणतो,—‘जा, तिकडे देवाचे दर्शन घे जा ’ इतकेहि सागून ती नच उठेल, तर काही तरी निमित्त काढून मीच खोलीतून बाहेर जातो !

“ बायकाचा सहवास फार वाईट बायकोच्या सहवासात मनुष्य राहिला की, तो तिला वश झालाच, ससारी माणसे बायकोने ‘ ऊठ ’ म्हटले की उठतात, ‘ बस ’ म्हटले की बसतात आणि कोणालाहि विचारा,–‘ का रे तुझी बायको कशी आहे ? ’ की तो म्हणालाच, —‘ माझी बायको चागली आहे ! ’ कोणा एकाची सुद्धा बायको वाईट नाही ! !

“ पण ससारी माणसाचेच कशाला ? एक दिवस मला स्वत ला एके ठिकाणीं जायचे होते रामलालच्या चुलतीला ( स्वतःच्या पत्नीला ) विचारता ती ‘ नको ’ म्हणाली मग मीहि गेलों नाही ! थोड्या वेळाने मनात विचार आला–‘ काय चमत्कार आहे ! मी कधी ससार केला नाही, कामकाचनाचा त्याग केलेला, तरी माझी ही अवस्था ! मग ससारी माणूस बिचारा आपल्या बायकोला किती वश होत असेल, ते देवाला ठाऊक !’ ”

एक दिवस नारायणला ( एक शिष्य ) श्रीरामकृष्ण म्हणाले, “ बायका-माणसाच्या अंगाची हवा सुद्धा स्वत ला लागूं देऊ नको नेहमी काही तरी जाड वस्त्र पाघरून घेत जा आणि आपल्या आईशिवाय इतर सर्व बायकापासून आठ हात, नाही तर दोन हात, निदान एक हात तरी दूर राहात जा ! ”

श्रीरामकृष्णाच्या साधनाकाली मथुरानाथ वगैरेना त्याचा उन्माद हा अखड ब्रह्मचर्याचा परिणाम असावा असे वाटून त्यानी त्याना एकदा वेश्याच्या घोळक्यात नेऊन सोडले होते, वगैरे हकीगत मागे ( भाग १ ला, पृ १९६–९७ ) आलीच आहे

एकदा एक अत्यत सुस्वरूप वेश्या कलकत्त्यास आली असता तिने ऐकले की, दक्षिणेश्वरी एक कामकाचनत्यागी परमहस राहातात ती अनेक मठ आणि तीर्थे हिंडली होती, परंतु खरा कामकाचनत्यागी, असा एकहि साधु तिला आढळला नव्हता, म्हणून हे साधुबोवा कसे काय आहेत, हे पाहण्यास म्हणून ती एक दिवस दक्षिणेश्वरी गेली श्रीरामकृष्ण त्यावेळी आपल्या भक्तमडळी-बरोबर बोलत बसले होते तेथे गेल्यावर, श्रीरामकृष्णाना नमस्कार करून ती वेश्या मोठया अदबीने तेथेच एका बाजूस उभी राहिली इतक्यात श्रीरामकृष्णाना शौचास लागली म्हणून ते झाउतलाकडे निघाले ती चतुर स्त्रीहि लगेच, त्याचा गडवा घेऊन, त्याच्या मागोमाग निघाली झाऊतलापर्यत गेल्यावर श्रीरामकृष्ण एका ठिकाणी शौचास बसले व ती स्त्री तो गडवा घेऊन तेथेच एका बाजूला उभी राहिली काही वेळाने ती स्त्री पाहते तो श्रीरामकृष्ण दोन्ही हातात दोन काटक्या घेऊन एखाद्या लहान मुलाप्रमाणे, जमीनीवर रेघोटया ओढीत, तोडाने काही गुणगुणत, आपल्याच नादात आहेत ! थोडया वेळाने श्रीरामकृष्णानी तिच्या-पासून पाणी मागून घेतले व विधि आटोपल्यावर, ते तिच्याशी गप्पा गोष्टी करीत परत आपल्या खोलीत आले ! ! या सर्व प्रकाराने ती स्त्री चकित झाली व श्रीरामकृष्णाची क्षमा मागून तेथून निघून गेली

तसेच आणखी एकदा, त्याची परीक्षा पाहाण्यासाठी काही कुटाळ मडळीनी हृदयला वश करून घेऊन, एके रात्री एका वेश्येला त्याच्या खोलीत नेऊन बसविले ! श्रीरामकृष्णाची तिच्याकडे नजर जाताच ते “ आई ! आई ! ” करीत एकदम खोलीतून बाहेर पडले आणि हलधारीला हाका मारून म्हणाले, “दादा दादा, इकडे जरा येऊन पाहा रे, माझ्या खोलीत एक कोण माणूस येऊन बसले आहे

ते ! ” हलधारीबरोबर इतर मंडळीनाहि त्यानी हाका मारल्या त्याबरोबर पुष्कळ मंडळी तेथे जमली व त्यानी त्या वेश्येला तेथून हाकून दिले हृदयहि या कटात सामील होता, असे कळल्यावर श्रीरामकृष्णानी त्याची खूप निर्भर्त्सना केली व काही दिवसपर्यंत त्याला आपली सेवा करू दिली नाही

**वासनात्याग.**

कामकांचनासक्तीबरोबर इतरहि लहानसान भोगवासनाचा त्यानी त्याग केला होता ते म्हणत, “ लहानसान वासनाचा उपभोग घेऊन त्याग केला तरी चालते पण मोठमोठ्या वासनाचे तसे करू गेल्यास, पतन होण्याचा फार संभव असतो म्हणून त्याचा त्याग विचारानेच—त्यातील दोषाकडे नजर देऊन—करावा ” त्यानी आपल्या स्वत च्या लहानसान वासनाचा त्याग असाच उपभोग घेऊन केला, एखादा विशेष जिन्नस घेण्याची अथवा काही विशेष पदार्थ खाण्याची अथवा काही पाहाण्याची इच्छा झाल्यास ते ताबडतोब मथुरबाबूंना सांगून ती पुरी करून घेत ! अशा प्रकारच्या अनेक मौजेच्या गोष्टी ते सांगत

एकदा त्याना भरजरी पोषाख घालून रुप्याच्या गुडगुडीतून तमाखू ओढण्याची इच्छा झाली ! ते सांगत असत-“ मथुरला सांगितले, त्याने पोषाख तयार करविला आणि एक रुप्याची सुंदर गुडगुडी आणून दिली मग मी तो भरजरी पोषाख घालून, हातात ती रुप्याची गुडगुडी घेऊन, मोठ्या ऐटीने ओढण्यास बसलो आणि एकदा इकडून, एकदा तिकडून, एकदा वरून, एकदा खालून, सर्व बाजूनी थोडे थोडे झुरके मारले आणि मनाला म्हणालो, ‘ मना, याला म्हणतात भरजरी पोषाख करून रुप्याच्या गुडगुडीतून तमाखू ओढणे ! बस ! झाली ना तुझी इच्छा पुरी ? ’ असे म्हणून ती गुडगुडी तशीच टाकून दिली, अंगातले कपडे काढून खाली टाकले—पायाखाली तुडवले, त्याच्यावर थुकलो आणि म्हणालो-‘ मना, हे जरीचे कपडे बरे ! यानी रजोगुण वाढतो, हे नकोत आपल्याला ! थू थू ! ’ ”

श्रीरामकृष्ण सागत असत, "लहानपणी गंगेवर स्नान करीत असता, एक दिवस, एका मुलाच्या कमरेला सोन्याचा करगोटा पाहिला पुढे अशी स्थिति झाल्यावर ( उन्मादावस्था प्राप्त झाल्यावर ) एक दिवस तसला करगोटा घालायची इच्छा झाली मथुरला सागितले, त्याने एक सोन्याचा सुदर करगोटा आणून दिला तो घातला, पण तत्क्षणीच अगातला वायु भराभर वर जाऊं लागला आणि अंगाला वेदना होऊ लागल्या ! ! सोनें अगाला लागले की नाही ? झाले; लगेच तो काढून फेकून द्यावा लागला ! "

**सत्यनिष्ठा.**

सरल स्वभाव, पावित्र्य, कामकाचनत्याग वगैरेप्रमाणेच श्रीरामकृष्णाच्या ठिकाणीं सत्यनिष्ठेची पराकाष्ठा होऊन गेली होती त्याच्या तोडून असत्य भाषण कधीहि बाहेर पडले नाही 'आज अमुक ठिकाणीं जाईन,' असें म्हटले की ते तेथे जावयाचेच 'अमुक काम करीन' असें म्हटलें की, ते तें काम करावयाचेच. थट्टेत सुद्धा कोणी खोटें बोललेलें त्याना खपत नसे अमुक गोष्ट करीन असे म्हणून जर कोणी ती केली नाही, तर ते तत्काळ त्याची कानउघाडणी करीत एक दिवस ते ब्राह्मसमाजात गेले असता शिवनाथबाबूंना काही काम असल्यामुळे ते तेथे हजर राहू शकले नाहीत, त्याच्या संबधाने बोलताना श्रीरामकृष्ण म्हणाले, "शिवनाथला पाहिलें म्हणजे मला फार आनंद होतो त्याची ईश्वराचे ठिकाणीं फार भक्ति आहे इतके लोक त्याला मान देतात, तेव्हा त्याच्यामध्ये थोडी फार ईश्वरीय शक्ति खास असली पाहिजे. पण शिवनाथाच्या अंगी एक फार मोठा दोष आहे—त्याचें बोलणे ठीक नाही त्या दिवशीं मला म्हणाला की, मी दक्षिणेश्वरी येईन, पण आला नाही व काही निरोपहि पाठविला नाहीं—हें चागलें नाही" असे म्हणून ते म्हणाले, "सत्य वचन हीच कलियुगातील तपस्या सत्यनिष्ठेच्या जोरावर भगवानाचा लाभ करून घेता येतो सत्यनिष्ठा नसेल तर मनुष्याचा हळूहळू सर्वनाश होतो "

ते नेहमी म्हणत असत की—"बारा वर्षेपर्यंत जर कायावाचामनें सत्याचें पालन केलें. तर मनुष्य सत्यसकल्प होतो त्याचा शब्द आई कधीहि मिथ्या

होऊ देत नाही" अगदी लहानपणापासून श्रीरामकृष्ण स्वत अत्यंत सत्यनिष्ठ होते ही त्याची सत्यनिष्ठा उत्तरोत्तर वाढत जाऊन खरोखरच शब्दश त्याच्या हाडीमासी कशी खिळली होती, हे पाहिलें म्हणजे आश्चर्याला सीमा उरत नाही

एक दिवस आपल्या भक्तमडळीबरोबर बोलत असता ते म्हणाले, "सत्य सत्य करायला लागून माझी ही काय अवस्था होऊन गेली आहे पहा बरे ? एखादे वेळीं जर सहज बोलून गेलो की आज जेवणार नाही, तर, भूक लागली तरी काही खायची सोय नाही ! एखाद्याला काही काम सागितले, तर तें त्यानेच केलें पाहिजे, दुसरा करीन म्हणेल तर सोय नाही,—ही कशी अवस्था आहे पहा बरे ? याला काही उपाय नाही का ?

"एक दिवस झाउतलाकडे ताब्या घेऊन यायला मी एकजणाला सागितलें तो 'बरे' म्हणाला, पण काही काम होते म्हणून निघून गेला त्याच्या ऐवजी दुसरा एकजण ताब्या घेऊन तिकडे आला शौचाहून परत येऊन पाहातो तो ताब्या घेऊन दुसराच एकजण उभा ! त्याच्या हातून काही पाणी घेववलें नाही ! नुसता हाताला माती लावून, तो येईपर्यंत तसाच उभा राहिलो झाले ! ! काय करायचे ? 'आईच्या पादपद्मी फुले वाहात जेव्हा सर्व गोष्टीचा त्याग करू लागलो, तेव्हा म्हणूं लागलो-' आई ! ही घे तुझी शुचिता आणि अशुचिता, हा घे तुझा धर्म आणि अधर्म, हे घे तुझें पाप आणि पुण्य, हे घे तुझे चागले आणि वाईट—मला फक्त तुझी शुद्धा भक्ति दे ' परंतु त्यावेळी 'हें घे तुझे सत्य आणि असत्य, ' असे म्हणूं शकलो नाही सत्याचा त्याग कसा करूं ?"

त्याच्या तोडून बाहेर पडणाऱ्या गोष्टी कोणत्याना कोणत्या तरी रीतीने खरोखरच प्रत्यक्ष घडून येत दिसावयास अशक्य अशा गोष्टी सुद्धा काही अतर्कित रूपाने खऱ्या होत तोडातून बाहेर येणाऱ्या गोष्टींचें राहो, पण त्याच्या

मनात सुद्धा असत्य संकल्पाचा कधीहि उदय होत नसे त्याना एखादी इच्छा झाली, तर ती कशी ना कशी तरी पूर्ग होईच

काशीपूर येथील बगीच्यात गळयाच्या रोगाने आजारी असता एक दिवस, ते जवळच्या मंडळीकडे पाहून म्हणाले, " यावेळी कुठे एखादा आवळा मिळेल का ? तोडाला चव म्हणून कशी ती नाही जर एखादा आवळा चघळायला मिळेल तर किती छान होईल ? " त दिवस आवळ्याचे नव्हते, म्हणून यावेळी आवळा कसचा मिळतो, असे वाटून सर्वजग निराशेने स्वस्थ वसले त्याच्यापैकी दुर्गाचरग नाग ( श्रीनागमहाशय ) याना मात्र स्वस्थ बसवेना आवळे मिळवित्यावाचून स्वस्थ बसावयाचे नाही, असा विचार करून तेथून त्यानी लगेच जवळपासचे बगीचे धुडावयास सुरुवात केली लागोपाठ दोन दिवस हिडल्यावर तिसऱ्या दिवशी त्याना एका बगीच्यात एका झाडाला दोन-तीन आवळे सापडले, ते तोडून घेऊन त्यानी त्याच पावली काशीपुरास जाऊन ते श्रीरामकृष्णाना दिले ! त्याची खात्री होती की, ज्या अर्थी श्रीरामकृष्गाना आवळे खावयाची इच्छा झाली आहे, त्या अर्थी कोठेना कोठे तरी आवळे सापडलेच पाहिजेत ! एक दिवस भक्तमडळीशी बोलत असता श्रीरामकृष्ग मधेच म्हणाले, " मला आता चागला हिगबिग घातलेली गरम गरम खुसखुशीत कचोरी ( एक प्रकारचा कडबू ) खायची इच्छा झाली आहे " हे ऐकून एकजण म्हणाला, " तर मग मी आत्ताच कलकत्त्याला जाऊन कचोरी करून घेऊन येतो " श्रीरामकृष्ग म्हणाले, " नको, कचोरीसाठी मुद्दाम इतक्या लाब जायची गरज नाही आणि शिवाय इतक्या लाब येईपर्यंत ती गरम कशी राहील ? " असे त्याचें बोलगे चाललें आहे इतक्यात कलकत्त्याहून एकजग अगदी तसलीच गरमागरम कचोरी त्यानाच देण्यासाठी म्हणून घेऊन आला ! !

एक दिवस राखाल दक्षिणेश्वरी आला होता श्रीरामकृष्ग त्याचंबरोबर बराच वेळ बोलत बसले राखालने काही खाल्ले नसल्यामुळे तो भुकेने व्याकुळ

होऊन रडूं लागला खाण्याला देण्यासारखा पदार्थहि काही जवळ नाही, असे पाहून श्रीरामकृष्ण लगबगीने उठले व घाटावर जाऊन मोठमोठ्याने, " ए गौरदासी, ( एक स्त्रीभक्त ) माझ्या राखालला भूक लागली आहे, काही तरी खायला घेऊन ये ग ये. " असे म्हणत ओरडूं लागले ! ! थोड्याच वेळाने कलकत्त्याच्या बाजूने एक नौका येऊन घाटाला लागली व तीतून बलराम बसू व गौरदासी ही दोघेजण खाली उतरली गौरदासीने श्रीरामकृष्णाना देण्यासाठी एक डबा भरून रसगुल्ले ( एक प्रकारची मिठाई ) आणले होते ! ! ते पाहताच मोठ्या आनदाने तेथूनच राखालला हाका मारीत ते म्हणू लागले,— " ए राखाल, अरे हे बघ रसगुल्ले,—गौरदासी घेऊन आली आहे भूक लागली म्हणालास ना ? " राखाल तेथे येऊन किंचित् रागावून म्हणाला, " महाराज, मला भूक लागली म्हणून ज्याच्या त्याच्या जवळ कशाला सागत सुटलात ? " श्रीरामकृष्ण म्हणाले, " अरे भूक लागली म्हणून सागायला काय हरकत आहे ? ये, हे खा रसगुल्ले ! ! "

अशी पुष्कळ उदाहरणे सागता येतील तोडाने असत्य भाषण बाहेर न येणें, मनातहि असत्य सकल्पाचा उदय न होणे, वाचिक आणि मानसिक सत्यपालनाची गोष्ट राहो, पण श्रीरामकृष्णाचा देह सुद्धा नेहमी सत्याचेच पालन करी ! सत्य हे कायावाचामने करून पाळावे असे शास्त्रे सागतात परंतु कायेकडूनहि सत्य पाळले जाणे म्हणजे काय, याचा उलगडा श्रीरामकृष्णाच्या चरित्रात जसा सुदर रीतीने दिसून येतो, तसा इतरत्र दिसून येत नाही खालील उदाहरणावरून ही गोष्ट स्पष्ट होईल

कालीमदिराजवळ बाबू शभुचद्र मल्लिक याचा बगीचा असून तेथे त्याचा एक दवाखाना अस शंभुचद्र व त्याची पत्नी या उभयताची श्रीरामकृष्णावर अत्यंत भक्ति असे व श्रीरामकृष्ण मधून मधून तेथे फिरावयास जात व शभुबाबूचे बरोबर ईश्वरविषयक गोष्टीत काही काळ घालवून परत जात श्रीरामकृष्णाना पोटदुखीची व्यथा असे एक दिवस ते शंभुचद्राकडे

गेले असता त्याचें पोट दुखूं लागले शंभुचंद्र त्याना म्हणाले, "आपल्याला मी एक दोन अफूच्या गोळ्या देईन परत गेल्यावर त्या खा, म्हणजे पोट दुखणे राहील " श्रीरामकृष्णानी ही गोष्ट मान्य केली पुढे बराच वेळपर्यंत दोघाच्या गप्पागोष्टी झाल्या व बोलण्याच्या नादात दोघेहि ही गोष्ट विसरून गेले

श्रीरामकृष्ण परत जावयास निघाले व दहा-वीस पावले गेल्यावर त्याना गोळ्याची आठवण झाली त्याबरोबर ते परत फिरले पण परत येऊन पाहतात तो शंभुचद्र तेथून गेले होते तेव्हा एवढयासाठी त्याना कशाला हाक मारावी, असा विचार करून कपाउडरजवळूनच अफूच्या दोन गोळ्या घेऊन ते परत फिरले. पण वाटेत आल्यावर, काय झाले कोणास ठाऊक, त्याना नीट चालवेनाच ! पाय रस्त्याने सरळ न जाता नाल्याच्या बाजूलाच ओढ घेऊ लागले ! ' असे का होते ? वाट तर चुकली नाही ना ? ' असा सशय येऊन मागे वळून पाहातात, तो मागील रस्ता नीट दिसत होता ! न जाणो खरोखरच रस्ता चुकला असेल, असे वाटून ते शंभुचद्राच्या फाटकापर्यंत परत गेले व तेथून आपला रस्ता पुन्हा एकवार नीट पाहून घेऊन परत जाऊ लागले तरी सुद्धा तसेच ! त्याच्या पायाना रस्ता नीट सापडेनाच ! असें का व्हावे याचे कारणहि त्याच्या काहीच लक्षात येईना चालावयास लागावे, पण पायानी सरळ जाण्याचेच नाकारावें ! असे दोन तीन वेळ झाल्यावर ते निराश होऊन रस्त्यात बसले, तो एकाएकी त्याच्या मनात आले, "अरे हो ! शंभु तर म्हणाला होता की, ' माझ्या जवळून गोळ्या घेऊन जा, ' पण तसे न करता व त्याला न कळवता मी त्याच्या कपाउडरजवळून गोळ्या घेऊन चाललो आहे ! म्हणूनच आई मला येथून जाऊ देत नसावी ! शंभूला विचारल्याशिवाय गोळ्या देणें कपाउडरला योग्य नाही व माझ्याजवळून घेऊन जा ' म्हणून त्याने सागितले असता, दुसऱ्याजवळून घेऊन जाणें मलाहि योग्य नाही तर अशा रीतीने गोळ्या नेण्यात असत्य भाषण आणि चोरी हे दोन्ही दोष आहेत, म्हणून आई मला येथून जाऊं न देता इथेच अडवून ठेवीत असावी !! " असें मनात येताच ते तत्काळ दवाखान्यांत गेले तेथे तो कंपाउंडरहि नव्हता,

तेव्हा त्यानी दारातूनच ती गोळ्याची पुडी आत टाकून, " ह्या तुमच्या गोळ्या आत टाकल्या हो ! " असे मोठ्याने ओरडून आपला रस्ता धरला ! आता या वेळेस पाय ठीक चालत होते व रस्ताहि नीट दिसत होता ! ! लवकरच ते आपल्या खोलीत जाऊन पोहोचले ! ते नेहमी म्हणत असत— " ज्याने आपला भार सर्वस्वी आईवर टाकला, त्याचा पाय ती इतका सुद्धा बेताल पडूं देत नाही !! "

अशा प्रकारची किती तरी उदाहरणे त्याच्या चरित्रात दिसून येतात. या अलौकिक सत्यनिष्ठेची व निर्भराची यत्किंचित तरी कल्पना कोणाला करतां येईल काय ? सत्यनिष्ठा ही त्याच्या रोमारोमात, हाडीमासी, इतकी भिनून गेली होती की असत्य संकल्प मनात येणे, वाचेने असत्य भाषण बाहेर निघणे, हे त्याच्या बाबतीत अशक्य होऊन गेले होते व यदाकदाचित् मनात असत्य संकल्प आलाच तर, त्याच्या देहाकडून त्या संकल्पाप्रमाणे कृति घडून येणे, हेहि अशक्य होऊन गेले होते ! ! त्याचा जगदंबेवरील निर्भरच काही विलक्षण होता या त्याच्या बालकासारख्या सरळ निर्भरातच त्याचे अलौकिक शक्तिसर्वस्व साठविलेले होते ते वारवार आपल्या शिष्याना खालील उदाहरण देत — " तिकडे आमच्या गावी एक माळ आहे जवळपासच्या गावाना जाण्याला त्यावरून एक अरुंदशी पाऊलवाट असे एकदा एकजण आपल्या दोघा मुलाना बरोबर घेऊन त्या माळावरून चालला होता लहान मुलाला त्याने कडेवर घेतले होते, मोठा मुलगा त्याचा हात धरून चालला होता. जाता जाता वाटेत कही गमत दिसून, कडेवरचा मुलगा आनंदाने टाळ्या वाजवूं लागला ती गमत पाहून, चाललेला मुलगाहि बापाचा हात सोडून टाळी वाजवणार तोच ठेच लागून धप्‌दिशी खाली आपटला व रडूं लागला ! त्याचप्रमाणे आईनेच ज्याचा हात धरला त्याला पडायचं भय नाही, पण ज्याने आईचा हात धरला त्याला मात्र भय आहे ! त्याने हात सोडला की तो पडलाच ! "

श्रीरामकृष्णाची जगदंबेवर एवढी उत्कट भक्ति होती की, त्याना जगदंबेवाचून दुसरे सुचतच नसे, असं म्हटलें तरी चालेल.

**ईश्वरनिर्भर.** एक दिवस 'विचार करणे' यावरून गोष्टी निघाल्या असता ते मणीला (एक शिष्य) म्हणाले, " बाबा, पुरे झाले विचार करणे नुसता विचार करून का कुठे ईश्वराला जाणता येईल ? न्यागटा म्हणत असे " ईश्वराच्या एका अंशाने हे सारे ब्रह्मांड उत्पन्न झाले आहे एवढे मी ऐकून ठेवले आहे,—बस झाले जास्त विचार करण्याची गरज काय ? "

" हाजराची भारी विचारबुद्धी ! त्याचा नुसता हिशेब ऐकत जा,—"ह इतक्या अंशाने जगत झाले, आता इतके अंश बाकी राहिले ! " तो एखाद्या दिवशी माझ्याजवळ असला आणि हिशेब करू लागला म्हणजे माझ्या डोक्यात तिडीक उठते,—काय जाळायचे आहे असल्या हिशेबाला ? मला ठाऊक आहे की, मला काही एक कळत नाही आणि मी कधी कळण्याचा प्रयत्नहि पण करीत नाही मी नुसता 'आई' 'आई' करून टाहो मात्र फोडीत असतो झाले ! तिची इच्छा असेल तसे ती करील ! इच्छा असेल तर समजावून देईल, नसेल तर नाही समजावून देणार ! माझा मांजराच्या पिल्लासारखा स्वभाव आहे पिल्लाला नुसते 'मियॉऊ' 'मियॉऊ' करायचे ठाऊक असते मग त्याची आई त्याला कुठे का ठेवीना,—उकिरड्यात ठेवो की, घरमालकाच्या बिछान्यावर ठेवो ! ! लहान मुलाना आई हवी असते, आपली आई श्रीमंत आहे की गरीब आहे, हे त्याना माहीत नसते मोलकरणीच्या मुलाला सुद्धा सगळा आधार आईचा ! मालकाच्या मुलाशी त्याचे भांडण झाले, तर ते त्याला म्हणतें, " थांब बर का आता मी आपल्या आईला जाऊन सांगतो ! "

आणि श्रीरामकृष्णाचीहि सदैव हीच अवस्था असे " आपल्याला काही एक समजत नाही,—आपल्या आईला सारे काही समजते,—तिची इच्छा असेल तसे करील ! " हा त्याचा नेहमीचा भाव असे

आपल्या साधनाकालाच्या गोष्टी सागत असता एक दिवस श्रीरामकृष्ण म्हणाले,—"तेव्हा मी धरणे धरून बसे,—मी म्हणे, "आई! मी मूर्ख अडाणी माणूस, मला समजावून दे,—वेद, पुराणे, तंत्रे, नाना शास्त्रे यात काय आहे ते!" आईने मला एकेक सारे समजावून दिले!"

आपल्याला ज्ञान प्राप्त व्हावे असा निराळा प्रयत्नच त्यानी केला नाही आईची इच्छा असेल, तर ती देईल आपल्याला ज्ञान, आपल्याला काय हवे ते आपण आईजवळ मागावे, मग तिला योग्य दिसेल ते ती करील, असा त्याचा विलक्षण निर्भर होता

जसे ज्ञानाचे, तसेच स्वत च्या शरीररक्षणासबंधाचे,—त्याचे तिकडे बिलकुल लक्ष नसे साधनाकालाच्या हकीगतीचे वर्णन मागे आले आहे, त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल सदा सर्वकाळ मन ईश्वरचितनात तल्लीन झालेले, मग देहाची फिकीर करावयाची कोणी?

साधनाकाली एकदा ते बरेच आजारी होते, ते स्वत सागत, "एक दिवस कालीमंदिरात बसलो असता आईजवळ बरे करण्याची प्रार्थना करायची इच्छा झाली, परंतु स्पष्टपणे बोलवेना इतकेच म्हणालो की, 'आई, हृदू म्हणतो की, आजाराची गोष्ट एकदा आईजवळ काढा,' पण असे म्हणत आहे तोच म्युझिअममधील तारानी गुफलेला माणसाच्या हाडाचा सापळा एकदम माझ्या डोळ्यापुढे आला! त्याबरोबर मी म्हणालो,—'आई, तुझी इच्छा असेल तसे कर इतकेच की, तुझे गुणवर्णन करीत हिंडायला सापडावें म्हणून, माझ्या हाडाचा सापळा, कसा तरी तिथल्यासारखा तारेने गुंफून ठेव म्हणजे झाले!!'"

# १०. श्रीरामकृष्णांची शिष्यपरीक्षा

" नीट परीक्षा केल्याशिवाय मी कोणालाहि आपल्या मंडळीत घेत नाही. "

" कोणाला होईल ( धर्मलाभ ), कोणाला नाही, कोणाला किती झाला आहे, वगैरे सर्व गोष्टी आई मला दाखविते ! "

—श्रीरामकृष्ण

---

शास्त्रामध्ये गुरूला " भवरोगवैद्य " असे म्हटलेलें आहे हें नांव उगीच अलंकारिक नसून तें खरोखरच अर्थपूर्ण आहे, हें श्रीरामकृष्णाच्या सहवासानें कळून येई साधक ईश्वरप्राप्तीच्या मार्गांत असतां तो ज्या ज्या अवस्थांमधून जातो, त्या चांगल्या की वाईट, साधकाच्या प्रगतीला त्या अनुकूल की प्रतिकूल, हे त्याच्या लक्षणावरून सद्‌गुरु तावडतोब कसे ओळखतात, त्या अनुकूल असल्यास, साधकाच्या अंगीं त्या मुरून अधिकाधिक उच्च अवस्था प्राप्त होणें त्याला कोणत्या उपायानें शक्य होईल आणि त्या प्रतिकूल असल्यास साधकाचें त्यापासून अकल्याण न होऊं देता, त्याच हळूहळू नाहीशा कशा होत जातील, यासंबंधानें सद्‌गुरु कशी व्यवस्था करतात, या गोष्टी श्रीरामकृष्णांच्या जवळ नेहमी पहावयास सांपडत नरेंद्राला प्रथम निर्विकल्प समाधीचा लाभ झाला, तेव्हा श्रीरामकृष्ण त्याला म्हणाले, " तूं आतां कांही दिवसपर्यंत दुसऱ्या कोणाच्या हातचें खाऊं नकोस, स्वतः स्वयंपाक करून खात जा या अवस्थेंत फार फार तर आपल्या आईच्या हातचें खाल्लेलें चालतें इतर कोणाच्याहि हातचें खाल्ल्यास हा भाव नष्ट होऊन जातो ! " एका भक्ताचें

बाह्य शौचाचाराकडेच फार लक्ष असे. त्यामुळेच त्याचें मन ईश्वर-चिंतनात एकाग्र होत नाही, असें पाहताच श्रीरामकृष्ण त्याला म्हणाले, " लोक जिथे मलमूत्रत्याग करितात, तिथे एक दिवस तूं मुद्रा धारण करून बस आणि ईश्वराचें ध्यान कर ! " एकजणाचे भजनकाळचे उद्दाम शारीरिक विकार त्याच्या उन्नतीला प्रतिकूल आहेत असें पाहून, ते त्याचा तिरस्कार करून म्हणाले, " मोठा लेकाचा इथे मला आपला भाव दाखवायला आला आहे ? खरोखरच भाव असला तर कुठे असें होत असतें काय ? बुडी मार, स्थिर हो हें काय ? (इतराच्याकडे वळून) एखाद्या मोठया कढाईत अर्धा छटाक दूध टाकून खाली चागला दणकून जाळ लावावा की नाही, तसा याचा हा भाव आहे थोडयाच वेळाने कढई खाली काढून पाहावी, तो कुठे काय आहे? दुधाचा एक थेंब सुद्धा नाही ! अर्धा छटाक तर नुसते कढईची आतली बाजू माखण्यातच निघून गेलें ! " तसेच एकाचा मानोभाव ओळखून त्याला म्हणाले, " निघ साल्या इथून ! जरा खा, पी, चैन कर अन् मग ये आणि कोणतेंहि काम धर्म करायचा म्हणून करूं नको, जा " काशीपुरातील बगीच्यात एक दिवस काही वैष्णवभक्त एका तरुण मुलाला घेऊन श्रीरामकृष्णाकडे आले. तो मुलगा ईश्वरभक्ति करीत असे परतु अलीकडे चार पाच दिवस झाले, त्याचें आचरण एखाद्या उन्माद झालेल्या माणसासारखें होई त्याचें तोंड, छाती लाल झालेली होती, तो अत्यंत दीनभावाने ज्याच्या त्याच्या पायाची धूळ आपल्या शिरावर धारण करी ! ईश्वराच्या नामोच्चाराने त्याच्या अंगास कप सुटून रोमांच उभे राहात दोन्ही डोळयातून एकसारख्या अश्रुधारा वाहात असल्यामुळे डोळे सुजून लाल झाले होते व शरीराकडे त्याचें बिलकुल लक्षच नव्हतें ! एक दिवस नामसंकीर्तन करीत असता एकाएकी त्याची अशी अवस्था झाली व तेव्हा-पासून त्याची हीच अवस्था होती. तेव्हापासून जेवणखाण व निद्रा नाहीच म्हटलें तरी चालेल. रात्रंदिवस ईश्वरदर्शनाच्या तळमळीने तो व्याकुळ झालेला असे. त्या मुलाला पाहताच श्रीरामकृष्ण म्हणाले, " हा मधुरभावाचा आरंभ दिसतो. परंतु याची ही अवस्था टिकणार नाही,—याच्याने टिकवली जाणार

नाही ही अवस्था राखणे फार कठीण गोष्ट आहे स्त्रीचा नुसता स्पर्श झाल्यास ( कामभावाने ) ही अवस्था तात्काळ नष्ट होऊन जाते !" श्रीरामकृष्णाचे बोलणे ऐकून व "निदान, या मुलाला वेड तरी लागले नाही," असे पाहून त्या मडळीना बरे वाटले त्यानतर काही दिवसानी असे कळले की, श्रीरामकृष्णानी सागितलें होते, तसे खरोखरच झाले, भावाच्या क्षणिक उद्दीपनाने त्याची जितकी उच्च अवस्था झाली होती, तितकेच, तो त्याचा भाव संपताच, त्याचे अध पतन झाले ! !

आणि खरोखरच, नुसता भाव अथवा समाधिलाभ होऊनच सर्व काही सपलें असे नाही त्याचा वेग धारण करता येणे, ती उच्च अवस्था अगात मुरवून घेता येणे, हीहि तितकीच महत्त्वाची गोष्ट आहे ही गोष्ट करता न आल्याने, उच्च अवस्थेला पोहोचलेल्या कित्येक साधकाचे अध पतन होते. मनात वासनाचा लवलेश असला तरी ती उच्च अवस्था कायम राहात नाही म्हणूनच "साधकाने वासनाचा समूळ त्याग करावा," असे शास्त्रानी सागितलें आहे, असो

औषधें कितीहि उत्तम असली तरी रोगाचे अचुक निदान झाल्याशिवाय त्याचा प्रयोग केल्यास, ती जशी काही कामाची नव्हत, तसेच, उपदेशवाक्ये कितीहि उत्तम असली तरी, शिष्याची बिनचूक परीक्षा केल्याशिवाय त्याचा प्रयोग केल्यास तीहि निरुपयोगीच होतात म्हणून गुरूला शिष्याची परीक्षा बिनचूक करता येत असली पाहिजे हा गुण श्रीरामकृष्णामधे पूर्णत्वाने वास करीत असे

त्यामा माणसाची पारख काही विलक्षण असे कोण कसा आहे, हे त्याना बिनचूक समजे आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येकाच्या मनातील भाव पूर्णपणे ओळखून ते त्याच्याशी वर्तन करीत व त्याच्या स्वभावानुरूप ते त्याला आपल्या स्वत शी वर्तन ठेवायला लावीत ! उदाहरणार्थ —नरेंद्रासबंधाने ते म्हणत

" नरेंद्र माझी सासुरवाडी आहे, " ( स्वत कडे बोट करून ) याच्या आत जो कोणी आहे तो जणु मादी आहे, आणि ( नरेंद्राकडे बोट करून ) याच्यात जो कोणी आहे तो जणु नर आहे " ते नरेंद्राला स्वत ची कोणतीहि सेवा करू देत नसत, ते म्हणत, " त्याला सेवा करण्याची जरूरी नाही. " राखालला ( स्वामी ब्रह्मानंदाना ) ते स्वत चा पुत्र समजत व त्याचे मुलासारखे लाड करीत एखाद्याने आपल्या स्वभावाविरुद्ध आचरण केलें तर ते त्याना बिलकुल खपत नसे एक दिवस देवीच्या मंदिरात उभे असता भावावेशात त्यानी गिरीशला भैरवाच्या रूपाने पाहिले तेव्हापासून ते त्याला साक्षात भैरव समजत व त्याची वाटेल तसली बोलणी ते खुशाल हसत हसत ऐकून घेत ! एक दिवस दुसरा एकजण त्याना गिरीशसारखेंच बोलू लागला, त्याबरोबर त्यानी त्याला थाबवून म्हटले—" हा भाव तुला योग्य नाही, तो गिरीशलाच शोभतो " याच प्रमाणे इतर सर्वाशी त्याचा शात अगर वात्सल्य कोणता तरी एक सबंध ठरलेला असे ते म्हणत, " काचेच्या कपाटातील सर्व वस्तु ज्याप्रमाणे दिसतात त्याप्रमाणे माणसाच्या आत काय आहे काय नाही, हे सर्व आई मला दाखवून देते ! माणसाच्या काठीवरून आणि छत्रीवरून त्याचा स्वभाव मला ओळखता येतो ! "

आपल्या आश्रयाला येणाऱ्या प्रत्येकाची ते अत्यत बारकाईने परीक्षा करीत व तीत तो उतरला तरच त्याच्याशी मन मोकळे करून वागत त्याची ही निवड कधीहि चुकीची ठरली नाही केशवचद्र सेन याच्या अनुयायात फाटाफूट होऊ लागल्यावर, एक दिवस ते त्याना म्हणाले, " केशव, तू आपल्या मडळीत वाटेल तशी खोगीरभरती करतोस म्हणून असे होते नीट परीक्षा केल्याशिवाय मी कोणालाहि आपल्या मडळींत घेत नाही "

आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येकाची ते किती बारकाईने व किती प्रकारानी परीक्षा पाहात, याचा विचार करता मन आश्चर्याने थक्क होऊन जातें व असे वाटते की, त्यानी लोकाचे चरित्र जाणण्याचे हे इतके उपाय कोठून व कसे जमा

केले असतील ते असोत ! ते या बाबतीत, कदाचित् आपल्या योगसामर्थ्याची मदत घेत असतील, तरी पण त्याची अवलोकनशक्ति काही विलक्षण होती यात शंका नाही कोणीहि मनुष्य त्याच्याकडे प्रथमच आला म्हणजे, त्याच्याकडे ते नीट लक्ष देऊन पाहात व त्याच्याकडे त्याचे मन आकृष्ट झाले, तर त्याच्याशी बोलावयास लागत व त्याला आपल्याकडे पुन्हा पुन्हा यावयास सागत असा तो चार पाच वेळा येऊन गेला, म्हणजे ते तेवढया वेळात, त्याच्या नकळत, त्याच्या अवयवाची घडण कशी आहे, त्याचे विचार कशा प्रकारचे आहेत, आपल्या स्वत विषयी त्याचे मत काय झाले आहे, या सर्वांचें निरीक्षण करीत व त्याच्यावरून त्याच्या आध्यात्मिक उन्नतीचा अंदाज बाधून त्याच्याशी कसे वागावयाचें हे ठरवीत व मग पुढे जर त्याच्याविषयी एखादी विशेष गोष्ट जाणण्याची इच्छा झाली, तर ती गोष्ट ते आपल्या योगसामर्थ्याने जाणून घेत ते म्हणत, " पहाटे उठून तुम्हा सर्वांचें कल्याण चितीत असताना, 'कोणाची किती उन्नति झाली आहे, कोणाची का होत नाही' या सर्व गोष्टी आई मला समजावून देते ! "

शारीरिक लक्षणावरून ते माणसाची परीक्षा करीत, असे वर सागितले आहे या सबधाने ते कधी कधी म्हणत, " पद्मपत्रासारखे ज्याचे डोळे असतात, त्याची सात्त्विक वृत्ति असते बैलासारखे ज्याचे डोळे असतात, त्याच्यात काम प्रबल असतो योग्याचे डोळे ऊर्ध्वदृष्टिसपन्न व आरक्त असतात देवचक्षु फारसे मोठे नसतात, पण त्याची लाबी अधिक असते एखाद्याशी बोलताना, त्याच्याकडे विशेष न्याहाळून पाहण्याची ज्याला सवय असते, तो साधारण माणसापेक्षा अधिक बुद्धिमान् असतो. दुष्ट माणसाचा हात जड असतो नाक चपटें असणे चागलें नाही शंभुचद्राचें* नाक चपटें असे, म्हणून ज्ञानी असूनहि ते तितक्या

---

* याना श्रीरामकृष्ण आपले " द्वितीय रसद्दार " म्हणत मथुरबाबूंच्या मृत्यूनंतर याचा श्रीरामकृष्णाशी परिचय झाला श्रीरामकृष्णावर याची व याच्या पत्नीची अत्यंत भक्ति जडली याचा स्वभाव परम उदार, तेजस्वी

सरळ वृत्तीचे नव्हते हात आखूड आणि कोपर मोठे, हे तसेंच एक वाईट लक्षण आहे डोळे माजरासारखे घारे असणे बरे नव्हे तसेच डोळा तिरळा असणेंहि वाईट एका डोळ्याने आधळा एक वेळ बरा, पण तिरळा माणूस फार दुष्ट आणि वाईट असतो

" एक दिवस एकजण इथे आला होता तो हृदयला म्हणाला, 'मी नास्तिक आहे, तू आस्तिक आहेस ना? माझ्याशी वाद कर!' तेव्हा मी त्याच्याकडे नीट न्याहाळून पाहिले, तो काय? त्याचे डोळे माजरासारखे घारे!"

तसेच पाय व चालणे ह्यावरूनहि पुष्कळ कळून येते शरीराच्या ठेवणी-संबंधाने ते म्हणत, "भक्तिवान मनुष्याचे अग स्वाभाविकच कोमल असते त्याच्या हातापायाचे सावे ढिले असतात" एखादी व्यक्ति बुद्धिमान् आहे असे दिसून आल्यास, तो चागल्या बुद्धीचा आहे, की वाईट बुद्धीचा आहे हे पाहण्यासाठी, त्याचा हात आपल्या हातात घेऊन ते त्याचे वजन पाहात!

काशीपुरास गळयाच्या रोगाने ते आजारी असता, एक दिवस स्वामी शारदानंद आपल्या धाकट्या भावास घेऊन त्याच्या दर्शनास गेले धाकट्या भावाला पाहून ते प्रसन्न झाले व त्याच्याबरोबर धर्मविषयक गोष्टी बराच वेळ बोलल्यावर, शारदानंदाना म्हणाले, "हा तुझा भाऊ आहे कायरे?" शारदा-नंदानी हो म्हटल्यावर ते म्हणाले, " मुलगा चागला दिसतो तुझ्यापेक्षा अधिक बुद्धिवान् आहे पाहू बरे सद्बुद्धि की असद्बुद्धि?" असे म्हणून त्याचा हात आपल्या हातात तोलून पाहून ते म्हणाले-" अरे वा! सद्बुद्धि!" मग शारदानंदाना म्हणाले, " काय रे? याला सुद्धा ओढून घेऊ का? (याचे सुद्धा मन ससारातून काढून ईश्वराकडे लावूं का?) तूं काय म्हणतोस?"

---

असून ते मोठे ईश्वरभक्त होते मथुरबाबूंनंतर चार वर्षेपर्यंत त्यानी श्रीरामकृष्णाची मथुरबाबूंप्रमाणेच अत्यत एकनिष्ठतेने सेवा केली ते १८७५ मध्ये मृत्यु पावले.

शारदानंद म्हणाले, " वा ! महाराज ! मग तर काय चागलेच झालें ! आणिक काय पाहिजे ? त्याला अवश्य ओढून घ्या ! " हे ऐकून क्षणभर विचार करून श्रीरामकृष्ण म्हणाले, " नको पण, अगोदरच एकाला घेतला आहे, आणखी दुसऱ्यालाहि घेतले, तर तुझ्या आईबापाना कष्ट होतील—विशेषत तुझ्या आईला, आजपर्यंत अनेक माऊल्याना कष्ट दिले, तेवढेच पुरेत ! "

श्रीरामकृष्ण म्हणत असत, " निरनिराळ्या लोकाची शारीरिक घडण जशी निरनिराळी असते, तसेच त्याचे निद्राशौचादि व्यवहारहि निरनिराळ्या प्रकारचे असतात झोपेंत सर्वांचेच उच्छ्वास सारखेच पडत नाहीत त्यागी लोकाचे एका तऱ्हेचे व भोगी लोकाचे निराळ्याच तऱ्हेचे असतात शौचादि प्रसगी भोग्याची मूत्रधारा डाव्या बाजूला व त्याग्याची उजव्या बाजूला पडते योग्याच्या मलाला डुकरे शिवत सुद्धा नाहीत "

अशा रीतीने शारीरिक घडगीवरून मनुष्याचा स्वभाव ओळखण्याचे कितीतरी आडाखे श्रीरामकृष्ण सागत व आपल्या भक्तमडळीच्या परीक्षेंत त्याचा उपयोग करीत नरेंद्राची त्यानी अशीच कसून परीक्षा केली होती एक दिवस ते त्याला म्हणाले, " तुझी सर्व लक्षणें फारच उत्तम आहेत, फक्त, झोपेंत तुझा निश्वास तेवढा जोराने पडतो, एवढीच एक गोष्ट वाईट आहे योगी म्हणतात, ' असा मनुष्य अल्पायु होतो ! ' "

एखादा मनुष्य त्याच्याकडे येऊ लागला, म्हणजे त्याच्या चालचलणुकी-वर ते बारकाईने लक्ष ठेवीत व परीक्षेत उतरून त्याला आपल्या मंडळींत घ्यावयाचे ठरल्यास, ते त्याला नाना प्रकारचा उपदेश करीत व गोड शब्दानी त्याचे दोष त्याला दाखवित तसेच त्याला गृहस्थच ठेवावयाचा, की सन्यासी करावयाचा हेंहि ठरवून त्याप्रमाणे त्याला शिक्षण देऊ लागत यासाठी, प्रत्ये-काला—" तुझा विवाह झाला आहे काय ? तुला घरी कोण आहे ? तू ससाराचा त्याग केलास, तर तुझ्या कुटुबाची काळजी घेईल असे कोणी आहे की नाही,–" वगैरे गोष्टीची ते प्रथमच चौकशी करीत,

अविवाहित मनुष्याला—" तुला लग्न करावेसे वाटते की नाही ? तुला चाकरी करावीशी वाटते की नाही ? " वगैरे प्रश्न ते विचारीत एखाद्याने—" लग्न करायची इच्छा नाही, पण चाकरी तर केली पाहिजे, " असे म्हटले तर ते त्याना कसेसेच लागे ! ते म्हणत, " तुला जर ससारी व्हायचे नाही, तर जन्मभर दुसऱ्याचा चाकर होऊन का राहातोस ? ईश्वराच्या सेवेत आपले आयुष्य का घालवीत नाहीस ? " ज्याला ही गोष्ट अशक्य वाटे, त्याला ते म्हणत, " तर मग विवाह कर आणि ईश्वर-प्राप्तीचे ध्येय पुढे ठेवून, सन्मार्गाने वागत, ससारधर्माचे पालन करीत जा " म्हणून जे लोक आध्यात्मिक मार्गात उत्तम व मध्यम अधिकारी असल्याचे त्याना दिसून येई, त्याच्यापैकी कोणी विवाह केला असल्याचे अथवा विशेष काही कारण असल्यावाचून, नुसता पैसा अथवा मान मिळविण्यासाठीच कोणी नोकरी करीत राहून, आपल्या शक्तीचा दुरुपयोग करीत असल्याचे जर त्यानी पाहिले, तर त्याना फार दु ख होई त्याच्या बालभक्तापैकी एकाने नोकरी धरल्याचे कळल्यावर एक दिवस ते त्याला म्हणाले, " तूं आपल्या आईसाठी नोकरी करतोस म्हणून हरकत नाही, पण जर उगीच नोकरी करीत असतास, तर मला तुझे तोंड सुद्धा पाहवले नसते ! " तसेच ते काशीपुरात आजारी असता, एका भक्ताचे लग्न झाले लग्नानतर एक दिवस तो त्याच्या दर्शनास आला असता, त्याना जसा पुत्रशोक व्हावा तसे झाले व त्याच्या गळ्याला मिठी मारून दु खाने रडत रडत ते पुन्हा पुन्हा त्याला म्हणू लागले, " बाळ, ईश्वराला विसरून ससारातच बुडून जाऊ नको, बरे ! "

दक्षिणेश्वरी वरचेवर ये जा करू लागल्यावर एके दिवशी एका मुलाला त्यानी एकदम विचारले, " काय रे ? तू लग्न का करीत नाहीस ? " मुलाने उत्तर दिले-" महाराज, अजून मन ताब्यात आले नाही आताच लग्न करीन, तर कदाचित् स्त्रैण होऊन बसेन, म्हणून कामजित् झाल्यावर मगच लग्न करायचा माझा बेत आहे " श्रीरामकृष्णानी ताडलें की, मनात

प्रबल आसक्ति असूनहि यांचे मन निवृत्तिमार्गाकडे वेधले आहे तेव्हा ते त्याला हसत हसत म्हणाले, " बाळ, तूं कामजित् झाल्यावर तुला लग्नाची मुळी आवश्यकताच उरणार नाही ! "

असेच आणखी एक दिवस ते एका मुलाला म्हणाले, " हे असे का होते सांग पाहू ? वाटेल ते केले तरी कमरेभोवती धोतर म्हणून टिकत नाही तें केव्हा गळून पडते इकडे लक्षच राहात नाही ! आता येवढा म्हातारा झालो, तरी नागडे हिंडायची लाज वाटत नाही ! मागे मागे तर, आपल्याकडे कोणी पाहात आहे की नाही, याचीहि शुद्ध नसे, पण आता कोणी बघेल तर त्याला लाज वाटेल, म्हणून कमरेभोवती धोतर कसेतरी गुंडाळून ठेवतो झाले तू माझ्यासारखा लोकांच्या समोर नागडा हिंडू शकशील ? " तो मुलगा म्हणाला, " महाराज, काही बरोबर सांगता येत नाही तरी पण आपण सांगाल तर वस्त्रत्याग करीन ! " श्रीरामकृष्ण म्हणाले, " खरे ? जा बरे तर, धोतर डोक्याला गुंडाळून देवळाच्या आंगणातून एक चक्कर मारून ये पाहू ? " तो मुलगा म्हणाला, " हे नाही महाराज माझ्याने करवणार तरीपण आपण सांगत असाल, तर फक्त आपल्यासमोर तसे करू शकेन " श्रीरामकृष्ण यावर हसून म्हणाले, " पुष्कळजण तुझ्यासारखे म्हणतात खरे—की तुमच्या समोर धोतर फेडून टाकायची लाज वाटत नाही, पण इतरांच्या समोर वाटते ! "

त्यांच्याकडे येणाऱ्या मनुष्याच्या मनात त्यांच्याविषयी जी श्रद्धा असे, ती उत्तरोत्तर वाढत आहे की नाही, इकडे त्यांची नेहमी दृष्टि असे आपली आध्यात्मिक अवस्था व आचरण त्याला कितपत समजले आहे, हे पाहण्यासाठी ते त्याला स्वत संबंधी काही प्रश्न विचारीत आपल्या सर्व सांगण्यावर त्याचा विश्वास आहे की नाही हें पाहात व आपल्या भक्तमंडळी-पैकी ज्याच्याशी सहवास ठेवल्याने त्याचा फायदा होईल असें त्यांना वाटे, त्याच्याशी त्याची ओळख करून देत.

एक दिवस त्यानी एकजणाला एकदम विचारले, " काय रे ? राम ( रामचंद्र दत्त ) मला अवतार म्हणत असतो, तुला काय वाटते ? "

**भक्त** —असे का ? तर मग महाराज, राम आपल्याला फारच कमी लेखतो !

**श्रीरामकृष्ण** —वा रे वा ! तो तर मला ईश्वराचा अवतार म्हणतो आणि तू काय म्हणतोस, की तो मला कमीच लेखतो ?

**भक्त** —होय महाराज अवतार तर ईश्वराचे अंश, मी तर आपल्याला साक्षात् ईश्वर समजतो !

**श्रीरामकृष्ण** —( हसून ) काय म्हणतोस ?

**भक्त** —असे आहे खरे आपण मला शंकराचे ध्यान करीत जा म्हणून सांगितलेत, पण काय वाटेल ते केले तरी ध्यानात शंकराची मूर्तीच येत नाही ! ध्यान करायला बसलो की डोळ्यापुढे एकदम आपलीच मूर्ति येते आणि मग शंकराचे ध्यान करण्याची इच्छाच होत नाही ! म्हणून मग मी आपल्यालाच शिव समजून आपलेच ध्यान करीत असतो !

**श्रीरामकृष्णः**—( हसून ) काय, म्हणतोस तरी काय ? पण माझी तर स्वतःची अशी खात्री आहे की, मी तुझ्या एखाद्या लहानशा केसाहूनहि मोठा नाही ! तें काही असो, तुझ्याबद्दल फार काळजी वाटत होती, ती आज नाहीशी झाली !!

आणखी एक दिवस ते आपल्या एका बालभक्ताला म्हणाले, " बाळ, तुझ्या शरीराच्या लक्षणावरून असे दिसते की, तुला पैसा पुष्कळ मिळावा आणि तुझ्या हातून पैशाचा सद्व्यय होऊन पुष्कळांचे कल्याण व्हावे मग काय ? तुला श्रीमंत होण्याची इच्छा आहे काय ? " हे ऐकून त्या बालभक्ताने उत्तर केले,

" महाराज, पैसा ईश्वरलाभाच्या मार्गातला अडथळा आहे ना ? मग तो घेऊन काय करू ? ईश्वराने माझ्यावर कृपा करावी आणि मला पैसा देऊ नये ! " हे ऐकून श्रीरामकृष्ण हसूं लागले

श्रीरामकृष्णाच्या शिष्यमंडळीत हरीश हा चागला सशक्त असून, अत्यंत शात स्वभावाचा असे तो घरचा सुखवस्तु असे त्याचे लग्न झालेले होतें व त्यास एक मुलगाहि झाला होता दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाकडे चार पाच वेळ येताच त्याच्या मनात वैराग्याचा उदय झाला व तेव्हापासून तो दक्षिणेश्वरी राहून श्रीरामकृष्णाची सेवा व जपध्यान यात बराच वेळ घालवी घरच्या मंडळींनी त्याला पुष्कळ सागून पाहिले, पण त्याने आपला क्रम मुळीच सोडला नाही हे पाहून त्याच्या घरची मडळी त्याच्यावर फार रागावली व त्याच्या पत्नीने तर जवळ जवळ खाणेपिणेहि सोडून दिलें हे ऐकून हरीशची परीक्षा पाहण्याकरिता, एक दिवस त्याला एकीकडे हाक मारून श्रीरामकृष्ण म्हणाले, " तुझी पत्नी इतकी दु ख करीत आहे, तर तूं एकदा घरीं जाऊन तिला भेटून का येत नाहीस ? " हरीशने यावर उत्तर दिले, " महाराज, ही दया दाखविण्याची जागा नव्हे इथे दया दाखविल्यास, मोहात सापडून आपले ध्येयच विसरून जाण्याची भीति म्हणून महाराज, असली आज्ञा आपण मला करू नये " या त्याच्या भाषणाने श्रीरामकृष्ण त्याचेवर फार प्रसन्न झाले व तेव्हापासून हरीशची ही गोष्ट मधे मधे आम्हास सागून, त्याच्या वैराग्याची प्रशंसा करीत

नरेंद्र म्हणजे श्रीरामकृष्णाचा जीव की प्राण, पण तो सुद्धा त्याच्या परीक्षेच्या दिव्यातून सुटला नाही तो दक्षिणेश्वरी आला म्हणजे श्रीरामकृष्णाच्या आनंदाला जसे भरतें येई ! मग ते इतर सर्व गोष्टी विसरून त्याच्याशीच गप्पागोष्टी करीत बसत ! त्याला दुरून येताना पाहून, "ये-न,-ये-न," एवढेच शब्द कसेबसे उच्चारीत कितीदा तरी त्याना त्यावेळीं समाधिमग्न झालेले लोकानी पाहिले आहे

पण एक दिवस, नरेंद्र आला, त्याना प्रणाम करून बसला, पण श्रीरामकृष्णाच्या तोंडून शब्दहि नाही ! कदाचित् ते भावावेशात असतील, असे वाटून तो काही वेळ थांबला, तरी श्रीरामकृष्ण काहीच बोलेनात ! हे पाहून, तेथून उठून बाहेर येऊन हाजरा महाशय वगैरे मंडळीशी तो गोष्टी बोलत बसला काही वेळाने श्रीरामकृष्णाच्या बोलण्याचा आवाज ऐकून तो आत गेला, पण त्याला पाहाताच श्रीरामकृष्ण दुसरीकडेच तोंड फिरवून बसले ! असा प्रकार संध्याकाळपर्यंत चालला व बराच वेळ झाला असे पाहून, श्रीरामकृष्णाना नमस्कार करून तो घरी निघून गेला पुढल्या रविवारी तो दक्षिणेश्वरीं गेला, पण खोलींत जाऊन श्रीरामकृष्णाना नमस्कार करतो, तोंच ते डोक्यावरून पांघरूण घेऊन निजूनच राहिले !! त्या दिवशीहि श्रीरामकृष्ण त्याच्याशी काहीच बोलले नाहीत आणखी एक दोन रविवारी असेच झाले मध्यतरी श्रीरामकृष्ण इतराच्या जवळ त्याची चौकशी करीत, पण तो आला, की त्याच्याशी मुळीच न बोलता स्वस्थ बसून राहात ! ! नरेंद्रनाथाने मात्र आपलें येणें सोडलें नाही पुढे एक दिवस नरेंद्र येताच श्रीरामकृष्ण त्याला म्हणाले, " काय रे नरेन्, मी तर तुझ्याशी एक शब्द सुद्धा बोलत नाही, मग तूं इथे कशाला येत असतोस, साग पाहूं ? " नरेंद्राने लगेच उत्तर दिल, " मी आपले भाषण ऐकायला थोडाच इथे येत असतों ? आपल्याविषयी प्रेम वाटतें,आपल्याला पाहावेंसें वाटतें, म्हणून येत असतों ! ' हे ऐकून श्रीरामकृष्णाना गहिवर आला व ते म्हणाले, " नरेन् नरेन्, मी तुझी परीक्षा पाहिली रे ! तुझे लाड केले नाहीत, तुझ्याशीं बोललो नाही, तर तू पळून जातोस की काय हे पाहिलें ! तुझ्यासारखाच हें सहन करूं जाणे, दुसरा कोणी असता, तर कधीच पळून गेला असता व इकडे पुन्हा फिरकला सुद्धा नसता !

तसेच, नरेंद्राच्या अंगी वैराग्य कितपत बाणले आहे, हे पाहाण्यासाठी एक दिवस त्याला एकीकडे बोलावून श्रीरामकृष्ण म्हणाले, " हे बघ,

तपश्चर्येच्या प्रभावाने मला अणिमादि अष्टसिद्धि कधीच्याच प्राप्त झाल्या आहेत पण मला संन्याशाला त्यांचा काय उपयोग ? शिवाय, त्यांचा उपयोग करण्याचें मला कधी कामहि पडलें नाही म्हणून मनांत आहे की, आईला विचारून त्या सर्व तुला देऊन टाकाव्या ! कारण आईने मला दाखविलें आहे की, तुझ्याकडून धर्मप्रचाराचें पुष्कळ काम व्हावयाचें आहे, तेव्हां तुला त्यांचा फार उपयोग होईल तुझा काय विचार आहे ? " नरेंद्राने विचारले, —" पण महाराज ईश्वरप्राप्तीच्या कामीं त्याचा कांही उपयोग होईल काय ? " श्रीरामकृष्ण म्हणाले—" नाही परंतु ईश्वरलाभ झाल्यानंतर, धर्मप्रचाराच्या कामीं त्याचा उपयोग होईल " नरेंद्राने ताबडतोब उत्तर दिलें, " तर मग महाराज त्या सिद्धि मला नकोत अगोदर ईश्वर दर्शन होऊं द्या, मग त्याच्या कामी सिद्धींची जरूरी असेल, तर तोच आपण होऊन देईल आताच सिद्धि घेऊन बसलो, तर मी कदाचित् त्यातच गुरफटून जाईन व ईश्वराचा लाभ बाजूलाच राहून जाईल ! " हें ऐकून श्रीरामकृष्णांना फार आनंद झाला व ते त्याचेवर अधिकच प्रसन्न झाले.

ते ज्याप्रमाणे दुसऱ्याची परीक्षा घेत, त्याप्रमाणे दुसऱ्यांनी आपली परीक्षा घेऊन मगच आपल्यावर विश्वास ठेवावा, अशी त्याची फार इच्छा असे. ते नेहमी म्हणत—" बाबांनो, साधूला दिवसा पाहावे, रात्रीं पाहावें, तेव्हांच त्याच्यावर विश्वास ठेवावा ! साधु दुसऱ्याला जसा उपदेश देतो, त्याप्रमाणे स्वतः वागतो की नाही, इकडे लक्ष देत जा. ज्याच्या बोलण्यांत आणि वागण्यांत मेळ नाही, त्याच्यावर कधीहि विश्वास ठेवत जाऊं नका. " त्याची शिष्य मंडळीहि चागली शिकली सवरलेली असल्यामुळे तीहि आपल्या चिकित्सक बुद्धीचे समाधान करून घेतल्यावाचून कधीहि स्वस्थ बसत नसत; एवढेंच नव्हें तर आपला भक्तिविश्वास दृढ करण्यासाठी म्हणून, कित्येक वेळां त्यांना त्रासहि देण्यास कधी कमी करीत नसत ! तरी, तो सर्व सद्धेतुमूलक आहे, असें माहीत असल्यामुळे, अशा प्रकारचा सर्व त्रास ते प्रसन्न मनाने सहन करीत.

स्वामी विवेकानंदानी त्याच्या बिछान्याखाली रुपया ठेवून त्याची परीक्षा पाहिल्याचे मागे ( भाग पहिला, पा. १९१–९२ ) सांगितलेच आहे

स्वामी विवेकानंद श्रीरामकृष्णाच्या चरणापाशी आल्यापासून आपल्या धर्मजिज्ञासू स्नेह्यासोबत्यासहि श्रीरामकृष्णाकडे घेऊन येत आपल्यासारखाच इतरहि सर्वांना श्रीरामकृष्णाच्या दिव्य संगतीचा लाभ मिळावा अशी त्याची फार इच्छा असे. परंतु अशा रीतीने त्यानी आणलेल्या सर्वांविषयी श्रीरामकृष्णाची सारखीच उच्च धारणा होत नसे, व म्हणून सर्वांवरच त्याची कृपा होत नसे, असें स्वामीजीच्याच तोंडून आम्हीं ऐकले आहे ते म्हणत, “ श्रीरामकृष्णानी आपल्या चरणीं मला आश्रय दिल्यानंतर, धर्म वगैरे संबंधी ते जसा उपदेश मला देत, तसा या इतर स्नेह्यासोबत्याना देत नसत, म्हणून माझ्यासारखीच त्याच्यावरहि कृपा करण्याबद्दल मी एकसारखे त्याच्या मागे टुमणें लावावे, एवढेच काय, पण अजाणपणामुळे कित्येकदा याबद्दल त्याच्याशी जोराजोराने वाद करीत बसावें ! मी म्हणावें, “ महाराज, असें कसें बरें ? ईश्वर काय असा पक्षपाती आहे, की तो एकावर कृपा करील व दुसऱ्यावर करणार नाही ? मग का बरे तुम्ही त्यानाहि माझ्यासारखाच आपल्या चरणी आश्रय देत नाही ? एखाद्याने मनात आणलें व तसा प्रयत्न केला, तर जसा विद्वान् पंडित होऊ शकेल, तसाच तो ईश्वरभक्तहि होईल, ही गोष्ट तर खरी ?” यावर श्रीरामकृष्णानी म्हणावे, “ काय करूं रे, आई तर मला निराळेंच दाखविते की, त्याच्यात एखाद्या खोंडासारखा पशुभाव भरलेला आहे आणि त्यांना या जन्मीं धर्मलाभ होणार नाही, मग मी तरी काय करूं बरे ? आणि हा काय तुझा भलताच समज आहे ? मनात आणलें आणि प्रयत्न केला तर काय कोणीहि जशी इच्छा असेल तसा होऊं शकतो की काय ? ” पण त्याचे हें बोलणें ऐकतो कोण ? मी पुन्हा म्हणावे, “ हें आपण काय म्हणता महाराज ? मनात आणले व उद्योग केला, तर काय जशी इच्छा असेल तसें करता येणार नाही ? अलबत आलेंच पाहिजे माझा तर या तुमच्या म्हणण्यावर बिलकुल विश्वास बसत नाही ! ” श्रीरामकृष्णाचें पुन्हा आपलें आहेच—“ तूं विश्वास

ठेव की ठेवूं नकोस, माझी आई तर मला निराळेच दाखविते!" मलाहि त्याचे म्हणणे त्यावेळीं काही केल्या पटत नसे पण पुढे जसजसे दिवस लोटूं लागले, तसतसे मला हळूहळू दिसून आलें की, ते जे म्हणाले तेच खरे आणि माझीच समजूत चुकीची होती!"

स्वामीजी म्हणत, "अशा रीतीने प्रत्येक गोष्टीत पदोपदी त्याच्याशी भाडून वाद करून माझी जेव्हा समजूत पटूं लागली, तेव्हाच त्याच्या सर्व गोष्टींवर माझा विश्वास बसूं लागला"

"साधूची दिवसा परीक्षा करावी, रात्री करावी तेव्हाच त्याच्यावर विश्वास ठेवावा," या श्रीरामकृष्णाच्या स्वतःच्याच सागण्याप्रमाणे त्याच्या प्रत्येक गोष्टीची व व्यवहाराची ते कशा रीतीने छाननी करीत यासबधाने स्वामीजींच्याच तोंडून आम्ही खालील गोष्ट ऐकली आहे १८८५ सालात रथ-यात्रेच्या दिवशीं, श्रीरामकृष्ण, पंडित शशधर याची भेट घेण्यास त्याच्या घरी गेले त्या दिवशी "परमेश्वराचा साक्षात्कार होऊन आदेश मिळालेले पुरुषच यथार्थ धर्मप्रचारास योग्य, इतर नुसते नावाचेच प्रचारक, त्याच्याकडून काही काम होणार नाही," वगैरे नानाप्रकारचा उपदेश पंडितास दिल्यावर, काही वेळाने त्यानी पिण्यासाठी एक फुलपात्रभर पाणी मागितले त्यावरोबर टिळे लावलेल्या, रुद्राक्षमाळा घातलेल्या एका व्यक्तीने मोठया थाटाने तरातरा एक फुलपात्रभर पाणी त्याना आणून दिले श्रीरामकृष्णानी ते फुलपात्र तोडाकडे नेले, पण ते ते पाणी पिऊ शकले नाहीत! हें पाहून दुसऱ्या एकजणाने ते पाणी फेकून दिलें व दुसऱ्या एका भाड्यात पाणी आणून तें त्याना प्यावयास दिले त्या भाड्यातील थोडेंसे पाणी पिऊन, श्रीरामकृष्णानी त्या दिवशीं पंडितजींचा निरोप घेतला. सर्वाना वाटले की, अगोदर आणलेल्या पाण्यात काही पडले असेल, म्हणून श्रीरामकृष्ण ते पाणी प्याले नाहीत.

स्वामीजी म्हणत, "त्या दिवशी मी श्रीरामकृष्णाच्या अगदी जवळ बसलों होतो त्या पाण्यात काही एक पडले नव्हतें व तरी सुद्धा ते पाणी प्याले

नाहीत, याचें कारण काय असावें, असा विचार करता करता माझ्या मनात आले की, ते पाणी स्पर्शदोषाने अपवित्र झाले असावे कारण मागे एकदा श्रीरामकृष्ण म्हणाले होते, "ज्याच्यात विषयबुद्धि प्रबल असते, जे ठकबाजी व कपट करून आपली उपजीविका चालवितात, जे स्वत च्या फायद्यासाठी व स्वत च्या इच्छा पूर्ण करण्यासाठी धर्माचे नुसते ढोंग माजवून लोकाना फसवतात, अशा लोकानी काही खाद्य पेय आणून दिल्यास, ते घेण्यास मी आपला हात पुढे करीत असताहि तो पुढे सरकत नाही, मागेच वळतो!" ही गोष्ट माझ्या लक्षात येताच, या गोष्टीच्या सत्यासत्यतेची शहानिशा करण्यास ही योग्य सधि आहे, असें पाहून मी लगेच उठलो व "माझ्याबरोबर दक्षिणेश्वरी चल," असे श्रीरामकृष्ण म्हणत असता, "मला काही जरूरीचे काम आहे म्हणून गेलेच पाहिजे," असे म्हणून मी तेथून बाहेर पडलो टिळेमाळा धारण करणाऱ्या त्या व्यक्तीच्या धाकट्या भावाची व माझी ओळख होती, म्हणून मी त्याला एकीकडे गाठून त्याच्या थोरल्या भावाच्या चारित्र्याविषयी त्याला विचारले काही वेळ तर त्याने मला काहीच पत्ता लागूं दिला नाही, पण अखेरीस तो म्हणाला, "वडील भावाचे दोष मी कसे सागूं बरे?" हे ऐकून मी समजलो की, येथे खास काही तरी पाणी मुरत आहे! पुढे त्याच्या घरातील दुसऱ्या एका ओळखीच्या मनुष्याकडून साऱ्या गोष्टी मला कळल्या व तो मनुष्य खरोखरच वाईट वर्तनाचा आहे अशी माझी खात्री होऊन, माझ्या आश्चर्याला सीमा उरली नाही

योगेंद्र हा श्रीरामकृष्णाचा एक अत्यंत अनुगत भक्त होता. एक दिवस तो दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या दर्शनास गेला व सध्याकाळपर्यंत तेथेच राहिला. संध्याकाळ झाली व आलेली सर्व मडळी आपापल्या घरी निघून गेली रात्रीं श्रीरामकृष्णाच्या सेवेस कोणीच उरले नाही, असे पाहून, त्यानें रात्री तेथेच राहण्याचे ठरविलें रात्रीं दहा वाजेपर्यंत ईश्वरीय कथालाप झाल्यावर श्रीरामकृष्णानी फराळ केला व योगेंद्राला आपल्याच खोलीत निजावयास सागून,

आपण स्वतःहि बिछान्यावर पडले. बारा वाजावयाच्या सुमारास श्रीरामकृष्णांना शौचास लागली व योगेंद्राला गाढ झोप लागली आहे असें पाहून, त्याला न उठवता ते एकटेच पंचवटीकडून झाउतलाकडे निघून गेले ते गेल्यावर थोडयाच वेळांत योगेंद्र जागा झाला व पाहतो तो खोलीचे दार उघडे असून श्रीरामकृष्णहि बिछान्यावर नाहीत! कदाचित् व्हराडयात फिरत असतील असे वाटून त्याने बाहेर येऊन पाहिले, पण तेथेहि कोणी दिसेना. पोर-वयच ते, त्याच्या मनात एक भयंकर संशय आला —तर मग काय श्रीरामकृष्ण नौबतखान्यांत आपल्या पत्नीकडे गेले असावे की काय? मग काय, श्रीराम-कृष्णांच्याहि बोलण्यात आणि वागण्यात मेळ नाही की काय?

या भयंकर संशयपिशाच्चाने झपाटल्यामुळे योगेंद्राचें मन अत्यंत अस्वस्थ झालें व त्याने आपल्या संशयाची पूर्ण निवृत्ति करून घेण्याचा बेत केला तो बाहेर आला व नौबतखान्याच्या दाराकडे लक्ष लावून पाहात, व्हरांडयांत उभा राहिला काही वेळाने पंचवटीच्या बाजूने जोडयाचा चटचट आवाज आला व तिकडे डोळे फिरवून पाहतो तों श्रीरामकृष्ण! त्यांनी त्याला तेथे उभा असलेला पाहून विचारलें,—"काय रे? तूं इथे उभा राहून काय करीत आहेस?" श्रीरामकृष्णाना पंचवटीच्या बाजूने येताना पाहून व हा त्याचा प्रश्न ऐकून योगेंद्र अगदी गोंधळून गेला व आपण हा काय भलताच संशय मनात आणला व आपण आज केवढा घोर अपराध केला, असा विचार मनांत येऊन त्याच्या अंगाला दरदरून घाम सुटला, पाय लटपटूं लागले व त्याच्या तोंडांतून एक शब्दहि बाहेर निघेना त्याच्या तोंडाकडे पाहाताच, इतका वेळ त्याचे मनात कसला गोंधळ चालला होता, तें सर्व श्रीरामकृष्णांच्या तेव्हांच लक्षात आलें व यत्किंचितहि न रागावता, त्याच्याकडे पाहून हसत हसत ते म्हणाले, "ठीक ठीक, साधूला दिवसा पाहावें, रात्रीं पाहावे, तेव्हांच त्याच्यावर विश्वास ठेवावा!" असें म्हणून त्याला आपल्या खोलीकडे येण्यास खूण करून ते आपल्या खोलीकडे वळले! आपण आज केवढा भयंकर अपराध केला, या विचाराने योगेंद्राला मात्र रात्रभर झोप लागली नाही! असो.

वरील विवेचनावरून त्याच्या शिष्यपरीक्षेची व शिष्यांच्या चिकित्सकपणाची थोडीशी कल्पना येईल शिष्य गुरूच्या परीक्षेंत उतरला म्हणजे त्याचें काम झालें मग त्याच्या उद्धाराची, त्याच्या कल्याणाची सर्व काळजी त्याच्या गुरूला लागली ! अशा प्रकाराने पारखून घेतलेल्या मंडळीवर श्रीरामकृष्णाचें काही विलक्षण प्रेम असे ! त्याची यथार्थ कल्पना करून देणें अशक्य आहे, तरी पण पुढील प्रकरणावरून त्याची थोडीफार कल्पना वाचकास येईल.

---

# ११. श्रीरामकृष्णांचा शिष्यस्नेह

"एखाद्यावर निष्काम प्रेम असें तेच ( श्रीरामकृष्ण ) करूं जाणत व करीत इतर सर्वजण स्वार्थासाठी, प्रेमाचे नुसतें वरवर प्रदर्शन मात्र करीत असतात!"

—स्वामी विवेकानंद

---

लहानपणापासूनच श्रीरामकृष्णाचा स्वभाव अत्यत प्रेमळ आणि सहानुभूतिसंपन्न असे बारा वर्षाच्या अपूर्व तपश्चर्येनतर ते जेव्हा गुरुपदवीवर अधिष्ठित झाले तेव्हा तर त्याच्या या प्रेमळ आणि सहानुभूतिसपन्न स्वभावाला प्रचड भरती आली! आपल्याकडून दुसऱ्याचें कल्याण कसे होईल, आपल्याला प्राप्त झालेले अनुभव दुसऱ्याना कसे प्राप्त करून देता येतील, हाच एक ध्यास त्याना लागला त्याच्या अपूर्व शिष्यस्नेहाचें बीज याच ध्यासात होते

श्रीरामकृष्णाच्या शिष्यस्नेहाला उपमा, केवळ आईच्या अपत्यावरील प्रेमाचीच! त्याच्या त्या सर्वग्रासी प्रेमात जे सापडत, ते त्याना कायमचे विकले जात! श्रीरामकृष्णाच्या सहवासावाचून व त्याच्याविषयीच्याच गप्पागोष्टीवाचून त्याना दुसरें काही सुचत नसे! आपल्या शिष्याच्या पारमार्थिक कल्याणाचीच नव्हे, तर ऐहिक कल्याणाचीहि त्याना काळजी लाग! एका शिष्याची आय कमी होऊन त्याच्या खर्चाची ओढाताण होऊ लागली, श्रीरामकृष्णाच्या कानावर ही गोष्ट गेल्यावर, एके दिवशीं आपल्या इतर भक्तमंडळीशीं बोलत असतां ते कळवळ्याने म्हणाले,—"अरेरे! त्याचा खर्च त्याच्या मिळकतींत भागत नाही, तुम्ही कोणी त्याला मदत कराल काय!" एखाद्याची प्रकृति

ठीक नसली तर श्रीरामकृष्णाना काळजी! तो काही दिवस दक्षिणेश्वरी आला नाही, तर त्याच्याबद्दल ते लगेच चौकशी करीत! एकदा 'एम्'* बरेच दिवसात त्याच्याकडे गेले नाहीत तेव्हा एकजणाजवळ ते म्हणाले, " अलीकडे तो इकडे आला नाही तो ? त्याला इथला कंटाळा आला की काय ? " आपल्या दर्शनास आलेल्या मडळीत कोण पायी आले, कोण नौकेतून आले, कोग गाडीतून आले, याची ते चौकशी करीत व पायी आलेल्या व भाडयासाठी पैसे खर्चण्याची ऐपत नसलेल्या भक्तास, परत जाताना एखाद्या श्रीमंताच्या गाडीत बसवून देत! नौकेंतून परत जाणाऱ्यासाठी, कधी कवी स्वत घाटावर जाऊन नौका पाहात बसत!! एखाद्याची परत जाण्याची काहीच सोय होत नसून, आता त्याला पुन्हा पायीच परत जावे लागते असे दिसल्यास, कवी कधी त्याला नौकेसाठी जवळचे पैसे देऊन, कुठे उतरावें तेंहि सागत!! आपल्या भक्तमडळीत कोणाला काय आवडते, ते सारे त्याना ठाऊक असे व त्याना कोणी कोणी आणून दिलेल्या जिन्नसापैकी ज्याच्या आवडीचा जो असे, तो त्याच्यासाठी नेमका वेगळा काढून ठेवीत व आल्यावर त्यास देत अथवा कोणाबरोबर त्याचेकडे पाठवून देत!! सर्वच भक्तावर त्याचें जरी अत्यत प्रेम असे तरी नरेंद्र, नारायण, पूर्ण, राखाल वगैरे मुलावर त्याचें जे गाढ प्रेम असे, ते काही विलक्षणच! ते जर दक्षिणेश्वरी काही दिवस आले नाहीत, तर श्रीरामकृष्ण खरोखरच रडत बसत, आणि जगदबेची प्रार्थना करीत, " आई, त्याला इकडे घेऊन ये! " ज्या भक्ताच्या भेटीसाठी त्याना अशा प्रकारची व्याकुळता वाटत नसे, तो आपला अंतरंगभक्त नव्हे असे ते समजत! एक दिवस एकजण म्हणाला, " (अमक्याला) आपल्या भेटीला आज बरेच दिवसात येता आलें नाही, म्हणून फार वाईट वाटत आहे इकडे कधी येतो, असें त्याला झाले आहे! " हें ऐकून श्रीरामकृष्ण म्हणाले, " पण मला वाटते तो इथला अंतरंग भक्त नसावा, कारण त्याच्या भेटीबद्दल मला कधी

---

* महेन्द्रनाथ गुप्त (मास्तर महाशय) श्रीरामकृष्णाचे हे शिष्य 'एम्' या नांवाने प्रसिद्ध आहेत.

रडूं आलें नाही ते ?" प्रत्यहीं पहाटे उठून, आपल्या भक्तांच्या कल्याणासाठी ते जगदंबेची प्रार्थना करीत !

आपल्या शिष्याचे सर्व बाजूनी कल्याण व्हावें, म्हणून कवी कधी स्वत ला आवडत नसलेली गोष्ट सुद्धा त्याच्यासाठी करण्यास ते तयार होत ! श्रीसमर्थांचा जसा भोलानाथ, तसा त्याचा एक लाटू ( पुढे स्वामी अद्‌भुतानंद ) म्हणून शिष्य होता तो अगदी निरक्षर असे सदैव श्रीरामकृष्णाची मनोभावाने सेवा करावयाची, एवढेंच त्याला ठाऊक असे त्याला श्रीरामकृष्णानी कितीदा तरी सांगावें की–" अरे, तूं काही लिहावाचायला शीक, " पण त्याने तिकडे मुळीच लक्ष देऊं नये एक दिवस श्रीरामकृष्णानी मूळाक्षराचे एक पुस्तक मुद्दाम आणवून स्वत त्याला शिकविण्यास सुरुवात केली ! ! पण शिकण्याचे बाबतींत शिष्याने गुरूवरहि ताण केली ! श्रीरामकृष्णानी अक्षरावर बोट ठेऊन म्हणावें– " हं, म्हण ' क ', ' ख ', ' ग ', ' घ ', ' ङ, ' " शिष्याने म्हणावे–' का ', ' खा ', ' गा ', ' घा ', ' ङा ', " श्रीरामकृष्णानी पुन्हा म्हणावें, " अरे ' का ' नव्हे–' क ', " पण शिष्याने पुन्हा, बरोबर पहिल्यासारखाच ' का ' उच्चार करावा ! शिष्याचें हे विचित्र उच्चार ऐकून श्रीरामकृष्णाची हसता हसता मुरकुंडी वळली त्याचा उच्चार बरोबर यावा म्हणून श्रीरामकृष्णानी जंग जंग पछाडलें, पण त्याचा तो ' का ' ' खा ' काही केल्या सुटेना ! अखेरीस कंटाळून जाऊन– ' जा लेका, तुझ्या नशीबांत विद्याच नाही ! " असें म्हणून निराशेने त्यांनी त्याला शिकवण्याचा नाद सोडून दिला !!

त्याच्या शिष्यप्रेमाचे कितीहि वर्णन केले तरी ते पुरे होणार नाही. नरेंद्राची हकीकत पुढे येईलच, त्यावरून श्रीरामकृष्णाच्या शिष्यप्रेमाची आणखी थोडीफार कल्पना येईल. शिवाय खालील प्रसंग पहा—

× × × ×

श्रीरामकृष्ण आपल्या खोलींत, महिमाचरण, राखाल, ' एम् ' व आणखी एक दोघेजण याच्याशीं बोलत बसले आहेत —

**श्रीरामकृष्णः**—" बरं तर, केदारबद्दल तुला काय वाटते ? त्याने दूध नुसते पाहिलें आहे, की, चाखलें आहे ? "

**महिमाचरणः**—" मला वाटते की त्याने चाखले आहे, त्याने आनंदाचा अनुभव घेतला आहे "

**श्रीरामकृष्णः**—" आणि नृत्यगोपाल ? "

**महिमाचरणः**—" वा ! छान मनुष्य ! "

**श्रीरामकृष्णः**—" आणि गिरीश ( घोष ) ? तो कसा काय आहे ? "

**महिमाचरण**—" तो चांगला आहे, पण त्याची तऱ्हा निराळी "

**श्रीरामकृष्ण**—" आणि नरेन् ? "

**महिमाचरण**—" माझी पंधरा वर्षांपूर्वी जी अवस्था होती, ती आज त्याची आहे "

**श्रीरामकृष्ण**—" आणि छोटा नरेन् ! किती सरळ स्वभावाचा आहे ? "

**महिमाचरण**—" हां, फारच सरळ स्वभावाचा "

**श्रीरामकृष्ण**—" ठीक बोललास. ( विचार करीत ) आणिक कोण कोण बरं ?—

ही जीं सारीं मुले इथे येतात, त्यानी दोन गोष्टी जाणल्या म्हणजे झाले; मग त्याना फारशा साधना करायला नकोत. पहिली गोष्ट–' मी कोण, ' आणि दुसरी गोष्ट ' ते कोण. ' या मुलातलीं बरीचशीं मुले अंतरंग भक्त दिसताल अंतरंग भक्ताना मुक्ति नाही. या मुलाना पाहून माझा प्राण शीतल होतो. ज्याना मुलेंबाळें झाली आहेत, जे नेहमी सरकार दरबार करीत हिंडताल, कामिनीकांचनांत गुरफटलेले

असतात, त्यांना पाहून कसा आनंद व्हावा ? सुद्धात करणाऱ्या माण-
साना पाहिल्यावाचून कसे जिवंत राहावे ? ”

× × × ×

‘एम्’ शी गप्पागोष्टी करीत श्रीरामकृष्ण पचवटीपर्यंत गेले तेथे हातातली छत्री खाली ठेऊन, खाली बसले छोट्या नारायणला ते साक्षात् नारायण समजत, म्हणून त्याचेवर त्याचे अतिशय प्रेम नारायण ‘ एम् ’ च्या शाळेंत शिकत असे

**श्रीरामकृष्ण** —“ नारायणचा स्वभाव कसा आहे, पाहिलास ना ? लहानात, मोठयात, सगळ्यात तो मिसळतो, आणि साऱ्याना तो हवासा वाटतो ! अगी काही विशेष शक्ति असल्यावाचून हे शक्य नाही, आणि स्वभाव किती सरळ ? नाही ? ”

**एम्** —“ खरेच महाराज, फारच सरळ ? ”

**श्रीरामकृष्ण** —“ तुझ्या घरी तो कधी आला होता काय ? ”

**एम्** —“ होय, एकदोनदा आला होता ”

**श्रीरामकृष्ण** —“ तूं त्याला एक रुपया देशील की कालीला सागूं ? ”

**एम्** —“ नको, मीच देईन ”

× × ×

श्रीरामकृष्ण आपल्या खोलींत बसले आहेत, ‘ एम् ’ ला म्हणतात—

**श्रीरामकृष्ण** —अलीकडे तुझी आणि नरेंद्राची भेट झाली नाही ?”

**एम्** —“ नाही महाराज, अलीकडे बरेच दिवसात झाली नाही ”

**श्रीरामकृष्ण** —“ एक दिवस त्याला भेटना ? आणि गाडी करून त्याला इकडे घेऊन ये ( हाजराला ) त्याचा आणि माझा काय संबंध आहे साग पाहूं ?”

**हाजरा** —" आपल्या साहाय्याने त्याची उन्नति होईल "

**श्रीरामकृष्ण** —" आणि भवनाथ ? पूर्वसंस्कारावाचून तो इथे इतका आला असता काय ?

" तसेंच हरीश. लाटू नुसते ध्यानच करतात, हे कसे ? हरीपद, त्या दिवशी इथे आला होता, तुला भेटला होता काय ? "

**एम्** —हरिपद भजन किती छान करतो ? प्रल्हादचरित्र, श्रीकृष्णजन्म, हे सर्व सुदर आवाजात गाऊन दाखवितो ! "

**श्रीरामकृष्ण** —" खरे ? त्या दिवशीं त्याचे डोळे पाहिले, जसे चढलेले दिसत होते ! त्याला म्हटलें,-' काय रे ? तूं अलीकडे ध्यानबीन फार करीत असतोस, वाटतें ? ' त्याने मान हलवून ' हो ' म्हटले तेव्हा मी म्हणालो-' फार झाले, इतके करू नये ' ( ' एम्‌ला ' ) बाबूराम म्हगतो-' ससार ? अरे बापरे ! ' "

**एम्** —पग महाराज, ही नुसती ऐकलेली गोष्ट बाबूरामला ससाराचा काय अनुभव आहे ? "

**श्रीरामकृष्ण** — ' हा, तसे तर खरेच, निरंजनाला पाहिलेस ना ? किती सरळ स्वभावाचा मुलगा ! "

**एम्** —" होय, त्याचा चेहराच मुळी आकर्षक आहे डोळे सुद्धा किती सुदर आहेत ? "

**श्रीरामकृष्ण** —" नुसते डोळेचसे काय, सगळेच ! त्याच्या लग्नाची बोलणी निघालीं तेव्हा तो घरच्या मडळींना म्हणाला, ' मला उगीच का ( ससारांत ) बुडवता ? ' ( ' एम् ' कडे पाहून हासत ) पण काय रे ? लोक तर म्हणतात की, खूप कामबीम करून घरी गेल्यावर बायकोजवळ बसून चार गप्पागोष्टी केल्या म्हणजे फार आनद होतो ? नाही ? "

**एम्** —" ज्याच्या मनात बायकोचेच विचार घोळत असतील, त्याला होत असेल ( राखालकडे पाहून ) ही बहुतेक माझी परीक्षा ( cross examination ) चालली आहे ! "

× × × ×

श्रीरामकृष्ण 'एम्' शी बोलत आहेत जवळ तेजचद्र, बलराम, नारायग वगैरे मंडळी आहेत पूर्णचंद्राची गोष्ट निघाली तो अलीकडे दक्षिणेश्वरी आला नव्हता तो कधी येऊन भेटेल असे श्रीरामकृष्णाना झाले होतें

**श्रीरामकृष्ण** —( 'एम्' ला ) " तो आता कधी येऊन मला भेटेल ? त्याची आणि द्विजची तूं गाठ घालून दे एकाच क्याच्या आणि एकाच विचाराच्या लोकाची मी गाठ घालून देत असतों, म्हणजे त्या योगाने दोघाचीहि उन्नति होते पूर्णचा स्वभाव कसा प्रेमळ आहे पाहिलेंस ना ? "

**एम्** —होय, मी ट्रॅममध्ये बसून येत होतो मला पाहून घरातून रस्त्यावर धावतच आला, आणि मला नमस्कार केलान् ! "

हे ऐकताच श्रीरामकृष्णाचे डोळे अश्रूंनी भरून आले ते म्हणाले, " ईश्वरदर्शनाची व्याकुलता असल्याशिवाय असे व्हायचे नाही ! "

× × × ×

पूर्णचें वय पधरा-सोळा वर्षाचे असेल 'एम्'च्या शाळेंत तो शिकत असे कोणी सद्गुणी व भाविक मुलगा पाहिला, म्हणजे त्याला 'एम्' श्रीरामकृष्णाच्या दर्शनास नेत त्याच्याबरोबर पूर्ण प्रथमच गेला, तेव्हापासून श्रीरामकृष्णाना तो फार आवडू लागला पूर्णलाहि श्रीरामकृष्णांच्याच दर्शनाचा एकसारखा ध्यास लागलेला असे परतु घरातील मंडळी त्याला वरचेवर दक्षिणेश्वरीं जाऊ देत नसत त्याची भेट व्हावी म्हणून प्रथम प्रथम श्रीरामकृष्ण इतके व्याकुळ होत की, एक दिवस रात्रींच दक्षिणेश्वराहून 'एम्'च्या घरीं आले ! त्या तेवढ्या रात्री 'एम्' पूर्णच्या घरीं गेले व त्याला घेऊन आले ! त्याला पाहून श्रीरामकृष्णांना

अत्यंत आनंद झाला व तेथेच त्याला ईश्वराची प्रार्थना कशी करावी, वगैरे उपदेश करून, ते परत दक्षिणेश्वरी निघून गेले ! !

× × × ×

आणखी एक दिवस इतर भक्तमंडळीविषयी 'एम्'जवळ गप्पागोष्टी करीत असता ते म्हणाले, " पूर्णची आणखी एक दोन वेळ भेट झाली, म्हणजे माझी व्याकुळता कमी होईल किती चतुर आहे तो ? आणि माझ्यावर भक्ति तरी केवढी ! " तो त्या दिवशी म्हणत होता, " आपल्या भेटीसाठी मन किती व्याकुळ होते ते काय सांगू ? " ( 'एम्'ला ) त्याच्या घरच्या माणसानी तुझ्या शाळेतून त्याला काढून घेतला आहे, याने तुझ्यावर तर काही ठपका येणार नाही ना ?

**एम्** —" जर ( विद्यासागर ) मला म्हणतील, की तुमच्यामुळे त्याला शाळा सोडावी लागली, तर त्याला माझ्याजवळ उत्तर आहे "

**श्रीरामकृष्ण** —" तूं काय म्हणशील ? "

**एम्** —" मी म्हणेन साधुसंगतींत ईश्वराचेंच चिंतन घडतें, ही काही वाईट गोष्ट नाही आपणहि आपल्या पुस्तकात लिहिले आहे की, ईश्वराची अंत करणापासून भक्ति करावी ! " ( श्रीरामकृष्ण हासतात )

**श्रीरामकृष्ण** —" कप्तानच्या घरी छोटया नरेंद्राला बोलावून घेतले त्याला म्हटले-' तुझे घर कुठे आहे ? चल जाऊं ? ' तो म्हणाला 'चला, या, असे इकडून या, ' पण भीतभीतच चालू लागला ! कदाचित् बापाला समजले तर ? म्हणून ! ( सगळे हासतात ) ( एका भक्ताला ) 'कारे ! तू अलीकडे बरेच दिवसात आला नाहीस ? सात आठ महिने होऊन गेले असतील ? "

**भक्त** —" होय महाराज, एक वर्ष होऊन गेलें. "

**श्रीरामकृष्ण** —" तुझ्याबरोबर आणखी एकजण येत असे, काय नाव त्याचें ? "

**भक्त** —" नीलमणी "

**श्रीरामकृष्ण** — " हा, नीलमणी तोहि अलीकडे आला नाही. त्याला एकदा येऊन जायला साग, बर का ? "

× × ×

श्रीरामकृष्ण आज बलरामाच्या घरी आले होते तिसरे प्रहरची वेळ. आज उष्मा फार होत होता !

**श्रीरामकृष्ण** —( 'एम्'ला ) "त्या दिवशी बोलून गेलो, तीन वाजता येईन, म्हणून आलो, पण उकडते आहे कोण ? "

**एम्** —" खरंच, आपल्याला फार त्रास होत असेल ! "

**श्रीरामकृष्ण** — " छोटा नरेन् आणि बाबूराम याच्यासाठी आलो. पूर्णला का घेऊन आला नाहीस ? "

**एम्** —" त्याला मडळीत यायचे मोठे भय वाटते उगीच आपण चार चौघात त्याची प्रशसा कराल, आणि मग ही सारी गोष्ट घरच्या मंडळीच्या कानावर जाइल, असे त्याला वाटते "

**श्रीरामकृष्ण** —" हा असे तर खरेच, तू पूर्णला धर्मासबधी गोष्टी सागत असतोस हे ठीक आहे . त्याची लक्षणे मोठी छान आहेत "

**एम्** —" होय, डोळे कसे पण उज्ज्वल आहेत ? "

**श्रीरामकृष्ण** —" नुसते उज्ज्वल असले म्हणजे झाले नाही देवचक्षु काही निराळेच असतात तू त्याला विचारलेंस ना ? मग तो काय म्हणाला ? "

**एम्** —" आज चार पाच दिवस तो म्हणतो आहे की, ईश्वराचे चिंतन किवा नामस्मरण केले म्हणजे अगावर रोमाच उभे राहातात ! "

**श्रीरामकृष्ण** —" काय म्हणतोस ? आणिक काय पाहिजे बाबा ? ( पल्टूला ) तू आपल्या वडिलाना काही उत्तर दिलेस म्हणे ! ('एम्'ला)

इथे येण्याच्या गोष्टीवरून याने आपल्या वडिलाना उलट उत्तर दिलें ! काय म्हणालास बाबा तू ? ”

**पल्टू** —“ मी म्हणालो ‘ हो, हो, मी त्याच्याकडे जात असतो, मग यात एवढा अपराध काय झाला ? ’ (श्रीरामकृष्ण व ‘ एम् ’ हासतात) आणखी पुन्हा वेळ आली तर याच्यापेक्षा जास्त बोलीन ! ”

**श्रीरामकृष्ण** —“ ( हसत ) छे, छे, असे करूं नये, तूं तर फार पुढे गेलास ! ( विनोदला ) तुझे कसे काय आहे बाबा ? ”

छोटा नरेंद्र आला श्रीरामकृष्ण हातपाय धुण्यास जात आहेत छोटा नरेंद्र हातरुमाल घेऊन त्याना पाणी देण्यास बरोबर जात आहे बरोबर ‘एम्’हि आहे छोटा नरेंद्र व्हराडयाच्या एका बाजूला श्रीरामकृष्णाचे पाय धूत आहे

**श्रीरामकृष्ण** —“ ( ‘एम्’ला ) काय उष्मा होत आहे ! तूं त्या एवढयाशा घरात कसा राहतोस कुणाला ठाऊक ! माडी तापत नाही का ? ”

**एम्** —“ होय महाराज, फारच तापते ”

**श्रीरामकृष्ण** —“ म्हणूनच तुझ्या बायकोला डोकेदुखी लागली बरं ! तिला खाली का बसायला सांगत नाहीस ? ”

**एम्** —“ घरात दुसरें कोणी नव्हते, शिवाय तिची डोकेदुखी, पाहायला कोणी नव्हते ”

श्रीरामकृष्णाना पुन्हा पूर्णची आठवण झाली

**श्रीरामकृष्ण**—"तू आज त्याला का घेऊन आला नाहीस? तो खरोखरच भक्त आहे, नाहीतर त्याच्यासाठी माझा प्राण व्याकुळ झाला नसता आणि त्याच्यासाठी बीजमत्राचा जपहि झाला नसता!"

श्रीरामकृष्णानी पूर्णसाठी बीजमंत्राचा जप केल्याचे ऐकून 'एम्' चकितच होऊन गेले! काय हें शिष्यप्रेम! (देवेद्राला) "एक दिवस तुझ्या घरी यावें म्हणतों"

**देवेंद्र**—"तीच आपगाला विनंति करायला इथे आलो!"

**श्रीरामकृष्ण**—"ठीक, पण फारशी मडळी बोलावूं नको बरे, तुझी मिळकत कमी, शिवाय गाडीभाडेहि फार आहे"

**देवेंद्र**—(हसून) "मिळकत कमी असली तर असली! 'ऋणं कृत्वा घृत पिबेत्!"

हे ऐकून श्रीरामकृष्ण एकसारखे हासूं लागले त्याना हसे आवरेना!

× × ×

असे अनेक प्रसंग सागता यतील मडळी जमली की, साऱ्याजणाची चौकशी व्हावयाची कोण काय करतो, ध्यान, भजन, जप कोणाचा कसा चालला आहे, कोणी आला नसेल तर तो का—वगैरे सर्व चौकशी व्हावयाची. ते अमुक दिवशी अमुक भक्ताच्या घरी यावयाचे आहेत, असें अगोदरपासूनच ठरलेलें असे, त्यामुळे मंडळीहि बिनचूक तेथे जमत एखादा आला नसल्यास श्रीरामकृष्ण त्याला बोलावून आगण्यास सागत! सर्व मडळी जमली म्हणजे मग भजन वगैरे होऊन फराळ झाल्यावर बैठक खलास होई

भक्तमडळीना असा विश्वास असे की, एखादी विशेष अवस्था अथवा दर्शन प्राप्त करून घ्यावयाचे असेल, तर श्रीरामकृष्णाच्या जवळ हट्ट धरला

म्हणजे झाले ! श्रीरामकृष्णहि त्याबद्दल त्याची किती आतुरता आहे ते प्रथम पुरे अजमावून घेत आणि त्याला खरोखरच तळमळ लागली आहे असे दिसले, म्हणजे मग काय करावयाचे ते करीत मग त्याला ती अवस्था प्राप्त होईपर्यंत त्याच्या जिवाला चैन नसे

एकदा, बाबूरामला ( स्वामी प्रेमानद ) आपल्याला भावसमाधि प्राप्त व्हावी अशी फार इच्छा झाली श्रीरामकृष्णाकडे जाऊन त्यानी फारच आग्रह धरला की " महाराज, मला भावसमाधि मिळालीच पाहिजे " श्रीरामकृष्णानी त्याची तळमळ अजमावून पाहण्यासाठी नेहमीप्रमाणे उडवा-उडवीची उत्तरें देऊन जेव्हा पाहिलें की, हा काही ऐकत नाही, तेव्हा ते म्हणाले, " बर बुवा, आईजवळ गोष्ट काढतो, माझ्या इच्छेने काय होतय् ? " ही गोष्ट झाल्यावर काही दिवसानी बाबूराम आपल्या गावी काही कामासाठी निघून गेला इकडे श्रीरामकृष्णाना काळजी लागली ! बाबूरामला भावसमाधि कशी मिळवी ? ज्याच्या त्याच्याजवळ बोलू लागले—" भावसमाधीबद्दल त्याने इथे माझ्याशी किती वाद घातलान्, किती रडारडी केलीन्, अन् किती हट्ट धरलान् आणि त्याला जर ती मिळाली नाही, तर तो पुन्हा मला मानणार नाही, काय करावे ? " एक दिवस तर आईची प्रार्थना करीत बसले—" आई ! बाबूरामाला थोडा फार भावबीव होईल असे काही कर " श्रीजगदंबेने त्याना सागितलें की, " त्याला भाव व्हायचा नाही, त्याला ज्ञान मिळेल ! " श्रीजगदंबेची वाणी ऐकून त्याना पुन्हा काळजी ! त्यानी आपल्या भक्तापैकी कोणा कोणाजवळ म्हणून दाखविलें–" बाबूरामाबद्दल आईला सागितले, पण ती म्हणते–" त्याला भाव मिळायचा नाही, ज्ञान मिळेल ! " पण ते काही का होईना, त्याला काही तरी एक मिळून त्याच्या मनाला शाति मिळाली म्हणजे झाले ! त्याच्यासाठी मनाला कसेसेच होत आहे—बिचारा त्या दिवशी किती रडून गेला ! " वगैरे बाबूरामाला साक्षात् धर्मोपलब्धि व्हावी म्हणून श्रीरामकृष्णाना किती काळजी ! आणि त्याचे ते म्हणणे ?—" असे झाले नाही,

तर तो पुन्हा मला मानणार नाही ! " जणु काय बाबूरामाने मानणे न मानणें यावर त्याचे सर्व काही अवलबून होते !

एक दिवस एका भक्ताबरोबर बोलत असता, ते म्हणाले, " पण तूं साग पाहू, ( बालभक्ताकडे बोट दाखवून ) या साऱ्याच्याबद्दल मला एवढी काळजी का वाटावी बरे ? पहायला गेले तर ही सारी शाळेतली पोरे; स्वत काही करू म्हणतील तर एकाची ताकद नाही, की एक पैसा माझ्यासाठी खर्च करायची शक्ति नाही, मग याची एवढी काळजी मला का लागावी ? एखादा जरा एक दोन दिवस आला नाही तर त्याच्यासाठी प्राण जसा कासावीस होतो आणि तो कधी भेटेल असे होऊन जाते ! असे का व्हावें बुवा ? "

**भक्त** —" असे का होते हे, महाराज, मी कसे सागावे ? त्याच्या कल्याणाच्या काळजीमुळेहि असे होत असेल ! "

**श्रीरामकृष्ण** —" त्याचे कारण असे आहे की, ही सारी मुले शुद्धसत्व आहेत अजूनपर्यंत कामकाचनाचा त्याना विटाळ झालेला नाही याचे जर ईश्वराकडे लक्ष लागेल, तर याना त्याचा लौकर लाभ होईल,—म्हणून मागे मागे नरेंद्राबद्दल जी काय व्याकुळता वाटे ती कांही विलक्षणच तशी दुसऱ्या कोणाबद्दलहि लागली नाही त्याला इथे यायला कधी दोन दिवस उशीर झाला तर प्राण कासावीस होई ! लोक काय म्हणतील, असे वाटून तिकडे झाउतला-कडे जाऊन मनमुराद रडत बसे ! हाजरा एक दिवस म्हणाला, ' हा काय तुमचा स्वभाव ? तुम्ही परमहस, तुम्ही म्हणजे सर्वकाळ समाधि लावून ईश्वराशी एक होऊन राहावयाचे, तर तें नाही. ' नरेंद्रच का आला नाही ? ' ' भवनाथाचेच कसं होईल ? ' ह्या पचाइती करून तुम्हाला करायचे आहे काय ?' "

हें ऐकून वाटले–" खरेच हाजरा म्हणतो ते काही खोटे नाही, आता आपण त्याच्याच सागण्याप्रमाणे करावे " यानतर झाउतलाकडून येत असता आईने दाखविले की, कलकत्ता समोर आहे आणि लोक सारे रात्रदिवस काम-काचनात गटागळ्या खात दु खे भोगीत आहेत !! त्याची ती दशा पाहून दया आली आणि वाटले की, वाटेल तितके कष्ट सोसून जरी याचे कल्याण करिता येईल, याचें दु ख थोडे तरी कमी करता येईल तरी ते करीन !" परत आल्या-वर हाजराला म्हणालो–" मी करतो ते ठीक करतो, या पोराची काळजी केली, तर तुझे रे काय गेले साल्या ? "

आपल्या शिष्यमडळीवर त्यांचें जसे अपार प्रेम अस, तसेच इतर सर्वा-विषयी त्यांच्या मनात नेहमी दया भरलेली असे सर्व अवस्थातून ते स्वत· गेले असल्यामुळे इतराच्या सुखदु खाची त्याना जाणीव असे मनुष्याचे मन किती दुर्बल आहे व मायेच्या तडाख्यातून सुटग किती कठीण आहे, हे त्याना माहित असल्यामुळे, दुसऱ्याविषयी त्याचे हृदय नेहमी सहानुभूतिसपन्न असे म्हणून मनुष्याच्या अगी कितीहि दुर्गुग असले, कितीहि दोष असल, तरी ते त्याचा कधीहि तिरस्कार करीत नसत त्याच्या कोशात पाप हा शब्दच नव्हता म्हटले तरी चालेल ! माणसाच्या हातून होणाऱ्या सर्व चुका त्याच्या मानसिक दुर्बलतेमुळे होतात, ही दुर्बलता काढून टाकण्याचा त्याने प्रयत्न करावा, म्हणजे त्याच्यावर ईश्वर कृपा करील, असे त्याचे सागणे असे कोणीहि आपल्या दु खाची कहाणी त्याच्याकडे घेऊन गेल्यास, ते त्याला हिडिस फिडिस करीत नसत, तर आपल्या स्वत च्या आयुष्यातील एखादा तसाच प्रसग सागून,—'माझीहि त्यावेळी तुझ्याच सारखी स्थिति झाली होती परतु आईने मला यातूनहि निभा-वून नेले तू ईश्वरावर पूर्ण भरवसा ठेव, तो तुलाहि यातून निभावून नेईल " असा त्याला उलट धीर देत ! या आश्वासनाने आणि प्रेमळ वर्तनाने त्या मनुष्याला किती धीर वाटत असेल व श्रीरामकृष्णावरील त्याची भक्ति आणि प्रेम किती पटीने वाढत असतील याची कल्पनाच करावी !

त्याच्याकडे येणाऱ्या जाणाऱ्या मंडळीपैकी मणिमोहन मल्लिक नावाच्या एका गृहस्थाच्या कर्त्यासवरत्या मुलाला एकाएकी देवाज्ञा झाली बिचारा मणिमोहन दु खाने अगदी वेडा झाला आणि मुलाचा अंत्यविधि उरकल्यावर, त्याने तशीच दक्षिणेश्वरी धाव घेतली श्रीरामकृष्णाच्या भोवती अनेक मंडळी बसलेली असून, काही ईश्वरीय कथालाप चालला होता मणिमोहन त्याना नमस्कार करून, अत्यंत दु खित अंत करणाने, एका कोपऱ्यात खाली मान घालून बसला थोडयाच वेळात श्रीरामकृष्णाची दृष्टि त्याच्याकडे जाऊन ते म्हणाले, “ काय रे मणिमोहन, आज असा सुकलेला का दिसतोस ? ” मणिमोहनने सद्गदित होऊन उत्तर दिले, “ महाराज, आज माझा मुलगा वारला ” वृद्ध मणिमोहनच्या तोंडून ही बातमी ऐकून सर्वानाच फार वाईट वाटले व जो तो, आपापल्या परीने त्याचे सांत्वन करूं लागला श्रीरामकृष्ण मात्र नुसते शांत चित्ताने या सांत्वनाच्या गोष्टी ऐकत होते ! त्याचा हा उदासीन भाव पाहून एखाद्याला वाटलेहि असेल, “ याचे हृदय किती कठोर आहे ? ”

या सांत्वनाच्या गोष्टी ऐकता ऐकता श्रीरामकृष्णाना अर्धबाह्य अवस्था प्राप्त झाली आणि एकदम उभे राहून मणिमोहनकडे पाहात, ते अत्यंत वीरश्रीयुक्त स्वरात गाऊ लागले —

ऊठरे ऊठ । संग्राम कराया नीट ॥ धृ ॥
रणवेशाने यम येवोनी । हा बघ फिरतो तुझिया सदनी ।
यास्तव शस्त्रे सिद्ध करोनी ॥ ऊ० ॥
निजपुण्याचा रथ घ करूनी । भजन तपस्या हे हय जुपुनि ।
येइ गर्जना करित रणांगणी ॥ ऊ० ॥
सज्ज करी तूं ज्ञानधनूते । भक्ति बाण हा जोडी त्याते ।
ब्रह्म वस्तुवरी सोडी हाते ॥ ऊ० ॥
लक्ष्य बरोबर जरी वेधीशी । लाखो यम जरी येती रणाशी ।
सहज जिंकशी तरि तू त्यासी ॥ ऊ० ॥

गाण्याचा वीरत्वव्यंजक सूर, श्रीरामकृष्णाचा तदनुरूप अभिनय, त्याच्या नेत्रातून जगु बाहेर वाहणारे वैराग्याचे तेज, ही सर्व एकवटून सर्वांच्या अंत करणात, एक प्रकारचा अपूर्व उत्साह उत्पन्न होऊन, शोकमोहादिकाच्या राज्यातून निघून, सर्वाची मनें एका अपूर्व इद्रियातीत, ससारातीत अशा शुद्ध ईश्वरीय आनदात निमग्न होऊन गेली ! मणिमोहनची मुद्धा हीच अवस्था झाली, त्यालाहि आपल्या दु खाचा क्षणभर विसर पडला !

गाणे सपले परंतु गाण्याच्या रूपाने श्रीरामकृष्णानी जे दिव्य भावतरंग उत्पन्न केल होते, त्यानी त्या खोलीतील सारे वातावरण भरून गेले सर्व मंडळी तटस्थ होऊन, आता श्रीरामकृष्ण काय म्हणतात, या उत्कठेने त्याचेकडे पाहूं लागली थोड्या वेळाने श्रीरामकृष्णाची समाधि उतरली व मणिमोहनजवळ बसून ते बोलू लागले —

"बाबा मणिमोहन, पुत्रशोकासारखी दुसरी कोणतीहि ज्वाला नाही ! या देहापासूनच त्याचा जन्म झालेला, तेव्हा देह असेपर्यंत त्याची आठवण राहावयाचीच !" अशी प्रस्तावना करून, श्रीरामकृष्णानी आपल्या पुतण्याच्या—अक्षयच्या—मृत्यूची हकीगत अशा कळवळ्याने सागण्यास सुरुवात केली की, जगु काय तो प्रसग आत्ताच घडत आहे, असे साऱ्याना वाटले ! ते म्हणाले— "अक्षय वारला त्यावेळी काही इतके वाईट वाटले नाही मनुष्य कसा मरतो, हे उभें राहून नीट पाहिले तरवार म्यानात असावी आणि ती एकदम बाहेर काढावी तसे झाले ! तरवारीला काही झाले नाही, ती जशीच्या तशीच राहिली म्यान मात्र बाजूला पडले ! हे पाहून फार आनंद झाला—खूप हसलों, गायलो, नाचलो ! त्याचा अंत्यविधि होऊन गेला, दुसरे दिवशी ( व्हराड्याकडे बोट करून ) त्या तिथे सहज उभा होतों आणि काय सागू, अक्षयच्या मरणाचे एकाएकीं इतके दु ख होऊ लागले, की एखादा पिळा जसा पिळावा, तसे माझ्या काळीजाला कोणी पिळून काढत आहे की काय, असे वाटू लागलें ! प्राण कासावीस झाला आणि ते दु ख सहन न होऊन आईला म्हणं

लागलो, 'आई ! इथे तर नेसलेल्या धोतराचीहि शुद्ध नसते, असे असून सुद्धा जर माझी ही दशा, तर मग संसारी माणसाचे कसे होत असेल ?' "

काही वेळ थाबून ते पुन्हा म्हणू लागले, " तरी पण हे खास समज, की ज्यानी आपला भार ईश्वरावर ठेवलेला असतो, ते असल्या दारुण प्रसंगानेहि गडबडून जात नाहीत, थोडयाच वेळात ते पहिल्यासारखे होतात गगेतून एखादे मोठे जहाज गेलें म्हणजे लहानसान होडग्याची, मचव्याची कशी त्रेधा उडते ती पाहिलीस ना ? असे वाटते की, ही आता बुडतात ! एखाद्यात तर पाणी सुद्धा शिरते ! पण तेच मोठया हजारमगी गलबताचे पहा ! दोन चारदा हेलकावे खाऊन, ती पुन्हा आपली जशीच्या तशीच ! तरी पण त्याचे सुद्धा दोन चार हेलकावे चुकत नाहीतच ! "

पुन्हा काही वेळ थाबून, ते पुन्हा गभीरपणाने म्हणू लागले—" बाबा मणिमोहन, ससारात स्त्रीपुत्रादिकाशी सबध किती दिवस ? माणूस बिचारा मोठया आशेने ससार करायला लागतो लग्न झाले, चार मुलेबाळे झाली, तीं मोठी झालीं, त्याची लग्ने कार्ये झाली,–काहीं दिवस सारे ठीक चालले, मग, हा आजारी पडला, तो मेला, ह्याचा धंदा चालेना, त्याची नोकरी गेली,—या भानगडी सुरू झाल्या आणि मग ससार म्हणजे काय आहे, हे त्याला थोडे बहुत समजायला लागते पण मग काय उपयोग ? बिचारा अडकून पडलेला असतो, त्याला त्यातून निसटता येत नाही !"

अशा रीतीने संसाराची अनित्यता आणि ईश्वरालाच सर्वस्वी शरणागत होण्याची आवश्यकता, याविषयी त्यानी मणिमोहनला, त्या दिवशी नाना तऱ्हेने उपदेश केला या त्याच्या अत्यत प्रेमळ वर्तनाने मणिमोहनचे दु ख कमी झाले आणि सद्गदित होऊन तो म्हणाला— "म्हणून तर महाराज इथे धाव घेतली ! मला वाटलेच की, ही ज्वाला इथे आल्याशिवाय शात होणार नाही !"

म्हाताऱ्याची समजूत घालण्यासाठी श्रीरामकृष्णहि त्याचेबरोबर समदु खी झाले ! त्याच्या या वर्तनाचा मणिमोहनाच्या मनावर केवढा परिणाम झाला असेल ? एवढे श्रीरामकृष्णासारखे महापुरुष आणि ते सुद्धा आपल्या विषयी इतका आपलेपणा ठेवतात व आपल्या सुखदु खाची काळजी करतात, असे पाहून त्या म्हाताऱ्याला स्वत विषयी किती धन्यता वाटली असेल ?

आणखी एक दिवस, एक तरुण मुलगा, श्रीरामकृष्णाकडे आला आणि त्याच्या पाया पडून अत्यत खिन्न मुद्रेने त्याना म्हणाला, "महाराज, काम कसा नाहीसा होईल ? इतका प्रयत्न करतो, तरी सुद्धा मधे मधे कुविचारानी मन चचल होऊन अत्यत अस्वस्थ होऊन जाते काय करू ?

**श्रीरामकृष्णः**—बाबारे, ईश्वराचे साक्षात् दर्शन झाल्याशिवाय काम सर्वस्वी नाहीसा होत नाही यानतर सुद्धा थोडा फार असतो, पण मग तो आपले डोके वर काढू शकत नाही, इतकेच तुला काय वाटते की, मी त्या चाडाळाला एकदम जिकले ? एक दिवस मनात आले की आता आपण याला कायमचे जिकले, त्यानतर असा सहज पचवटीखाली बसलो होतो आणि काय सागू ? एकाएकी मनात कामाने अशी खळबळ माजवली, की, माझा सारा धीर सुटून गेला आणि मन आवरेनासे झाले ! ! तेव्हा जमीनीवर डोके हापटीत आणि मातीत तोड घासत, गडबडा लोळू लागलो आणि मोठमोठ्याने रडत म्हणू लागलो, " आई ! मी मोठा अपराधी आहे, आता पुन्हा कधीहि म्हणणार नाही, की या चाडाळाला जिकले, एक वेळ मला क्षमा कर ! " अशी तर माझी अवस्था झाली ! सध्याची ही वेळ तुझ्या यौवनाच्या भरतीची आहे, म्हणून तू तिला बाध घालू शकत नाहीस ! महापूर आला म्हणजे काय बाधाबिधाना जुमानतो काय रे ? सारे बाधबिध ढासळून टाकून जिकडे तिकडे मारे पाणीच पाणी होऊन जाते ! शेताबितावर सुद्धा पुरुष पुरुष

पाणी पसरते ! म्हणून म्हणत असतात की, 'कलियुगात मनाचे पाप, पापच नव्हे, ' आणि समज, की एखादे वेळी मनात एखादा कुविचार आला, तर ' हा का आला ? ' ' कसा आला ? ' असला विचारच मुळी कशाला करीत बसावे ? कधी कधी असले विचार शरीरधर्मानेच येत असतात मल, मूत्र याच्या वेगासारखेच हेहि आहेत, असेच समजत जा शौचास किंवा लघ्वीस लागली तर, डोके खाजवीत-' ही का लागली ? ' ' कशी लागली ? ' असा का कोणी विचार करीत बसतो ? त्याचप्रमाणे या साऱ्या कुविचाराना तुच्छ समजून त्याच्याविषयी विचारच करीत बसू नये आणि असले विचार मनात येऊ न देण्याविषयी ईश्वराची खूप प्रार्थना करावी, त्याचे खूप नामस्मरण करावे, नेहमी ईश्वराच्याच गोष्टी मनात घोळवाव्या, असे करीत राहिले म्हणजे हे विचार हळूहळू येईनासे होतील, समजलास ? "

त्या मुलाला धीर देण्यासाठी श्रीरामकृष्ण त्याच्याच सारखे झाले !

गरिबाची दु खे पाहून त्याचे मन कळवळे मथुरबाबूबरोबर तीर्थयात्रा करीत असता एक दोन गावी तेथील लोकाची दैन्यावस्था पाहून त्याच्या अत -करणात कशी कालवाकालव झाली व मथुरबाबूकडून त्यानी त्या लोकाना एकवेळ पोटभर अन्न व अंगभर वस्त्र कसे देवविले, ही हकीगत मागे आलीच आहे ( भाग १ ला, पान १५३ ) बुभुक्षिताला कोणी अन्नदान केले म्हणजे, त्याना फार आनद होई एखादा भिक्षेकरी आला, म्हणजे कोणाकडून तरी ते त्याला काही तरी देववीत एकदा दक्षिणेश्वरी जेवण झाले उरले सुरलेले अन्न भिकाऱ्याना मिळाले, परतु गर्दी फार असल्यामुळे, एका बिचाऱ्या म्हातारीला त्या धक्काबुकीत काहीच मिळाले नाही सारे भिकारी निघून गेले तरी ती तिथेच हाका मारीत बसली होती हे पाहून एका पहारेकऱ्याने तिला धक्के देऊन तेथून हाकून लावले ! हा सारा प्रकार पाहून श्रीरामकृष्ण, " आई ! ही

कसली ग तुझ्या घरची व्यवस्था ? चार घास अन्नासाठी बिचारीला धक्के खावे लागले ! " असे म्हणून मोठमोठयाने रडू लागले ! ! त्रैलोक्य बाबूच्या कानावर ही गोष्ट गेली तेव्हा त्यानी त्या म्हातारीला बोलावून आणून तिला खाऊ घातले व वर एक रुपया दिला. हे ऐकल्यावर श्रीरामकृष्णाचा आनद गगनात मावेना ! त्या आनदाच्या भरात, श्रीजगदबेची स्तुति करीत ते नाचू लागले ! !

त्याच्या सहानुभृतीला आणि शिष्यस्नेहाला सीमाच नसे आपल्याला प्राप्त झालेले सर्व अनुभव, वरचेवर होत असलेली सर्व दर्शने सर्वांना सागावी व सर्वांना आपल्यासारखेच आनंदपूर्ण करावे, या तळमळीने त्यानी पुष्कळदा अशक्य कोटीतील गोष्टीहि शक्य करणाचा प्रयत्न करावा ! ! कठस्थानावर कुंडलिनी शक्ति गेली, म्हणजे काय काय दर्शने होतात, हे आपल्या शिष्यमंडळीना सागण्याची श्रीरामकृष्णानी किती तरी वेळा खटपट करावी व ते अशक्य आहे असे पाहून स्वत ला वाईट वाटून घ्यावे ! एक दिवस हे सर्व सागण्याचा त्यानी अगदी निश्चयच केला आणि मन समाधिमग्न होऊ न देण्याचा प्रयत्न करून बोलण्यास सुरुवात केली ते म्हणाले, " आज या साऱ्या गोष्टी तुम्हाला सागून टाकतो अगदी एवढे सुद्धा लपवून ठेवत नाही " हृदय, कंठ, या भूमिकापर्यतच्या सर्व चक्राची माहिती नीट सागून आपल्या भुवयामधील भागाकडे बोट करून ते फार सावधगिरीने बोलू लागले-" या स्थानी मन स्थिर झाले म्हणजे परमात्म्याचे दर्शन होते व समाधि लागते जीवात्मा व परमात्मा याच्यामध्ये त्यावेळी केवळ एक स्वच्छ पातळ असा पडदा मात्र राहिलेला असतो तेव्हा असे दिसते की " इतकें बोलून आता पुढे बोलणार, तोच त्याना एकदम समाधि लागली ! बऱ्याच वेळाने समाधि उतरल्यावर पुन्हा बोलू लागले-" तेव्हा असे दिसते, की " इतके शब्द उच्चारतात तोंच त्याना पुन्हा समाधि लागली ! आणखी एक दोन वेळ असेच झाले याप्रमाणे, वरचेवर प्रयत्न करून काही उपयोग होत नाही, असे पाहून, त्याचे डोळे पाण्याने भरून आले आणि ते रडत रडत म्हणू लागले, " काय करू रे ?

माझ्या तर फार मनात आहे की तुम्हाला सारे सारे सांगून टाकावे, एवढे सुद्धा लपवून ठेवू नये, पण तें होतय् कुठे? काही केल्या आई बोलूच देत नाही, तोंडच दाबून धरते, याला काय करूं रे?" शारदानंद म्हणत -"हा सारा प्रकार पाहून आम्हाला मोठा अचंबा वाटला की 'काय चमत्कार आहे पाहा! हे तर सारें काही सांगायला तयार होऊन बसले आहेत आणि आईच यांना कां बोलू देत नाही?' पण त्यावेळी कोठें समजत होतें की बोलणें सांगणें वगैरे गोष्टी ज्याच्या साहाय्याने होत असतात, त्या मन-बुद्धीची धाव कोठपर्यंत? परमात्म्याचें दर्शन तर त्याच्या सरहद्दीच्या पलीकडील गोष्ट! आमच्यावरील अपार प्रेमाने प्रेरित होऊन, अशक्य गोष्टीला सुद्धा शक्य कोटींत ओढण्याचा प्रयत्न श्रीरामकृष्ण करीत आहेत, हे त्यावेळी समजावें कसें?"

एक दिवस श्रीरामकृष्ण आपल्या भक्तमंडळीबरोबर धर्मविषयक अनेक गोष्टी बोलत असतां, वैष्णवधर्माची गोष्ट निघाली, तेव्हा त्या मताचे सार काय, हे ते थोडक्यांत सांगू लागले-"नामावर प्रेम, जीवावर दया, आणि वैष्णवांचे पूजन—या तीन गोष्टी नेहमी करीत राहाव्या, असें हे मत सांगतें. ईश्वर आणि त्याचें नाम यांत मुळीच भेद नाही हे जाणून, सदा सर्वकाळ, मोठ्या प्रेमाने ईश्वराचें नामस्मरण करीत जावें, भक्त आणि भगवान्, कृष्ण आणि वैष्णव यांतहि भेद नाही हे जाणून, नेहमी साधु भक्त वगैरेंची सेवा करावी व त्यांच्यावर श्रद्धा ठेवावी आणि हा सर्व जगत्संसार श्रीकृष्णाचाच आहे, हे नेहमी मनांत वागवून सर्व जीवावर दया "— 'सर्व जीवावर दया' इतके शब्द उच्चारताच त्यांना एकाएकी समाधि लागली! काही वेळाने अर्धबाह्य दशा प्राप्त झाल्यावर ते बोलूं लागले—"जीवावर दया? जीवावर दया? कीटानुकीट तू, तूं काय जीवावर दया करणार? दया करणार तू कोण? छे छे, जीवावर 'दया' नव्हे, शिवज्ञानाने जीवाची सेवा!"

"शिवज्ञानाने जीवाची सेवा," या त्यांच्या उद्गारांत त्यांच्या अपार प्रेमाचें आणि सहानुभूतीचें आणि मनाच्या उदारतेचें रहस्य आहे ब्रह्मज्ञ

पदवी प्राप्त करून घेऊन, सर्वांच्या आध्यात्मिक उन्नतीसाठी, त्यानी जो प्रचंड खटाटोप केला, त्याचे बीज याच उद्गारात आहे त्याचे सर्व भूतमात्रावर अहेतुक प्रेम असे गुरुशिष्यसबधात प्रेमाचा ओलावा असल्याशिवाय, गुरूचा उपदेश जसा परिणामकारक व्हावयास पाहिजे तसा होत नाही गुरूला शिष्याविषयी अहेतुक प्रेम असले म्हणजे आपले सर्व अनुभव शिष्याला प्राप्त करवून देण्याची त्याला तळमळच लागते, शिष्याच्या सर्व दुर्बलतेची व अडचणीची त्याला आपोआप कल्पना होत जाते व शिष्याचे सर्व प्रकारे कल्याण कसे होईल, इकडेच त्याचे सारे लक्ष वेधते श्रीरामकृष्णाना आपल्या शिष्याच्या कल्याणाची कशी तळमळ लागलेली असे, हे त्याच्या शिक्षणपद्धतीवरून बरेचसे स्पष्ट होईल.

---

# १२. श्रीरामकृष्णाची शिक्षणपद्धति

जेथे शुद्ध ब्रह्मज्ञान । आणि स्थूळ क्रियेचे साधन ।
तोचि सद्‌गुरु निदान । दाखवी डोळा ।। —श्रीदासबोध, ५-२-२८
येथे शब्द नाही शिष्यासी । हे अवघे सद्‌गुरुपाशी ।
सद्‌गुरु पालटी अवगुणासी । नानायत्ने करूनी ।।

—श्रीदासबोध, ५-३-२५

---

श्रीरामकृष्णाच्या सहवासात राहणे हेच एक प्रकारचे उच्च शिक्षण असे त्याची प्रत्येक उक्ति, प्रत्येक कृति अर्थपूर्ण असे त्यांचे कोणतेहि आचरण निरर्थक नसे आपल्या आश्रयास राहिलेल्या प्रत्येकाच्या मनातील भाव त्याना पूर्णपणे माहीत असत व त्या धोरणाने ते त्याला उपदेश करीत आपल्याकडे येणाऱ्यास ते आपल्या स्नेहाने प्रथमत आपलासा करून टाकीत व मग त्याला जे काय सागावयाचे, ते सहज एखाददुसऱ्या सिद्धात-वाक्याने सागत असत कोणाच्या स्वभावात काय वैगुण्य आहे ते ओळखून, कधी गोड शब्दानी, तर कधी किचित् रागावल्यासारखे करून, ते त्याचा अवगुण त्याला दाखवून देत

त्याच्या भक्तमडळीत सर्व धर्माचे, सर्व मताचे लोक असत, अर्थातच, सर्व मडळीस एकत्रच काही सागणें असल्यास, ते सर्वाना लागू पडेल असे सागत गृहस्थाला म्हणत, " अरे ज्याने ईश्वरासाठी सर्वस्वाचा त्याग केला, तो तर नेहमी त्याचे नामस्मरण करीलच करील, त्यात काय बहादुरी ? पण ससारात राहून जो ईश्वराचे नामस्मरण करील, त्याची मातब्बरी खरी.

ससारात काय वाईट आहे ? ससारात राहून ईश्वराकडे मन लावणे म्हणजे किल्ल्यात राहून शत्रूशी लढाई करण्यासारखे आहे ! किल्ल्यात असले म्हणजे, बाहेर कितीहि का सैन्य असेना, त्याचे काही चालत नाही त्याचप्रमाणे एक ईश्वराचे नामस्मरण करीत असले, म्हणजे, कितीहि का सकटे येईनात, त्याचे काही चालत नाही सन्यासी भक्तमडळीना वराग्याचा उपदेश करावयाचा असल्यास, तो किती जपून ! स्वामी विवेकानद सागत, " आम्हा बालभक्ताना त्यागवैराग्याची महती सागावयाची असल्यास, ते आम्हाला एकीकडे बोलवीत, जवळपास कोणी गृहीभक्त नाही अशी खात्री करून घेत आणि मग आपल्या तेजस्वी वाणीने त्याग वैराग्य वगैरेची आवश्यकता आम्हाला समजावून सागत !" —म्हणत, " बाबानो , ईश्वरासाठी सर्वस्वाचा त्याग केला पाहिजे, प्रखर वैराग्य अगी बाणले पाहिजे तरच त्याचे दर्शन होईल अत -करणातल्या सर्व वासनाचा समूळ त्याग केला पाहिजे , वासनाचा लवलेश सुद्धा तेथे उरता कामा नाही, तरच ईश्वराचे दर्शन होईल ! " भोगवासना नष्ट झाल्यावाचून संसाराचा त्याग करण्यात अर्थ नाही व जर निष्काम बुद्धीने व ईश्वरचरणी मन ठेवून ससारी माणसे आपापली कामे करीत राहातील, तर त्याची भोगवासना हळूहळू नष्ट होईल, त्याच्या मनात आपोआप वैराग्याचा उदय होईल व मग सर्व मन ईश्वराकडे लावण्यास त्याना सोपे जाईल,—असे त्याच सागणे असे व म्हणून कोणाहि ससारी माणसाला, ससाराचा एकदम त्याग करण्यास ते कधीहि सागत नसत

धर्ममार्गाला लागून कित्येकाचा मूळचा दयाळु व कोमल स्वभाव अधिकच वाढत जातो, तो इतका की तो स्वभावच कित्येकदा त्याच्या बंधनास कारण होऊन बसतो म्हणून अशा कोमल स्वभावाच्या माणसाला कठोर होण्यास ते सागत आणि उलट, एखाद्याचा स्वभाव फारच कठोर असल्यास ते त्याला अंत करणात कोमलपणा आणण्यास सागत योगेद्राचे नाव मागे आलेच आहे त्याचा स्वभाव अत्यत कोमल असे कारण असले तरी, त्याला कधी राग येत नसे व तो कधी कोणाला टाकून अगर टोचून बोलत नसे त्याच्या मनात लग्न

करण्याचे मुळीच नव्हते तरी, एक दिवस आईच्या डोळ्याला पाणी आलेले पाहून, त्याने लग्न करण्याला एकदम रुकार दिला व लवकरच त्याचे लग्नहि झालें. परंतु आपण ही अविचाराची गोष्ट केली, असे त्याला वाटूं लागून, त्याचें मन उदास झाले दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाकडे ये-जा करूं लागल्यावर त्याच्या उपदेशाने व धीर देण्याने त्याचे मन हळूहळू शात झाले मनाच्या कोमलतेमुळे, त्याच्या हातून अशा प्रकारचा अविचार पुन्हा होऊ नये व सर्व कामे त्याने नीट विचारपूर्वक करीत जावी, म्हणून श्रीरामकृष्ण त्याला यापुढे कसे शिक्षण देत, हे खालील उदाहरणावरून समजून येईल श्रीरामकृष्णाच्या वस्त्रें वगैरे ठेवण्याच्या पेटीत, एक दिवस एक झुरळ त्याना दिसले योगेंद्र जवळच होता. त्याचेकडे पाहून ते म्हणाले, “ हे झुरळ बाहेर नेऊन मारून टाक ” योगेंद्राने ते बाहेर नेले, परंतु न मारता तसेच सोडून दिले तो परत खोलीत येताच श्रीरामकृष्णानी त्याला विचारले, “ काय रे ? झुरळ मारून टाकलेस ना ? ” योगेंद्र म्हणाला, “ नाही महाराज, त्याला सोडून दिले ! ” हे ऐकून रागावल्यासारखे करून श्रीरामकृष्ण त्याला म्हणाले, “ कसा विचित्र मनुष्य आहेस रे तू ? ‘ झुरळ मारून टाक, ’ म्हणून मी तुला सागितले आणि तू आपले त्याला खुशाल सोडून दिलेस ? काय म्हणावें तुला ? आता लक्षात ठेव आणि तुला जसे करायला सागेन अगदी तस्से करीत जा ! नाही तर दुसऱ्या अधिक महत्त्वाच्या गोष्टीतहि तूं असे आपलेच मन चालवू लागशील आणि मग फुकट पश्चात्ताप पडशील ”

आणखी एक दिवस योगेंद्र नौकेत बसून दक्षिणेश्वरी चालला असता, दुसऱ्या एकाने, “ कुठे जाता ” असे विचारल्यावरून, “ दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या दर्शनास जातों, ” असे तो म्हणाला हे ऐकून त्या गृहस्थाने श्रीरामकृष्णाची खूब निंदा सुरू केली तो म्हणाला, “ ते एक ढोंगी साधु आहेत. चागले खातात पितात, गाद्यागिर्द्यांवर निजतात आणि धर्माच्या नावाखाली,

लहानसान पोराची डोकी खराब करतात झाले " वगैरे वगैरे तो वाटेल तसे बकूं लागला आपल्या सद्गुरूची ही निदा ऐकून, योगेद्राला अत्यत दु ख झाले व त्या माणसाला चागले उत्तर द्यावे, असेहि एक वेळ त्याच्या मनात आले परंतु त्याचा स्वभाव अत्यंत शात पडला त्याला वाटले की, " श्रीरामकृष्णाची नीट माहिती नसल्यामुळे, किती तरी लोक गैरसमजुतीने त्याना नावें ठेवीत असतील मग आपल्याला तितक्याची तोडे कशी बंद करता येतील ? " असा विचार करून, त्या गृहस्थाला काही एक उत्तर न देता, तो खिन्न मनाने दक्षिणेश्वरी आला " तू आज असा सुकलेला का दिसतोस ? " असे श्रीरामकृष्णानी विचारल्यावरून नौकेतील सर्व हकीगत त्याने त्याना सागितली त्याला वाटले की, श्रीरामकृष्ण म्हणजे अत्यत निरभिमानी,—स्तुति निदा याचे-पासून त्याना सुखदुःख झालेले कधीहि कोणी पाहिले नाही,—ही सारी हकीगत ऐकून हसून गप्प बसतील झाले ! पण गोष्ट झाली निराळीच, ते रागावल्या-सारखे करून योगेद्राला म्हणाले, " त्या माणमाने माझी विनाकारण निदा केली आणि ती तू खुशाल ऐकून घेतलीस ? काय म्हणावे तुला ? शास्त्रात काय सागि-तले आहे, माहीत आहे ? ' गुरुनिदा करणाऱ्याचा पेथडक जीव घ्यावा, नाहीतर, त्या ठिकाणी क्षणभर सुद्धा राहू नये ! '—आणि तू तर यातले काही एक न करता, माझी अयोग्य निदा खुशाल ऐकत बसलास ? धि कार असो तुला !"

आणखी एकदा, अशाच प्रसगी, श्रीरामकृष्ण आपल्या दुसऱ्या एका भक्ताला काय म्हणाले, हे पाहिले असता, ते आपल्या शिष्याच्या स्वभावा-नुरूप कसे शिक्षण त्याना देत, हे दिसून येईल निरंजन स्वभावत च उग्र प्रकृतीचा मनुष्य असे तो एक दिवस असाच नौकेत बसून दक्षिणेश्वरी जात असता नौकेतील एक दोघानी श्रीरामकृष्णाची निंदा चालविलेली ऐकून, रागाने लाल होऊन गेला आणि त्याना प्रत्युत्तरे देऊ लागला तरीहि ते गप्प बसेनात असे पाहून, नावेसकट नदीत बुडवून टाकण्याची त्याने त्याना भीति दाखविली !

त्याचे शरीर कसलेले व पिळदार असल्यामुळे, त्याच्या त्या रुद्रस्वरूपाकडे पाहून ती मंडळी घाबरली व त्याची क्षमा मागून, त्यानी त्याला कसे बसे शात केलें. पुढे ही गोष्ट श्रीरामकृष्णाच्या कानी गेल्यावर त्याची निर्भर्त्सना करून ते म्हणाले,–" क्रोध चाडाळ? माणसाने त्याच्या ताब्यात कधी जावे काय? चागल्याचा राग म्हणजे पाण्याचा डाग,—तत्काळ नाहीसा होऊन जातो! वाईट लोक वाटेल त्याची वाटेल तशी निदा करतात, त्याच्या तोडाला लागायला लागले तर सारा जन्म त्यातच निघून जाईल! अशा वेळी समजत जा की, लोक म्हणजे पोक ( किडे ), त्याच्याकडे काय लक्ष्य द्यायचे आहे? रागाच्या भरात तू काय भलतेच करायला निघाला होतास, पाहा बरे? त्या बिचाऱ्या कोळ्यानी तुझें काय केलें होते, म्हणून त्याची नाव सुद्धा तू बुडवायला तयार झाला होतास बरे?"

पुरुषभक्ताप्रमाणे त्याच्या स्त्रीभक्तानाहि त्याची अशीच शिकवण असे एका स्त्रीचा स्वभाव अत्यत कोमल असे तिला एक दिवस ते म्हणाले– "इतका कोमल स्वभाव उपयोगाचा नाही, ही तर मनाची दुर्बलता झाली? असे समज, की–कोणी एकजण अत्यत श्रम घेऊन तुला सर्व बाबतीत मदत करीत आहे, पण सौदर्याच्या मोहामुळे, त्याला आपले दुर्बल मन ताब्यात ठेववत नाही, मग अशा ठिकाणी, अशा माणसावर काय दया दाखवावयाची?— की, मन दगडासारखे घट्ट करून त्याच्यापासून कायमचे दूर व्हावयाचे? म्हणून हे लक्षात ठेव, की वाटेल तेथे, वाटेल तेव्हा, वाटेल त्याच्यावर, दया करून चालत नाही, दयेलाहि काही सीमा आहे देश, काल, पात्र याचा विचार करून ती करावी लागते!"

"विश्वास असल्यावाचून धर्ममार्गामध्ये उन्नति होत नाही" असे श्रीरामकृष्ण वरचेवर म्हणत या गोष्टीचा भलताच अर्थ समजून त्याची काही शिष्य मडळी प्रथम प्रथम वाटेल त्या गोष्टीवर व वाटेल त्या माणसावर विश्वास ठेवीत श्रीरामकृष्णाच्या तीक्ष्ण नजरेला ही गोष्ट येताच, त्यांनी

त्या मंडळींना लगेच सावध केले, आणि खरोखर विश्वासाची महती नेहमी वर्णन करूनहि, त्यानी कधीहि कोणाला सदसद्विचार गुंडाळून ठेवण्यास सांगितले नाही नेहमी सदसद्विचार करावा व कोणतेहि कर्म करण्यापूर्वी त्याच्या इष्टानिष्टतेचा सर्व दृष्टीने पूर्ण विचार करीत जावा, असे त्याचे नेहमीचे सांगणे असे

त्याच्या शिष्यापैकी एकजणाने एकदा एका दुकानदाराला धर्माचे भय दाखवून, एक लोखंडी घमेले विकत घेतले, पण घरी जाऊन पाहातो तो ते फुटके निघाले ! श्रीरामकृष्णाना ही गोष्ट कळताच ते त्याचा तिरस्कार करून म्हणाले– " भक्त व्हावे, हे ठीक आहे, पण म्हणून विचारशून्य व्हावे की काय ? दुकानदाराने दुकान मांडले ते काय धर्म करायला की काय,—म्हणून तू त्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून, घमेले एकदा सुद्धा नीट न बघता विकत घ्यावेस! पुन्हा असे कधी करू नकोस एखादा जिन्नस घ्यायचा झाला तर चार दुकाने हिंडून, भाव पाहून, मग त्यातून जो चांगला असेल तो निवडून घ्यावा तसेच काही जिनसावर पस्तुरी मिळत असते, ती सुद्धा घेतल्याशिवाय कधी सोडू नये ! "

साधकाने लज्जा, घृणा, भय याचा त्याग करावा,—म्हणजे " मी ईश्वराची भक्ति करू लागलो म्हणजे मला कोणी नावे तर ठेवणार नाही, कोणी माझी चेष्टा तर करणार नाही ?—अशी लोकाची लाज अथवा भीति वाटू देऊ नये, लोकाच्या बोलण्याकडे पूर्ण दुर्लक्ष करावे "—असे ते वरचेवर सांगत आध्यात्मिक विषयासबंधीचा हा नियम ते स्वत व्यवहारातहि पाळीत

एक दिवस रात्री दहा–अकरा वाजण्याच्या सुमारास गंगेला समुद्राची भरती येऊन पाण्याची एक भिंतच्या भिंत, * नदीप्रवाहाच्या उलट दिशेने

* बंगालच्या उपसागरात भरती आली म्हणजे ते फुगलेले पाणी गंगा-नदीत शिरते व नदीच्या पृष्ठभागावरून उलट दिशेने, मोठा आवाज करीत

मोठ्या वेगाने वर चढूं लागली ! त्या रात्री स्वच्छ चादणे पडलेले होते श्रीरामकृष्ण जागेच होते भरतीचा आवाज ऐकून ते लगेच आथरूणावरून उठले, व " या रे या, भरतीची गम्मत बघायला या ! " असे म्हणून, आपण घाटावर जाऊन, पाण्याची ती विपरीत लीला पाहात, आनदाने बेहोष होऊन एखाद्या लहान मुलासारखे आनंदाने नाचू लागले ! त्यानी हाका मारल्या तेव्हा मडळीच्या डोळ्यावर झोप होती, म्हणून, उठून, धोतरे वगैरे सावरून, घाटावर जाण्याला त्याना जरा विलब लागला अर्थातच तेवढयात ती भरतीची लाट निघून गेली ! इतका वेळ, श्रीरामकृष्ण आपल्याच आनंदात गर्क होते ! लाट निघून गेल्यावर मडळीकडे पाहून त्यानी विचारले,—" का रे ? लाटेची कशी गमत दिसली ? " व धोतरे सावरण्याच्या गडबडीत उशीर झाल्यामुळे, लाट कोणालाच दिसली नाही, हे ऐकून ते एकदम म्हणाले, " अहारे शहानो ! लाट काय तुमच्या धोतर नेसण्यासाठी थाबून राहील वाटते ? माझ्या सारखेच धोतर फेकून देऊन का नाही आलात इथे ? "

कित्येकदा, श्रीरामकृष्ण आपल्या भक्तमंडळीपैकी कोणाकोणामधे वाद लावून देऊन आपण गमत पाहात बसत, व अशा वादविवादात, जेथे ज्याचे म्हणणे चुकीचे असेल, तेथे त्याला थाबवून त्याची चूक त्याला दाखवून देत आपल्याला एखाद्या विषयासबधी जेवढे काही माहीत आहे, तेवढे नीट व्यवस्थित रीतीने दुसऱ्याला सागता येते की नाही, हे प्रत्येकाने अजमावून पाहावे, असा एक हेतु, वाद जुपून देण्यात त्याचा असे ते स्वत हि एखादे वेळी अशा वादविवादात भाग घेत व अशा रीतीने कोणाचे विचार कसे आहेत, हे त्याच्या नकळत समजावून घेत

---

वर सरकू लागते ! फार मोठी भरती असेल तर कधी कधी समुद्राच्या पाण्याची पधरा-वीस फूट उचीची भितच्या भित नदीवरून वर सरकत असलेली दिसून येते !

त्याच्या शिष्यमंडळीत नरेंद्रनाथाइतका दुसरा कोणीहि वादविवादात कुशल नसे श्रीरामकृष्णाकडे त्याचे येणे जाणें सुरू झाले, तेव्हा तो ब्राह्म-समाजाचा अनुयायी असून साकारवादी लोकावर त्याचा त्यावेळी मोठा कटाक्ष असे, म्हणून श्रीरामकृष्ण वरचेवर, त्याचा कोणातरी साकारवादी भक्ताबरोबर वाद लावून देऊन, आपण मजा पाहात बसत! नरेंद्राच्या तीक्ष्ण बुद्धीपुढे आणि अचुक कोटिक्रमापुढे कोणीच टिकत नसे, व म्हणून ज्याला त्याला त्याच्याशी, वाद करण्याची भीतिच वाटे! श्रीरामकृष्ण मात्र वरचेवर ज्याच्यात्याच्याजवळ मोठया आनदाने त्याच्या बुद्धिमत्तेची प्रशसा करीत व म्हणत–"अमक्या अमक्याचे बोलणे त्या दिवशी नरेंद्राने असे कचाकच तोडून टाकले!" एक दिवस श्रीरामकृष्णानी साकारवादी गिरीशचद्राबरोबर त्याचा वाद लावून दिला आणि गिरीशचा साकारावरील विश्वास अधिक दृढ करण्यासाठी, आपण स्वत त्याची बाजू घेतली वाद रगात आला असता, साकारवादी भक्ताच्या परमेश्वरावरील विश्वासाला, नरेंद्राने "अधविश्वास" असे म्हटले त्याबरोबर श्रीरामकृष्ण म्हणाले–"काय रे, नरेंद्र, तू अधविश्वास कशाला म्हणतोस ते मला समजावून देतोस काय? विश्वास तर येथून तेथून साराच अंध विश्वासाला कुठे डोळे असतात होय? त्यातच आणखी 'अंधविश्वास' आणि 'डोळस विश्वास' हे भाग कसले? एक तर म्हण, 'विश्वास,' नाही तर म्हण, 'ज्ञान'!" नरेंद्र सागत असे, "आणि खरोखरच त्या दिवशी, 'अंधविश्वास' या शब्दाचा काहीच अर्थ मला सागता येईना; आणि पुष्कळ विचार करूनहि त्या शब्दात मला काही अर्थच सापडेना! त्या दिवसापासून, 'अंधविश्वास' असा शब्दप्रयोगच करण्याचे मी सोडून दिले!"

याप्रकारच्या शिक्षणाशिवाय, त्याच्या सहवासात राहणाऱ्याना, पुष्कळस व्यावहारिक शिक्षणहि मिळे सामान्य सामान्य गोष्टीकडेहि लक्ष देऊन, ते आपल्या भक्तमंडळीचे गुणदोष त्याना दाखवून देत निरजन फार तूप खातो, असे दिसून आल्यावरून, ते त्याला म्हणाले, "इतके तूप खात असतात काय?

कुठे मोठा पराक्रम गाजवावयाचा आहे वाटते ?" एकजण फार झोपाळू असे, म्हणून त्यानी एक दिवस त्याची अशीच कानउघाडणी केली एकजण वैद्यकीचा अभ्यास करीत असता, त्यानी त्याला ते शिक्षण सोडून देण्यास सागितले, परंतु त्याने तिकडे दुर्लक्ष केले, हे पाहून श्रीरामकृष्ण त्याला म्हणाले-" मनातून एक एक वासना काढून टाकायची ते दिले सोडून आणि उलट वासनाच्या जाळ्यात, आपल्याला अधिकाधिक गुरफटून घेतोस तेव्हा तुला काय म्हणावें ? अशाने तुझे कसे होईल रे ?"

त्याचे आपल्या ससारी भक्ताना नेहमी सागणे असे, " ससारात पैसा अवश्य पाहिजे, त्याच्यावाचून चालायचे नाही, म्हणून नेहमी काटकसरीने खर्च करावा कधीहि कोणाचे ऋणकरी होऊ नये " एखाद्याने गुडगुडी पेटविण्यास काडी ओढली तर ते त्याचेवर रागावून म्हणत, " ऊठ, तिथे स्वयपाकघरात विस्तव पेटला असेल, तिथून एखादा निखारा घेऊन ये ! काडी काय फुकटची येते होय रे ? असाच का तूं ससार करणार ?"

साधारणत असें दिसून येते की, फार विचार करणाऱ्या पुरुषाचे—कवि, गणिती, वगैरेचे—आपल्या विषयाखेरीज इतर गोष्टीकडे लक्ष नसते त्याचे मन आपापल्या विषयाच्या विचारात इतके गुग होऊन गेलेले असते की, त्याना त्या विषयाखेरीज इतर काही सुचत नाही व पुष्कळदा त्याचे आचरण वेडयासारखे होते पण श्रीरामकृष्णाविषयी पाहावे तो काही निराळाच प्रकार दिसून येई ! सदासर्वकाळ ईश्वरचिंतनात मग्न असून सुद्धा, त्याना सर्वप्रकारच्या लहानसान गोष्टीची सुद्धा शुद्ध असे ! स्वत च्या सर्व जिनसाची व्यवस्था ते स्वत पाहात त्याच्या खोलीतील सर्व वस्तूची माडणी अगदी रेखीव असे प्रत्येक वस्तूची जागा ठरलेली असून, ती वस्तु तिथेच ठेवावयाची, असा त्याचा शिरस्ता असे आणि त्याचप्रमाणे ते दुसऱ्यालाहि वागावयास लावीत त्याना घाणेरडेपणा, गबाळेपणा, बिलकुल खपत नसे अमुक वेळी अमुक गोष्ट करावयाची असे

ठरल्यावर, ते त्यात कधीहि मागे पुढे होऊं देत नसत !—इत्यादि गुणामुळे त्याच्या सहवासात राहणाऱ्यालाहि नीटनेटकेपणाने राहण्याची आपोआप सवय लागे

एक दिवस सकाळी श्रीरामकृष्ण दक्षिणेश्वराहून बलराम बसूंच्या घरी जावयास निघाले बरोबर त्याचा पुतण्या रामलाल आणि योगेंद्र हे होते सर्व मडळी गाडीत बसून निघाली गाडी बागेच्या फाटकापर्यंत आली असेल तोच, श्रीरामकृष्णानी योगेंद्रला विचारले-" काय रे, बटवा आणि पचा बरोबर घेतलास ना ? "

**योगेंद्र** —" नाही महाराज, बटवा घेतला, पण पंचा विसरलो ॲ. त्यात काय आहे ? बलराम बाबू दुसरा एखादा पचा देतील ! "

**श्रीरामकृष्ण** —" वा ? तो काय म्हणेल ?—' कुठून लेकाचे भिकारी आले आहेत ! ' त्याला नाही उगीचच्या उगीच त्रास होणार ? ते काही नाही, परत जा आणि पचा घेऊन ये " अर्थातच योगेंद्राला परत जाऊन पचा आणावा लागला

श्रीरामकृष्ण म्हणत असत-" मोठे लोक, श्रीमत लोक, एखाद्याच्या घरी गेले, तर आपली सगळी व्यवस्था नीट अगोदर करून जातात त्याच्याबद्दल त्या माणसाला येवढा सुद्धा त्रास होत नाही आणि तोच जर एखादा भिकारडा कोणाच्या घरी गेला, तर इथून तिथून साऱ्यानाच त्रास! आणि गमत ही, की ज्या दिवशी घरात काही नसेल त्या दिवशी हे लेकाचे ठेवलेले ! "

श्रीरामकृष्णाच्या वेळी, दक्षिणेश्वरी श्रीयुत प्रतापचंद्र हाजरा म्हणून एक गृहस्थ राहात असत, त्याना सर्वजण हाजरा महाशय म्हणत ते आपला बराच वेळ जप ध्यान वगैरेत घालवीत श्रीरामकृष्ण आपल्या भक्तमडळीच्या घरी जात तेव्हा कधीकधी हाजरा महाशयहि त्याचे बरोबर असत एक दिवस ते श्रीरामकृष्णाबरोबर एका भक्ताच्या घरीं गेले असता तेथे आपला हातरुमाल

विसरून आले ते परत आल्यावर ही गोष्ट श्रीरामकृष्णाना समजली तेव्हां ते त्याना म्हणाले—" ईश्वरचिंतनात, मला नेसलेल्या धोतराची सुद्धा शुद्ध राहात नाही, पण मी एक दिवस सुद्धा आपला पचा, की बटवा कोठे विसरून आलो नाही ! आणि येवढा तेवढासा जप आणि ध्यान करून तुला इतका विसर पडू लागला ? "

वरील निरनिराळ्या उदाहरणावरून त्यांच्या शिक्षणपद्धतीची कल्पना येईल शिष्याची नीट परीक्षा करून त्याला योग्य त्या दिशेने शिक्षण देत असता, निरनिराळे विषय ते कसे समजावून देत, हे पुढील प्रकरणावरून थोडे फार समजून येईल

---

# १३. श्रीरामकृष्णांची विषयप्रतिपादनाची शैली

जे वेदाचे अभ्यंतरी । ते काढूनि अपत्यापरी ।
शिष्यश्रवणी कवळ भरी । उदार वचने ॥ — श्रीदासबोध,
५-२-१७

फोडूनि शब्दांचे भांडार । वस्तु दाखवी निजसार ।
तोचि सद्‌गुरु माहेर । अनाथांचे ॥ —श्रीदासबोध, ५-२-१५

---

श्रीरामकृष्णांची विषयप्रतिपादनशैली काही विलक्षण असे कोणत्याहि मताचे, कोणत्याहि पंथाचे लोक असोत, त्यांचे भाषण ऐकून मोहून जात! साधेसाधे दृष्टांत देऊन, वर्ण्यविषय एखाद्या लहान मुलाला समजेल इतका सोपा करून ते सांगत धर्म म्हणजे अगदी सोपी गोष्ट आहे, असे त्यांच्याकडे येणाऱ्या प्रत्येकास वाटे! काही मोठे शब्द नाहीत, घटपटादिकांची खटपट नाही, काही अवडंबर नाही, काही मोठमोठ्या ग्रंथकर्त्यांचे आधार नाहीत, की काही नाही! सरळ सोप्या भाषेत नेहमीच्या व्यवहारातील एक दोन मार्मिक दृष्टांत त्यांच्या तोंडून ऐकले, की कसल्याहि गहन विषयाचे हृद्गत ऐकणाऱ्यांना तेव्हाच कळून येई.

त्यांच्या विषयप्रतिपादनात ही एक विशेष गोष्ट असे, की ते कधीहि, त्या त्या प्रसंगाला अनावश्यक अशा गोष्टी सांगून, श्रोत्यांच्या मनाचा गोंधळ उडवून देत नसत त्यांच्या बोलण्यात कधीहि स्वमतसमर्थन, परमतखंडन वगैरे खटाटोप, संदिग्धता मुळीच नसे त्यांचा मुख्य भर दृष्टांतावर असे प्रश्न करणा-

त्याचा भाव लक्षात घेऊन, त्याच्यावर उत्तर म्हणून काही सिद्धात-वाक्ये ते सागत आणि ती स्पष्ट समजावी म्हणून एक दोन अत्यत मार्मिक दृष्टात देत मतभेद झाला तरीहि ते कधी वाद घालीत बसत नसत एक दिवस ते एका चिकित्साखोर श्रोत्याला म्हणाले–" एका गोष्टीत समजून घ्यायच असेल, तर इथे येत जा आणि वादविवाद करून व व्याख्याने ऐकून समजून घ्यायचे असेल तर केशवकडे जा ! " एखाद्याला आपले बोलणे पटले नाही असे दिसून आल्यास–" मी काय सागावयाचे तें सागितले आहे, यातील तुम्हाला जे पटेल ते तुम्ही घ्या "—असे म्हणून स्वस्थ बसत ! कधीकधी नुसती उदाहरणेच देऊन ते थाबत नसत, तर, आपल्या म्हणण्याच्या स्पष्टीकरणार्थ, रामप्रसाद, कमलाकात वगैरे साधकाची एक दोन पदेहि आपल्या सुस्वर आवाजांत म्हणून दाखवीत

ते म्हणत असत—" ज्याने आपला सर्व भार आईवर टाकला त्याच्या अत करणात ती स्वत राहाते आणि त्याच्याकडून काय बोलवावयाचे असेल तें बोलवते आईचाच पाठिबा असल्यावर कोणाचे ज्ञानभाडार रिकामे होणार ? तो कितीहि खर्च करीना, आई त्याच्या अत करणात ज्ञानाच्या राशीच्या राशी आणून ठेवते ! " हीच गोष्ट स्पष्ट करण्यासाठी त्यानी खालील गोष्ट सागितली एक दिवस दारूगोळ्याच्या कारखान्यातील काही शिपायानी मला प्रश्न केला, ' मनुष्याने ससारात कसे राहावे, म्हणजे त्याला धर्मलाभ होईल ? इतक्यात माझ्या डोळ्यापुढे एक उखळाचा देखावा आला एक बाई भात काडीत आहे व दुसरी उखळात भात सारीत आहे, असे दिसले त्याबरोबर समजले की ससारात कसे सावधगिरीने राहिलें पाहिजे, हेच आई समजावून देत आहे ! दोन्ही बाया एकमेकींशी बोलत असतात, पण भात काडणारी बाई, आपल्या हातावर मुसळाचा घाव बसूं नये याविषयी जशी सावध असते, तसेच ससारातील प्रत्येक काम करताना मनात सावधगिरी ठेवली पाहिजे, तरच बधनात पडण्याची भीति नाही उखळाचे चित्र दिसल्याबरोबर मनात या गोष्टी आल्या आणि भात काडण्याचेच उदाहरण देऊन, त्या शिपायाना

या गोष्टी समजावून दिल्या ! त्या ऐकून त्याना फार आनंद वाटला लोका-बरोबर बोलत असताना, उदाहरण देण्याचे काम पडताच, अशाच प्रकारची चित्रें डोळ्यासमोर उभी राहातात ! ”

विषयाचे प्रतिपादन करीत असता दृष्टांतादाखल ते जी उदाहरणे देत, ती इतकी मार्मिक व समर्पक असत की ऐकणाराला त्याच्या सूक्ष्म अवलोकन-शक्तीचें आश्चर्य वाटल्यावाचून राहात नसे “ श्रीरामकृष्ण-वाक्सुधा ” ज्यानी वाचली असेल, त्याना या विषयाची खात्री पटली असेल, तरीपण आणखीहि काही गोष्टी व उदाहरणें येथे दिली असता त्याच्या प्रतिपादन-शैलीच्या अपूर्वत्वाची आणखी ज्यास्त स्पष्ट कल्पना वाचकाना येईल

समजा की, जटिल साख्यशास्त्राच्या गोष्टी चालल्या आहेत, पुरुष व प्रकृति याच्या परस्पर सबधाचे वर्णन करीत असता श्रीरामकृष्ण म्हणतात– “ साख्यशास्त्रात म्हटले आहे की, पुरुष अकर्ता, तो काहीच करीत नाही, सर्व काही प्रकृति करते, तिच्या सर्व कार्यावर पुरुष साक्षीरूपाने देखरेख मात्र करीत असतो, पण गमत ही की, पुरुषावाचून प्रकृतीला एकटीलाच काही एक करता येत नाही ! ” श्रोते तर काय, सगळेच पडित ! कोणी धदेवाले, कोणी ऑफिसातले नोकर, फारच झाले तर, कोणी डॉक्टर, वकील आणि बरेचसे भरताड शाळेतले आणि कॉलजातले विद्यार्थी ! अर्थात् श्रीरामकृष्णाचे हे बोलणे न समजून सारेजण एकमेकाच्या तोडाकडे पाहात आहेत ! आपल्या श्रोत्याना काही एक समजले नाही, असे पाहून श्रीरामकृष्ण म्हणतात, “ यात विलक्षण असे काही नाही एखाद्या लग्नघरी नाही का पाहिलेत ? घरधनी हुकूम देऊन, खुशाल एखाद्या लोडाला टेकून गुडगुडी ओढत स्वस्थ बसलेला असतो पण त्या बिचाऱ्या घरमालकिणीची कोण वादल ? तिच्या जिवाला चैन नाही ! कोठीतच जा, मडपातच जा, स्वयपाकघरातच ये, हे काम झाले की नाही तें बघ, ते काम कितपत झाले आहे ते पाहा, बाजारातून काही राहिलेला जिन्नसच आणायला साग, इतक्यातच लक्ष्मबाई, सरस्वतीबाई वगैरे चार बायका

आल्या, त्याना ' या बसा 'कर, मवेच घरमालकाकडे जाऊन, —' हे असें झाले, तें तितके झाले, हे इतके राहिले, ते असे करायला हवें, ' वगैरे साग,— सारी व्यवधाने सभाळता सभाळता, तिचा जीव बेजार होऊन जातो ! आणि इकडे घरधनी काय करत असतो ? नुसता लेकाचा गुडगुडी ओढीत मान हालवत, बसल्या बसल्याच,-' हू, ठीक आहे, बर आहे असच करा, '— असे म्हणत असतो, नाही ? तसेच प्रकृतीचे आणि पुरुषाचे आहे ! ! "

काही वेळाने, समजा वेदान्ताच्या गोष्टी निघाल्या आहेत. श्रीरामकृष्ण म्हणतात-" वेदान्तात सागितलें आहे की ब्रह्म आणि ब्रह्मशक्ति, पुरुष आणि प्रकृति एकच हे काही दोन निरनिराळे पदार्थ नव्हत पदार्थ एकच, मात्र तो कधी पुरुषभावाने राहातो, कधी स्त्रीभावाने राहतो, इतकेच " हा विषय स्पष्ट करण्यासाठी श्रीरामकृष्ण म्हणतात-" अरे, हे कसे असतें साग ? जसे, साप,- कधी चालत असतो व कधी वेटोळे घालून स्वस्थ बसलेला असतो, जेव्हा तो स्वस्थ बसलेला असतो, तेव्हा झाला पुरुषभाव तेव्हा काही एक कार्य घडत नाही, त्यावेळी प्रकृति पुरुषामधे लीन होऊन गेलेली असते आणि जेव्हा साप चालत असतो, तेव्हा झाला प्रकृतिभाव, त्यावेळी जणु काय प्रकृति पुरुषापासून वेगळी होऊन काम करीत असते,—नाही ? त्यासारखे "

आणखी थोडया वेळाने प्रश्न निघाला-" माया ही ईश्वराची शक्ति ती ईश्वरामध्ये वास करते तर मग ईश्वरहि काय आमच्यासारखाच मायाबद्ध आहे की काय ? " हे ऐकून श्रीरामकृष्ण म्हणतात-" छे, रे, तसे नाही माया ईश्वराची असली व ती त्याच्याच ठिकाणी सर्वदा राहात असली, तरी त्यामुळे ईश्वर कधीहि मायाबद्ध होत नाही हेंच पाहा ना,—सापाच्या तोंडात नेहमी विष असतें, त्याच तोंडाने तो खातो पितो, पण तो स्वत. कधीहि मरत नाही. तो ज्याला चावतो, तो मात्र मरून जातो, त्यासारखें ! "

आमच्यापैकी एका जणाला एकदा वेदान्तावर वादविवाद करण्याचा खूप नाद लागला, म्हणून तो पूर्वीप्रमाणे वरचेवर श्रीरामकृष्णाच्या दर्शनास येईनासा

झाला तो अलीकडे खूप वेदान्ताची चर्चा करीत असतो, ही गोष्ट श्रीरामकृष्णाच्या कानावर गेली व तो त्यांच्या दर्शनास आल्यावर, ते त्याला म्हणाले– "काय रे ? तू म्हणे अलीकडे एकसारखी वेदान्तचर्चा करीत असतोस ? त्याला काही हरकत नाही म्हणा, पण वेदान्तचर्चा म्हणजे एवढीचना, की 'ब्रह्म सत्य आणि जगत् मिथ्या ?' की आणखी दुसरे काही ?" शिष्य म्हणाला, "होय महाराज, एवढेच, आणखी दुसरे काय असणार ?" श्रीरामकृष्ण म्हणाले, "श्रवण, मनन, निदिध्यासन, ब्रह्म सत्य जगत् मिथ्या, ही गोष्ट अगोदर ऐकून घेतली मग याचे मनन केले—म्हणजे ही गोष्ट एकसारखी मनात घोळवली नंतर निदिध्यासन—म्हणजे मिथ्यावस्तु जी जगत् तिचा त्याग करून, सद्वस्तु जी ब्रह्म तिच्या ध्यानामध्ये मनाला लावले झाले ! वेदान्त वेदान्त म्हणजे काय इतकाच, की आणखी काही ? पण तसे न करिता भाराभर ऐकले आणि असे धरू की, तेहि समजले पण जी मिथ्या वस्तु तिचा त्याग करण्याचा काही प्रयत्न केला नाही तर मग काय फायदा रे ? मग हे सारे झाले संसारी लोकाच्या ज्ञानासारखे ! असल्या ज्ञानाने वस्तुलाभ होत नाही धारणा पाहिजे, त्याग पाहिजे, तर काही होईल ! ते न करता नुसते तोंडाने, 'काटा नाही, बोच नाही,' असे म्हटल्याने का कुठे काटा बोचल्याच्या वेदना नाहीशा होत असतात ? तसे, नुसते तोंडाने 'ब्रह्म सत्य जगन्मिथ्या' म्हणायचे मात्र, पण जगातील रूपरसादि विषय पुढे आले की, लगेच त्यानाच सत्य समजून बंधनात पडायचे ! असाने का कुठे वस्तुलाभ होत असतो ? एकदा काय झाले की, पंचवटीखाली एक साधु उतरला होता लोकांबरोबर तो वेदान्तावर खूप वाद करीत बसे लोकांना वाटे, 'अहाहा ! साधु असावा तर असा असावा !' पुढे काही दिवसानी माझ्या कानावर आले की, त्याचे एका बाईशी सूत जमले आहे दुसऱ्या दिवशी मी झाउतलाकडे शौचास गेलो असता त्याची गाठ पडली तेव्हा मी म्हटले, 'काहो बाबाजी, तुम्ही सारे वेदान्ताच्या गोष्टी सांगता आणि मग हे हो कसे' ? तो म्हणाला,—'ॲ ? त्यात काय आहे ? मी आत्ता तुम्हाला समजावून देतो की त्यात काही दोष नाही अहो, जिथे जगच मुळी मिथ्या, तिथे काय

एवढीच गोष्ट तेवढी सत्य होय? ती सुद्धा मिथ्याच!!' हे त्याचे निर्लज्जपणाचें बोलणे ऐकून मला त्याचा फार राग आला आणि मी म्हणालो,—' आग लाव तुझ्या या असल्या वेदान्तज्ञानाला!' म्हणून म्हणतो की, या असल्या ज्ञानाला काय जाळायचे आहे? हे मुळी ज्ञानच नव्हे!' तो शिष्य म्हणत असे-' माझा खरोखरच असा समज होऊन बसला होता की, पंचदशी वगैरे ग्रंथ वाचल्याशिवाय वेदान्त कधीच समजायचा नाही व अर्थातच त्याशिवाय कधी मुक्ति मिळायची नाही परंतु श्रीरामकृष्णाच्या त्या दिवशीच्या उपदेशाने माझे डोळे उघडले व माझी खात्री झाली की, वेदान्ताची चर्चा आणि वाचन, हे सारे केवळ, ' ब्रह्म सत्य, जगत् मिथ्या ' या सिद्धांताची मनात नीट धारणा व्हावी, एवढ्यासाठीच आहे "

' मते तितके मार्ग, ' हा श्रीरामकृष्णाचा सिद्धान्त ऐकून एके दिवशी एकजणाने विचारले -" तर मग महाराज, या अनेक मार्गांपैकी आम्ही कोणता पत्करावा? " श्रीरामकृष्ण म्हणाले-" ज्याला जो मार्ग पसंत वाटत असेल, तोच त्याने पक्का धरावा म्हणजे झाले. जो भाव आवडेल तोच दृढ धरावा म्हणजे झाले ईश्वर हा भावाचा विषय, भावावाचून त्याचे कसे आकलन व्हावे? म्हणून कोणता तरी एक भाव पक्का धरून त्याची आराधना केली पाहिजे भाव तसा लाभ भाव म्हणजे काय समजले? ईश्वराशी कोणता तरी एक संबंध जोडून घेणें म्हणजे भाव, ईश्वराचा दास मी अथवा त्याचे अपत्य मी अथवा त्याचा अंश मी—असा एखादा संबंध ईश्वराशीं जडवून घेऊन, तोच भाव सदा सर्वकाळ, खाता, बसता, चालता, मनात घोळवावा हा तरी एक प्रकारचा अहंकारच आहे याला म्हणतात ' पक्का अहंकार,' हा असला तर हरकत नाही, आणि मी ब्राह्मण, मी क्षत्रिय, मी अमक्याचा मुलगा, हा सारा ' कच्चा अहंकार, ' त्याचा त्याग करावा आणि सर्वकाळ पक्का अहंकार मनात घोळवून, आपण ईश्वराशी स्थापन केलेला भाव अधिकाधिक दृढ करीत जावा, तरच आपला ईश्वरापाशी जोर—हट्ट-चालेल! हेच पाहाना--नवी नवी ओळख असली म्हणजे बोलणे कसें येतें? ' आपण '-' आपले '-' आपल्याला '

–नाही ! जरा घसट जास्त झाली, म्हणजे मग 'आपले बिपले' निघून जाते आणि सुरू होते–'तुम्ही' 'तुमचे !' आणि तोच घरोबा खूप वाटला, म्हणजे मग हेंहि जाऊन नुसतेंच 'तू' अन् 'तुझे' अन् 'लेका,' याशिवाय शब्दच बाहेर येत नाही ! ईश्वर आपल्याला, इतका आपल्याहून आपला वाटायला पाहिजे ! तरच त्याच्याजवळ आपला जोर चालेल ! एखादी वाईट चालीची स्त्री जेव्हा प्रथमच परपुरुषावर प्रीति करायला शिकते, तेव्हा किती लपवा-छपवी आणि किती लाजणं अन् मुरकणं ? पण काही दिवसांनी हे सारं बदलून जातं आणि वेळप्रसंगी, ती आपली सारी लाजलज्जा गुंडाळून ठेवून, कुळाच्या नाव–लौकिकावर लाथ मारून, खुशाल त्या परपुरुषाचा हात धरून घरातून बाहेर निघून जाण्यासहि कमी करीत नाही ! आणि समजा, त्यानंतर तो तिला बाळगीनासा झाला, तर ती त्याच्या नरड्याला हात लावून नाही म्हणणार ?– 'अरे वा ! तुझ्यासाठी सारी लाज लज्जा सोडली, कुलशील सोडले, आणि तू आता बाळगीत नाही म्हणतोस ? मुकाट्यानं घरात घेतोस की नाही, बोल !' तसे, ज्याने ईश्वरासाठी सर्वस्वाचा त्याग केला, ज्याला आपल्याहून आपला म्हटले, त्याला दर्शन देणं त्याला भागच पडतं नाही तर तो त्याला भीईल होय ? तो नाही म्हणणार ?–'देवा ! तुझ्यासाठी मी सर्वस्वाचा त्याग केला, आणि आता तू माझ्याकडे पाहात नाहीस ? बऱ्या बोलाने दर्शन देतोस की नाही, बोल' !! "

× × × ×

ईश्वर, माया इत्यादिकांच्या स्वरूपासंबंधीचे त्यांचे दृष्टांत पाहा —

" ज्याप्रमाणे पाण्याला कोणी 'वारि' म्हणतात, कोणी 'पानी' म्हणतात, कोणी 'वाटर' म्हणतात, कोणी 'ॲक्वा' म्हणतात, त्याचप्रमाणे एका सच्चिदानंदालाच कोणी 'गॉड' म्हणतात, कोणी 'हरि' म्हणतात, कोणी 'राम' म्हणतात, कोणी 'अल्ला' म्हणतात ! "

× × × ×

" माणसे म्हणजे नुसत्या गाद्यागिर्द्यांच्या खोळी आहेत ! खोळी जशा निरनिराळ्या रंगाच्या व आकाराच्या असतात, त्याचप्रमाणे माणसे, कोणी सुरूप, कोणी कुरूप, कोणी साधु कोणी दुष्ट अशी असतात, इतकेच परंतु, सर्व खोळीत जसा एकच पदार्थ भरलेला असतो—कापूस, त्याचप्रमाणे सर्व मनुष्यात एकच सच्चिदानंद भरला आहे ! "

× × × ×

" पहारेकरी चोरकंदिलाच्या योगाने सर्वांस पाहू शकतो, पण तो मात्र कोणास दिसत नाही त्यानेच जर कंदिलाचा उजेड आपल्या तोंडावर धरला, तर लोक त्याला पाहू शकतात त्याचप्रमाणे ईश्वर सर्वांना पाहातो, पण तो मात्र कोणाला दिसत नाही, त्यानेच कृपा करून जर स्वत ला प्रकाशित केले, तरच त्याचे दर्शन होते "

× × × ×

**प्रश्नः**—" ईश्वर जर सर्वत्र भरलेला आहे, तर तो आम्हाला का दिसत नाही ? "

**उ** —" शेवाळाने झाकलेल्या तळ्याच्या काठी उभे राहून ' तळ्यात पाणीच नाही, ' असे म्हणण्यासारखेच हें आहे ! तुम्हाला पाणी प्यायचे असेल तर ते शेवाळ बाजूला करा. तसेच, तुमच्या डोळ्यावर मायेचा पडदा आल्यामुळे तुम्हाला ईश्वर दिसत नाही, त्याला पाहाण्याची इच्छा असेल तर त्या मायेला बाजूला करा ! "

× × × ×

" मायेला ओळखताक्षणी ती नाहीशी होते जसे आपण घरात शिरल्याची बातमी मालकाला लागली आहे, असे दिसताच चोर पळून जातो ! "

× × × ×

**श्रीरामकृष्ण** —" ईश्वरदर्शन झाल्यावर हजार जन्मांचे पातक एकदम नष्ट होते "

**शिष्य** —" हे कसे बुवा ? ही गोष्ट काही पटत नाही "

**श्रीराकृष्ण** —" का बरे ? एखाद्या गुहेतला हजारो वर्षांचा अंध कार तेथे दिवा नेताच एकदम नाहीसा होऊन जातो, की थोडथोडा नाहीसा होतो ? तीच गोष्ट ईश्वरदर्शनाची ! "

× × × ×

**प्रश्न** —" जीवाचा सोहभाव सभवतो काय व तो कसा ? "

**उ** —" ज्याप्रमाणे एखाद्या घरचा पुरातन इमानी चाकर, घरातील सर्व-जण त्याला आपल्यातलाच एक असे समजून वागतात एखाद्या दिवशी घरमालक त्याच्या एखाद्या विशेष कामगिरीने प्रसन्न होऊन, त्याचा हात धरून त्याला आपल्या शेजारी बसवून सगळ्याना सागतो, ' आजपासून माझ्यात आणि त्याच्यात काही एक भेदभाव ठेवायचा नाही, समजलात ? सगळ्यानी माझ्याप्रमाणेच याचीहि आज्ञा पाळली पाहिजे कोणी मोडल्यास ते मला खपायचे नाही ' बिचारा स्वामी-निष्ठ सेवक ! धन्याची आपल्यावरील ही कृपा पाहून त्याचे हृदय भरून येऊन, गादीवर बसायचा तो सकोच करू लागतो, पण धनी त्याला जबरदस्तीने तेथे बसवतोच ! जीवाचा सोहभाव सुद्धा अशाच प्रकारचा आहे कित्येक दिवसाच्या सेवेने प्रसन्न होऊन, ईश्वर कोणाकोणाला आपल्यासारखाच विभूतिसपन्न करून, आपल्या आसना-वर बसवून घेतो ! "

× × × ×

" कोळ्याच्या जाळ्यात सापडणाऱ्या माशात तीन प्रकार दिसून येतात काही मासे जसेच्या तसे पडून राहातात, तेथून निसटण्याचा प्रयत्नहि करीत

नाहीत, किंबहुना आपल्यावर संकट आलेले आहे याची त्याना जाणीवच नसते! काही मासे सुटण्याचा प्रयत्न करतात, पण बिचाऱ्याना सुटण्याचा मार्गच सापडत नाही आणि एखादा बहाद्दर असा असतो की, तो जाळे कुरतडून त्यातून निसटून जातो!—तसेच या ससारातहि तीन प्रकारचे जीव दिसून येतात,—बद्ध, मुमुक्षु आणि मुक्त!"

× × × ×

**भक्त** —" महाराज, ईश्वर साकार आहे की निराकार आहे?"

**श्रीरामकृष्ण** —" बाबारे, तो साकार आहे आणि निराकारहि आहे हे कसें, समजले? ज्याप्रमाणे पाणी आणि बर्फ पाण्याला आकार नाही, पण बर्फाला आहे थंडीमुळेच पाण्याचे बर्फ होते, त्याचप्रमाणे भक्तिरूपी थंडीने अखड सच्चिदानंदसागरात ठिकठिकाणी साकार बर्फ जमते!"

× × × ×

एक दिवस, भक्तमंडळीशी श्रीरामकृष्ण गोष्टी बोलत बसले असता एकजणाने विचारले-" महाराज, परमार्थ-साधनात सद्‌गुरूची आवश्यकता आहे काय? गुरूवाचून चालायचे नाही काय?"

**श्रीरामकृष्ण**,—न चालायला काय झालें? गुरूवाचून सुद्धा साधक आपलें ध्येय गाठूं शकतो इतकेंच की सद्गुरूची मदत असेल तर त्याचा मार्ग बराचसा सुगम होतो"

असे बोलणे चालले आहे, इतक्यात, समोरच गंगेतून एक गलबत जात असलेले श्रीरामकृष्णाना दिसले त्याबरोबर त्या मनुष्याकडे वळून ते म्हणतात—" तें गलबत चिनसुऱ्याला केव्हासें पोहोचेल साग पाहूं!"

**गृहस्थ** —"मला वाटते संध्याकाळी पाच सहाच्या सुमारास पोहोचेल"

**श्रीरामकृष्ण** —"त्या गलबताच्या मागच्या बाजूला, ती लहान होडी दोराने बांधून ठेवली आहे, पाहिलीस ? ती सुद्धा त्या गलबता-बरोबरच सध्याकाळी चिनसुऱ्याला जाऊन पोहोचेल, होय की नाही ? पण समज, की दोर सोडून ती होडी गलबतापासून बाजूला काढली व एकटीच वल्हवत नेली, तर ती चिनसुऱ्याला केव्हा पोहोचेल, साग पाहू ? "

**गृहस्थ** —"मला वाटते, मग काही ती होडी उद्या सकाळच्या अगो-दर तिथे पोहोचणार नाही, खास "

**श्रीरामकृष्ण** —" त्याचप्रमाणे, साधक एकटाच ईश्वरदर्शनाच्या मार्गात अग्रसर होईल, तरी त्याला ईश्वरलाभ होईल, पण त्याला वेळ लागेल, आणि तेच जर त्याला सुदैवाने सद्गुरूची मदत मिळाली, तर त्याचा लांबीचा प्रवास फारच थोड्या वेळात उरकेल, समजलास ? "

× × × ×

**शिष्य** —" महाराज, 'नेति' 'नेति' विचार म्हणजे काय व तो करीत गेल्याने ज्ञानविज्ञान कसे प्राप्त होते ? "

**श्रीरामकृष्ण** —"एका काळोख्या खोलीत एकजण निजला होता, त्याला शोधण्यासाठी दुसरा एकजण त्या खोलीत गेला, प्रथमच एक खुर्ची त्याच्या हाताला लागली, त्याबरोबर 'छे, हा तो नव्हे,' असे म्हणून तो दुसरीकडे चाचपू लागला, आता त्याच्या हाताला एक टेबल लागले, तेव्हा पुन्हा 'छे, हाहि तो नव्हे' असे म्हणून तो पुन्हा चाचपू लागला व आणखीहि इतर वस्तु हाताला लागताच 'छे, हा तो नव्हे' असे म्हणू लागला,—'नेति' 'नेति' !! काही वेळाने त्याचा हात त्या पलंगावर निजलेल्या गृहस्थास लागला, त्याबरोबर 'हाच तो !' ( 'इति' 'इति' ) असे तो

आनंदाने म्हणाला त्याचे अर्धे अधिक काम झाले त्याला ज्ञान झाले, पण अजून विज्ञान झाले नव्हते, त्या गृहस्थाला उठवून, त्याच्याशी चार गप्पागोष्टी झाल्या तेव्हा त्याचे काम पुरे झाले,— त्याला विज्ञान झाले ! विज्ञान म्हणजे विशेष रूपाने जाणणे—गप्पा-गोष्टी करणे, समजलास ? ”

× × × ×

“ कोणी दुधाचें नाव ऐकलेले असते कोणी दुध पाहिलेले असते, व कोणी तें चाखलेले असते ! तसेच कोणी ईश्वर आहे असे ऐकलेले असते, कोणी त्याचे दर्शन घेतलेले असते व कोणी त्याच्याबरोबर गोष्टी केलेल्या असतात ! अज्ञानी, ज्ञानी, विज्ञानी ! ”

× × × ×

एक दिवस एक स्त्रीभक्त त्याना म्हणाली –“मनात पुष्कळ येते की ईश्वराचे एकसारखे नामस्मरण करावे, पण तसे घडत नाही काय करावे ? ”

**श्रीरामकृष्ण** —“ईश्वराला सर्वस्वी शरण जाणे, ही काय सोपी गोष्ट आहे का ग ? महामायेचा प्रभाव इतका जबरदस्त आहे की ती मुळी शरणच जाऊ देत नाही ! ज्याला या जगात आपले म्हणायला सुद्धा कोणी नाही, त्याच्यासुद्धा गळयात एखाद्या माजराचेच लोढणे बांधून, त्याच्याकडून संसार करवील ! त्या माजरासाठी त्याला इकडून तिकडून दूध मागून आणायला लावील ! एखाद्याने विचारले– “ का हो तुम्हाला दूध कशाला हवे ? ” तर तो म्हणेल– “ काय करावे हो ! आमचे माजर नुसती भाकरी खात नाही, म्हणून दूध हवे ! ”

“ अथवा एखादे मोडकळीस आलेले घर असावे घरात कर्तेसवर्ते कोणी नाही, राहता राहिल्या दोन चार विधवा बाया मात्र ! त्या बिचा-

त्याना मरण नाही ! घर जागोजाग पडलेले छप्पर आज पडणार की उद्या अशा स्थितीत ! भितीतच कुठे कुठे पिंपळाची झाडें उगवलेली ! परसात रान माजलेले आणि त्या बाया, असल्या त्या चद्रमौळी घरात राहून त्याच परसातला कसला तरी पाला ओरबडून त्याची भाजी करून खात बसतील, पण ईश्वराकडे म्हणून मन लावणार नाहीत ! ! ”

“ अथवा एखाद्या स्त्रीचा नवरा मेलेला असावा, आता तर तिला ससारात अडकून बसण्याचे काही कारण नाही ? आता तिला ईश्वराकडे मन लावायला काही हरकत आहे ? पण नाही ती आपल्या भावाच्याच घरी जाईल, आणि तिथे कारभार करू लागेल आणि सगळीकडे सागत मिरवल की– ‘ मी इथे आले नसते की नाही, तर दादाला खायला सुद्धा मिळाले नसते ! ’ अहाग सटवाई ! तुझे स्वत चे कसे होईल ते बघ ना अगोदर ! पण ते नाही तिला तिच्या दादाचा ससार करायला पाहिजे ! ! म्हणून म्हणतो की महामायेचा प्रभाव काही विलक्षण आहे ! तिच्या कचाटयातून सुटायला ईश्वराची कृपाच पाहिजे तू त्याची व्याकुळ होऊन प्रार्थना कर, म्हणजे तो मायेच्या बधनातून तुला मुक्त करील ! ”

योगमार्ग, कुडलिनी, षट्चक्रे, सात भूमिका वगैरे गहन विषयहि ते अत्यत सोपा करून सागत कुंडलिनी, सुषुम्ना मार्गाने मस्तकाकडे जात असता, प्रत्येक चक्राचे ठिकाणी काय काय दर्शने होतात, याविषयी ते म्हणत–“ वेदान्तामध्ये सप्तभूमिकाचे वर्णन आहे प्रत्येक भूमीवर निरनिराळ्या प्रकारची दर्शने होतात मनुष्याच्या मनाची स्वाभाविक गति खालील तीन भूमीमधेच—( गुह्य, लिग, नाभी ) खाणे पिणे, उपभोग घेणे इत्यादिकामधेच–असते या तीन भूमि सोडून त्याचे मन जर हृदयभूमिपर्यत वर चढले, तर त्याला ज्योतिदर्शन होते परंतु हृदयभूमीपर्यत जाऊनहि ते तेथून खाली उतरण्याचा सभव असतो हृदयभूमीच्यावर, कठापर्यंत, जर मन चढले तर त्याला ईश्वरीय गोष्टीवाचून इतर गोष्टी आवडत नाहीत, की बोलवत नाहीत ! तेव्हा तेव्हा

( साधनाकाली ) माझी अशी अवस्था होऊन जात असे की, कोणी संसारातल्या गोष्टी काढल्या तर वाटे की कोणी डोक्यावर काठीचे तडाखेच लगावत आहे की काय ! मग मी लगेच तेथून उठून पंचवटीकडे धाव घ्यावी ! विषयी लोक दिसताच मी भयाने लपून बसावे ! आपली नातलग माणसे म्हणजे जसे खड्डे आहेत असे वाटे वाटे, की मी यांच्यात गेलो की खड्ड्यात पडलोच ! त्यांना पाहाताच एकदम गुदमरल्यासारखे होई,—वाटे की आता प्राण जातो ! त्यांच्या-पासून दूर पळून जावे, तेव्हा जरा बरे वाटावे ! कुंडलिनी कंठप्रदेशापर्यंत गेलेली असली, तरी सुद्धा ती खालील भूमिकांवर उतरण्याचा संभव असतो म्हणून तेव्हा सुद्धा सावधच असलें पाहिजे पण एकदा का कंठ सोडून कुंडलिनी भ्रुकुटि-पर्यंत चढली, तर मग तेथून पतन पावण्याची भीति नाही तेथे परमात्म्याचे दर्शन होऊन, निरंतर समाधिसुखाचा लाभ होतो ती भूमि व सहस्रार यांच्या मध्ये केवळ एक कांचेसारखा पारदर्शक पडदा मात्र असतो तेव्हा परमात्मा इतका जवळ असतो, की आपण आता त्याच्याशी एकरूप झालों, असें वाटते ! पण अजून सुद्धा एकत्व प्राप्त झालेले नसतें इथून मन उतरलेंच तर ते फार फार कंठ अगर हृदयापर्यंतच उतरते त्याच्या खाली कधीहि उतरत नाही जीवकोटी लोक येथून खाली कधीहि उतरत नाहीत एकवीस दिवस पर्यंत निरंतर समाधिस्थितीत राहिल्यावर, तो पडदा एकदम फुटून, जीवात्मा परमात्म्याशी एकरूप होऊन जातो ! सहस्रार कमल हीच सप्तम भूमि ! ”

श्रीरामकृष्णांच्या तोंडून या वेदवेदान्त, दर्शनें, योगशास्त्र वगैरेच्या गोष्टी ऐकून एक दिवस आमच्यापैकी एकाने त्यांना विचारले—“ पण महाराज, आपण तर लिहिण्यावाचण्याच्या पाठीमागे कधीच लागला नाही, मग ही इतकी माहिती आपण मिळविली कुठून ? ” श्रीराम-कृष्णांना या असल्या पानचट प्रश्नाचाहि राग नाही ! जरासे हसून ते लगेच म्हणाले, “ अरे, शिकलों नसलो म्हणून काय झाले ? मी ऐकलय किती ?

ते सारें लक्षांत आहे चागल्या चागल्या शास्त्री-पंडिताच्या तोंडून, वेद, वेदान्त, पुराणें हे सारे एकले आहे ! त्याच्यातलें सार समजून घेतल्यावर, त्या पोथ्या-पुराणाची एक माळ करून ती आईच्या गळ्यात घालून मी तिला म्हणालो-" आई ! ही घे तुझो शास्त्रे आणि पुराणे, मला फक्त तुझी शुद्धा भक्ति दे ! "

---

# १४. श्रीरामकृष्ण व श्रीकेशवचंद्र सेन

"केशव गेला, तर, आई ! कलकत्त्यास गेल्यावर कोणा बरोबर मी गोष्टी बोलू ?"

"केशवच्या मृत्यूची बातमी ऐकून मी तीन दिवस आथरुणावर पडून होतो, असे वाटले की माझे एक अंगच गळून गेले !"

—श्रीरामकृष्ण

---

## श्रीकेशवचंद्र सेन यांची पहिली भेट व सहवास

### ( इ. स. १८७५ )

श्रीरामकृष्णाच्या गुरुभावाचे निरनिराळ्या दृष्टींनी आतापर्यंत विवेचन झालें, अशा रीतीने गुरुपदवीवर अधिष्ठित होऊन लोकामधे प्रकट झाल्यानतरच्या त्याच्या आयुष्याचे वर्णन यापुढे करावयाचे आहे

श्रीरामकृष्णाची माता मृत्यु पावण्याचे अगोदर काही दिवस त्याना, ब्राह्मसमाजाचे नेते प्रसिद्ध श्रीकेशवचंद्र सेन याना भेटण्याची इच्छा झाली त्यावेळीं केशवचद्र, कलकत्त्याचे उत्तरेस काही मैलावर बेलघारिया नामक ठिकाणी श्रीयुत जयगोपाल सेन याच्या बगीच्यात साधनभजनात निमग्न असल्याचें ऐकून, एक दिवस, हृदयला बरोबर घेऊन ते केशवचंद्राना भेटण्यास विश्वनाथ उपाध्याय याच्या गाडीत बसून बेलघारियाला गेले. ते तेथे पोहोचल

तेव्हा दुपार नुकतीच टळून गेली होती श्रीरामकृष्णानी त्या दिवशी फक्त एक रेशीमकाठी धोतर मात्र नेसून त्याचा सोगा डाव्या खाद्यावर टाकलेला होता

ग डीतून उतरताच, काही मडळीसह केशवचद्राना पुष्करणीच्या काठावर बसलेले, हृदयने पाहिले व पुढे होऊन त्याना नमस्कार करून तो म्हणाला, "माझ्या मामाना हरिकथा व हरिगुग ऐकगे फार आवडते व ते ऐकून त्याना समाधिहि लागते आपले नाव ऐकून आपल्या तोडून ईश्वरीय गोष्टी ऐकाव्या म्हणून ते येथे आल आहेत आपली हरकत नसेल तर त्याना येथे घेऊन येतो" केशवचद्रानी त्याना घेऊन येण्यास सागताच, हृदय गाडीजवळ गेला व श्रीरामकृष्णाना घेऊन आला श्रीरामकृष्णाना पाहाण्यासाठी केशवचद्र वगैरे मडळी उत्कठित झाली होती, श्रीरामकृष्णाना पाहून हे कोणी अलौकिक पुरुष असावेत, असे त्याना मुळीच वाटले नाही

केशवचंद्राच्या जवळ जाऊन श्रीरामकृष्ण म्हणाले, "बाबू, मी ऐकले आहे की तुम्हाला नित्य ईश्वराचे दर्शन होते तेव्हा ते दर्शन कसे काय आहे, हे जाणण्याच्या इच्छेने मी तुमच्याकडे आलो आहे" अशा रीतीने उभयतांच्या सवादास सुरुवात झाली श्रीरामकृष्णाच्या प्रश्नावर केशवबाबूनी काय उत्तर दिले ते माहीत नाही थोडयाच वेळाने, "के जाने मन काली। केमन षड्दर्शने ना पाय दर्शन" हे रामप्रसादचें गाणें म्हणता म्हणता श्रीरामकृष्णाना समाधि लागली श्रीरामकृष्णाची समाधि पाहून ही काही आध्यात्मिक उच्च अवस्था असावी, असे त्या मडळीना मुळीच वाटले नाही उलट हे काही ढोग असावे अथवा डोक्याचा विकार असावा, असाच त्याचा ग्रह झाला! त्याची समाधि उतरण्यासाठी हृदय त्याच्या कानात प्रणवोच्चार करू लागला व तो ऐकता ऐकता श्रीरामकृष्णाच्या मुखमंडलावर अपूर्व तेज दिसू लागले! अर्धबाह्य दशा प्राप्त झाल्यावर, सोपे सोपे दृष्टात देऊन, गूढ आध्यात्मिक विषय श्रीरामकृष्णांनी इतक्या सोप्या भाषेत, सागण्याला सुरुवात केली की, ती सर्व मंडळी ते ऐकत असतां चित्रा-

सारखी तटस्थ होऊन देहभान विसरून गेली माध्यान्हस्नानाची व जेवणाखाण्याची वेळ होऊन गेली, तरी त्याचे कोणाला स्मरणहि राहिले नाही! अशी त्याची तन्मयावस्था पाहून हसत हसत श्रीरामकृष्ण म्हणाले, " गाईच्या कळपांत दुसरे एखादे जनावर शिरलें, तर त्या साऱ्या गाई त्याच्या अगावर धावून जातात, पण एखादी गायच असल्यास साऱ्याजणी तिचे अंग चाटूं लागतात ! आजचा प्रकारहि असाच दिसतो ! " नंतर केशवबाबूंना उद्देशून ते म्हणाले, " तुझी शेपटी गळून गेली आहे ! " याचा अर्थ कोणाला समजला नाही, असे पाहून ते म्हणाले, " हे पाहा, जोपर्यंत शेपटी गळून गेली नसते, तोपर्यंत बेडूक पाण्यातून बाहेर येत नाही पण त्याची शेपटी गळून गेली म्हणजे तो पाण्यातहि राहूं शकतो व पाण्याच्या बाहेरहि राहूं शकतो त्याचप्रमाणे, मनुष्याची अविद्यारूप शेपटी जोपर्यंत गळून पडत नाही, तोपर्यंत, तो केवळ ससाररूप पाण्यातच राहातो, पण ती त्याची शेपटी गळून गेली, म्हणजे तो ससार व परमार्थ या दोन्ही विषयात मनाप्रमाणे विचरण करू शकतो ! केशव, सध्या तुझें मन अशाच प्रकारचे झालें आहे व म्हणून ते संसारातहि व सच्चिदानंदाच्या ध्यानातहि राहू शकते " याप्रमाणे आणखीहि काही वेळ गप्पागोष्टीत घालवून त्या दिवशी श्रीरामकृष्ण दक्षिणेश्वरी परत आले

या दिवसापासून केशवबाबूंची श्रीरामकृष्णावर इतकी भक्ति बसली की केव्हाहि वेळ सापडल्यास, ते श्रीरामकृष्णाच्या दर्शनासाठी दक्षिणेश्वरी येत व कधीकधी त्याना आपल्या " कमलकुटीर ' नामक बगल्यात घेऊन जात व त्याच्या सहवासात बराच वेळ घालवीत हळूहळू उभयतामधे इतके प्रेम उत्पन्न झाले, की, त्याना एकमेकाला भेटल्यावाचून चैनच पडेनासे झाले ! दोघाची काही दिवस भेट न झाल्यास श्रीरामकृष्ण तरी त्याच्याकडे येत, अथवा केशवबाबू तरी दक्षिणेश्वरीं त्याना भेटण्यास जात ! तसेंच ब्राह्मसमाजाच्या वार्षिक उत्सवाचे वेळी, केशवचंद्र त्याना घेऊन उत्सवाच्या ठिकाणीं जात व त्याच्या सहवासात एक दिवस घालवीत त्याच्या वार्षिक उत्सवातला हा एक कार्यक्रमच होऊन

बसला होता ! कितीदा तरी, आपल्या अनुयायासह ते जहाजात बसून दक्षिणे-श्वरी जात व श्रीरामकृष्णाना जहाजात बसवून त्याचा अमृतमय उपदेश ऐकत गंगेवर सहल करीत !

दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या भेटीला जाताना ते कधीहि रिक्तहस्ते जात नसत फळे वगैरे काही तरी बरोबर नेऊन, ते श्रीरामकृष्णाच्या पुढे ठेवून त्याना नमस्कार करीत व एखाद्या शिष्यासारखे त्याच्या पायापाशी बसून, मग त्याच्याशी बोलणें सुरू करीत ! एक दिवस श्रीरामकृष्ण थट्टेने त्याना म्हणाले, "केशव, तू आपल्या वक्तृत्वाने साऱ्याना हालवून सोडतोस, मला काही साग ना" केशवचद्र यावर नम्रपणे म्हणाले, "मी काय लोहाराच्या दुकानी सुया विकायला बसूं होय ? आपणच सागा, मी ऐकतो ! आपल्याच तोंडच्या दोन चार गोष्टी मी लोकाना सागतो व त्या ऐकून ते हुरळून जातात, झाले !"

एक दिवस दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णानी केशवचद्राना सागितले की "ब्रह्माचे अस्तित्व स्वीकार करावयाचे असेल, तर त्याच्या बरोबरच ब्रह्मशक्तीचेहि अस्तित्व स्वीकारले पाहिजे ब्रह्म व ब्रह्मशक्ति ही नेहमी अभेदभावाने असतात" केशवबाबूना ही गोष्ट समजली मग श्रीरामकृष्ण पुन्हा म्हणाले, "ब्रह्म व ब्रह्मशक्ति याच्या संबधाप्रमाणेच, भागवत, भक्त व भगवान ह्या तिघाचाहि सबध असून तेहि नित्ययुक्त आहेत हे तिन्ही एकच आहेत, एकाचीच ही तीन रूपें आहेत" केशवबाबूना हीहि गोष्ट पटली नतर श्रीरामकृष्ण म्हणाले, "गुरु, कृष्ण, व वैष्णव हे तीनहि एकच आहेत, ही गोष्ट आता तुला समजावून सागतो" यावर केशवबाबू हात जोडून नम्रपणे म्हणाले, "महाराज ! आता-पर्यंत जें ऐकले, त्याच्या पुढे सध्या माझ्या बुद्धीची मजल जाऊ शकत नाही. म्हणून सध्या इतकेच पुरे" अशा रीतीने त्या दोघाचा मोकळेपणाने नेहमी सवाद चाले श्रीरामकृष्णाच्या दिव्य सहवासाचा केशवचद्राच्या जीवनावर फार परिणाम झाला व त्याना उत्तरोत्तर वैदिक धर्माची रहस्ये नीटपणे समजत जाऊन त्याची धर्ममतें पुढेपुढे बदलत गेली

काही तरी विशेष आघात झाल्याशिवाय मनुष्याचे मन ससारातून उठून, सर्वस्वी ईश्वराकडे लागत नाही श्रीरामकृष्णाचा परिचय झाल्यानंतर सुमारें तीन वर्षांनी, केशवबाबूंनी आपल्या मुलीचा कुचबिहारच्या महाराजाशी विवाह करून दिल्यामुळे त्याना असा आघात प्राप्त झाला या विवाहाने ब्राह्म-समाजात मोठी खळबळ उडाली व ब्राह्मसमाजातील ज्या मडळीना केशवबाबूचें हें कृत्य आवडले नाही, त्यानी त्या समाजातून फुटून "साधारण ब्राह्मसमाज" नावाचा एक नवीन समाज स्थापन केला व दोन्ही पक्षात नेहमी वादविवाद व भाडणतटे सुरू झाले य कश्चित् सामाजिक विषयावरून अशी भाडणें व्हावीत याचे श्रीरामकृष्णाना फार वाईट वाटले मुलीच्या विवाहासबधाचे ब्राह्मसमाजाचे नियम ऐकून श्रीरामकृष्ण म्हणाले, "जन्म, मृत्यु, विवाह, या साऱ्या ईश्वराधीन गोष्टी आहेत या सबधाने कडक नियम करणे योग्य नाही केशव असे कशाला करू गेला कोणास ठाऊक!" ह्या विवाहाची गोष्ट काढून श्रीरामकृष्णाच्या समोर जर कोणी केशवचद्राची निदा करू लागला, तर ते म्हणत, "केशवने यात एवढे निदा करण्यासारखे काय केलें? केशव ससारी माणूस, आपल्या मुलामुलींचे जेणेकरून कल्याण होईल अशा गोष्टी सुद्धा त्याने करू नयेत? ससारी माणसाने धर्माप्रमाणे वागून जर अशी गोष्ट केली, तर त्यात एवढे निंदा करण्यासारखें काय आहे? केशवने यात काही अधर्माचरण केले नाही, तर त्याने केवळ आपले पित्याचे कर्तव्य मात्र बजावलें!" ते काही असो, या विवाहापासून उत्पन्न झालेल्या भाडणतट्यानी केशवचंद्राचे मन मात्र ससारातून निघून उत्तरोत्तर परमार्थमार्गात अधिकाधिक तन्मय होऊ लागले

केशवचद्राची श्रीरामकृष्णावरची भक्ति उत्तरोत्तर अधिकाधिक वाढूं लागली ते त्याना साक्षात् धर्ममूर्ति समजत त्याना वरचेवर आपल्या घरी नेऊन आपल्या निजण्या-बसण्याच्या, ईश्वरचितनाच्या जागेतून त्याना हिडव

व त्या जागाना त्याचे पाय लागले म्हणून स्वतःला महाभाग्यवान् समजत आणि " आता यापैकी कोणत्याहि जागेत मी असलो तरी मला ईश्वराचा विसर पडणार नाही ! " असे म्हणून दाखवीत ! दक्षिणेश्वरी ' जय विधानेर जय ! ' असे म्हणून श्रीरामकृष्णाना साक्षात् ईश्वर समजून नमस्कार करिताना त्याना आमच्यापैकी कित्येकानी पाहिले आहे

उलटपक्षी श्रीरामकृष्णाचेहि त्याचेवर अपार प्रेम असे केशव-चद्राच्या बुद्धिमत्तेची, भक्तीची, वक्तृत्वाची ते सर्वाजवळ प्रशंसा करीत ते म्हणत, " मी नेहमी आईला म्हणत असतो, ' आई, केशवची कीर्ति सहस्रपट वाढो ! ' केशवचद्राच्या अखेरच्या दुखण्यात, एक दिवस त्याची प्रकृति अधिकच बिघडल्याचे कळल्यामुळे त्याना बिलकुल चैन पडेना आणि ' त्याच्या दुखण्याला उतार पडू दे ' अशी ते श्रीजगदबेची प्रार्थना करू लागले ! एवढेच काय पण ' माझ्या केशवला बरा कर म्हणजे तुला गुळखोबरे वाहीन ' असा त्यानी देवीला नवसहि केला ! ! त्या दुखण्यात त्याच्या समाचारासहि ते एक दोन वेळ गेले

श्रीरामकृष्णाचे केशवचद्रावर किती अद्भुत प्रेम होते हे केशवचद्राना देवाज्ञा झाली ( १८८४ ) त्यावेळी सर्वाना दिसून आले श्रीरामकृष्ण सागत असत, ' केशवच्या मृत्यूची बातमी ऐकून मी तीन दिवस अथरुणावर पडून होतो, असे वाटले की, माझे एक अगच गळून गेले ! "

---

# १५ ब्राह्मसमाज व श्रीरामकृष्ण

कलकत्त्यातील लोकाना श्रीरामकृष्णाची माहिती प्रथम श्रीकेशवचंद्र सेन याचेकडून झाली केशवचद्र सेन हे फार उदार स्वभावाचे व गुणग्राही होते म्हणून श्रीरामकृष्णाच्या दिव्य सगतीत ज्या काही नव्या नव्या गोष्टी, नवे नवे विचार त्याना समजत, ते सर्व मोठया प्रेमाने ते आपल्या व्याख्यानात सागत व आपल्यासारखाच सर्वांना श्रीरामकृष्णाच्या दिव्य सगतीचा लाभ व्हावा या हेतूने श्रीरामकृष्णाविषयीच्या व त्याच्या उच्च आध्यात्मिक अवस्थेच्या गोष्टी "सुलभ समाचार" "सन्डे मिरर" "थिएट्रिकल क्वार्टर्ली रिव्ह्यु" वगैरे वर्तमानपत्रात वरचेवर लिहीत व्याख्यानात व उपासनेच्या वेळीहि, श्रीरामकृष्णाच्या मुखातून ऐकलेले विचार व उक्ति, याचा ते मनसोक्त उपयोग करीत त्याचप्रमाणे फुरसत सापडताच, स्वत व कधी कधी आपली शिष्य-मडळी बरोबर घेऊन, ते दक्षिणेश्वरी जात व विविध विषयावर बोलत, त्याच्या सगतीत, काही काळ आनदाने घालवीत

ब्राह्मसमाजाचे केशवचद्र सेन वगैरे पुढारी याची धर्मजिज्ञासा आणि ईश्वरप्रेम पाहून, त्याना साधनभजनादिकाची अधिकाअधिक गोडी लागून, त्याना ईश्वरदर्शनाचा लाभ व्हावा, यासाठी योग्य तो मार्ग दाखविण्याचा प्रयत्न श्रीरामकृष्ण नेहमी करीत त्याच्या सगतीत ईश्वरविषयक गोष्टी बोलण्यात आणि भजन करण्यात त्याना इतका आनंद होई की, ते कधी कधी आपण होऊन केशवचद्राच्या घरी जात समाजातील इतर मडळीचा परिचय झाल्यावर, ते त्याच्याहि घरी जाऊन तेथे त्याच्याबरोबर काही वेळ आनदात घालवीत कित्येकदा असेहि होई की, उपासना चालली असता, श्रीरामकृष्ण त्याठिकाणी अकस्मात यावे व केशवचद्रानी आपली उपासना थाबवून व्यास-

पीठावरून खाली यावें व श्रीरामकृष्णाबरोबर ईश्वरीय विषयावर बोलणे सुरू करून, त्याच्या मुखातून स्रवणाऱ्या बोधामृताचें सर्वांनी मिळून पान करावे व त्या दिवशी उपासना अर्वाच राहावी !

श्रीरामकृष्णाचा स्वभावच असा असे की, अंत करणापासून कोणी ईश्वरावर प्रेम करीत असल्याचे त्याना दिसून येताच, तो त्याना आपला असे वाटे व मग त्याची उत्तरोत्तर ईश्वरदर्शनाच्या मार्गात कशी प्रगति होत जाईल, इकडे ते सदैव लक्ष ठेवीत व त्या कामी त्याला सर्व प्रकारचें साहाय्य करीत, आणि म्हणूनच ब्राह्मसमाजातील पुढाऱ्यापैकी केशवचद्र सेन, विजयकृष्ण गोस्वामी, प्रतापचंद्र मुजुमदार, चिरजीव शर्मा, शिवनाथ शास्त्री वगैरे मडळीवर त्याचे अत्यत प्रेम असे या सर्व यथार्थ ईश्वरानुरागी मडळीबरोबर एकत्र जेवण्यासहि ते कधी मागे पाहात नसत कारण अशा मडळीची एक निराळीच जात असते, असे ते म्हणत ह्या सर्व मडळीच्या मनावर, पाश्चात्य शिक्षण व विचार याचा संस्कार झाला असल्यामुळे, त्याच्या उपासनादि प्रसगातहि अंत करणाच्या उमाळ्यापेक्षा बाह्य दिखाऊपणाच थोडा फार शिरला होता, तो नाहीसा व्हावा व ईश्वरप्राप्ति हेंच जीवनाचे ध्येय असे त्यानी समजावे व म्हणून त्यानी साधनादिकावर विशेष भर द्यावा, असे श्रीरामकृष्णाचे त्याना नेहमी सागणे असे या त्याच्या उपदेशानुसार वागल्यामुळे केशवचद्राची पुष्कळच आध्यात्मिक उन्नति झाली तसेच, ईश्वराचे " आई " हे प्रेमळ नाव व ईश्वराची मातृभावाने उपासनाहि समाजात सुरू झाली आणि समाजाच्या भजनात, पदात वाङ्मयातहि हा श्रीरामकृष्णाचा भाव प्रविष्ट होऊन, त्यात एक प्रकारचा जिवतपणा व मधुरपणा उत्पन्न झाला

श्रीरामकृष्णाना ही गोष्ट पूर्णपणे माहित होती की, आपण जे काही सागू, ते सर्वच या मडळीला पटेल असें नाही, म्हणून उपदेशपर गोष्टी सागणे झाल्यावर ते बहुतकरून त्याना म्हणत, " तुम्हाला जे काय सागावयाचें होते ते मी सागितले आहे, यातील जेवढे तुम्हाला पटेल तेवढेच

ध्या ! ” त्याना हेहि माहित होते की ब्राह्मसमाजाचे सर्वच सभासद म्हणजे केशवचद्राप्रमाणे अंत करणापासून ईश्वराचे भक्त आहेत असे नाही! ते म्हणत—“ एक दिवस केशवच्या प्रार्थनामदिरात गेलो होतो, त्यावेळी उपासना चालली होती ईश्वराच्या ऐश्वर्याचे बराच वेळ वर्णन करून वक्ता म्हणाला, ‘ आता आपण ईश्वराचे ध्यान करू या ’ मला वाटले आता ही मडळी बराच वेळ ध्यानस्थ बसणार बरे का ! पण काय ? दोन मिनिटातच त्याचे ध्यान होऊनहि गेले ! या असल्या ध्यानाने का कधी ईश्वराची प्राप्ति होईल ? ती मडळी ध्यान करीत असताना मी सगळ्याच्या चेहऱ्याकडे पाहात होतो व ध्यान सपल्यानतर केशवला म्हणालो, “ तुमच्यापैकी पुष्कळाचे ध्यान पाहून मनात काय वाटले सागू ? कित्येक वेळा तिकडे दक्षिणेश्वरी झाउतलाकडे वानराचा कळप येत असतो ते सगळे वानर कसे पण अगदी चूप बसलेले असतात,—पाहाणाऱ्याला वाटावे, ‘ अहाहा ! किती चागले आहेत हे ? याना दुसरे तिसरे अगदी काही एक ठाऊक नाही बरे का किती शात आहेत हे ? ’ पण ते काय खरेच शात असतात की काय ? छे ! ‘ कोणाच्या बागेतल्या झाडाना फळें आली आहेत, कोणाच्या वेलाना काकडया आणि भोपळे लागले आहेत, कुठल्या चिचेला चिचा लागल्या आहेत, ’ हे सारे त्याचे विचार चाललेले असतात ! झाले,—काही वेळाने एकदम ‘ हुप् ’ करून, उडया मारीत, क्षणार्धात ते नाहीसे होतात आणि कुठल्यातरी बागेवर धाड घालून तिचा फन्ना उडवतात !! इथल्यापैकी पुष्कळाचे ध्यान अशाच प्रकारचे दिसले ! हे ऐकून सगळे जण हासायला लागले ! ”

आपल्या शिष्यमडळीना उपदेश करीत असताहि कित्येकदा ते असाच विनोद करीत एक दिवस स्वामी विवेकानद त्याच्या पुढे भजन करीत होते त्यावेळी ते ब्राह्मसमाजाचे अनुयायी असून रोज सकाळ संध्याकाळ समाजाच्या नियमाप्रमाणे उपासना ध्यान वगैरे करीत असत एकदा

“ सेई एक पुरातन पुरुष निरंजन, चित्त समाधन कर रे ”

हें समाजसंगीतातील पद ते तन्मय होऊन गात होते म्हणता म्हणता "भजन साधन तार, कर रे निरंतर," ही ओळ आली ह्या चरणात केलेला उपदेश विवेकानंदाच्या मनावर दृढ ठसावा, म्हणून ते एकदम म्हणाले, "छे छे, असे म्हणूं नको त्याच्या ऐवजी 'भजन साधन तार, कर रे दिने दुबार!' असे म्हण! आपल्याला जे कधी करायचेच नाही, ते बळेंबळेच म्हणण्यात काय अर्थ आहे?" हे ऐकून सर्वजण खो खो हसूं लागले व विवेकानंदहि मनात किंचित् वरमले असो

आणखी एक वेळ, उपासनेसबंधाने, श्रीरामकृष्ण केशवचद्र वगैरेना म्हणाले, "तुम्ही ईश्वराच्या ऐश्वर्याचेंच एवढे वर्णन का करीत असता? बापाच्या पुढे बसून, मूल 'माझा बाप किती श्रीमत आहे, त्याचे किती बागबगीचे आहेत,' असे म्हणत असते, की त्याचे आपल्यावर केवढे प्रेम आहे, या विचाराने तन्मय झालेले असते? बापाने मुलाला चागले खायला प्यायला घातले, त्याला सुखात ठेवले, तर त्याने यात विशेष ते काय केले? ईश्वराची जर आपण सारी मुले आहो, तर त्याला असे केलेच पाहिजे म्हणून जो खरा भक्त असतो, तो असे विचार मनात न आणता, ईश्वराचे आपल्यावर केवढे प्रेम आहे, या विचारात तन्मय होऊन तो सर्वस्वी आपला कसा होईल याचेच चितन करून, त्यावर अधिकाधिक प्रेम करू लागतो आपले सर्वस्व तोच आहे, अशा दृढ भावनेने त्याच्यापाशी हट्ट धरून बसतो, त्याच्यावर रागावतो, त्याला हट्टाने म्हणतो—'देवा, माझी प्रार्थना तुला ऐकलीच पाहिजे, मला तूं दर्शन दिलेच पाहिजे' आणि तेच जर ईश्वराच्या ऐश्वर्याच्या गोष्टीचे सारखे चितन चालविले तर 'ईश्वर आपलाच आहे,' ही भावना तितकी दृढ होऊ शकत नाही व आपला त्यावर जोरहि चालत नाही ऐश्वर्याच्या चिंतनाने एक प्रकारची भीति मनात उत्पन्न होते व ईश्वराशी आपला इतका जिव्हाळ्याचा सबंध राहू शकत नाही मग मनात असेच येत जातें की, 'ईश्वर म्हणजे केवढा मोठा, आपण त्याचे पुढे किती क्षुद्र आणि

तो आपल्यापासून किती तरी दूर ! ’ त्याची जर प्राप्ति करून घ्यायची असेल, तर त्याच्याशी अगदी जिव्हाळ्याचा संबंध ठेवला पाहिजे ! ”

ईश्वराच्या प्राप्तीसाठी साधन-भजन आणि विषयवासनात्याग याची अत्यत आवश्यकता आहे या गोष्टीशिवाय आणखीहि एक गोष्ट श्रीराम-कृष्णाच्या सगतीने ब्राह्मसमाजातील मडळीना कळून आली, ती गोष्ट म्हणजे ईश्वर साकारहि आहे ही होय पाश्चात्य धर्मप्रचारकाच्या तोंडून ऐकून आणि कित्येक इंग्रजी पुस्तकावरून त्याची अशी समजूत झालेली होती, की, ईश्वर केवळ निर्गुण निराकार आहे व मूर्तिमध्ये त्याचा आविर्भाव कल्पून त्याची पूजा वगैरे करणे महापाप आहे परंतु “ निराकार जलामध्ये साकार बर्फ जमावे त्याप्रमाणे, निराकार सच्चिदानंदाला भक्तिरूपी थडीने साकार रूप प्राप्त होते, ” “ ज्याप्रमाणे वकील दिसला की, कोर्टाची आठवण होते त्याप्रमाणे प्रतिमेवरून ईश्वराची आठवण होते,” “साकार मूर्तीच्या अवलबनाने ईश्वराच्या यथार्थ स्वरूपाचा साक्षात्कार होतो,” वगैरे प्रतीकोपासनेच्या गोष्टी श्रीराम-कृष्णाच्या तोंडून ऐकून त्याना समजून आले की, जिला आपण इतके दिवस नावे ठेवीत होतों, त्या मूर्तिपूजेच्या तर्फेहि काही गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. त्यानंतर श्रीरामकृष्णाच्या तोंडून, “ अग्नि व त्याची दाहकशक्ति ही जशी एक-रूपच असतात, त्याचप्रमाणे ब्रह्म व त्याची जगत्प्रसवकारिणी शक्ति एकरूपच आहेत ” हा सिद्धान्त ऐकून, त्याच्या साकारोपासनेच्या कल्पनेवरहि नवाच प्रकाश पडला आणि त्याची खात्री झाली की, ईश्वर केवळ साकार आहे असें प्रतिपादण्यात जसा दोष आहे, तसेच ईश्वर केवळ निराकार आहे, असें म्हणण्या-तहि दोष आहे श्रीरामकृष्ण एक दिवस केशवचंद्र वगैरेंना म्हणाले, “ ईश्वर-स्वरूपाची ‘ इति ’ करणें शक्य नाही तो साकार आहे, निराकारहि आहे आणि याशिवाय आणखी कसा कसा आहे, हे कोण जाणूं–बोलूं शकेल ? ”

केशवचद्र सेन याच्या मुलीचा कुचबिहारच्या राजाबरोबर विवाह झाल्यानंतर, समाजात या सबधाने बराच वाद माजून अखेरीस ब्राह्म-

समाजाचे "भारतवर्षीय" व "साधारण" ब्राह्मसमाज असे दोन भाग झाले तरी सुद्धा, श्रीरामकृष्णाचा ब्राह्मसमाजाशी सबध कायमच होता कारण त्या दोन्ही समाजावर त्याचा लोभ तसाच कायम राहिला व या दोन्ही समाजातील साधकाना त्याच्याकडून पूर्ववत् आध्यात्मिक मार्गात साहाय्य मिळत गेले

समाजाचे दोन विभाग झाल्यानंतर साधारण ब्राह्मसमाजाचे आचार्य-पद श्री विजयकृष्ण गोस्वामी व शिवनाथशास्त्री याचेकडे आले विजयकृष्ण हे अत्यत भक्तिमान् असल्यामुळे श्रीरामकृष्णाचे त्याचेवर फार प्रेम असे श्रीरामकृष्णाच्या उपदेशाप्रमाणे साधना करावयास लागल्यापासून, थोडक्याच वेळात त्याची आध्यात्मिक उन्नति मोठ्या झपाट्याने झाली कीर्तनाचे वेळची त्याची तन्मयावस्था, त्याचे भगवतप्रेमाने रगलेले नृत्य, त्याची भावावस्था वगैरे पाहून लोक मोहून जात त्याच्या उच्च आध्यात्मिक अवस्थेसबधाने श्रीरामकृष्ण म्हणत, "ज्या दिवाणखान्यात प्रवेश केला म्हणजे साधना पूर्ण होऊन, ईश्वरदर्शन घडते, त्याच्या जवळच्या खोलीत पोहोचून, तो दिवाणखाना उघडण्यासाठी विजय दार ठोठावीत आहे !" असो

ब्राह्मसमाज दुभंगल्यापासून त्या दोन्ही पक्षातील लोकाची मने एक-मेकाविषयी चागली नव्हती, तरी पण दोन्ही पक्षातील लोक श्रीरामकृष्णाना सारखाच मान देत व वरचेवर त्याच्या दर्शनाला दक्षिणेश्वरी येत एक दिवस केशवचद्र आपल्या अनुयायाना घेऊन दक्षिणेश्वरी आले असता, विजयकृष्णहि आपली मडळी घेऊन तेथे आले ही अशी अचानक गाठ पडल्यामुळे अर्थातच दोन्ही पक्षातील मडळीना सकोचल्यासारखे झाले खुद्द केशवचद्र व विजयकृष्ण यानाहि चुकल्या चुकल्यासारखे झाले ही गोष्ट श्रीरामकृष्णाच्या नजरेस येताच ते हसत हसत म्हणू लागले —

"एका एकदा काय झाले, की भगवान् शंकर व श्रीरामचंद्र याच्यामध्ये काही तटा उपस्थित होऊन, दोघाचे युद्ध झाले आता, शकराचे गुरु राम आणि रामाचे गुरु शकर, असे असल्यामुळे युद्धानंतर त्या दोघाचे पूर्वीप्रमाणे सख्य होण्याला उशीर लागला नाही पण शंकराचे सैन्य भुतेखेते आणि रामाचे सैन्य वानरमडळी, याचे मात्र सख्य झाले नाही, त्याचे युद्ध चालूच राहिले! (केशव व विजय याना उद्देशून) म्हणून म्हणतो, जे व्हायचे ते होऊन गेले, तुम्हा दोघाच्या मनात तरी एकमेकाविषयी तेढ राहू नये, ती राहायचीच असेल तर तुमच्या वानरात आणि भुताखेतातच राहू द्या!" तेव्हापासून केशवचद्र आणि विजयकृष्ण याच्यामध्ये पुन्हा बोलणेचालणे सुरू झाले विजय-कृष्णाची साधनभजनामधे जसजशी अधिकाधिक उन्नति होत गेली, तसतसे समाजाच्या कामातून आपण मोकळे व्हावे व सर्व वेळ साधनेमधेच घालवावा असे त्याना वाटू लागले व लवकरच त्यानी साधारण ब्राह्मसमाजाचे पुढारीपण सोडले त्याचबरोबर इतरहि बरीचशी मंडळी समाजातून निघाली, त्यामुळे समाज बराच रोडावला विजयकृष्णाच्या मागून समाजाच्या पुढारीपणाची जबाबदारी श्री शिवनाथशास्त्री याच्या अगावर पडली शिवनाथशास्त्री याचेहि श्रीरामकृष्णाकडे वरचेवर येणे जाणे असे परतु श्रीरामकृष्णाच्याच उपदेशाने विजयकृष्णाचे विचार बदलले व त्यानी समाज सोडला म्हणून ते आता श्रीरामकृष्णाकडे पूर्वीप्रमाणे वरचेवर येईनासे झाले स्वामी विवेकानंद त्या वेळी त्या समाजाचे अनुयायी असत व त्याचेवर शिवनाथाचेहि फार प्रेम असे समाजाप्रमाणेच, स्वामीजी मधून मधून केशवचद्राकडे व दक्षिणेश्वरी श्रीराम-कृष्णाकडे जात असत श्रीरामकृष्णाकडे त्याचे जाणे येणे असल्याचे ऐकून, "श्रीराम-कृष्णाकडे वरचेवर जात जाऊ नको," असा शिवनाथानी विवेकानदास उप-देश केला व म्हणाले, "असेच जर सर्वजण तिकडे जाऊ लागले तर लवकरच समाज मोडून जाईल!" श्रीरामकृष्णाची भावसमाधि हा एक प्रकारचा मेंदूचा रोग आहे, अशी त्याची समजूत असे; ती ऐकून श्रीरामकृष्णानी त्याना काय उत्तर दिलें ते मागे आलेच आहे (भाग १ ला, पान २८८)

श्रीरामकृष्णाच्या प्रभावाने समाजात साधनानुराग उत्पन्न झाला व ईश्वराची प्राप्ति करून घेणें हेंच जीवनाचे ध्येय ठेवून त्याप्रमाणे ईश्वरप्राप्तीच्या प्रयत्नाला पुष्कळानी मनापासून सुरुवातहि केली एक दिवस आचार्य प्रतापचंद्र मुजुमदार दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या दर्शनास आले असता, समाजावर श्रीरामकृष्णाच्या उपदेशाचा केवढा परिणाम झाला, यासबधाने ते म्हणाले, " श्रीरामकृष्णाचे दर्शन होण्यापूर्वी, धर्म म्हणजे कशाला म्हणतात, हे कोणाला समजत होतं ? सारा लुच्चेगिरीचा बाजार भरला होता धर्मजीवन कशाला म्हणतात, हे श्रीरामकृष्णाच्या सगतीचा लाभ झाल्यानतरच पुष्कळाना कळून आलं " त्या दिवशी प्रतापचद्राबरोबर चिरजीव शर्माहि होते

नवविधान समाजावर श्रीरामकृष्णाचा प्रभाव विशेष रीतीने दिसून येई, तरी विजयकृष्ण आचार्यपदावर असेपर्यंत साधारण ब्राह्मसमाजावरहि त्याचा प्रभाव काही थोडाथोडका नव्हता विजयकृष्ण व त्याच्याबरोबरच इतर खरे साधक, यानी समाज सोडल्यापासूनच, त्या समाजावरील श्रीरामकृष्णाचा प्रभाव कमी होत गेला नवविधान समाजाचे एक विशेष अग म्हटले म्हणजे आचार्य चिरजीव शर्मा यानी रचिलेली त्याची सगीते होत परतु अशी श्रेष्ठ भावोद्दीपक सगीते, त्याना तरी श्रीरामकृष्णाच्या सहवासाने, त्याचे नानाप्रकारचे भाव, दर्शने, समाधि वगैरेची माहिती झाल्यामुळेच रचिता आली चिरजीव शर्मा स्वत उत्तम गागारे असत त्याचे गायन ऐकता ऐकता कित्येक वेळा श्रीरामकृष्णाना समाधि लागलेली आम्ही पाहिली आहे

अशा रीतीने ब्राह्मसमाजावर श्रीरामकृष्णाच्या उपदेशाचा परिणाम झालेला होता " मते तितके मार्ग " हा आध्यात्मिक जगतातील नवीनच सिद्धान्त त्यानी स्वानुभावाने शोधून काढला असल्यामुळे, सर्व धर्म, सर्व मते याचेवर त्याचा विश्वास असे, तोच विश्वास ब्राह्मसमाजाविषयीहि त्याचे मनात होता सकीर्तनाचे शेवटी ईश्वराला व सर्व सप्रदायाच्या साधकाना नमस्कार करण्याचे वेळी," आधुनिक ब्रह्मवाद्याना प्रणाम " असे म्हणून, ब्राह्मसमाजाच्या

भक्तमंडळीस नमस्कार करण्यास ते कधीहि विसरत नसत, यावरून ही गोष्ट सिद्ध होते श्रीरामकृष्णाचा साधनायज्ञ पूर्ण होऊन त्याच्या अगच्या गुरुभावाचा पूर्ण विकास झाल्यानतर मुख्यत ब्राह्मसमाजापासूनच त्याच्या कार्याला सुरुवात झाली व कलकत्त्यातील सर्वसाधारण लोकाना श्रीरामकृष्णाची माहिती ब्राह्मसमाजानेच करून दिली, असो

ब्राह्मसमाजाच्या अनुयायाच्या घरीहि जाऊन कित्येकदा श्रीरामकृष्ण भजन व ईश्वरीय कथालाप करून आनद करीत असत, असे वर सागितलेच आहे अशा दोन बहारीच्या प्रसगाना आम्हीहि सुदैवाने हजर होतो; म्हणून प्रत्यक्ष डोळयानी पाहिलेल्या या प्रसगापैकी एकाचे वर्णन पुढील प्रकरणात केले आहे

---

# १६. मणिमोहन मल्लिकाच्या घरचा ब्राह्मोत्सव

भगवतासी कीर्तन प्रिये । कीर्तने समाधान होये ।।
बहुत जनासी उपाये । हरिकीर्तने कलियुगी ।।—श्रीदासबोध,
४-२-७

कीर्तने महादोष जाती । कीर्तने होये उत्तम गती ।।
कीर्तने भगवत्प्राप्ती । येदर्थी संदेह नाही ।।—श्रीदासबोध,
४-२-२७

" कलियुगात नामस्मरणासारखे दुसरें सोपे साधन नाही "
" नामस्मरणाने मनुष्याचे मन व शरीरहि शुद्ध होते "

—श्रीरामकृष्ण

---

१८८३ सालचा नोव्हेंबर महिना या महिन्याच्या पंचवीस तारखेस मणिमोहन मल्लिक याचे घरीं ब्राह्मसमाजाच्या वार्षिक उत्सवानिमित्त श्रीरामकृष्णाना आमंत्रण होतें आम्ही त्या दिवशी दुपारी दक्षिणेश्वरीं श्रीरामकृष्णाच्य दर्शनास गेलो होतों, त्यावेळी ते निघण्याच्याच तयारीत होते त्याच्या चरणी मस्तक ठेऊन त्याना प्रणाम करिताच ते म्हणाले, " अरे वा ! तुम्ही मडळी आलात होय ? ठीक आहे, काही हरकत नाही, बसा मात्र जरा उशीरा आला असता तर भेट झाली नसती आज कलकत्त्याला जायचें आहे, गाडी आणायला गेले आहेत तिथे ब्राह्मसमाजाचा उत्सव आहे काही असो, पण भेट झाली हें चागले झाले ! भेट न होता तसेंच परत जावे लागले असतें, तर वाईट वाटलं असतें, नाही ! " आम्ही खाली एका बाजूला बसलों काही वेळाने

त्याना म्हणालो, " महाराज, आपण जात आहा, तेथे आम्हाला येऊ देतील काय ? " श्रीरामकृष्ण म्हणाले, " हो, न येऊ द्यायला काय झाले ? तुम्हाला यायचें असेल तर खुशाल या सिदुरियापटीत मणिमोहन मल्लिकाचें घर " जवळच एक साधारण गोरटेला, सडपातळसा, ताबडे वस्त्र नेसलेला तरुण मुलगा उभा होता, त्याचेकडे पाहून श्रीरामकृष्ण म्हणाले, " अरे ! याना तेवढा मणिमोहनच्या घराचा नंबर साग बघृ ! " त्याने अत्यत नम्रपणे उत्तर दिले, " न० ८१ चितपूररोड, सिदुरियापटि " याचेनंतर अजमासे एक महिन्याने, त्याच तरुण मुलाचे नाव बाबूराम आहे, असे समजले हेच पुढे स्वामी प्रेमानंद या नावाने सर्वांच्या परिचयाचे झाले

थोडयाच वेळात गाडी आली बाबूरामाला आपला हातरुमाल, मसाल्याचा बटवा व उपरणे वगैरे जिन्नस बरोबर घेण्यास सागून श्रीरामकृष्ण श्रीजगदंबेचे दर्शन घेऊन गाडीत बसले एका बाजूला बाबूराम बसला गाडी कलकत्त्याकडे निघून गेली आम्हीहि पुन्हा नावेंत बसून कलकत्त्याला गेलो व शोध करीत अदाज चारच्या सुमारास मणिमोहनच्या घरी पोहोचलो श्रीरामकृष्णाची चौकशी करीत असता, ते वर असल्याचे कळलें. वर जाऊन पाहातों तो दिवाणखाना पत्रपुष्पानी सुदर सजविला असून, तेथे काही मडळी परस्पराशी बोलत बसली होती त्याच्याकडून समजलें की माध्यान्ह उपासना, भजन वगैरे नुकतेच झाले आहे व आता याच्यानंतर सायंकाळची उपासना व कीर्तन वगैरे होईल स्त्रीभक्तमडळींच्या आग्रहावरून श्रीरामकृष्ण आत गेले होते

सायकाळच्या उपासनेला अजून वेळ आहे असे पाहून आम्ही थोडे हिंडण्यास बाहेर गेलो सन्ध्याकाळ होताच त्या ठिकाणी पुन्हा परतून आलों घरासमोरील रस्त्यावर असतानाच आतील भजनाचा आणि मृदंगाचा आवाज आमच्या कानावर आला. कीर्तनाला नुकताच आरंभ झाला असावा, असे जाणून, आम्ही त्वरेने वरील दिवाणखान्याकडे गेलों तेथे जो देखावा आमच्या

दृष्टीस पडला, त्याचे यथातथ्य वर्णन करणे अशक्य आहे दिवाणखान्याच्या आत-बाहेर चिकार गर्दी होती प्रत्येक दरवाज्याच्या व खिडकीच्या तोंडी इतकी गर्दी होती की, तीतून आत अथवा बाहेर जाणे येणें अगदी अशक्य होते सर्वजण माना वर करून भक्तिपूर्ण अत करणाने आत टक लावून पाहात होते ज्याची त्याची पुढे जाण्याची चुळबुळ चालली होती या अशा भयकर गर्दीतून रेटारेटी करून आम्ही कसेबसे जिवानिशी आत तर गेलो तेथे मात्र बाहेरच्या-पेक्षा जराशी गर्दी कमी होती, म्हणून आतला देखावा कसाबसा दिसत होता

काय तो देखावा ! त्या दिवाणखान्यात स्वर्गीय आनदाचे जणु तुफान सुटले होते ! सर्वजण तन्मय होऊन गेलेले होते सकीर्तन करणाऱ्या मडळीतील कोणी हासत होते, कोणी रडत होते, कोणी मुद्दाम वेगाने नृत्य करीत होते, कोणी जमीनीवर एकदम देह टाकून गडबडा लोळत होते, कोणी अत्यत विव्हल होऊन उन्मत्तासारखे वर्तन करीत होते आणि या साऱ्या उन्मत्ताच्या मध्यभागी भावावेशात श्रीरामकृष्ण स्वत नृत्य करीत होते ! नृत्य करीत करीत ते पुढे सरकत व तेथून पुन्हा मागे सरकत सरकत पहिल्या ठिकाणी परतून येत इतकी ठेचून गर्दी होती तरी, ते पुढे अथवा मागे सरकू लागले म्हणजे जवळ बसलेले लोक भारल्यासारखे होऊन त्याना वाट करून देत ! त्याच्या मुखावर हास्याची छटा असून त्याच्या वदनमंडळावर अपूर्व तेज चमकत होतें त्याच्या अंगातून मधुरता व कोमलता हे भाव जणु काय गळत होते आणि त्याबरोबरच नृत्य करताना त्याच्या अगी सिंहाचे बल आविर्भूत झाले असल्याचें दिसत होतें ! त्याच्या त्या नृत्याला तोडच नाही ! त्यात काही अवडबर नाही, की उड्या मारणे नाही, की काही बळेबळेच अगविक्षेप करण्याचा खटाटोप नाही ! सारे काम अगदी स्वाभाविक आणि अत करणातील स्फूर्तीने होत असल्याचे दिसे. चागल्या स्वच्छ पाण्यात एखादा मासा सोडून दिला, म्हणजे तो जसा त्यात आनंदाने क्रीडा करतो, केव्हा शातपणे तर केव्हा भरभर पोहत असतो आणि पाण्यात चारी बाजूला धावपळ करीत असतो, अगदी तीच तऱ्हा श्रीरामकृष्णाच्या या अपूर्व नृत्याची ! असे वाटे की, आनदसागरात बुड्या मारून त्याच्या

अंत करणाला जें काही अपार सौख्य वाटत असेल, तेंच नृत्याच्या द्वारा ते प्रकट करून दाखवीत असावे! हें अपूर्व नृत्य चालले असता मधून मधून ते सज्ञाशून्य होऊन जात, त्याचे नेसलेले धोतर गळून जाई व इतक्यात कोणीतरी तें त्याच्या कमरेभोवती कसेतरी गुंडाळून ठेवी! भावावेशाने एखाद्याला सज्ञा-शून्य होताना पाहून, ते त्याच्या वक्ष स्थलाला स्पर्श करून, पुन त्याला सचेतन करीत! असे वाटे की त्याच्या अंगातून एक दिव्य व उज्ज्वल आनंदाचा प्रवाह चारी दिशाना वाहात सुटला असून, त्या प्रवाहात सापडणाऱ्या यथार्थ भक्ताला ईश्वरदर्शन होत आहे, मृदुवैराग्यवानाला तीव्र वैराग्य प्राप्त होत आहे, सर्वांच्या मनातील आळस नाहीसा होऊन, आध्यात्मिक मार्गात अग्रसर होण्याचे सामर्थ्य सर्वांना प्राप्त होत आहे, एवढेच काय, पण घोर विषयी मनुष्याच्या मनातील संसारासक्तीहि क्षणभर नाहीशी होत आहे!! त्याच्या भावावेशाच्या प्रवाहात सर्वचजण सापडले असून, त्या प्रवाहाच्या पवित्रतेने त्याची मनें चागली धुतली जाऊन, ती उच्च उच्च आध्यात्मिक पायऱ्यावर आरोहण करीत आहेत! साधारण ब्राह्मसमाजाचे आचार्य श्री विजयकृष्ण गोस्वामी, याची तर गोष्टच बोलावयाला नको, ब्राह्ममडळीपैकी कित्येक इतरहि मंडळी त्या दिवशी भावाविष्ट व सज्ञाशून्य होऊन गेली! आचार्य चिरंजीव शर्मांचीहि तीच गत! भक्तिविषयक एक पद तन्मय होऊन, आपल्या अत्यत मधुर आवाजाने एकतारीवर गात असता, त्यानाहि भावावेश प्राप्त झाला! अशा रीतीने दोन अडीच तासपर्यंत हें अपूर्व सकीर्तन व नृत्य चालल्यानंतर, “एमन मधुरनाम जगते आनिल के” हे पद होऊन व सर्व धर्मसंप्रदायाना व भक्ताचार्यांना प्रणाम होऊन त्या दिवशीचा हा अपूर्व आनं-दाचा बाजार मोडला

सकीर्तनाचे शेवटी, सर्व मंडळी बसल्यावर, “हरि रस मदिरा पिये मम मानस मात रे” हे पद म्हणण्याची, आचार्य नगेंद्रनाथ चट्टोपाध्याय याना श्रीरामकृष्णानी विनंति केली व त्यानीहि तन्मय होऊन हे पद दोन-तीन वेळ घोळून घोळून म्हटलें व सर्वांना आनदित केले.

यानंतर, " रूपरसादि विषयातून मनाला बाहेर काढून ते ईश्वराच्या सेवेत गुतविले असता, जीवाला परमशाति प्राप्त होते, " अशा आशयाचा उपदेश श्रीरामकृष्णानी जमलेल्या सर्व मडळीस केला दिवाणखान्याच्या एका बाजूला पडद्याआड स्त्रियाहि बसलेल्या होत्या त्यानीहि आध्यात्मिक विषयावर अनेक प्रश्न श्रीरामकृष्णाना विचारले व श्रीरामकृष्णानीहि त्याची योग्य ती उत्तरे दिली त्या दिवशी निघालेले विषय, मडळींच्या मनात दृढ ठसावे, म्हणून त्यानी उत्तरे देता देताच श्रीजगदबेचे नाम गाण्यास सुरुवात केली व रामप्रसाद, कमलाकात वगैरे साधकाची अनेक भक्तिरसपूर्ण पदे स्वत गाऊन दाखविली

इकडे श्रीरामकृष्ण पदे म्हणण्यात गुग झाले असता, श्रीविजयकृष्ण, घरात एका बाजूला काही भक्ताना श्रीतुलसीदासाचे रामायण वाचून दाखवून त्याचा अर्थ सागत होते काही वेळाने, सायकाळची उपासना सुरू करण्यापूर्वी श्रीरामकृष्णाना प्रणाम करावा म्हणून, ते दिवाणखान्यात आले त्याना पाहाताच श्रीरामकृष्ण एखाद्या लहान मुलामारखे त्याची चेष्टा करू लागले ते म्हणाले, " आजकाल विजयला सकीर्तनाशिवाय दुसरे काही सुचत नाही ! ते सारे ठीक आहे, पण त्याचे ते नाचणे सुरू झाले, की माझ्या छातीत धडकीच भरते ! हो ! नेम काय ? कडीपाटसुद्धा ढासळायचा एखाद्या वेळेला ! ( सारे लोक हासतात ) खोटे नाही, आमच्या गावी एकदा खरोखरच अशी गोष्ट घडून आली एक साधुमहाराज आपल्या शिष्याच्या घरी दुसऱ्या मजल्यावर सकीर्तन करीत होते कडीपाट काही मोठासा भक्कम नव्हता. सकीर्तन चागले जमल्यावर नृत्याला सुरुवात झाली साधुमहाराज आपले होते तुझ्यासारखेच चागले आडव्या आगाचे ! नाचता नाचता, एकाएकी कडीपाट भगून, साधुमहाराजाची स्वारी एकदम खालच्या मजल्यावर येऊन हजर झाली ! म्हणून वाटतें की तुझ्या नृत्याने एखादे वेळीं असाच प्रकार व्हायचा !! " ( सारे हासतात ) विजयकृष्णाच्या भगव्या वस्त्राकडे पाहून ते म्हणाले, " आजकाल भगव्या रगाचेहि विजयला मोठे वेडच लागले आहे ! इतर लोक फक्त आपल्या

कपड्यालाच तेवढा भगवा रंग देतात, पण विजयची तऱ्हा पाहा ! त्याचे वस्त्र, चादर, अगरखा, जोडा,—सारेच भगवे ! बाकी हे काही वाईट नाही म्हणा एक वेळ मनाची अशी अवस्था होते की, तेव्हा असेच करण्याची फार इच्छा होते भगव्याशिवाय काहीच बरें वाटत नाही आणि हेहि बरोबरच आहे कारण भगवा रग म्हणजे त्यागाचे चिन्ह की नाही ? म्हणून साधकाला तो नेहमी ईश्वरासाठी सर्वस्वत्यागाच्या व्रताचे स्मरण देत असतो " यावेळी विजयकृष्णानी श्रीरामकृष्णाना प्रणाम केला व " ॐ शांति शाति शाति, तुला शाति प्राप्त होवो ! " असा श्रीरामकृष्णानीहि त्याना प्रसन्न मनाने प्रेमपूर्वक आशीर्वाद दिला.

श्रीरामकृष्ण पदे म्हणत असता एक लहानशीच गोष्ट घडून आली, परतु तिच्यावरून श्रीरामकृष्णाच्या स्वभावाची चागली कल्पना करता येते व सदैव ईश्वरचितनात तन्मय असूनहि बाह्यजगतातील विषयाकडे त्याची किती बारीक नजर असे, हे दिसून येते गाणी गात असता त्याची दृष्टि सहज बाबूरामच्या तोंडाकडे गेली व त्याला भूक लागली आहे असे त्याच्या तत्काळ लक्षात आले त्यानी लगेच स्वत साठी म्हणून थोडेसे संदेश ( एक प्रकारची मिठाई ) व एक पेलाभर पाणी मागून घेतलें व आपल्या अगोदर तो कधीहि काही खाणार नाही हे जाणून त्यातील लेशमात्र स्वत ग्रहण करून बाकीचे सर्व संदेश त्यानी बाबूरामाला खावयास दिले !

विजयकृष्ण श्रीरामकृष्णाचा आशीर्वाद घेऊन उपासना सुरू करण्यास खाली आले व इकडे श्रीरामकृष्णाना फराळासाठी आत नेण्यात आले रात्रीचे नऊ वाजून गेले होते आम्ही दिवाणखान्यांतून खाली येऊन विजयकृष्णाची उपासना ऐकण्यास थोडेसे थांबलो " सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म " वगैरे ब्रह्माचा महिमा दाखविणाऱ्या वाक्यांनी उपासनेला सुरुवात झाली होती कांही वेळाने श्रीरामकृष्णहि तेथे आले व उपासना ऐकत

इतर सर्वांच्या बरोबर दहा-पंधरा मिनिटे बसून राहिले नंतर त्यानी भूमिष्ठ होऊन प्रगाम केला व रात्र बरीच झाली असे पाहून परत जाण्यासाठी गाडी आगण्यास सागितले गाडी आल्यानतर ते उपासनागृहांतून हळूहळू बाहेर आले व थडी लागू नये म्हणून मोजे, बडी व कानटोपी चढवून गाडीत बसले सर्वांनी त्याना प्रगाम केल्यावर गाडी दक्षिणेश्वराकडे निघून गेली. विजयकृष्णांच्या उपासनेला आणखी थोडा वेळ थाबून आम्हीहि घरी परतलो

---

# १७ श्रीरामकृष्णांच्या भक्तमंडळींचें आगमन

" कमल प्रफुल्लित झाले म्हणजे भुग्याना आमत्रण द्यावे लागत नाही ! "

—श्रीरामकृष्ण

ब्राह्मसमाजाशी आलेल्या सबंधावरून श्रीरामकृष्णाच्या ही गोष्ट लक्षात आली की, पाश्चात्य विद्या शिकलेल्या सर्वच लोकाना आपला सर्वच उपदेश पटेल असे नाही जडवादाने त्याच्या मनावर पगडा बसविला असल्यामुळे, त्याची फार आध्यात्मिक अवनति झाली आहे व हा पगडा दूर होऊन धर्माचें खरे रहस्य या मडळीना समजण्यास काही काळ लागणार धर्मसबधी गोष्टी याना एक प्रकारे नवीनच असल्यामुळे, ईश्वरलाभासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याचे खडतर असिधाराव्रत स्वीकारण्याचे धाडस याच्याने होणार नाही आणि अशी ईश्वरदशनाची तळमळ जोपर्यंत याना लागगार नाही तोपर्यंत प्रपंचातील इतर अनेक गोष्टीप्रमाणे, धर्म हीहि एक लोकाचाराचीच गोष्ट आहे, यापलीकडे त्याची प्रापचिक दृष्टि पोहोचणार नाही असे जाणून सुद्धा श्रीरामकृष्णानी त्याना उपदेश देताना आपली उदार मते व विचार त्याना स्पष्टपणे सागण्यास कधी कमी केले नाही " ईश्वरासाठी सर्वस्वत्याग न केल्यास त्याच्या दर्शनाचा लाभ कधीहि होणार नाही, " " मते तितके मार्ग, " " कोगत्याहि मार्गाने जा, त्या मार्गाचे अती उपासक आपल्या उपास्याशी एकरूप होऊन जातो, " " मन व मुख एक करणे हेच साधन," " ईश्वरावर पूर्ण भरवसा व विश्वास ठेवून फलाची आशा न धरिता, नेहमी सदसद्विचारपूर्वक, संसारातील सर्व कर्तव्यकर्मे करीत

राहणे, हाच ईश्वरप्राप्तीचा मार्ग "—वगैरे आध्यात्मिक तत्वे ते त्याच्यासमोर नि सकोच प्रतिपादन करीत

असे असले तरी, ईश्वरासाठी सर्वस्वाचा होम केलेल्या, त्यागाचे मूर्तिमत अवतार असलेल्या श्रीरामकृष्णाना, आपल्यासारखे त्यागी भक्त कधी दिसतील अशी उत्कठा लागावी, यात आश्चर्य नाही मानव जन्माला येऊन जे काय मिळावावयाचें ते त्यानी पूर्णपणे मिळविले होते व सदैव आपल्या आनदात निमग्न राहून आपल्या अनुभवाचा फायदा इतराना देण्यास ते आता तयार होऊन बसले होते कमल प्रफुल्लित झाले होते आणि त्यातील दिव्य मधु चाखण्यास मधुलोलुप भृगाचे थवेच्या थवे धावून येऊ लागण्याची वेळ जवळ आली होती, किंबहुना असे भृंगे अगोदरपासूनच येऊ लागले होते यापुढील त्याचे आयुष्य केवळ "बहुजनहिताय बहुजनसुखाय" होते त्याना स्वत ला आता काही मिळवावयाचे राहिलें नव्हते त्याना आता सारी तळमळ काय ती एवढीच लागली होती की, आपल्याकडे खरे खरे भक्त, खरे खरे साधक कधी येतील व त्याना आपण आपल्या विविध अवस्था व अनुभव कधी सागू? त्यानी तेव्हा अत्यत व्याकुळतेने प्रार्थना करावी, "आई, तुझ्या त्यागी भक्ताना इथे घेऊन ये, म्हणजे मी त्याच्याबरोबर मन मोकळे करून तुझ्या गोष्टी बोलेन व आनद करीन " हे सारे भक्त केव्हा येतील, ते किती असतील, त्यातल्या कोणाकडून कोणते काम आई करून घेईल, आई त्याना सन्यासी करील की गृहस्थाश्रमीच ठेवील,—वगैरे वगैरे विचार करण्यातच या अद्भुत सन्याशाचे तेव्हा दिवसच्या दिवस जाऊ लागले! श्रीरामकृष्ण म्हणत, "काय सागू रे! तुम्हा सगळ्याची भेट व्हावी, म्हणून अशी तळमळ लागावी आणि मनाला अशा काही वेदना व्हाव्या, की त्याच्या योगाने मी बेहोष होऊन पडावे! असे वाटावे की, मोठ्याने गळा काढून मनमुराद रडत बसावे! पण लोक काय म्हणतील या विचाराने रडवत नसे मनाची कशीबशी समजूत घालून दिवस घालवावा, पण सध्याकाळ झाली आणि देवळात आरत्या सुरू झाल्या म्हणजे मात्र, "आणखी एक दिवस निघून गेला आणि अजून

कोणीच आलें नाही ! ” ह्या विचाराने बिलकुल धीर धरवत नसे. गच्चीवर जाऊन, “ तुम्ही सारे कोग कुठे आहात, ते यारे या ! तुमच्या भेटीसाठी माझा प्राण कासावीस झाला आहे ! ” असे मोठमोठयाने ओरडावे आणि गळा काढून रडत बसावे ! असे वाटे की, आता वेड लागणार खास ! अशा तळमळीत काही दिवस गेल्यानंतर मग तुम्ही एकेकजग येऊ लागला, तेव्हा मन शात झाले आणि अगोदर पाहिल्यामुळे, तुम्ही जसजसे येत गेला, तसतसे तुम्हाला ओळखीतहि गेलो असे होता होता जेव्हा पूर्ण ( श्रीराम-कृष्गाचा एक भक्त ) आला, तेव्हा आई म्हणाली, “ तू पूर्वी पाहिल्यापैकी जेवढे भक्त यावयाचे होते तेवढ आता पूर्ग झाले, आता या प्रकारचे कोणीहि बाकी राहिले नाहीत ” असे सागून त्याचेकडे बोट दाखवून आई म्हणाली “ ह --हे तुझे अतरग भक्त ! ”

यापुढील श्रीरामकृष्णाचे आयुष्य म्हणजे, आपल्या भक्तमडळीसह त्यानी केलेला आनंद आणि त्याच्यासह केलेल्या विचित्र आणि अद्भुत लीला यानी भरलेले आहे त्या लीलाचे यथासाग वर्णन करणे अशक्य आहे श्रीरामकृष्णाचे भक्त असख्य होते व त्यातील प्रत्येकाच्या जीवनात श्रीरामकृष्गाच्या दिव्य सगतीने क्राति घडून आली होती म्हणून श्रीरामकृष्गाच्या लीलाचे सागोपाग वर्णन करावयाचे म्हणजे त्याच्या प्रत्येक भक्ताचे चरित्र-वर्णन केले पाहिजे अर्थातच ही गोष्ट येथे शक्य नाही म्हणून त्याच्या भक्तापैकी एखाद्याचीच साधारण सविस्तर हकीकत दिली, म्हणजे तीवरून इतराचीहि कल्पनेने समजता येईल यास्तव आता यापुढे त्याच्या भक्तमडळीतील श्रेष्ठ भक्त नरेंद्रनाथ ( स्वामी विवेकानद ) याचा जीवनेतिहास व त्यावर उमटलेला श्रीरामकृष्णांचा अपूर्व प्रभाव याचेच यथासाध्य अवलोकन करू तो सागताना इतराचीहि थोडीफार हकीगत ओघाने येईलच

श्रीकेशवचद्र सेन याच्या भेटीनंतर अजमासे चार वर्षानी ( स १८७५ ) श्रीरामचद्र दत्त व मनमोहन मित्र हे दोघे, वर्तमानपत्रातून श्रीरामकृष्णाची

माहिती वाचून त्यांच्या दर्शनास आले आणि आल्यादिवसापासूनच श्रीराम-कृष्णाच्या ठिकाणी त्याची भक्ति जडली त्याच्या स्वभावात हळूहळू इतका बदल होऊन गेला की, त्याच्या ओळखीच्या माणसानाहि त्याचे आश्चर्य वाटले श्रीरामकृष्णावरची त्याची भक्ति इतकी वाढली की, ते दोघेहि त्याना आपल्या इष्टदेवतेप्रमाणे भजूं लागले, त्यानी श्रीरामकृष्णांना वरचेवर आपल्या घरी न्यावे व त्यांच्या संबधाने ते कधी कधी म्हणत, “ रामचा स्वभाव आता इतका उदार असलेला तुम्ही पाहाता, पण प्रथम जेव्हा तो इथे येऊं लागला, तेव्हा इतका कृपण होता की सागता सोय नाही एक दिवस त्याला वेलची आणायला सागितली तर त्याने एक पैशाची कसली तरी वाळकी वेलची आणून पुढे ठेवली आणि नमस्कार केला ! रामच्या स्वभावात केवढा फरक झाला आहे, हे यावरून समजा ! ” या दोघानाहि श्रीरामकृष्णाच्या दर्शना-पासून इतकी धन्यता वाटूं लागली की, आपल्यासारखाच सर्वांना आनद प्राप्त व्हावा म्हणून, ते आपल्या नात्यातल्या व ओळखीच्या मडळीना श्रीरामकृष्णाच्या दर्शनास घेऊन जाऊं लागले श्रीरामकृष्णाच्या भक्तमडळीपैकी पुष्कळाना श्रीरामकृष्णाचे प्रथम दर्शन याच्याचमुळे झालें

इ० स० १८८० सालापासून श्रीरामकृष्णाचे लीलासहचर, त्यागी भक्त त्याच्याकडे येण्यास सुरुवात झाली या मडळीपैकी पहिले स्वामी ब्रह्मानद हे होत यांचें पूर्वाश्रमीचे नाव राखालचद्र असून मनमोहन मित्र याच्या बहिणीबरोबर त्याचा विवाह झाला होता विवाहानतर थोड्याच दिवसांनी त्यानी श्रीरामकृष्णाचे नाव ऐकले व लवकरच त्याचे दर्शनहि घेतले श्रीरामकृष्ण म्हणत असत, “ राखाल येण्याचे अगोदर काही दिवस, भावावस्थेत असे पाहिले की, आई एका लहान मुलाला माझ्या माडीवर बसवून म्हणत आहे, ‘ हा तुझा मुलगा बरे का ! ’ हे ऐकताच माझ्या अगावर भीतीने रोमाच आले व मी चकित होऊन म्हणालो, ‘ आई ! हे ग कसे ? मला मुलागाबिलगा कुठला ? ’ हे ऐकून ती हासली व म्हणाली, ‘ अहा रे वेडा !

अरे खरोखरीचा मुलगा नव्हे, हा तुझा त्यागी मानसपुत्र ! ' तेव्हा मला धीर आला ! या दर्शनानंतर काही दिवसानी राखाल आला व त्याला पाहाताच हाच तो मुलगा असे मीं तेव्हाच ओळखले ! "

राखालसबंधाने श्रीरामकृष्ण पुढे म्हणाले,* " तेव्हा तेव्हा राखालचा स्वभाव असा होता की, जगु तीनचार वर्षांचें लहान बाळच ! त्याने नेहमी माझ्याशी आईसारखे वागावें ! पाहावे पाहावे आणि एकदम धावून माझ्या मांडीवरच येऊन बसावे ! आणि घरीं जाणे तर दूरच राहिले, पण इथून एक पाऊल सुद्धा दुसरीकडे कोठे जाऊ नये असें त्याला वाटे ! त्याचा बाप कदाचित् त्याला इकडे येऊ देणार नाही म्हणून मी त्याला मधून मधून बळेच घरी पाठवावें ! त्याचा बाप चागला श्रीमत जमीनदार होता पण भारी कृपण आपल्या मुलाने येथे येऊ नये, म्हणून प्रथम प्रथम त्याने खूप खटपट केली, पण पुढे जेव्हा त्याने पाहिले की, येथे मोठमोठे श्रीमत लोक, विद्वान लोक येतात, तेव्हा तो आपल्या मुलाला येथे येण्याला हरकत करीनासा झाला आपल्या मुलासाठी म्हणून तो मधून मधून इथे येई व राखालच्या कल्याणासाठी, मी अनेक गोष्टी सागून त्याची समजूत घाली

" राखालच्या सासुरवाडीच्या माणसानी मात्र इथे येण्याबद्दल राखालला कधी अटकाव केला नाही, कारण मनमोहनची आई, बायको, बहिणी व घरची इतर सारीं माणसें, नेहमी येथे येत जात असत राखाल येथे येऊं लागल्यानंतर काही दिवसानी मनमोहनची आई राखालच्या बायकोस घेऊन आली तेव्हा " इच्या सहवासाने माझ्या राखालच्या ईश्वरभक्तीची तर हानि नाहींना होणार ? " असा सशय येऊन, मी तिला आपल्यापाशीं बोलावून, पायापासून

* राखालसबंधाने श्रीरामकृष्णानी पुढील सर्व गोष्टी एकाच वेळीं सागितल्या नाहीत तरी पण सर्व हकीगत सुसंबद्ध व्हावी म्हणून त्या येथे एकत्र दिल्या आहेत.

डोक्याच्या केसापर्यंत, तिच्या सर्वांगाची नीट परीक्षा केली व जाणले की ‘ भिण्याचे कारण नाही, ही देवीशक्ति आहे हिच्यापासून आपल्या पतीला धर्म-मार्गांत कधीहि अडथळा होणार नाही ’ तेव्हा कुठे माझ्या जिवात जीव आला व आनंदित होऊन नौबतेखान्यात ( पत्नीला ) सांगून पाठविले की, ‘ आपल्या सुनबाईला पाहून, तिच्या हातावर खाऊला एक रुपया ठेव ! ’

“ माझ्याजवळ असला म्हणजे देहभान विसरून जाऊन राखालच्या मनात एकदम बालकभाव उत्पन्न होई त्यावेळी त्याला पाहून सर्वजण आश्चर्य-चकित होत मीहि भावाविष्ट होऊन त्याला दूध पाजावे, लोणी खाऊ घालावें, खेळवावे ! केव्हा केव्हा तर त्याला खांद्यावरहि घ्यावे ! आणि आश्चर्य हे की, त्यालाहि यात मुळीच संकोच वाटू नये ! पण मी त्याला हे सांगून ठेवले, की तू थोडासा मोठा होऊन आपल्या स्त्रीसह राहू लागलास, म्हणजे हा तुझा बालक-स्वभाव राहणार नाही

“ त्याने कधी चूक केली तर मी त्याला शिक्षाहि करावी काली-मंदिरातून एक दिवस प्रसादाचे लोणी आलें होते, भूक लागली होती म्हणून त्याने ते सारे एकट्यानेच खाऊन टाकले ! हे पाहून मी त्याची चांगली खरडपट्टी काढली, त्याला म्हणालों, ‘ तूं तर भारीच लोभी आहेस बुवा ! इथे येऊन लोभ टाका-यला शिकायचे, ते कुठेच गेलें आणि ते सारे लोणी एकट्या एकट्यानेच खाऊन टाकलेंस ? काय म्हणावें तुला ? ’ हें ऐकून त्याला फार वाईट वाटलें आणि पुन्हा त्याने अशी गोष्ट कधीहि केली नाही

“ राखालच्या मनात तेव्हा लहान मुलासारखा मत्सर व अभि-मानहि असे त्याच्याशिवाय जर दुसऱ्या कोणाशी मी प्रेमाने वागलो तर ते त्याला सहन होत नसे ! या योगाने मला त्याच्याबद्दल कधी कधी फार भय वाटावें कारण आईच ज्याना इथे घेऊन येते त्याचा द्वेष केल्यास उलट त्याचेंच कदाचित् अकल्याण व्हावयाचें !

" इथे आल्यानतर सुमारे तीन वर्षांनी राखालची प्रकृति बिघडली व तो बलरामबरोबर वृंदावनास गेला त्याच्यापूर्वी काही दिवस भावावस्थेत मी पाहिलें की, आई त्याला बाजूला सारीत आहे तेव्हा व्याकुळ होऊन मी म्हणालो, 'आई ! तो अजून लहान आहे, त्याला काय समजतें बरे ? म्हणून तो कधी कधी अभिमान करतो, इतकेच तू त्याला आपल्याच कामासाठी इथून बाजूला करत असशील, तर एवढे तरी कर, की त्याला कुठे तरी चागल्या ठिकाणीं आनंदात ठेव, म्हणजे झालें ' यानंतर थोडया दिवसानी तो वृदावनास गेला

" तेथेहि त्याची प्रकृति ठीक नाही, असे एकून फार काळजी वाटू लागली कारण आईने दाखविलें होतें की, राखाल म्हणजे खरोखरच व्रजांतील राखाल ( गोप ) आहे ! म्हणून अशी भीति वाटली की, त्याला तेथच्या मागील सर्व गोष्टी आठवून, तो देहत्याग तर करणार नाही ना ? म्हणून मग मी पुन्हा आईची प्रार्थना केली व तिने ' काळजी करू नको ' असें सांगितले. त्याच्यासबधाने आईने अशा किती तरी गोष्टी दाखविल्या त्या साऱ्या सागायला निषेध आहे "

अशा रीतीने श्रीरामकृष्णानी राखालसबधाने किती किती गोष्टी आम्हाला सागाव्या ! तरुणपणी राखालने ईश्वरासाठी आपल्या सर्व-स्वाचा त्याग करून सन्यास घेतला व बेलूर मठाची स्थापना झाल्यावर राखालचद्र ( स्वामी ब्रह्मानद ) हे त्याचे पहिले अध्यक्ष झाले. स्वामी विवेकानद म्हणत असत " आध्यात्मिकदृष्टया राखाल माझ्याहून थोर आहे ! " पचवीस वर्षेपर्यत सतत परिश्रमपूर्वक शिवज्ञानाने जीवाची सेवा करून व अनेक लोकाना सन्मार्गाला लावून स्वामी ब्रह्मानंद नुकतेच ( १९२२ साली ) समाधिस्थ झाले

राखालचद्र श्रीरामकृष्णांच्या दर्शनास आल्यानंतर तीन-चार महिन्यांनीच नरेंद्रनाथांनी श्रीरामकृष्णाचें प्रथम दर्शन घेतलें

---

# १८. नरेंद्रनाथाचा परिचय

" इथे इतकेजण येतात, पण त्यात नरेंद्रासारखा एकहि नाही ! "

" एखाद्या वेळी वाटते—कोणी दशदल, कोणी षोडशदल, कोणी फार तर शतदल पद्म,—पण पद्मात नरेंद्र सहस्त्रदल पद्म ! "

" इतर लोक—कोणी गडवा, कोणी कळशी—फार तर घागर,—पण नरेंद्र म्हणजे हाडा ! "

" इतर लोक—कोणी डबके, कोणी विहीर—फार फार तर तळे,—पण नरेंद्र म्हणजे सरोवर ! ! "

—श्रीरामकृष्ण

---

कलकत्त्यात दत्ताचे घराणे फार प्रसिद्ध असे धन, मान, विद्यादिकामवे कायस्थ घराण्यात तेच पहिले असे नरेंद्राचा पणजा राममोहन दत्त यानी वकीलीच्या धद्यात चागले पैसे मिळविले त्याचा पुत्र दुर्गाचरण याचा प्रथमपासूनच धर्माकडे कल असे लग्न झाले तरी ससारात त्याचें मन नव्हतेच व एक पुत्र झाल्याबरोबर ससाराचा व सपत्तीचा त्याग करून, ते तीर्थाटणास निघून गेले व पुन्हा कधीहि घरीं परत आले नाहीत शास्त्रात सागितल्याप्रमाणे मात्र, जन्मभूमि-दर्शनासाठी बारा वर्षांनी एकदा ते कलकत्त्यास आले होते घरच्या मडळीस खबर लागताच त्यानी त्याना आग्रह करून घरी नेलें, परतु तेथे गेल्यापासून

ते मौनव्रत स्वीकारून जे एका ठिकाणीं बसून राहिले, ते तीन दिवसपर्यंत तेथून बिलकुल हालले नाहीत ! चवथ्या दिवशीं सकाळी मंडळी पाहातात, तो दुर्गाचरण कोठें निघून गेले होते त्यानंतर पुन्हा कधींहि त्याची वार्ता समजली नाही

दुर्गाचरणाचे पुत्र विश्वनाथ हेहि एक प्रसिद्ध वकील होते व ह्यानी आपल्या वद्यात चागले पैसे कमावले परंतु त्याचा स्वभाव फार उदार, खर्चिक व आप्तवत्सल असल्यामुळे त्यानी आपल्यामागे काहीच ठेवले नाही त्याना सगीताचा नाद असे व आपल्या जेष्ठ पुत्रास ( नरेंद्रास ) त्यानी याचे सशास्त्र शिक्षण देण्यासाठी एक वस्तादहि ठेवला होता त्याचा स्वमाव अत्यंत शात व गभीर असे कोणी कधी चूक केली तर त्याला रागे भरण्याऐवजी, त्याने केलेली चूक ते सर्वांना सागत व मग जो तो त्या अपराध्याला त्याबद्दल असे बोलून बोलून बेजार करी, की त्याने अगदी खजील होऊन जावे ! एक दिवस नरेंद्र आपल्या आईला काही उलट बोलला होता विश्वनाथबाबूनी याबद्दल नरेंद्राजवळ एक चकार शब्दहि काढला नाही परतु नरेंद्र ज्या स्नेह्याच्या घरी नेहमी जात येत असे, त्याच्या घरी जाऊन, त्यानी गुपचुप " आज नरेंद्र आपल्या आईला उलट बोलला, " अशी मोठमोठी अक्षरे कोळशाने एका भितीवर लिहून ठेविली ! नरेंद्र व त्याचा मित्र याच्या दृष्टीस हे वाक्य पडले व नरेंद्राला आपल्या आचरणाचा फार पश्चात्ताप झाला व पुन्हा कधीहि तो आपल्या आईस उलट बोलला नाही

विश्वनाथबाबूंचें अत करण फार कोमल असे आपल्या आप्तां-तल्या कित्येक मडळीना, ते पात्रापात्र विचार न करिता, नेहमी द्रव्याची मदत करीत नरेंद्र मोठा झाल्यावर त्याच्या लक्षात हा प्रकार आला व एक दिवस " अशी वाटेल त्याला मदत करणें चागलें नाही " असे तो आपल्या वडिलास म्हणाला विश्वनाथबाबूनी यावर उत्तर दिले, " बाळ !

मनुष्य-जीवन किती दु खमय आहे याची तुला काय कल्पना आहे ? ज्यावेळी तुला हे समजून येईल, त्यावेळी, आपल्या दु खाचा क्षणभर तरी विसर पडावा म्हणून, अफू खाणाऱ्या लोकाविषयी सुद्धा तुझ्या मनात दया उत्पन्न होईल ! ”

विश्वनाथबाबूना बरीच अपत्यें झाली त्याच्या मुली अल्पायु झाल्या तीन चार मुलीच्या पाठीवर नरेद्राचा जन्म झाल्यामुळे तो आपल्या आईबापाचा फार लाडका होता

नरेंद्राची माता भुवनेश्वरी देवी ही रूपाने सुदर व गुणानी थोर असे. ती अत्यत देवभक्तिपरायण असे रामायण, महाभारत यातील सर्व गोष्टी तिला अवगत असत तिला लिहिणें वाचणें बेताचेच येत असे, तरी पग ती बहुश्रुत होती पतीच्या मृत्यूनंतर तिच्या आगचें धैर्य, सहिष्णुता, तेजस्विता वगैरे गुण दिसून आले हजारो रुपयाचा कारभार करणाऱ्या त्या मानी स्त्रीला दरमहा तीस रुपयात आपला प्रपंच चालवावा लागे, तरी सुद्धा तिचे धैर्य खचले नाही, की ती कधी दु खी कष्टी दिसली नाही !

अशा प्रकारच्या मातापितराच्या पोटी नरेंद्राचा जन्म झाला होता त्याची बुद्धि अत्यत तीव्र असे व ती कोणत्याहि विषयाचें सहज लीलेने आकलन करूं शके लहानपगापासून त्याची सत्यनिष्ठा जबर असे, तो लहानपणापासून अत्यत धीट, साहसी व स्वातंत्र्यप्रिय असे, त्याचा कठ मधुर असे व त्याबरोबरच त्याला तालमीचा हि नाद असे सर्वाशी त्याचें वर्तन अगदी प्रेमळपणाचे असे व त्याच्या अंगच्या अलौकिक गुणानी तो ज्याला त्याला प्रिय असे तो आपला अभ्यास सहज केव्हा तरी करून टाकी व मग सारा वेळ खुशाल निश्चिंतपणे खेळत बसे ! त्याचे मन अत्यंत कोमल असे व दीन-दुबळया दरिद्री लोकाना पाहून त्याच्या डोळ्याना पाणी येई व काही तरी दिल्याशिवाय तो त्याना परत जाऊ देत नसे लहान असताना तो अत्यंत रागीट असे. तो एखाद्यावर रागावला

म्हणजे त्याचें सर्वांग रागाने थरथर कापू लागे व हा आता काय करील आणि काय नाही, असे सर्वांना भय वाटे त्याच्या आईने म्हणावे, " पुत्र व्हावा म्हणून काशीस जाऊन वीरेश्वराला नवस केला, वीरेश्वराने मला वाटतें, एखादें भूतच पाठवून दिले की काय ? नाही तर रागाने का कुणी असे भुतासारखें आचरण करतें ? " तिने त्याच्या या रागावर औषधहि मोठे बेमालूम शोधून काढले होते तो रागावला की तिने वीरेश्वराचें नाव घेऊन त्याच्या डोक्यावर एकदोन थंड पाण्याच्या घागरी ओताव्या ! या औषधाने त्याचा राग तेव्हाच शात होई ! दक्षिणेश्वरी एक दिवस नरेंद्र म्हणाला, " धर्मकर्म करायला लागून इतर काही न होवो, ईश्वरकृपेने एवढे मात्र झालें की, या दुष्ट क्रोधाला मात्र मी जिंकू शकलो ! "

लहानपणापासून नरेंद्राला ध्यान करणें फार आवडे व त्यात तो तेव्हाच तन्मय होऊन जाई निजावयाचे वेळेस रोज त्याला एक तेजोगोल दिसे व कोणी तरी तो गोल आपल्याकडे फेकीत आहे असा त्याला भास होई ! तो गोळा जवळ जवळ येत अगदी जवळ आला, म्हणजे, आपण त्यात बुडून जात आहो असे वाटून त्याच्या बाह्यसंज्ञेचा लोप होई ! कित्येक दिवसपर्यंत, सर्वांनाच अशा रीतीने झोप लागत असावी, असे त्याला वाटत असे, परंतु तसे ते नाही, हें त्याला पुढे समजलें

विद्यार्थीदशेंत असतानाच नरेंद्र ब्राह्मसमाजाचा अनुयायी झाला होता व उत्तरोत्तर धर्माकडे त्याचे अधिकाधिक लक्ष लागत चालले होतें त्याने या सुमारास निरनिराळ्या धार्मिक ग्रथाचा अभ्यास सुरू केला व त्या योगे निरनिराळ्या मताच्या वादविवादाचा त्याला कंटाला येऊन, सत्य काय आहे ते जाणण्याची त्याची उत्कठा वाढत चालली नरेंद्राची एफ् ए ची परीक्षा झाल्यानंतर विश्वनाथबाबूंनी त्याच्या विवाहाचा बेत चालविला व रामचंद्र दत्त वगैरे आप्त मंडळीनीहि त्या बाबतीत नरेंद्राला आग्रह चालविला परंतु विवाह करण्याचे नरेंद्राने साफ नाकारिलें.

धर्मप्रेरणेमुळेच नरेंद्र विवाहाला समत होत नाही, हें हळूहळू विश्वनाथबाबूच्या व रामचंद्र दत्ताच्या लक्षात आले व एक दिवस रामचंद्र दत्त त्याला म्हणाले, "जर तुझ्या मनातून खरोखरच धर्मलाभ करून घ्यावयाचा असेल तर उगीच ब्राह्मसमाज वगैरे ठिकाणी भटकण्यात अर्थ नाही दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या आश्रयाला चल "

'जनरल असेब्लीज इन्स्टिट्यूशन' मध्ये नरेंद्र त्यावेळी एफ ए च्या वर्गात होता त्या सस्थचे प्रिन्सिपाल हेस्टि या नावाचे एक विद्वान् गृहस्थ होते त्याची विद्वत्ता, अत्यत शुद्ध आचरण, शिष्यावरचे त्याचे प्रेम, या साऱ्या गुणाबद्दल नरेंद्राच्या मनात त्याच्याविषयी फार आदर असे सृष्टिशोभा पाहाण्यात दंग होऊन कवी कधी, वर्डस्वर्थ कवीला भावसमावि लागत असे, असे एक दिवस त्याच्या सागण्यात आल्यावरून विद्यार्थ्यांनी ह्या विषयाची अधिक माहिती देण्यास त्याना आग्रह केला त्यानीहि हा विषय शक्य तितका सुलभ करून विद्यार्थ्यास सागितला व ते पुढे म्हणाले, 'चित्ताची पवित्रता व एखाद्या विषयामवे मन एकाग्र होणे, याच्या योगाने ही अवस्था प्राप्त होत असते असे पुरुष फार क्वचित दिसून येतात माझ्या पाहाण्यात तरी दक्षिणेश्वरचे श्रीरामकृष्ण परमहस हे एकटेच असे पुरुष आहेत तेथे जाऊन ही त्याची अवस्था पाहिल्यास तुम्हाला या विषयाची बरीच माहिती होईल " हे ऐकल्यापासूनहि नरेंद्र दक्षिणेश्वरी जाण्याचा बेत करीतच होता

यापूर्वी एक दिवस नरेंद्राची व श्रीरामकृष्णाची अकल्पित रीतीने भेट झाली होती कलकत्त्यातील सिमला विभागात राहाणारे सुरेशचंद्र मित्र याना याच सुमारास श्रीरामकृष्णाच्या दर्शनाचा लाभ घडला होता व प्रथम दर्शनाच्या दिवसापासूनच त्याची श्रीरामकृष्णावर अतिशय भक्ति जडली होती ते वरचेवर दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या दर्शनास येत असत व कधी कधी त्याना आपल्या घरीं घेऊन जाऊन काही काळ त्याच्या सहवासातच व त्याच्या उपदेशामृताचे पान करण्यात घालवीत. एक दिवस श्रीरामकृष्ण त्याच्या घरी आले

असता त्याना काही पदें ऐकविण्याची त्याना इच्छा झाली तेथे असलेल्या मंडळींत गाणें कोणाला चागलेसें येत नसल्यामुळे सुरेशने आपल्या घराजवळच असलेल्या विश्वनाथबाबूच्या मुलाला ( नरेंद्राला ) गाणे म्हणण्यासाठी बोलावून आणलें व त्यानेहि त्या दिवशी एक-दोन गाणी उत्तम रीतीने म्हणून दाखविली अशा रीतीने भगवान श्रीरामकृष्ण व त्याचे मुख्य लीलासहायक स्वामी विवेकानंद याची प्रथम भेट झाली तो इसवी सन १८८० सालचा नोव्हेंबर महिना

त्या दिवशी नरेंद्राला पाहाताच श्रीरामकृष्णाचे लक्ष त्याचेकडे वेधले त्यानी सुरेंद्र व राम या दोघाना एकीकडे बोलावून त्याच्याबद्दल बरीच माहिती विचारली व एक दिवस त्याला दक्षिणेश्वरी घेऊन येण्यास सुरेशला सागितले नरेंद्राचे गाणे सपल्यावर श्रीरामकृष्ण स्वत. नरेंद्राजवळ गेले व त्याच्या अंगावरील सर्व लक्षणे नीट लक्षपूर्वक पाहात दोन-तीन गोष्टी त्याच्याबरोबर बोलून त्यालाहि लवकर एक दिवस दक्षिणेश्वरी येण्यास त्यानी सागितले, असो

रामचद्र दत्तानी दक्षिणेश्वरी चलण्यास सागताच नरेंद्र कबूल झाला व रामचंद्र, सुरेश, नरेद्र व आणखी तीन चार मडळी मिळून सर्वजण दक्षिणेश्वरी गेले.

त्या दिवशी नरेंद्राला पाहून श्रीरामकृष्णाना काय वाटले तें त्यानी एक दिवस सहज गोष्टी निघाल्यावरून आम्हाला सागितले ते म्हणाले, " त्या दिवशी नरेंद्र ( पश्चिमेच्या दाराकडे बोट करून ) या दाराने खोलीत आला. त्याचें आपल्या शरीराकडे बिलकुल लक्ष नव्हते डोक्यावरचे केस, अंगावरील कपडे यात सुद्धा इतराच्या सारखा ठाकठीकपणा नव्हता किवा कोणत्याहि बाह्य वस्तूकडे त्याचें लक्ष नव्हतें त्याचें सारेंच निराळें होते. त्याच्या डोळ्यावरून असें दिसलें की, त्याचे मन कोणीतरी जबरदस्तीने अंतर्मुख करून ठेविले आहे. हें सर्व पाहून असें वाटले की, विषयी लोकाचे आगर, अशा या कलकत्त्यात, एवढा मोठा सत्वगुणी अधिकारी कुठून आला बुवा ?

“ जमिनीवर सत्रंजी घातली होती, तिच्यावर बसायला सागितले सत्रंजीच्या एका टोकाला एक गंगेच्या पाण्याची घागर भरलेली होती, तिच्याजवळ तो बसला त्याच्याबरोबर त्या दिवशी त्याचे दोन चार स्नेहीहि आले होते परंतु त्याचा स्वभाव अगदीच निराळा दिसला साधारण लोकाची जशी भोगाकडे दृष्टि असते, तशीच त्याची दिसली

“ गाणे गायला सागितले, तेव्हा समजले की, त्याला बंगाली गाणी दोन चारच येतात त्यातलेंच एखादे गायला सागितल्यावरून ‘ मन चल निज-निकेतने ’ हें ब्राह्मसमाजाचे गाणें, त्याने अशा तन्मयतेने म्हणून दाखविलें की, तें ऐकून मला भावावेश प्राप्त झाला गाणे झाल्यावर थोडया वेळाने मडळी निघून गेली

“ तो निघून गेल्यावर त्याची पुन्हा भेट व्हावी म्हणून चोवीस तास मन असे व्याकुळ झालेले असे, की सागता सोय नाही ! मधून मधून तर अशा वेदना होत की, कोणी तरी काळजाला एखाद्या पिळ्यासारखे पिळून काढीत आहे की काय असे वाटे ! त्या वेदना सहन करवतनाशा झाल्या की, उठून झाउतलाकडे जावे,—कारण तेथे कोणी येण्याची भीति नसे व तेथे लाजलज्जा गुडाळून ठेवून ‘ नरेंद्रा ! येरे ये, तुझ्यावाचून प्राण जाऊ पाहातात ! ’ असे ओरडत मोठ्याने गळा काढून रडत बसावे ! काही वेळ असे रडले म्हणजे मग कुठे मन जरासे शात होई आणि हा प्रकार एक दोन दिवस नव्हे, एकसारखा सहा महिने चालला होता ! इथे आलेल्या पुष्कळ मुलाच्याबद्दल असे होई ! परतु नरेंद्राच्या भेटीबद्दल जशी व्याकुळता लागली होती तिच्यापुढे इतराबद्दल म्हणजे काहीच नव्हे ! ”

श्रीरामकृष्णानी ही जी हकीकत आम्हाला त्या दिवशीं सागितली ती संक्षेपाने सागितली असावी, कारण याच भेटीसबंधाने स्वत नरेंद्र एक दिवस आम्हाला म्हणाला —

" गाणे तर गायलो तें संपताच श्रीरामकृष्ण लगबगीने उठून माझ्या-जवळ आले आणि माझा हात धरून मला उत्तरेच्या बाजूच्या व्हराड्यात घेऊन गेले ते हिवाळ्याचे दिवस असल्यामुळे थड वारा लागू नये म्हणून व्हराड्याच्या बाजूने पडदे लाविले होते त्या व्हराड्यात जाऊन खोलीचे त्या बाजूचे दार लावले, म्हणजे बाहेरील कोणालाहि आत काय चालले आहे तें दिसून येत नसे त्या व्हराड्यात जाताच श्रीरामकृष्णानी त्या बाजूचे खोलीचे दार लावून घेतले, म्हणून वाटले की हे मला एकीकडे काहीतरी उपदेश करणार असावे, परतु साराच प्रकार विपरीत ! माझे हात आपल्या हातात धरून, एक सारखे अश्रु गाळीत, हुदके देत एखाद्या अतिशय ओळखीच्या माणसाप्रमाणे मला प्रेमाने म्हणूं लागले, ' इथे यायला इतके दिवस का लावायचे असतात ? मी इथे तुझी किती उत्कठेने वाट पाहात बसलो आहे, याचा विचार सुद्धा करायचा नाही ॲ ? विषयी लोकाच्या भाकडकथा ऐकून ऐकून माझे कान जळून जाण्याच्या बेतात आले आहेत, मनातल्या गोष्टी सागायला कोणी न मिळाल्यामुळे, त्या आतल्या आत जिरून माझें पोट सुजलें आहे ! '—वगैरे वगैरे किती किती बोलूं लागले व रडू लागले ! काही वेळाने माझ्यापुढे हात जोडून उभे राहिले व म्हणूं लागले, ' प्रभो ! मला ठाऊक आहे की तूं तो पुरातन नारायण ऋषि असून जीवाची दुर्गति निवारण करण्यासाठी पुन्हा शरीर धारण करून आला आहेस ! '

" हा प्रकार पाहून मी अत्यत आश्चर्यचकित होऊन गेलों आणि मनात म्हणूं लागलो, ' मी इथे कोणाच्या दर्शनाला म्हणून आलों आणि इथे गाठ तर कोणाची पडली ! याना तर उन्मादवायु झालेला दिसतो ! नाहीतर विश्वनाथ दत्ताचा मुलगा मी, मला या गोष्टी हे कसे म्हणतात ? ' पण मी उघड कांही न म्हणता चूप बसून, त्याचे बोलणे ऐकत बसलों नंतर मला तेथेच थाबावयास सागून ते आपल्या खोलींत गेले व तेथून थोडीशी मिठाई आणून आपल्या हाताने मला भरवू लागले ! मी पुष्कळ म्हणालों की, ' ती

आपण माझ्या हातात द्या, मी आपल्या सोबत्याबरोबर खाईन,' पण ते काही केल्या ऐकेचनात ते म्हणाले, 'ते खातील मग, तू अगोदर खा पाहू ?' असे म्हणून त्यानी दोनचार घास मला खायला लावलेच मग पुन्हा माझे हात धरून म्हणाले, 'तू असाच इथे आणखी एकदा, एकटाच, शक्य तितक्या लवकर येशीलना ? म्हण बघू 'येईन' म्हणून ?' इतका आग्रह केल्यावर मी अर्थातच 'येईन' म्हटले, व त्याच्याबरोबर खोलीत परत येऊन, आपल्या स्नेह्याबरोबर बसून राहिलो

"तिथे बसून त्याच्याकडे नीट लक्ष देऊन पाहू लागलो व विचार करू लागलों त्याचे बोलणे, दुसऱ्याशी वागणे वगैरे गोष्टीत तर उन्मादासारखे काही एक दिसेना ! त्याचा उपदेश ऐकून व भावसमाधि पाहून मनाला वाटले की, खरोखरच ईश्वरासाठी यानी सर्वस्वाचा त्याग केला असून, त्याचे वागणे 'बोले तैसा चाले' अशा महात्म्याच्या कोटीतलेच आहे 'तुम्हाला मी जसे पाहातों व तुमच्याशी गप्पागोष्टी करतो, तसेच ईश्वरालाहि पाहाता येते, त्याच्याशीं गप्पागोष्टी करता येतात, परतु असें करायची इच्छाच कोणाला असते ? लोक स्त्रीपुत्राच्या शोकाने घागर घागर अश्रु ढाळतात, इच्छिलेली वस्तु मिळाली नाही अथवा सपत्तीचा नाश झाला, तर रडून रडून डोळे सुजवतात, पण ईश्वराची प्राप्ति झाली नाही, म्हणून असा शोक कितीसे करतात बरे ? 'देवा दर्शन दे !' म्हणून जर कोणी खरोखरच व्याकुळ होऊन त्याचा धावा करील, तर ईश्वर त्याला दर्शन देईलच देईल,' या गोष्टी त्याच्या तोडून ऐकून, मनाला वाटले की, इतराच्यासारखे हे उगीच काही तरी वायफळ गप्पा मारीत नसून, ईश्वराची अत्यत व्याकुळतेने प्रार्थना करून व त्याचे प्रत्यक्ष दर्शन घेऊनच, या गोष्टी हे इतरास सागत आहेत परतु इतक्यात त्याचे तें मघाचे उन्मादासारखे आचरण आठवून या आत्ताच्या उपदेशाशी त्याचा कसा मेळ जमावा, हे कळेना बराच विचार करून, अखेरीस असे ठरविलें की, हे अर्धोन्माद असावेत ! परतु मनाने असे नुसते ठरवून काय उपयोग ? ईश्वरासाठी

त्यानी केलेला त्याग, त्याची अपूर्व तपस्या वगैरे गोष्टी एकदम मनापुढे उभ्या राहून, त्याचा अर्धोन्माद मनाला पटेना कारण ईश्वरासाठी असा त्याग केलेल्या कितीशा व्यक्ति आपल्या पाहाण्यात येतात ? असा विचार येऊन मन गोंधळून गेले, पण अखेरीस-' हे कोणीहि का असेनात, हे अत्यत पवित्र आणि त्यागी असल्यामुळे मान देण्यास सर्वथैव योग्य आहेत- ' असा विचार करून, त्याच्या चरणावर मस्तक ठेवून, मी त्या दिवशी त्याचा निरोप घेतला "

या गोष्टीस सुमारे एक महिना लोटला कॉलेजातील अभ्यास, ध्यान, गायन-शिक्षण, आखाडयातील मेहनत, ब्राह्मसमाजातील उपासना वगैरे गोष्टीत गढून गेल्यामुळे, या महिन्यात नरेंद्राला दक्षिणेश्वरी जाण्याला फुरसत मिळाली नाही तरीहि, एकटा येण्याचें श्रीरामकृष्णांना वचन दिलें असल्यामुळे, त्याच्या लक्षातून ती गोष्ट गेली नव्हती म्हणून वेळात वेळ काढून ते एक दिवस पायींच दक्षिणेश्वरीं गेला या दिवसाचीहि हकीकत त्यानी एकदा आम्हाला सागितली ते म्हणाले —

" दक्षिणेश्वराला जाण्यास त्या दिवशीं मी पायीच निघालो मागे फक्त एकदा तेथे गेलो होतो व तोहि गाडींतून म्हणून दक्षिणेश्वर इतके दूर असेल अशी माझी मुळीच कल्पना नव्हती किती चालून गेलो तरी वाटच सपेना शेवटी तेथे एकदाचा जाऊन पोहोचलों व तडक श्रीरामकृष्णाच्या खोलीत गेलों ते आपल्या छोटया पलगडीवर एकटेच विचारमग्न होऊन बसलेले होते जवळपास कोणीहि नव्हते मला पाहाताच मोठया आनदाने त्यानी मला जवळ बोलावले व आपल्या पलगडीवरच एका बाजूला बसविलें थोडयाच वेळात मला दिसून आले की, त्याना भावावेश प्राप्त झाला असून, तोंडाने अस्पष्ट स्वराने काही तरी पुटपुटत, माझ्याकडे टक लावून पाहात, हळूहळू माझ्याच बाजूला सरकत येत आहेत ! त्याबरोबर मला वाटले की, आता पुन्हा त्या दिवशींसारखा कांहीतरी प्रकार होणार ! हें मनांत

येतें न येतें इतक्यात मजजवळ येऊन, त्यानी आपला उजवा पाय माझ्या अंगावर ठेवला ! त्याबरोबर काय चमत्कार सांगावा ? असे दिसूं लागले की, ती खोली आणि तिच्यातील सर्व वस्तु मोठ्या वेगाने फिरावयास लागून, कोठेतरी अंतर्धान पावत आहेत व सारे विश्व व त्याबरोबर माझा अहंकारहि एका सर्व-ग्रासी महाशून्यामध्ये विलीन होण्यासाठी मोठ्या झपाट्याने चालला आहे ! हा प्रकार पाहून माझी पाचावर धारण बसली, असे वाटले की, ‘ मीपणाचा नाश म्हणजेच तर मरण, मग मरणाला आता काय बाकी राहिली आहे ? ’ त्यासरशी धीर सुटून मी एकदम ओरडलों, ‘ अहो ! तुम्ही मला काय करीत अहा ? मला आईबाप आहेत अजून ! ’ हे ऐकून ते खदखदा हासू लागले व हातानी माझे वक्ष स्थळ चोळीत चोळीत म्हणूं लागले, ‘ तर मग आत्ता राहू दे एक-दमच व्हायला नको, हळूहळू होईल ! ’ आणि आश्चर्याची गोष्ट ही की, या त्याच्या स्पर्शाने तो सारा अद्‌भुत देखावा नाहीसा झाला व मी पहिल्यासारखा देहभानावर आलो

“ पुन्हा मनामध्ये खळबळ उडाली ! हा मनुष्य आहे तरी कोण ? आणि याने हा केलेला प्रयोग हिप्नॉटिझमचा आहे असे म्हणायचे की काय ? पण ही गोष्टहि मनाला पटेना ज्याचें मन दुर्बल आहे अशा माणसावरच तो चालतो असे मी वाचले होते आणि मला तर असा अभिमान असे की, आपली इच्छा-शक्ति फार प्रबल आहे मग याला काय म्हणावे ? व एखाद्याच्या मनाला नुसत्या इच्छेने चिखलाच्या गोळ्यासारखा वाटेल तसा आकार देणाऱ्या या माणसाला अर्धोन्माद तरी कसें म्हणावें ? बरे, न म्हणावे तर पहिल्या दिवशीचें याचे आचरण अर्धोन्मादासारखे नव्हतें तर कशासारखे होतें ? असे कितीतरी विचार येऊन त्यानी मनात काहूर माजविले

“ त्या दिवशीहि त्यानी माझे फार लाड केले व आपल्या नेह-मीच्या परिचयातील माणसासारखे माझ्याशी वर्तन केले त्याच्या या प्रेमपूर्ण व्यवहाराचाहि मला काही उलगडा होईना त्याचा तो सारा

दिवस माझ्याशी बोलण्यात, मला खायला घालण्यात व तऱ्हेतऱ्हेचे लाड करण्यात गेला मग सध्याकाळ झालीशी पाहून मी त्याची परवानगी मागितली मी निघालो असें पाहून ते खिन्न मुद्रेने माझ्याकडे पाहून म्हणाले, ' पुन्हा लौकर येशीलना पण इथे ? म्हण ' येईन ' म्हणून ? ' अर्थातच त्या दिवशीहि पुन्हा लौकरच येण्याचें आश्वासन देऊन, मी त्याच्या पायावर डोके ठेऊन परत घरी आलो "

यानंतर सुमारे आठ-दहा दिवसानी, नरेंद्र पुन्हा दक्षिणेश्वरीं गेला श्रीरामकृष्णाच्या इच्छाशक्तीचा प्रभाव आपल्या मनावर होऊ द्यावयाचा नाही, असा जणु त्याने आपल्याशी निश्चय करून ठेवला होता या दिवशीची हकीगत, श्रीरामकृष्ण व नरेंद्र या दोघाच्याहि तोडून आम्हाला पुढे ऐकावयास सापडली

त्या दिवशी दक्षिणेश्वरी बरीच गर्दी असल्यामुळे म्हणा अगर दुसऱ्या काही कारणाने म्हणा, श्रीरामकृष्णानी नरेंद्राला, जवळच असलेल्या यदु मल्लिकाच्या बगीच्यात आपल्याबरोबर फिरावयास चलण्यास सागितले यदुनाथ मल्लिक व त्याची आई या दोघाचीहि श्रीरामकृष्णावर फार भक्ति असे व आपल्या पश्चात् सुद्धा श्रीरामकृष्ण तेथे आल्यास गंगेच्या बाजूचा दिवाणखाना त्याना बसावयास उघडून देत जावा, अशी त्याची आपल्या नोकरास ताकीद असे श्रीरामकृष्ण व नरेंद्र बगीच्यात काही वेळ हिंडून त्या दिवाणखान्यात जाऊन बसले व थोडयाच वेळात श्रीरामकृष्णाना समाधि लागली नरेंद्र त्याच्या जवळच बसून त्याची ती समाधि अवस्था पाहाण्यात दग होऊन गेला होता, इतक्यात श्रीरामकृष्ण एकदम त्याच्याजवळ आले व त्यानी त्याला मागच्यासारखा पुन्हा स्पर्श केला ! नरेंद्र आज खूप सावधगिरीने बसला होता, तरी सुद्धा त्या शक्तिपूर्ण स्पर्शाने त्याची बाह्यसज्ञा तत्काळ नष्ट झाली ! त्या स्थितींत काही वेळ गेल्यानंतर जेव्हा तो पुन्हा देहभानावर आला, तेव्हा त्याने पाहिले

की, श्रीरामकृष्ण आपल्या वक्ष स्थळावर हात फिरवीत आहेत व आपण देह-भानावर येत आहो, असे पाहून गालातल्या गालात हासत आहेत!

बाह्यसंज्ञेचा लोप झाल्यावर, त्या दिवशी नरेंद्राला काय काय अनुभव आला, यासंबंधाने त्याचे तोंडून आम्ही काहीच ऐकले नाही आम्हाला वाटे की, विशेष रहस्याच्या गोष्टी असल्यामुळे नरेंद्र त्या दुसऱ्याला सांगत नसावा परंतु एक दिवस सहज बोलता बोलता श्रीरामकृष्णांनी त्या दिवशीची हकीकत आम्हाला सांगितली, तिच्यावरून असे दिसून आले की, ते अनुभव नरेंद्राला स्मरत नसावे यांत काही आश्चर्य नाही श्रीरामकृष्ण म्हणाले —

"बाह्यसंज्ञेचा लोप झाल्यावर, त्या दिवशी नरेंद्राला कित्येक गोष्टी विचारल्या—तूं कोण, कोठून आलास, कशासाठी आला आहेस-(जन्म घेतला आहेस), इथे (पृथ्वी) किती दिवस राहणार आहेस,—वगैरे आणि त्यानेहि अंतर्मुख होऊन, त्या प्रश्नांची उत्तरें दिली, त्याच्यासंबंधाने मी जें काय पाहिलें होतें, त्याचा त्याच्या उत्तराशी ठोकताळा जमला त्या साऱ्या गोष्टी सांगण्याला निषेध आहे त्याच्या सांगण्यावरून एवढी गोष्ट मात्र मला कळून आली की, ज्या दिवशी आपण कोण याचे त्याला स्मरण होईल, त्या दिवशी मग तो इहलोकी राहाणार नाही योगमार्गाने तत्काल शरीराचा त्याग करील! नरेंद्र ध्यानसिद्ध महापुरुष आहे!"

नरेंद्रनाथासंबंधी श्रीरामकृष्णांना जी जी दर्शने झाली त्यापैकी काही काही ते एखादे वेळी आम्हास सांगत ते म्हणत, "नरेंद्रासारखा अधिकारी पुरुष या युगात पृथ्वीवर आजपर्यंत कधीहि झाला नाही!" "नरेंद्र पुरुष,—मी प्रकृति" नरेंद्र माझी सासुरवाडी" कधी कधी म्हणत "नरेंद्र अखंडाच्या राज्यातील माणूस, अखंडाच्या राज्यात, जेथे देव, देवी वगैरे कोणीहि ब्रह्मापासून आपापले पृथगस्तित्व राखूं शकले नाहीत, तेथे केवळ सात ऋषि मात्र ध्यानस्थ बसलेले मी पाहिले नरेंद्र त्याच्यापैकीच एकाचा अंशावतार जगत्पालक

नारायणाने, नर व नारायण या दोन ऋषींच्या रूपाने जगताच्या कल्याणासाठी तपश्चर्या केली, त्यांपकी एका ऋषीचाच नरेंद्र अवतार आहे " कधी म्हणत " शुकदेवासारखीच, नरेंद्राला माया स्पर्श करू शकत नाही ! " यांपकीच एका अद्भुत दर्शनाचे त्यांनी एक दिवस वर्णन केलं ते म्हणाले —

" एक दिवस मन समाधि स्थितीत ज्योतिर्मय मार्गाने उच्च उच्च स्थानी चढत होते चंद्र, सूर्य, तारका यांनी मंडित असे स्थूल जगत् सहज ओलांडून त्याने सूक्ष्म भावजगतात प्रवेश केला त्यातील उच्च उच्चतर भावभूमिका-मधून जात असता, मला रस्त्याच्या दोहो बाजूस देवताच्या नानाप्रकारच्या भावघन विचित्र मूर्ति आढळून आल्या हळूहळू या भावजगताच्या चरम सीमेपाशी येऊन ठेपलो तेथे असे दिसले की एका ज्योतिर्मय पडद्याने खंड व अखंड हे प्रदेश विभागले गेले आहेत ह्या पडद्यापलीकडील अखंडाच्या राज्यातहि प्रवेश केला, पण पाहातो तो त्या ठिकाणी देहधारी असे कोणीहि दिसून येईना ! दिव्य देहधारी देव देवता सुद्धा येथे प्रवेश करण्यास न धजता, येथून किती तरी खालच्या प्रदेशात आपापले अधिकार गाजवीत आहेत ! परंतु थोडयाच वेळात, ज्योतिर्मय दिव्य देहधारी सात ऋषि तेथे समाधिमग्न होऊन बसलेले दिसले ज्ञान, पुण्य, त्याग, प्रेम यामध्ये ते मानवापेक्षाचसे काय, पण देवदेवतापेक्षाहि श्रेष्ठ होते त्यांच्याकडे आश्चर्यचकित होऊन पाहात, त्यांच्या थोरपणाचा विचार करीत होतो इतक्यात, समोरच असलेल्या अखंडाच्या राज्यातील ज्योतिर्मंडळापैकी एक अंश घनीभूत होऊन, त्यापासून एक दिव्य बालक निर्माण झाले ! ते दिव्य बालक रांगत रांगत त्या सप्तर्षीपैकी एकाजवळ गले व आपल्या कोमल हातांनी त्यांच्या गळ्याला मिठी मारून आपल्या अमृतमयी वाणीने हाका मारीत, त्यांना समाधीतून उठविण्याचा प्रयत्न करूं लागलें ! थोडयाच वेळात त्या ऋषीची समाधि भंगली व आपल्या अर्धो-न्मीलित नेत्रांनी ते त्याचेकडे पाहूं लागले त्या वेळच्या त्यांच्या चर्येवरून असें वाटले, की हें बालक म्हणजे त्यांचा अगदी जीव की प्राण असावें ! ऋषीची

समाधि उतरलेली पाहून, त्या बालकाला अत्यंत आनंद झाला व ते म्हणाले, " मी निघालो आहे, तुम्हाला माझ्याबरोबर आले पाहिजे " ऋषीनी यावर काही एक उत्तर न देता, मानेने नुसता रुकार दिला व त्या बालकाकडे प्रेमपूर्ण नयनानी पाहात पाहात ते पुन्हा समाधिमग्न झाले आणि काय चमत्कार ! त्याच्या शरीरमनाचा एक अंश उज्ज्वल ज्योतीच्या आकाराने विलोम मार्गाने पृथ्वीवर उतरत असलेला मला दिसू लागला ! नरेंद्राला पाहाताक्षणी मी ओळखले की हाच तो ऋषि ! " असो

श्रीरामकृष्णाच्या अलौकिक शक्तिप्रभावाने नरेंद्राचे अशा रीतीने पुन्हा एकवार भावांतर झाल्यामुळे तो अत्यंत चकित होऊन गेला त्याच्या प्रचंड दैवी शक्तीपुढे आपली बुद्धि व शक्ति किती अल्प आहे याचा त्याला प्रत्यक्ष अनुभव आला ते अर्धोन्माद आहेत अशी जी त्याची कल्पना होती, ती पार कोठच्या कोठे नाहीशी झाली व इच्छामात्रेकरून वाटेल त्याचे मन फिरवून, ते उच्च मार्गाकडे सहज लीलेने वळविणारा हा मनुष्य सामान्य नसून, कोणी तरी दैवी शक्तिसंपन्न, असामान्य योग्यतेचा महापुरुष असला पाहिजे, अशी त्याची बालबाल खात्री होऊन गेली ! आणि आपल्यावर या महापुरुषाचे केवढे प्रेम आहे हे आठवून, त्याला स्वत ची धन्यता वाटू लागली !

श्रीरामकृष्णाच्या असामान्य दैवी शक्तीचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्यामुळे नरेंद्राच्या मनात हळूहळू त्याच्याविषयी पूज्यबुद्धि उत्पन्न होऊ लागली तरी पण त्याचा स्वभाव अभिमानी व चिकित्सक असल्यामुळे श्रीरामकृष्णाची प्रत्येक गोष्ट नीट परीक्षा करून मगच ग्रहण करावयाची, असा त्याने आपल्या मनाशी निश्चय केला श्रीरामकृष्णाच्या परिचयाचा त्याचे मनावर जो तावडतोब परिणाम झाला तो त्यागाचे बाबतीत होय " त्यागावाचून ईश्वरप्राप्ति व्हावयाची नाही, " या गोष्टीवर लहानपणापासूनच नरेंद्राचा विश्वास असे आणि श्रीरामकृष्णाच्या दर्शनापासून हा विश्वास झपाट्याने वाढत चालला.

नरेंद्राला पाहिल्यापासून, श्रीरामकृष्णाना तर त्याचे किती वेड लागले होते, याची वाचकाना थोडीशी कल्पना आलीच असेल नरेंद्र जेव्हा, पहिल्यानेच, त्याच्या दर्शनास एकटा गेला, तेव्हा त्याला समाधि लावून, ब्रह्मज्ञपदवीवर एकदम आरूढ करण्याचा त्यानी बेत ठरविला होता, यात सशय नाही कारण त्यानंतर चार वर्षानी जेव्हा नरेंद्राने श्रीरामकृष्णाच्या चरणी आपल्याला सर्वस्वी वाहून घेतले व निर्विकल्प समाधीसाठी त्याना एकसारखा आग्रह चालविला, तेव्हा अनेक वेळा त्या दिवशीची आठवण देऊन श्रीरामकृष्ण आम्हा सर्वाच्यादेखत त्याला म्हणत, “ का ? तू तर त्या दिवशी म्हणालास की, मला आईबाप आहेत आणि मला त्याची सेवाचाकरी करायला हवी म्हणून ! ” एखाद्या वेळी विनोदाने असेहि म्हणत, “ हें बघ, एकजण मेल्यावर भूत होऊन बसला पुष्कळ दिवसपर्यंत एकटे एकटे राहिल्यामुळे त्याला करमेनासे झाले आणि तो आपल्याला कोणीतरी जोडीदार शोधू लागला एखादा मनुष्य मेल्याची त्याला बातमी लागताच, आता आपल्याला सोबती मिळणार, या विचाराने त्याला मोठा आनद व्हावा व मोठ्या उत्कठेने त्याने तिकडे धावून जावे पण काय ? जिथे जावे तिथे असे झालेलें असे की, तो मेलेला मनुष्य, गगाजलाच्या स्पर्शाने अथवा दुसऱ्या काही उपायाने उद्धरून गेलेला असावा ! हे पाहून त्या बिचाऱ्याने निराश होऊन आपल्या कपाळावर हात मारून घ्यावा व पुन्हा पहिल्यासारखे एकटे एकटे राहू लागावे ! अशा रीतीने त्या बिचाऱ्याला सोबती कधीच मिळाला नाही ! त्या भूतासारखीच माझीहि दशा झाली ! तुला पाहून वाटले होते की, यावेळी मात्र आपल्याला सोबती खास मिळणार पण काय ? तूं सुद्धा म्हणूं लागलास की, मला आईबाप आहेत ! अर्थातच त्यावेळीहि मला कोणी सोबती मिळाला नाही ”

नरेंद्राला पाहाताच योगदृष्टिसाहाय्याने, श्रीरामकृष्णानी तो थोर अधिकारी असल्याचे ताबडतोब जाणले व जगदंबेच्या कृपेने आपल्याला प्राप्त झालेले अनुभव सागून, तिचें कार्य जगतामध्ये पसरविण्यास हा पुरुष सर्वथैव योग्य आहे

असे पाहून, आपले सर्व अनुभव एकदम त्याला देऊन, त्याला ताबडतोब सिद्ध पुरुष करावा, या हेतूने प्रथम भेटीच्या वेळीच त्याला समाधीचा अनुभव देण्यास ते उत्कंठित झाले असावे परंतु नरेंद्राच्या त्या वेळच्या उद्गारावरून, हा आपले अनुभव ग्रहण करण्यास अजून सर्वथैव पात्र झालेला नाही, असे जाणून त्यानी त्यावेळी आपला बेत रहित केला व त्याला सर्व उच्च आध्यात्मिक तत्त्वे सावकाशपणे पटवून देऊन, त्याची क्रमशः उन्नति करावी असे त्यानी ठरविलें नरेंद्राच्या अंगी असाधारण सामर्थ्य व गुण असल्याचे त्यानी जाणलें होते व ईश्वर, जीव, जगत, मानव जीवनाचे ध्येय, इत्यादिकासबधाने यथार्थ तत्त्वे न समजून घेता नरेंद्र जर ती अर्धवटच समजून बसला, तर याचा परिणाम चांगला व्हावयाचा नाही असे त्यानी जाणले ते म्हणत असत, “ तसे जर होईल तर इतर प्रचारकाप्रमाणे नरेंद्र एखादा नवीन पथ काढून, जगात कीर्ति व मान्यता मिळवील, परंतु साप्रतचे युगप्रयोजन पूर्ण करण्यासाठी ज्या उदार आध्यात्मिक तत्त्वाचा प्रचार करणे आवश्यक आहे, त्या मताचा अनुभव घेणे व त्याचा प्रचार करणे, हे त्याच्याकडून होणार नाही ” म्हणून नरेंद्राला आपली उच्च आध्यात्मिक अवस्था व आपली मते सर्वथैव कशी पटतील व त्याच्या सर्व शंका व संशय याचे पूर्णपणे निरसन होऊन, तो साप्रतचे युग-प्रयोजन पूर्ण करण्याचे कामी आपल्याला साहाय्यक कसा होईल, इकडे त्याचे लक्ष वेधूं लागले श्रीरामकृष्ण नेहमी म्हणत की, “ डबकी, तळी, वगैरे ज्या ठिकाणी पाणी वाहात नाही, त्याच ठिकाणी शेवाळ, लव्हाळी वगैरेंची उत्पत्ति होते, त्याचप्रमाणे जेथे आध्यात्मिक जगतामधे सत्याच्या अंशालाच मनुष्य पूर्ण सत्य समजून बसतो, तेथेच नवीन पंथाची उत्पत्ति होते ” असाधारण बुद्धि-संपन्न नरेंद्रहि कदाचित असाच एखादा नवीन पथ निर्माण करून बसेल, या भीतीने, नरेंद्राला पूर्ण सत्याचा अधिकारी करण्याचा त्याचा खटाटोप होता, असे यावरून दिसून येते असो

प्रथम भेटीपासूनच नरेंद्राचे श्रीरामकृष्णाना जे वेड लागले होते, त्याची पूर्णपणे कल्पना करून देणे, फार कठीण आहे संसारी माणसे ज्या कारणानी

परस्परावर प्रेम करतात, त्यातील एक सुद्धा कारण विद्यमान नसताना, नरेंद्राच्या भेटीसाठी त्याचा जीव जसा कासावीस होत असे व त्याची भेट झाली असता, त्याच्या आनदाला जसे भरते येई, तशी एखाद्याची अवस्था झालेली आमच्या तरी कधीहि पाहाण्यात नाही निष्कारण एखाद्याचें दुसऱ्यावर इतक प्रेम असू शकते, याची आम्हाला कधीहि कल्पना नव्हती श्रीरामकृष्णाना नरेंद्राच्या भेटीची कशी तळमळ लागत असे, याची कल्पना खालील एकदोन गोष्टीवरून येईल

नरेंद्राच्या प्रथम भेटीनंतर थोडक्याच दिवसात, स्वामी प्रेमानदाना श्रीरामकृष्णाच्या दर्शनाचा प्रथमच लाभ झाला नरेंद्र सात-आठ दिवसात दक्षिणेश्वरी न आल्यामुळे श्रीरामकृष्णाची कशी अवस्था झाली होती, याबद्दलची खालील हकीकत सद्गदित, होऊन त्यानी कितीदा तरी आमचेजवळ सागावी ते म्हणत, " स्वामी ब्रह्मानदाच्या बरोबर आम्ही काही मडळी एक दिवस दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या दर्शनास गेलो होतो त्याच्या खोलीत जाऊन पाहातो तो, ते श्रीकालीमदिरात देवीच्या दर्शनास गेले होते आम्हाला तेथच बसावयास सागून ब्रह्मानंद त्याना आणण्यासाठी मदिराकडे गेले थोड्याच वेळाने ते त्याना सावरून धरून—" इथे पायरी आहे, जपून उतरावें," " इथे पायरी आहे, जपून चढावे " असे म्हणत, त्याना खोलीकडे घेऊन येताना दिसले ! भावावेशात श्रीरामकृष्णाना बाह्यसज्ञा मुळीच राहात नाही असे आमच्या ऐकण्यात होते, म्हणून त्याना अशा स्थितीत पाहून, ते भावावेशात असावे असे आम्ही ओळखिले अशा रीतीने खोलीत येऊन ते आपल्या छोट्या पलगडीवर बसले व थोड्याच वेळात चागले देहभानावर आले आम्ही त्याच्या दृष्टीस पडताच, त्यानी मोठ्या प्रेमाने आम्हाला कुशल प्रश्न केले व मला जवळ बोलावून माझ्या हात, पाय, तोड इत्यादि अवयवाची लक्षपूर्वक तपासणी करू लागले मग माझा तळहात आपल्या तळहातावर पालथा ठेऊन घेऊन, हात सैल सोडावयास सागून, त्यानी माझ्या हाताचे वजन बघितलें व म्हणाले,

' ठीक ! ' अशा वजनात त्याना काय समजले हे त्याचे त्यानाच ठाऊक नंतर आमच्याच बरोबर आलेल्या रामदयाळबाबूना त्यानी नरेंद्राचे कुशल विचारले व त्याची प्रकृति ठीक आहे असे ऐकून ते म्हणाले, ' आज सात आठ दिवस होऊन गेले, तो इथे आला नाही त्याला भेटायची फार इच्छा आहे एक दिवस त्याला इथे यायला साग '

" नतर ते बराच वेळपर्यंत नानाप्रकारच्या धार्मिक विषयावर आमच्याशी बोलत बसले सुमारे दहा वाजता आम्ही फराळ केला व त्याच्या खोलीच्या उत्तरेस असलेल्या व्हराडयात जाऊन निजलो स्वामी ब्रह्मानद श्रीरामकृष्णाच्या खोलीतच निजले आम्हाला निजून एखादा तास झाला असेल नसल इतक्यात, पाहतो तो, श्रीरामकृष्ण आपले धोतर काखोटीला मारून आपल्या खोलीतून बाहेर येत आहेत ! जवळ येऊन ते रामदयाळबाबूच्या उशाशी बसले व त्याला हाक मारून म्हणाले, ' काय रे ? झोप लागली का ? ' आम्ही दोघेहि गडबडून एकदम उठून बसलो व म्हणालो, ' नाही महाराज अजून ! ' हे ऐकून ते म्हणाले, ' काय सागू ? नरेंद्राच्या भेटीसाठी प्राण कासावीस होत आहेत त्याला इकडे एकदा येऊन जायला साग सागशीलना ? नरेंद्र शुद्धसत्वगुणी, साक्षात् नारायण ! मधून मधून त्याला भेटल्याशिवाय मी जिवत राहाणार नाही ! ' रामदयाळबाबूना श्रीरामकृष्णाचे नरेंद्रावर केवढे प्रेम आहे हें माहीत होते म्हणून त्याचे बोलणे ऐकताच ' महाराज, काही काळजी करू नका पहाट होताच मी त्याचेकडे जाऊन त्याला इकडे यायला सागतो, ' वगैरे सागून त्याचे सात्वन करण्याचा त्यानीं पुष्कळ प्रयत्न केला. परंतु त्या रात्री श्रीरामकृष्णाची तळमळ काही केल्या नाहीशी होईना ! आपल्या बरोबर आपण दुसऱ्याचीहि झोपमोड करीत आहो, हें लक्षात येऊन ते उठून खोलीत जात, परतु थोडयाच वेळात, पुन्हा आमच्यापाशी येऊन, नरेंद्राचे गुणवर्णन करीत व त्याच्या भेटीसाठी प्राण कसा कासावीस होत आहे, ते मोठया केविलवाण्या मुद्रेने सागूं लागत ! साऱ्या रात्रभर हा प्रकार चालला होता !

त्यांचें ते नरेंद्रावरील अगाध प्रेम पाहून आमची अंतःकरणे सद्गदित झाली व यांना अशा तळमळीत पाडणाऱ्या नरेंद्राचें मन किती कठोर असले पाहिजे, असेंहि वाटल्यावाचून राहिलें नाही पहाट झाल्यावर श्रीरामकृष्णाचा निरोप घेऊन व श्रीजगदंबेला प्रणाम करून आम्ही कलकत्त्यास परत आलो ”

तसेंच आणखी एकदा, वैकुंठनाथ सन्याल श्रीरामकृष्णाच्या दर्शनास दक्षिणेश्वरी गेले होते त्यावेळीहि नरेंद्र बरेच दिवसांत आला नसल्यामुळे श्रीरामकृष्ण आनंदात नव्हते वैकुंठनाथ म्हणत, “ त्या दिवशी त्यांच्या साऱ्या नरेंद्राविषयीं गोष्टी चालल्या होत्या ते मला हाक मारून म्हणाले, ‘ हे बघ, नरेंद्र शुद्धसत्वगुणी तो अखंडाच्या राज्यातील चौघांपैकी एक आहे व सप्तर्षी-पैकी एक आहे त्याच्या गुणांना अंत नाही ! ’ बोलता बोलता नरेंद्राच्या भेटीची तळमळ सहन न होऊन, ते एखाद्या मुलासारखे रडू लागले ! थोड्या वेळाने त्यांनी आपला शोक कसाबसा आवरला व ही मंडळी आपल्याला काय म्हण-तील असें वाटून ते आपल्या खोलीच्या उत्तरेच्या व्हराड्यात लगबगीनें निघून गेले पण तेथे तरी काय ? ‘ आई ग ! त्याला भेटल्यावाचून माझ्यानें राहावत नाही ! ’ असे म्हणून मोठमोठ्याने रडत असलेले आम्ही त्यांना ऐकले ! ! काही वेळाने आपले रडे आवरून ते खोलीत येऊन आमच्या जवळ बसले व दीनवाण्या मुद्रेने म्हणूं लागले, “ इतका रडलो, पण नरेंद्र अजून काही आला नाही, त्याच्या भेटीसाठी प्राण कासावीस झाले आहेत आणि काळीज जसें पिळून निघत आहे ! पण त्याला काही आहे का याचें ? ” असे म्हणत म्हणत, अस्थिर होऊन ते पुन्हा तेथून उठून बाहेर गेले काही वेळाने फिरून आत येऊन म्हणू लागले, ‘ मी म्हातारा माणूस, आणि त्याच्यासाठी असा वेडा झालेला पाहून लोक तरी काय म्हणतील बरें ? तुम्ही सारी आपली माणसें, तुमच्यापाशी काही लज्जा वाटत नाही, पण दुसऱ्या एखाद्याने पाहिलें, तर त्याला काय बरें वाटेल ? पण मी तरी काय करूं ? काही केल्या जिवाची

तळमळ म्हणून शात होत नाही ! ' हें त्याचे नरेंद्रावरील अलौकिक प्रेम पाहून आम्ही आश्चर्यचकिन झालो व त्याची समजत घालण्याच्या इराद्याने त्याना म्हणालो, " खरेच महाराज, नरेंद्राने आपला मोठा अपराध केला आहे, त्याची भेट न झाल्यास, आपल्याला फार कष्ट होतात, असे ठाऊक असून सुद्धा तो इकडे येत नाही याला काय म्हणावे ? ' असो यानंतर आणखी एक दिवस, आम्ही दक्षिणेश्वरी गेलो होतो त्या दिवशी तेथे त्याच्या जन्म-दिवसानिमित्त उत्सव होता भक्तमडळीनी त्या दिवशी त्याना नूतन वस्त्र नेसविले होते व त्याच्या अगास चदनाची उटी लावून, सुदर सुदर फुलाच्या माळा घातल्या होत्या त्याच्या खोलीच्या पूर्वेकडील व्हरा-ड्यात सकीर्तन चालले होते व श्रीरामकृष्ण आपल्या भक्तमडळीसह ते ऐकत बसले होते परंतु आजच्या आनंदाच्या प्रसगी नरेंद्र आला नसल्यामुळे श्रीरामकृष्णाचा थोडा विरस झालेला दिसत होता त्याच्या वाटेकडे त्याचे डोळ एकसारखे लागले होते व मधून मधून निराशेने ' आज अजून नरेंद्र आला नाही ! ' असे आमच्याकडे पाहून ते म्हणत होते दोन प्रहरच्या सुमारास नरेंद्र एकदाचा आला व त्याच्या पायावर मस्तक ठेऊन त्याच्या जवळ बसला तो येताक्षणीच श्रीरामकृष्णाच्या आनदाला जणु भरते आले व एकदम उठून नरेंद्राच्या खाद्यावर बसून ते गभीर समाधिनिमग्न झाले !! समाधि उतरल्यावर नरेंद्राशीच त्याच्या गप्पागोष्टी सुरू झाल्या आणि त्याला काही तरी खाऊ घालण्याच्याच व्यवस्थेत ते निमग्न झाले ! त्या दिवशी मग कीर्तन वगरे तसेच राहिले ! "

वरील वर्णनावरून श्रीरामकृष्णाचे नरेंद्रावर किती विलक्षण प्रेम असे याची थोडीशी तरी कल्पना होईल नरेंद्राला श्रीरामकृष्णाच्या दिव्य सहवासाचा लाभ पाच वर्षे घडला दर आठवड्यास तो दक्षिणेश्वरी जाऊन श्रीरामकृष्णाचे दर्शन घेई व मधून मधून दोन-दोन तीन-तीन दिवस तेथे राहीहि श्रीराम-कृष्णांच्या अद्भुत शक्तीची प्रत्यक्ष माहिती, त्याला पहिल्या एक-दोन भेटी-

मधे झाली होती व अशा असाधारण शक्तिसपन्न महापुरुषाचे आपल्यावर केवढे अपार प्रेम आहे, याची जाणीव सदोदित त्याच्या मनात जागृत राहून, त्याच्याकडे गेल्यावाचून त्याला राहावतच नसे एखाद्या आठवड्यास जर त्याचे जाणे झाले नाही, तर श्रीरामकृष्णानाहि चैन पडत नसे व ते त्याला मुद्दाम निरोप पाठवून बोलावून आणीत व इतकेहि करून त्याचे येणे झाले नाही, तर स्वत कलकत्त्यास जाऊन त्याची भेट घेत !! पहिल्या दोन वर्षात, दर आठवड्यास त्याच्या दर्शनास जाण्याचे नरेंद्राचे बहुतेक चुकले नाही, परतु बी ए ची परीक्षा झाल्यानंतर त्याचे वडील अकस्मात मृत्यु पावले व ससाराचा सर्व भार त्याच्याच अंगावर पडला, यामुळे काही दिवसपर्यंत त्याचे दक्षिणेश्वरी नियमित रीतीने जाणे होत नसे परतु श्रीरामकृष्ण गळ्याच्या रोगाने आजारी पडल्यापासून मात्र तो त्याच्या सेवेसाठी सदैव त्याच्या जवळच राहू लागला

नरेंद्र हा उच्च दर्जाचा आध्यात्मिक अधिकारी असल्याचे योगदृष्टीने जागल्यापासून, त्याला पुढील महत्त्वाच्या कार्यासाठी कशा रीतीने तयार करावयाचा, हे त्यानी स्वत शी ठरवून ठेवले व त्याला आपल्या दिव्य शक्तीची ओळख पटवून देऊन व त्याला आपल्या अपार प्रेमाने पूर्णपणे जखडून टाकून, त्याला त्यानी सर्वथैव आपलासा केला व मग नाना तऱ्हानी शिक्षण देऊन त्याच्या सर्व शंका व सशय याचे निरसन केले व त्याचे शिक्षण पूर्ण झाल्यावर धर्मसस्थापनेचे कार्य कशा रीतीने करावयाचे याविषयी नीट उपदेश करून, शेवटी आपल्या सर्व भक्तमंडळीचा भार त्याचेवर टाकून ते निश्चित झाले

या पाच वर्षाच्या दीर्घ काळात या अलौकिक गुरुशिष्याना एकमेकाच्या सहवासात जो आनंद झाला असेल, त्याचे परस्पराशी जे सुखसवाद झाले असतील, ईश्वरीय कथावर्णनात जे बहारीचे प्रसंग आले असतील, त्या सर्वाचें यथायोग्य वर्णन करणे, केवळ अशक्य आहे नरेंद्राचा स्वभाव अत्यत चिकित्सक

अमुक एकजण सांगतो, म्हणून अमुक गोष्ट खरी, असें कधीहि न मानणारा तो! व गुरुहि असे खबीर की, " मी सांगतो म्हणून एखाद्या गोष्टीवर विश्वास ठेऊ नको, तुला स्वतःला अनुभव आला तरच ठेव, " असें वारंवार निक्षून सांगून शिष्याकडून स्वतःची हवी तशी परीक्षा करून घेण्यास नेहमी तयार! अशी जोडी एके ठिकाणी आल्यामुळे, या दोघांच्या सहवासांतून, नवीन नवीन आध्यात्मिक विचारांचें अमृत बाहेर निघावें व त्याच्या पानानें सर्व जगताची आध्यात्मिक तृषा शांत व्हावी यांत आश्चर्य तें काय? श्रीरामकृष्णांच्या सहवासांत नरेंद्राची आध्यात्मिक उन्नति क्रमशः कशी होत गेली, याचें सिंहावलोकन मात्र येथें करणें शक्य आहे व पुढील प्रकरणांत हेंच करण्याचें योजलें आहे.

---

# १९. श्रीरामकृष्ण व नरेंद्रनाथ

"नरेंद्र इंद्रियसुख, संसार वगैरे कशातहि लिप्त नाही "

मी म्हणालो—"आई, याला मायेने बद्ध करून ठेव, नाही तर समाधिमग्न होऊन हा देहत्याग करील "

"नरेंद्रासारखा आधार ( अधिकारी पुरुष ) कलियुगात आजपर्यंत झाला नाही ! ! "

—श्रीरामकृष्ण

---

कॉलेजात असताना, धार्मिक सत्यान्वेषणाची तळमळ लागल्यामुळे, नरेंद्राचे बाह्य आचरण इतके बेफिकीरीचे असे की, पुष्कळाची त्याच्यासंबंधाने चुकीची समजूत होई त्याचा प्रचंड आत्मविश्वास, असाधारण सत्यनिष्ठा, अलौकिक तेजस्विता, इत्यादि गुणाची नीट ओळख न पटून पुष्कळजण त्याला उद्धट, दांभिक, स्वच्छंदी असे म्हणत ! लोकाच्या स्तुतिनिंदेविषयी पूर्ण उदासीनता, स्पष्टवक्तेपणा निर्भयपणा वगैरे गुण त्याचे अंगी विशेषरूपाने असल्यामुळेच इतराची त्याच्याबद्दल अशी चुकीची समजूत होई यात शंका नाही नरेंद्राबद्दल त्याचा एक शेजारी, एक दिवस असे म्हणाला, " या पलीकडल्या घरी एक मुलगा राहातो, त्याच्यासारखा विलक्षण मुलगा साऱ्या जगात नसेल कुठे एक दोन परीक्षा पास झाला आहे, पण ऐट केवढी ? आपल्या बापासमोर तबला वाजवायला कमी करीत नाही मोठ्या माणसाच्या देखत खुशाल चिरूट फुंकत बसतो-एक अन् दोन ! त्याची किती थेरें सांगावीत ? " आणि याच्या नंतरच दोन चार दिवसात दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णाच्या तोंडून नरेंद्राविषयी हें

ऐकले —" ही सारी मुले काही वाईट नाहीत, कोणी एक तर कोणी दीड*परीक्षा पास झाली आहेत, स्वभावाने चागली शिष्ट, शात आहेत, पण नरेंद्रासारखा एकहि कोणी दिसत नाही ! गाण्यात काय, वाजवण्यात काय, विद्येत काय, बोलण्याचालण्यात काय, धार्मिक विषयात काय--साऱ्या गोष्टीत नरेंद्र हुशार ! ध्यान करण्यास बसतो, तर रात्र निघून जाऊन, सकाळ झाली तरी त्याला दादच नसते ! आमचा नरेंद्र म्हणजे खरे नाणे आहे वाजवून पाहा, कसे खण खण वाजेल ! या साऱ्या मुलाचें पाहातो, तो हाडाची काडे करून, रात्रीचे दिवस करून, कशानशा एकदाच्या दोन-तीन परीक्षा पास होतात झाले ! त्याची सगळी शक्ति यातच खर्च होऊन जाते ! तेच नरेंद्राचे पाहा, हासत, खेळत, इतर कामे करीत, त्याचा अभ्यास कसा सहज लीलेने होतो ! परीक्षा म्हणजे त्याच्या हातचा मळ आहे ! तो ब्राह्मसमाजात जातो, तिथे भजन करतो, पण इतर ब्राह्मसमडळीसारखे मात्र नव्हे तो खराखरा ब्रह्मज्ञानी आहे ध्यान करीत असता त्याला ज्योतिर्दर्शन होते उगीच का मला नरेंद्र एवढा आवडतो ? " नरेंद्राची ही स्तुति ऐकून, त्याची ओळख व्हावी या इच्छेने आम्ही विचारले, " महाराज, नरेंद्र कुठे राहातो ? " श्रीरामकृष्ण म्हणाले, " नरेंद्र विश्वनाथ दत्ताचा मुलगा, घर सिमल्यात " पुढे कलकत्त्यास आल्यावर, चौकशी करता असे समजले की, ज्याच्या विषयी आपण नुकतीच काही विचित्र हकीगत ऐकली तोच हा नरेंद्र ! ही परस्परविरोधी वर्णने ऐकून आम्हाला फार आश्चर्य वाटले व नुसत्या बाह्य वर्तनावरून एखाद्याविषयी काही मत बनविणे किती चुकीचे असते याचा त्यावेळी आम्हाला प्रत्यय आला

---

| | | | |
|---|---|---|---|
| *मॅट्रिक | १ | ज्युनिअर बी ए | २॥ |
| कॉलेजातील पहिले वर्ष | १॥ | बी ए | ३ |
| | | फर्स्ट बी एल् | ३॥ |
| एफ् ए | २ | बी एल् | ४ |

असे श्रीरामकृष्णाचे परिक्षाचे कोष्टक असावे

अंतर्दृष्टीने नरेंद्राची योग्यता जाणल्यामुळे त्याच्या संबंधीचे आपले मत, कोणाजवळहि स्पष्टपणे सांगण्यास श्रीरामकृष्ण कमी करीत नसत एखाद्याची चार चौघात प्रशंसा केली तर त्याला बहुधा स्वत चा अभिमान वाटू लागतो, हे माहीत असूनहि श्रीरामकृष्ण सर्व लोकात त्याची स्तुति करीत, कारण त्याना हें पक्के ठाऊक होतें की, या स्तुतीचा नरेंद्राच्या मनावर काहीहि अनिष्ट परिणाम खास होणार नाही उलट, इतक्या स्तुतीला आपण पात्र नाही, असे जर त्याला वाटत असेल तर ते गुण अंगी आणण्याची तो अधिकच खटपट करील एकदा केशवचद्र सेन, विजयकृष्ण गोस्वामी वगैरे बडी बडी मडळी श्रीरामकृष्णाच्या जवळ बसून त्याचा उपदेश ऐकत होती त्या मंडळीत नरेंद्रहि होता बोलता बोलता भावावेशात त्याची दृष्टि केशवचंद्रावरून नरेंद्राकडे वळली व त्याच्या भावी जीवनाचें उज्ज्वल चित्र त्याच्या अंत श्चक्षूंपुढे उभे राहून, ते मोठ्या प्रसन्न मनाने त्याचेकडे पाहू लागले केशव वगैरे मंडळी निघून गेल्यावर श्रीरामकृष्ण आम्हाला म्हणू लागले, “ असे पाहिले की, ज्या एका शक्तीच्या उत्कर्षाने केशव जगद्विख्यात झाला आहे, तसल्या अठरा शक्ति नरेंद्राच्या अगी पूर्ण उत्कर्ष पावल्या आहेत ! आणखी असे पाहिले की, विजय व केशव याचे ज्ञान दिव्याच्या ज्योतीसारखे आहे, तर नरेंद्राचे ज्ञान प्रत्यक्ष सूर्यासारखे प्रखर आहे ! ! ” दुसरा कोणी असता, तर या स्तुतीने त्याला आकाश ठेगणे झाले असते, परतु नरेंद्राला या भाषणाचे आश्चर्य वाटले व कोठे जगद्विख्यात केशव-चद्र सेन आणि कोठे एखादा माझ्यासारखा कॉलेजातील सामान्य विद्यार्थी ! असे असून केशवचद्रापेक्षा माझी जास्त स्तुति श्रीरामकृष्ण कशी करतात असे वाटून, सरळ स्वभावाचा नरेंद्र त्याना म्हणाला, “ महाराज, हे काय भलतेच आपण बोलत आहा ? कोठे केशवचंद्र सेन आणि कोठे माझ्यासारखा य कश्चित् विद्यार्थी ? कृपा करून त्याच्याशी आपण माझी तुलना कधीहि करीत जाऊ नये ” हें ऐकून श्रीरामकृष्ण अधिकच प्रसन्न होऊन म्हणाले, “ पण याला मी काय करूं रे ? तुला काय वाटतें की, हे सारें मी

आपण होऊन बोलतो ? आई मला जसे दाखविते, तसें बोलतो तिने तर मला खोटी गोष्ट कधीहि दाखविली नाही, मग हीच तेवढी खोटी कुठून असेल बरे ? ”

पण नुसते “ आई दाखविते, आई बोलविते, ” असे म्हणून नरेंद्राच्या हातून श्रीरामकृष्णाची सुटका होत नसे श्रीरामकृष्णाच्या ह्या निरनिराळ्या दर्शनासबधी सशय येऊन, स्पष्टवक्ता, निर्भय नरेंद्र पुष्कळ वेळा म्हणे, “ महाराज, हे सारे आई दाखविते, की हा सारा आपल्याच मनाचा खेळ आहे ? मला जर अशी काही दर्शने प्राप्त झाली असती, तर मी तरी निदान हा सारा माझ्या मनाचाच खेळ आहे, असेच समजलो असतो इद्रियाना येणारा अनुभव नेहमीच खरा असतो असे नाही त्याच्यावर विश्वास ठेवल्यास पुष्कळ वेळा मनुष्य फसण्याचाच जास्त सभव असतो आपण मजवर प्रेम करता, सर्व बाबतीत मी थोर व्हावे अशी इच्छा करता, म्हणून आपल्याला ही असली दर्शने प्राप्त होतात, दुसरे काही नाही ” असे म्हणून अनेक तर्कयुक्त्यादिकानी आपले म्हणणे श्रीरामकृष्णाना पटवून देण्याचा नरेंद्र प्रयत्न करी श्रीरामकृष्णाचे मन त्या वेळी जर उच्च भावभूमीवर आरूढ झालेले असले, तर नरेंद्राच्या या खटाटोपाचे त्याना कौतुक वाटे व या त्याच्या सत्यनिष्ठेवर ते प्रसन्न होत परतु जर ते साधारण भावभूमीवर असले, तर त्याच्या सरल स्वभावामुळे त्याच्या मनात नानाप्रकारचे विचार उद्भवत त्याना वाटे, “ खरेच कायावाचामने सत्यपरायण असलेला नरेंद्र कधी खोटे बोलणार नाही त्याच्यासारख्या अत्यत सत्यनिष्ठ मनुष्याच्या मनात मिथ्या संकल्पाचा उदयच व्हायचा नाही तर मग काय ? माझी दर्शनेच खोटी की कसे ? ” असा विचार येऊन त्याच्या मनाची चलबिचल व्हावी पण त्याना पुन्हा वाटावे, “ पण मी तर आजपर्यंत अनेक तऱ्हेने परीक्षा करून पाहिले आहे की, आईने मला कधीहि असत्य असे दाखविलेच नाही व वरचेवर तिने स्वत आश्वासनहि दिले आहे तर मग हा नरेंद्र माझ्या दर्शनाना कल्पनेचे

खेळ म्हणतो हे कसे आणि मी सांगितल्याबरोबर, त्याला ही सत्य आहेत, असे कसे वाटत नाही ? ”

असा मनाचा गोंधळ उडून जाऊन, श्रीरामकृष्णांनी आईकडे धाव घ्यावी ! आणि आईला तरी आपल्या बालकाचे सांत्वन केल्यावाचून कसे राहवावे ? “त्याच्या म्हणण्याकडे तू लक्ष देतोस कशाला ! काही दिवसांनी आपोआप तो साऱ्या गोष्टी मानू लागेल,” असे तिने सांगावे, तेव्हा कुठे त्यांच्या जीवात जीव यावा ! या प्रकारचे एक उदाहरण येथे दिल्यास ठीक होईल.

ब्राह्मसमाजाचे दोन भाग झाल्यावर नरेंद्र साधारण ब्राह्मसमाजाचा अनुयायी झाला दर रविवारी तो समाजाच्या उपासनेस हजर राहून भजनादिकांत भाग घेई एकदा एक दोन आठवडे नरेंद्र दक्षिणेश्वरी न आल्यामुळे श्रीरामकृष्णांना चैन पडेना त्याची वाट पाहून थकून त्यांनी कलकत्त्यासच जाऊन त्याची भेट घेण्याचे ठरविले व तो दिवस रविवारचा असल्यामुळे साधारण ब्राह्मसमाजाच्या उपासनामंदिरातच नरेंद्र गेला असण्याचा संभव असल्यामुळे तेथेच जाण्याचा त्यांनी बेत केला केशवचंद्र, विजयकृष्ण वगैरेंच्या वेळी समाजात जसा आपला मान असे, तसा आता राहील की नाही अथवा न बोलावता आपले जाणें शिष्टाचारसंमत होईल की नाही अथवा आपल्या जाण्याने तेथील मंडळींना संकोचल्यासारखे होईल की नाही वगैरे गोष्टींचा विचारच न करता, ते संध्याकाळच सुमारास उपासनागृहात येऊन दाखल झाले उपासना चाललेली होती कोणीहि श्रीरामकृष्णांचे स्वागत केले नाही, उलट विजयकृष्ण वगैरेंनी समाज सोडण्याला हेच कारण आहेत, असा पुष्कळांचा समज असल्यामुळे, नुसता ‘ या बसा ’ म्हणण्याचा साधा शिष्टाचार सुद्धा, त्यांना कोणी दाखविला नाही !

पण श्रीरामकृष्णांचे तिकडे लक्षच नव्हते सभागृहात येताच त्यांना भावावस्था प्राप्त झाली होती व वेदीपर्यंत जाताच ते समाधिमग्न झाले.

श्रोतृसमाजात नरेंद्र होताच श्रीरामकृष्णाना तेथे आलेले पाहून तो त्यांच्या-जवळ येऊन उभा राहिला उपासना थाबली व सभागृहात एकच गडबड उडून गेली समाधिस्थितींत उभे असलेल्या श्रीरामकृष्णाना पाहण्यासहि जो तो आपापली जागा सोडून पुढे सरसावू लागला श्रीरामकृष्णाच्या भोवती गर्दी झाली व ती मोडण्याचे बाजूसच राहिले, उलट वाटण्याचाच रग दिसू लागला सरतेशेवटी गर्दी इतकी झाली की, श्रीरामकृष्ण येथून नीटपणे बाहेर कसे पडतात अशी नरेंद्र वगैरेना काळजी पडली, म्हणून चलाखी करून त्यानी सभागृहातील ग्यासचे दिवे विझवून टाकले व नरेंद्र त्या काळोखात श्रीरामकृष्णाना धरून एका दरवाजाने हळूच बाहेर पडला !

आपल्यासाठी श्रीरामकृष्ण येथे आले व त्याना कोणी नुसते या बसा' सुद्धा म्हटले नाही, असे पाहून नरेंद्राला मेल्याहून मेल्यासारखे झाले नरेंद्र सागत असे-" त्या दिवशी माझ्यासाठी श्रीरामकृष्णाना अपमानित व्हावे लागले ही गोष्ट माझ्या मनाला फार लागली व माझ्या भेटीसाठी असे तिऱ्हाईत ठिकाणी आल्याबद्दल मी त्याना फार दोष दिला, परतु त्यानी तिकडे बिलकुल लक्ष न देता, माझे बोलणे हसण्यावर घालविले यावर मी म्हणालो, " आपण नेहमी 'नरेंद्र नरेंद्र' करून एकसारखे माझेच चितन करीत असता, पण हे चागले नाही, आपणाला माहीत आहेना की, राजा भरताला हरिणाचा ध्यास लागून त्याला हरणाच्याच जन्माला जावे लागले ते! तसे तुमचे न होवो म्हणजे झाले!" हे ऐकनाच श्रीरामकृष्णाचा चेहरा गभीर झाला व ते दुःखावेशात म्हणाले, " तूं म्हणतोस ते सर्व खरे आहे रे! पण तुझ्या भेटीवाचून माझे प्राण कासावीस होतात, त्याला काय करू?" पण त्या दिवशी एवढ्यावरच भागलें नाही दक्षिणेश्वरी परत आल्यावर ही गोष्ट जगदबेच्या कानावर घालण्यासाठी ते मदिरात गेले व तेथे त्याना गभीर समाधि लागली समाधि उतरल्यावर ते हासत हासत परत आपल्या खोलीत येऊन मला म्हणाले, " जा मूर्खा! मी तुझे बोलणे बिलकुल ऐकत नाही! आई म्हणते की, तू त्याला साक्षात् नारायण

समजतोस, म्हणून तो तुला एवढा आवडतो, पण ज्या दिवशीं तूं त्याला नारायण समजणार नाहीस, त्या दिवशी तुला त्याचे तोंडसुद्धा बघावेसे वाटणार नाही !" झाले, अशा रीतीने माझे सारे बोलणें त्यानी एका फटकाऱ्यासरशी उडवून लावलें !"

नरेंद्राच्या सत्यनिष्ठेसबधाने श्रीरामकृष्णाची अत्यत उच्च धारणा असे त्याना वाटे की, अत्यत सत्यपरायण नरेंद्राच्या तोंडून असत्य गोष्ट कधीहि बाहेर पडावयाची नाही, म्हणून एखाद्या गोष्टीच्या सत्यतेबद्दल त्याची खात्री असली व ती गोष्ट खरी नाही, असे नरेंद्र म्हणाला, तर सरळ स्वभावाच्या श्रीरामकृष्णाच्या मनात त्या गोष्टीच्या सत्यतेबद्दल सशय उत्पन्न होई ! एक दिवस चातक पक्षाची गोष्ट निघाली असता, नरेंद्र म्हणला, " महाराज, चातकपक्षी मेघाच्या पाण्याशिवाय इतर कसलेंहि पाणी पीत नाहीं म्हणतात, पण ती नुसती कविकल्पना आहे मी स्वत एक चातकपक्षी नदीचे पाणी पिताना पाहिला आहे आणि एखाद्या दिवशी तुम्हाला सुद्धा दाखवीन !" प्रत्यक्ष नरेंद्राने असे म्हटल्यावर मग काय विचारावे ! श्रीरामकृष्ण म्हणाले–" तूच म्हणतोस तेव्हा असेलहि तसे ! तर मग इतके दिवस माझीच चुकीची कल्पना झाली होती तर !" यानंतर एक दिवस नरेंद्र मोठया लगबगीने श्रीरामकृष्णास हाक मारून म्हणाला–" हा पाहा महाराज, चातकपक्षी नदीचें पाणी पीत आहे !" श्रीरामकृष्ण त्या पक्षाकडे पाहून हासत हासत नरेंद्राला म्हणाले–" अहारे मूर्खा, अरे हा तर चामचिका ! चातक इतर ठिकाणी पाणी पितो असे सागून, उगीच त्या दिवसापासून तूं मला विचारात पाडलेस यापुढे तुझ्या साऱ्याच गोष्टीवर मी विश्वास ठेवणार नाही !"

नरेंद्राच्या मनात नेहमी उच्च विचार घोळत राहावे व त्याच्या अनुरोधाने त्याने आपली सर्व कामें करीत जावी, इकडे प्रथमपासून श्रीरामकृष्णाचे लक्ष असे एवढयाच कारणाने नरेंद्राबरोबर त्याचें आचरण, इतर भक्तमंडळींहून निराळे असे. भगवद्भक्तीची हानि होऊं नये म्हणून आहार, विहार, निद्रा, जप,

ध्यान वगैरे सर्व विषयासंबंधी जे नियम श्रीरामकृष्ण स्वत पाळून इतरानाहि ते पाळण्यास उपदेश करीत, तेच नियम नरेंद्राला लागू नाहीत व हे न पाळल्यास त्याला दोष लागणार नाही, असे ते सर्वासमक्ष नि संकोच प्रतिपादन करीत ! " नरेंद्र नित्यसिद्ध " " नरेंद्र ध्यानसिद्ध " " नरेंद्रामध्ये असलेला ज्ञानाग्नि निरंतर धगधगीत पेटलेला असून, सर्व प्रकारचे आहारादिकाचे दोष जाळून भस्म करीत असतो, म्हणून त्याने कुठेहि काहीहि खाल्ले तरी त्याला त्यापासून दोष लागणार नाही ", " ज्ञानखड्गाने तो आपले मायाबंधन सदैव तोडून टाकीत असल्यामुळे, महामाया त्याचेवर आपला प्रभाव चालवू शकत नाही, " वगैरे वगैरे नरेंद्राविषयी कितीतरी गोष्टी, ते नेहमी आमच्याजवळ सांगत !

श्रीरामकृष्णाच्या भक्तमंडळीत काही मारवाडीहि होते ते येताना आपल्याबरोबर बदाम, पिस्ते, खडीसाखर, किसमिस वगैरे जिन्नस घेऊन येऊन ते श्रीरामकृष्णापुढे ठेवीत त्यापैकी एक कण सुद्धा श्रीरामकृष्ण कधी स्वत खात नसत अथवा इतर कोणा भक्तालाहि देत नसत ते म्हणत, " या मारवाड्याच्या हातून, निष्कामभावाने दान कालत्रयी व्हायचे नाही साधूला एखादा विडा देतील, तर लेकाचे त्याच्याबरोबर सतरा वासना लावून देतील ! असल्याच्या हातचे खाल्ल्याने भक्तीची हानि होते " मग हे सारे जिन्नस द्यायचे तरी कोणाला, असे कोणी विचारल्यास म्हणत, " जा, हे सारे नरेंद्राला नेऊन दे, त्याने हे सारे खाल्ले तरी त्याला काही एक होणार नाही !"

एक दिवस नरेंद्र हॉटेलात काही खाऊन येऊन श्रीरामकृष्णास म्हणाला, " महाराज, कुणी खाऊ नये म्हणतात असले जिन्नस मी आज हॉटेलात खाऊन आलो आहे ! " श्रीरामकृष्णानी जाणले की, नरेंद्र हे काही आपली बहादुरी दाखविण्यासाठी म्हणत नसून, असे केल्यामुळे त्याला आपल्याला स्पर्श करायचा नसेल अगर खोलीतील पाण्याची भांडी वगैरे पदार्थांना शिवू द्यायचे नसेल, तर हें सारं अगोदर माहीत असलेले बरं म्हणून सांगत आहे श्रीरामकृष्ण लगेच

त्याला म्हणाले, " काही हरकत नाही, तुला त्याचा काही एक दोष नाही. गोमास भक्षग करून जर कोणी आपले मन ईश्वरचरणी अढळ राखीत असेल तर त्याचे ते खाणे हविष्यान्नतुल्य होय, व जर कोणी कदमुळे भक्षण करून, विषयचितनात निमग्न राहात असेल, तर त्याचे ते खाणे गोमासतुल्य होय ! तू आज अखाद्य पदार्थ खाऊन आलास, तरी मला त्याचे काही वाटत नाही, परतु ( इतराकडे बोट दाखवून ) यातल्या कुणी मला असे येऊन सागितले असते, तर मी त्याला स्पर्श सुद्धा करू शकलो नसतो ! " असो

शिष्याच्या मनाची इतकी बारकाईने परीक्षा करुन त्याच्याशी तद्नुरूप आचरण करणे, हे जगद्गुरूखेरीज इतराच्या ठिकाणी सभवत नाही श्रीरामकृष्णानाहि आपल्या अगदी पोटातल्या गोष्टी नरेंद्राला सागितल्याशिवाय राहावत नसे ते सर्व विषयात त्याचे मतामत विचारीत आपल्याकडे आलेल्या व्यक्तीच्या बुद्धीची व विश्वासाची परीक्षा पाहाण्यासाठी अनेक प्रसगी ते त्याचा नरेंद्राशी वाद लावून देऊन, आपण स्वस्थपणे गमत पाहात असत ! श्रीरामकृष्णासारख्या महापुरुषाचे आपल्यावर एवढे प्रेम आहे, याची त्याला निरतर जाणीव राहून, त्याच्या या प्रेमास साजेसेच आपले वर्तन सर्वदा कसे राहील इकडे नरेंद्राचें लक्ष राहू लागलें व तीन चार वर्षाच्या अवधीतच तो सर्वस्वी त्याचा झाला

नरेंद्र श्रीरामकृष्णाकडे येऊ लागल्यानतर काही महिन्यानी " श्रीरामकृष्ण-कथामृत " या अलौकिक ग्रथाचे कर्ते व श्रीरामकृष्णाचे परमभक्त श्रीयुत " एम् " ( महेंद्रनाथ गुप्त ) याना श्रीरामकृष्णाचे प्रथम दर्शन झाले याच्या प्रथम भेटीची हकीगत त्यानी आपल्या पुस्तकात सागितलेलीच आहे नरेंद्रनाथ सागत असे, " त्या सुमारास एकदा मी रात्री श्रीरामकृष्णाकडेच राहिलो होतो सध्याकाळी पचवटीखाली सहज बसलों होतो, इतक्यात श्रीरामकृष्ण तेथे आले व माझा हात धरून हासत हासत म्हणाले, ' आज तुझी विद्या आणि बुद्धि किती आहे ते बघू तू तर मारे अडीच परीक्षा पास झाला आहेस, पण आज

साडेतीन परीक्षा पास झालेला ' मास्टर ' आला आहे ! चल बघू, त्याच्याशीं वाद करण्यात कितीसा टिकतोस पाहू ? ' अर्थातच मला मग श्रीरामकृष्णा-बरोबर जावे लागले खोलीत गेल्यावर, श्रीरामकृष्णानी ' एम् ' ची ओळख करून दिली व मग आम्ही अनेक विषयावर एकमेकाशी बोलू लागलो श्रीरामकृष्ण एका बाजूला गुपचुप बसून आमचे बोलणे ऐकत होते. काही वेळाने ' एम् ' निघून गेल्यावर ते म्हणाले, ' साडेतीन परीक्षा पास होऊन तरी काय उपयोग ? मास्तर बायकासारखा लाजाळू आहे त्याच्याने बट बोलवतसुद्धा नाही ! ' अशा रीतीने, ते नेहमी माझ्याबरोबर कोणाचा तरी वाद लावून देऊन आपण स्वस्थपणे गमत पाहात बसत "

श्रीरामकृष्णाच्या ससारी भक्तमडळीत केदारनाथ चट्टोपाध्याय या नावाचे एक गृहस्थ होते ते मोठे भगवद्भक्त असून सरळ स्वभावाचे असत त्याचा स्वभाव अत्यत प्रेमळ असे भजन, कीर्तन वगैरे ऐकताना त्याच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागत ! ही त्याची भक्ति पाहून, श्रीरामकृष्ण त्याची नेहमी प्रशंसा करीत ते ढाका येथे राहात व मधून मधून श्रीरामकृष्णाच्या दर्शनास येत ते आले म्हणजे श्रीरामकृष्णानी आपल्या इतर भक्तमंडळीशी त्याची ओळख करून द्यावी एक दिवस केदारनाथ श्रीरामकृष्णा-जवळ बसले असता नरेंद्र तेथे आला श्रीरामकृष्णाच्या सागण्यावरून नरेंद्राने एक दोन पदे म्हटलीं, ती ऐकत असेता केदारनाथ त्यात अत्यत तन्मय होऊन गेले होते व त्याच्या नेत्रातून अश्रुधारा वाहात होत्या गाणे सपल्यावर त्या दिवशीं, केदारनाथाच्या बरोबरहि श्रीरामकृष्णानी नरेंद्राचा वाद लावून दिला केदारनाथ आपल्या म्हणण्याचे चागले समर्थन करीत व प्रतिवादीच्या विचारसरणीतील चुका रोख ठोक जबाब देऊन त्याला दाखवीत त्यानी एखाद्याच्या प्रश्नावर एखादे बिनतोड उत्तर देऊन त्याला निरुत्तर केले व ते उत्तर श्रीरामकृष्णाना पसत पडले तर, " केदारने त्या दिवशी या प्रश्नावर असे उत्तर दिले, " असे ते ज्याच्यात्याच्याजवळ मोकळ्या मनाने सागत.

नरेंद्राबरोबर वाद करताना त्या दिवशी असा प्रश्न निघाला की, "भगवान जर खरोखरच दयामय आहे, तर मग त्याच्या सृष्टीत इतकी विषमता व दुःख कष्ट का? नुसते पोटभर अन्न न मिळाल्यामुळे हजारो माणसे का मरावी?" यावर केदारने उत्तर दिले, "दयामय असून सुद्धा आपल्या सृष्टीत दुःख, कष्ट, अपमृत्यु वगैरे राखण्याचे ईश्वराने ज्या दिवशी ठरविले, त्या दिवशीच्या सभेला त्याने मला बोलाविले नाही तेव्हा हे त्याने असे का ठरवले, हे मी कशावरून समजावे बरे?" हे ऐकून तेथे एकच हशा पिकला. तरी पण त्या दिवशी नरेंद्राच्या तीक्ष्ण कोटिक्रमापुढे केदारला हरावे लागले

केदारनाथ निघून गेल्यावर श्रीरामकृष्ण नरेंद्राला म्हणाले, "का रे? कसा आहे केदार पाहिलास ना? कशी भक्ति आहे पाहिलेस ना? देवाचे नुसते नाव त्याच्या कानी पडले की, त्याच्या डोळ्यातून कसे अश्रू वाहू लागतात, पाहिलेस ना? देवाचे नाव कानी पडताच ज्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागतात, तो जीवन्मुक्त! केदार मोठा चांगला मनुष्य आहे नाही?" नरेंद्राचा स्वभाव फार तेजस्वी व अंतःकरण पवित्र पुरुषासारखे पुरुष असून जे बायकांसारखे आचरण करतात,—मग ते धर्मलाभाच्या बाबतीत असो अथवा इतर कोणत्या बाबतीत असो, त्याचा त्याला मनापासून तिटकारा येई दृढसंकल्प व सततोद्योग याच्या जोरावर ईश्वरलाभ करण्याचा प्रयत्न करणे सोडून देऊन, बायकांसारखे मुळूमुळू रडून ईश्वरदर्शनाची इच्छा करणे, म्हणजे पुरुषत्वाचा अपमान करणें आहे, असे त्याला वाटत असे ईश्वरावर सर्वस्वी भार टाकला तरी पुरुष तो पुरुषच, त्याने आपल्या पुरुषत्वाला उचित अशा रीतीने आत्मसमर्पण करावे, असें त्याचें मत असे म्हणून श्रीरामकृष्णाचें बोलणें न पटून तो म्हणाला, "महाराज, हे मला कसे बरे समजावे? आपण जाणूं शकता, म्हणून आपण तसे म्हणता हे ठीक आहे नाही तर, नुसत्या रडारडीवरून चांगलेवाईटपणा काही ओळखता येणार नाही तसे कशाला? नुसते एका वस्तूकडे

टक लावून पाहात बसले तरी डोळ्याला पाणी येतें राधेच्या विरहावस्थेची गाणीं ऐकून कित्येकाचे डोळे भरून येतात, पण तसे होण्याचे कारण भक्तीचा उमाळा नसून आपल्या स्त्रीचा विरह आठवल्यामुळे अथवा स्वत ला त्या अवस्थेंत कल्पिल्यामुळे, त्याच्या डोळ्यातून पाणी येते ! पण अशा अवस्थेचा अनुभव नसलेल्या माझ्यासारख्या माणसाला अशी कैक गाणी ऐकून सुद्धा बिलकुल रडूं येणार नाही " अशा रीतीने आपल्याला पटत नसलेली गोष्ट स्पष्टपणे त्याना सागण्यास नरेंद्र कधी कमी करीत नसे व श्रीरामकृष्णहि या त्याच्या स्पष्टवक्तेपणाबद्दल त्याच्यावर प्रसन्न होत

श्रीरामकृष्णाकडे येऊं लागण्यापूर्वी नरेंद्रनाथ ब्राह्मसमाजात जात असे, असे मागे सागितलेच आहे " निराकार ईश्वराचीच मी उपासना करीत जाईन " अशा आशयाच्या समाजाच्या अंगिकारपत्रावर त्याने सही करून दिली होती यापूर्वीच राखालचद्राची व नरेंद्राची ओळख झालेली होती व त्यानेहि समाजाच्या अगिकारपत्रावर सही करून दिली होती नरेंद्रनाथ श्रीरामकृष्णाकडे येऊ लागला, तेव्हा तेथेहि राखाल येत असतो, असे पाहून त्याला फार आनंद झाला राखालचा साकारोपासनेकडे मूळपासून ओढा असे व श्रीरामकृष्णाच्या उपदेशामुळे त्याची ही सगुणभक्ति पुन्हा जागृत झाली एक दिवस नरेंद्रनाथ दक्षिणेश्वरी आला असता, श्रीरामकृष्णाच्या बरोबर राखाललाहि, देवळात जाऊन देवाना नमस्कार करीत असल्याचे त्याने पाहिले सत्यपरायण नरेंद्राला याचा राग आला व त्याने समाजाच्या अगिकारपत्रावर केलेल्या सहीची राखालला आठवण करून देऊन सध्याच्या त्याच्या वर्तनाबद्दल त्याची चागली खरडपट्टी काढली गरीब बिचारा राखाल ! नरेंद्रापुढे त्याला काही बोलता येईना व त्या दिवसापासून नरेंद्रापुढे जाण्याला सुद्धा त्याला भीति वाटूं लागली ! या साऱ्या गोष्टी श्रीरामकृष्णाच्या कानावर जाताच, नरेंद्राला एक दिवस एकीकडे बोलावून ते त्याला म्हणाले, " हे बघ, याबद्दल राखालला तूं आणखी काही बोलू नकोस तुला पाहाताच तो भीतीने थरथर कापू लागतो.

सध्या त्याच्या मनाचा कल साकारोपासनेकडे आहे, मग त्याने काय करावे बरे ? सर्वांनाच तुझ्यासारखी निर्गुणाची धारणा पहिल्यापासून कशी व्हावी ? ” तेव्हापासून नरेंद्राने राखालला साकारोपासनेबद्दल कधी दोष दिला नाही

नरेंद्र उत्तम अधिकारी असल्याचे जाणून, प्रथमपासूनच श्रीरामकृष्ण त्याला अद्वैततत्वाचा उपदेश करीत असत तो तेथे येताच त्यानी त्याला अष्टावक्रसंहिता वगैरे पुस्तकें वाचावयास द्यावी नरेंद्राला हे सारे ग्रथ नास्तिक विचारानी भरलेले वाटत श्रीरामकृष्णाच्या आग्रहावरून त्याने ते पुस्तक थोडेसे वाचल्यासारखें करावे व लगेच स्पष्टपणे म्हणूं लागावे-“ यात आणि नास्तिकपणात काय फरक आहे ? उत्पन्न केलेल्या जीवाने मी उत्पन्नकर्ता शिव आहे, असे म्हणावे म्हणजे काय ? यापेक्षा कुठे अधिक पाप असूं शकेल काय ? मी ईश्वर, तू ईश्वर, जन्ममरणशील सर्व पदार्थ ईश्वर, यापेक्षा एखादी अधिक विचित्र गोष्ट असणे शक्य आहे काय ? या ग्रथकर्त्या ऋषीची डोकी बिघडली असली पाहिजेत, नाहीतर त्यानी असे कधीच लिहिले नसते !” हें ऐकून श्रीरामकृष्णानी थोडेंसे हसावे, “ अरे, पण तुला हे सारे पटत नसेल, तर नको मानू, म्हणून त्या ऋषीची निंदा कशाला करतोस ? आणि ईश्वराच्या स्वरूपाची ‘ इति ’ तरी का करतोस ? तूं सत्यस्वरूप ईश्वराची मनोभावाने प्रार्थना कर आणि तुला त्याच्या ज्या स्वरूपाचा प्रत्यय येईल, त्यावरच विश्वास ठेव, म्हणजे तर झाले ना ? ” तरी सुद्धा श्रीरामकृष्णाच्या म्हणण्याकडे त्याने लक्षच देऊ नये व त्या ग्रथात प्रतिपादिलेल्या विषयाचा श्रीरामकृष्णाजवळ व इतर लोकाजवळ खुशाल उपहास करीत सुटावे !

ज्ञानमार्गाचा साधक असूनहि नरेंद्राच्या अत करणात भक्तिभाव व कोमलता हेहि गुण भरपूर भरलेले आहेत, असे त्याच्याविषयी श्रीरामकृष्ण म्हणत एक दिवस नरेंद्राला येताना पाहून श्रीरामकृष्ण आमचेकडे वळून म्हणाले, “ शुष्क ज्ञान्याचे डोळे कधी असे असतात काय ? ज्ञानाबरोबरच भक्तीहि त्याच्या अंत करणात भरलेली आहे केवळ पुरुषोचित भावच ज्याच्यामधे

असतो, त्याच्या स्तनाच्या बाजूचा भाग कधीहि काळा नसायचा महावीर अर्जुनाचें असेच होते ”

नरेंद्र दक्षिणेश्वरी आला, म्हणजे कित्येकदा त्याला दुरून पाहाताच श्रीरामकृष्णाना भावावेश प्राप्त होई ! मग देहभानावर आल्यानतर पुष्कळ वेळपर्यंत ते त्याच्याबरोबर धार्मिक विषयावर बोलत बसत कित्येक वेळा असे बोलणे चालले असता, त्याना गाणे ऐकण्याची इच्छा होई व नरेंद्राने गाण्यास सुरुवात केल्याबरोबर ते समाधिमग्न होऊन जात ! असे झाले तरी नरेंद्राने गाणें चालूच ठेवावे, श्रीरामकृष्ण देहभानावर आल्यानतर पुष्कळदा ते नरेंद्राला एखादे विशेष गाणें गाण्यास सागत आणि सर्वांच्या शेवटी “ जो कुछ है, सो तू ही है” हें गाणे त्याला म्हणावयास सागत अशा रीतीने नरेंद्र आला म्हणजे त्याच्या आनंदाला जणु भरते येई

दक्षिणेश्वरच्या कालीमंदिरात त्यावेळी प्रतापचद्र हाजरा म्हणून एक गृहस्थ राहात असे, असे मागे सागितलेच आहे जप ध्यान वगैरे करण्यात तो बराच वेळ घालवी त्याच्या घरची सापत्तिक स्थिति बरी नसे व ईश्वराची भक्ति करण्यात, त्याने आपल्याला सपत्ति द्यावी अशी त्याची मनातील इच्छा असे त्याचे असे म्हणणे असे की, “ ईश्वराची उपासना केल्यास तो आपल्या सर्व प्रकारच्या इच्छा पूर्ण करतो त्याच्याजवळ ऐश्वर्याचा तोटा नसल्यामुळे भक्ताची इच्छा असेल तर तो त्याला संपत्ति सुद्धा देतो ! ” अशा प्रकारची सकामभक्ति न करता निष्कामभावाने भक्ति करीत जावी, असा त्याला प्रथमपासूनच श्रीरामकृष्ण उपदेश करीत ते त्याला पटूं नये श्रीरामकृष्णाच्या दर्शनास जसे अनेक लोक येतात, तसेच आपल्याकडेहि येत जावे अशी त्याची इच्छा असे व म्हणून आलेल्या मंडळीबरोबर चार दोन वेदाताच्या गप्पा मारून, त्याच्यावर आपली छाप बसविण्याचा तो प्रयत्न करी व त्याची बुद्धीहि बरी असल्यामुळे, तो पुष्कळ वेळा सफलहि होई हाजरामहाशयाशी फारसा सबध ठेऊ नये असे श्रीरामकृष्ण

आम्हांला सांगत. ते म्हणत, " हाजरा मोठा खोल बुद्धीचा आहे त्याचें कधी ऐकत जाऊं नका "

तेथे येणाऱ्या मंडळीपैकी नरेंद्राची व त्याची काही दिवस बरीच गट्टी जमली होती नरेंद्र त्याच्याबरोबर पाश्चात्य तत्ववेत्त्याच्या मतासंबंधी पुष्कळ वेळा चर्चा करीत बसे परंतु एखादा वादाचा प्रश्न उपस्थित झाल्यास मात्र, नरेंद्रापुढे त्याला नेहमी हार खावी लागे नेहमी त्याने नरेंद्राचे बोलणे अगदी लक्ष लावून ऐकावे व म्हणून नरेंद्रहि त्याचेवर खुष असे त्या दोघाची अशी दोस्ती पाहून आम्ही कित्येक वेळा हसत हसत म्हणावे, " आता काय बुवा, हाजरामहाशय झाले आहेत नरेंद्राचे दोस्त ! "

एक दिवस, अद्वैत मतासबंधी बोलणे चालले असता, 'जीव-ब्रह्माचे ऐक्य आहे,' ही गोष्ट श्रीरामकृष्णानी नरेंद्राला अनेक प्रकारानी समजावून सांगितली त्याचे सर्व बोलणें नरेंद्राने नीट लक्ष लावून ऐकले, परंतु ते त्याला पटले नाही बोलणे संपल्यावर नरेंद्र नेहमीप्रमाणे हाजरामहाशयाचेकडे गेला, व नुकत्याच ऐकलेल्या अद्वैतमताचा उपहास करून म्हणूं लागला, " ही किती विचित्र गोष्ट आहे ? काय म्हणे, घर ईश्वर, दार ईश्वर, भांडे ईश्वर, झाड ईश्वर, तुम्ही आम्ही सर्वजणहि ईश्वर ! असे असणे कधी तरी शक्य आहे काय ? " हाजरा-महाशयानीहि नरेंद्राच्या म्हणण्याला पुष्टि दिली व ते दोघे मोठमोठ्याने खो खो हासूं लागले श्रीरामकृष्ण त्यावेळी भावावस्थेत होते नरेंद्राचे हासणे ऐकून ते आपले नेसण्याचे धोतर बगलेत मारून बाहेर आले आणि तुमच्या काय गोष्टी चालल्या आहेत रे ? " असे म्हणून हसत हसत नरेंद्राजवळ जाऊन त्यानी त्याच्या अंगाला स्पर्श केला व आपण समाधिमग्न होऊन गेले !

नरेंद्रनाथ सांगत असे, " श्रीरामकृष्णाच्या त्या दिवशीच्या अद्भुत स्पर्शाने क्षणार्धांत माझें विलक्षण भावांतर होऊन गेले काय चमत्कार ! मला खरोखरीच असें दिसूं लागले की, या साऱ्या ब्रह्मांडात ईश्वरावाचून इतर

काहीहि नाही असे पाहून मी आपला विचार करू लागलो की, पाहू हीच मनाची अवस्था किती वेळ टिकते ती पण त्या दिवशी काही ती स्थिति बिलकुल कमी झाली नाही घरी परत आलो, तिथेहि तेच ! जे जे दिसे ते ते ईश्वरच आहे असे वाटे ! जेवायला बसलो तर असे दिसू लागले की, ताट, वाटी, अन्न, वाढणारा, मी स्वत जेवणारा हे सारे ईश्वरच आहे ! कसेबसे एक दोन घास खाल्ले, पुढे जेवणच जाईना ! ‘ असा का स्वस्थ बसला आहेस ? आज जेवत का नाहीस ? ’ असे आईने विचारले त्याबरोबर एकदम भानावर आलो, व पुन्हा एकदोन घास खाऊन स्वस्थ बसलो सारा दिवस,—जेवताना, चालताना कॉलेजात जाताना असेच वाटावे की, सर्व काही ईश्वरमयच आहे आणि सर्व वेळ एखाद्या भुताने पछाडल्याप्रमाणे त्या विचाराशिवाय दुसरा विचारच मनात येऊं नये ! रस्त्यातून चालताना, गाडी पुढून येत आहे असे मी चांगले पाहतोय, पण तिच्यापुढून बाजूला होण्याची प्रवृत्तीच होऊ नये ! वाटावे की, काय हरकत आहे ? गाडी तरी काय, ईश्वरच की नाही ? तिच्यात आणि माझ्यात काय फरक ? हात पाय जसे ढिले पडलेले असावे ! आणि कितीहि खाल्ले तरी तृप्ति म्हणून होऊ नये,—असे वाटावे की, इतका वेळ मी कुठे खाल्ले ? दुसऱ्याच कोणी तरी खाल्ले ! खायला बसावे, मधेच झोप यावी ! पुन्हा उठावे, पुन्हा चार घास खावे ! एखाद्या दिवशी इतके जेवावे की, काही सुमारच नाही ! आणि आश्चर्य हे की, त्यापासून प्रकृतीत काही एक बिघाडहि होऊ नये ! हा सारा प्रकार पाहून आईच्या तोंडचे पाणी पळाले, तिने म्हणावे, ‘ तुला काही तरी होत आहे, पण तूं सांगत नाहीस ” एखादे वेळी तिने म्हणावे, “ हा आता वाचणे कठीण दिसते ’ बरे, हा सर्वेश्वरभाव जेव्हा थोडाबहुत कमी होई, तेव्हा हे सारे जगत् स्वप्न आहे असें वाटावे ! हेदुया तलावाजवळच्या रेल्वेच्या रुळावर डोके आपटावे व हे रूळ खरे आहेत, की स्वप्नातलेच आहेत, हें पाहावे ! हातापायात शक्ति नसल्यामुळे वाटावे, की आता अर्धांगवायु खास होणार ! अशा अवस्थेत बरेच दिवस गेल्यावर, मग हा भाव जरा जरा कमी होऊ लागला आणि जेव्हां पहिल्यासारखा देहभानावर आलो तेव्हा वाटले की,

हाच तो अद्वैत विज्ञानाचा थोडासा अनुभव! शास्त्रात याबद्दल जे काही लिहिले आहे, ते काही तर मग खोटें नव्हे आणि तेव्हांपासून अद्वैततत्वासबंधी माझ्या मनात कधीहि संशय आला नाही ”

श्रीरामकृष्णासबधाने आणखी एक अद्भुत व सुदर घटना आम्ही नरेंद्राच्या तोंडून ऐकली व तेव्हापासून श्रीरामकृष्णाबद्दलची आमची मतें अगदी बदलून गेली त्यावेळेपर्यंत आमचा असा समज होता की, श्रीरामकृष्ण म्हणजे इतर जसे साधुसत असतात, त्याच्याच सारखे एक साधु आहेत, इतकेंच, परतु नरेंद्रनायाच्या तोंडून खालील गोष्ट ऐकल्यावर आमची खात्री झाली की, श्रीरामकृष्ण हे सामान्य साधु नसून श्रीचैतन्य, श्रीकृष्ण, येशु ख्रिस्त वगैरे महापुरुषाच्याच कोटीतील महापुरुष होत ती गोष्ट अशी —

एक दिवत आम्ही नरेंद्रनाथाच्या घरी दुपारचे वेळी गेलो व सध्याकाळपर्यंत त्याच्याबरोबर अनेक विषयादर गप्पागोष्टी करून, मग त्याचेबरोबर हेदुया तळ्यावर फिरण्यास गेलो आज नरेंद्राची स्वारी फार खुषीत होती व श्रीरामकृष्णाच्या अलभ्य सहवासाच्या लाभाने, स्वत च्या मनावर काय परिणाम झाला होता, याचें तो तन्मय होऊन वर्णन करीत होता त्याची वृत्ति अत्यंत तल्लीन होऊन गेली होती व त्या तल्लीनतेच्या भरात त्याच्या हृदयातील आनद पुढील पदाच्या रूपाने बाहेर पडू लागला,—

प्रेमधन विलाय गोरा राय ।
तोरा के निवि रे आय ।
प्रेम कलसे कलसे ढाले-।
तबू ना फुराय ।
प्रेमे शातिपूर डुबु डुबु नदे भेसे याय !
गौरप्रेमेर हिल्लोलेते, नदे भेसे याय ॥—*

---

* गौराग प्रेमधन वाटीत आहे ज्याची ते घेण्याची इच्छा असेल ते यारे या! (काय आश्चर्य), प्रेम घागरीच्या घागरी ओतीत आहे, तरी त्याचा साठा सपतच नाही!! प्रेमाच्या प्रवाहात सारे शातिपूर वाहून चालले आहे!

नरेंद्र तन्मय होऊन हें पद किती तरी वेळ घोळून घोळून म्हणत होता पद सपल्यावर तो आपला आपल्याशीच म्हणूं लागला-" खरोखरच लूट माडली आहे ! प्रेम म्हणा, भक्ति म्हणा, ज्ञान म्हणा, मुक्ति म्हणा,—ज्याला जे हवे ते त्याला, गौराग वाटत सुटला आहे ! काय ही अद्भुत शक्ति ! ( क्षणभर स्तब्ध राहिल्यानंतर ) रात्री दाराला कडी लावून बिछान्यावर पडलो होतो, इतक्यात एकाएकी, या शरीराच्या आत असणाऱ्याला आकर्षण करून नेऊन दक्षिणेश्वरी हजर केले !! आणि मग तिथे कितीतरी वेळ गप्पागोष्टी आणि उपदेश झाल्यावर फिरून तेथून परत घरी पोहोचते केले ! काय ही अद्भुत शक्ति ! या गौरागाला या दक्षिणेश्वरच्या गौरागाला, काय वाटेल ते करता येते ? "

अशा रीतीने श्रीरामकृष्णाच्या दिव्य सहवासात नरेंद्राचे दिवस जात होते, तरी धर्मजिज्ञासेच्या भरात त्याचे वाचन काही कमी झाले नव्हते कारण इतर सर्व विषयाप्रमाणे धर्मविषयहि आपल्या बुद्धीच्या जोरावरच आकलन करून घेण्याची त्याची धमक होती १८८१ मध्ये एफ ए ची परीक्षा झाल्यावर त्याने 'मिल' आदिकरून पाश्चात्य नैय्यायिकाचे ग्रथ वाचून टाकले होतेच आता डेकार्टचा " अहवाद, " ह्यूम व बेन याचा " नास्तिकवाद, " स्पायनोझाचा " अद्वैत चिद्वस्तुवाद, " डार्विनचा " उत्क्रातिवाद, " कॉट व स्पेन्सर याचा " अज्ञेयवाद " वगैरे निरनिराळ्या मताच्या परिशीलनात त्याचा वेळ जाऊ लागला जर्मन तत्ववेत्त्यापैकी कट, हेगेल, शोपेनहार, फिक्टे वगैरेंचे ग्रथहि त्याने वाचून काढले शरीरातील निरनिराळे अवयव व स्नायु वगैरेंची पूर्ण माहिती करून घेण्यासाठी या सुमारास तो मधून मधून मेडिकल कॉलेजमधेहि जाऊन तेथील व्याख्याने ऐकत असे अशा रीतीने १८८४ मध्ये बी ए परीक्षा पास होण्याचे पूर्वीच पाश्चात्य तत्त्वज्ञान्याच्या मताची त्याने चागली माहिती करून घेतली होती व त्याला कळून चुकले होते की, या सर्व मतामताच्या गलबल्यात

---

गौरागाच्या प्रेमप्रवाहात ( सारे शातिपूर ) वाहून चालले आहे !

ईश्वरप्राप्तीचा निश्चित मार्ग सापडणे दूरच राहो, पण उलट ही सर्व मते, मानवबुद्धीच्या सीमेपलीकडे असलेल्या सद्वस्तूची ओळख करून देण्यास सर्वथैव असमर्थ आहेत आणि हे जाणल्यापासून तर त्याच्या मनाची अशांति अधिकच वाढली

असे झाले तरी, मनाची समजूत घालण्यासाठी म्हणून, उगीच वाटेल त्याच्यावर विश्वास ठेवावयाचा व तो सांगेल तसे वागावयाचे, ही गोष्ट त्याच्या मनाला कधीच शिवली नाही आणि म्हणूनच श्रीरामकृष्णाच्या निरनिराळ्या आध्यात्मिक अवस्था व अनुभव यांचीहि परीक्षा करून पाहाण्यास त्याने कधी कमी केले नाही त्याच्या सर्व संशयांचे छेदन करणारा श्रीरामकृष्णासारखा गुरु जर त्याला त्यावेळी मिळाला नसता, तर त्याचे मन संशयसागरात कोठे भटकले असते ते कोणी सांगावे ? श्रीरामकृष्णांनी त्याला स्पष्ट सांगितलें की, "अंत करणापासून केलेली प्रार्थना ईश्वर सर्वदा श्रवण करतो आणि ज्याप्रमाणे माझ्या तुझ्यात आत्ता गप्पागोष्टी चालल्या आहेत, त्यापेक्षाहि अधिक स्पष्ट रीतीने, ईश्वराला पाहाता येते, त्याचे बोलणे ऐकता येते, एवढेच काय, पण त्याला स्पर्शहि करता येतो, हे मी शपथेवर सांगायला तयार आहे !" त्याचप्रमाणे त्यांनी हेहि सांगितलें की, "ईश्वराची निरनिराळी रूपे म्हणजे केवळ मनाचा खेळ आहे, त्यात सत्य काहीच नाही, असा तुझा समज असेल तरी हरकत नाही, पण या जगाचा नियामक असा कोणी एक ईश्वर आहे, या गोष्टीवर जर तुझा विश्वास असेल तर, 'हे ईश्वरा ! तू कसा आहेस हे मला समजत नाही, म्हणून तू कसा आहेस ते मला तूच समजून दे,' अशी तू अंत करणापासून प्रार्थना कर, तो अंतर्यामी भगवान्, तुझी प्रार्थना ऐकेलच ऐकेल" या आश्वासनाने नरेंद्राच्या गोंधळलेल्या मनाला धीर आला आणि तेव्हापासून त्याने साधनांना सुरुवात केली आणि एकांतवास, अध्ययन, तपस्या आणि दक्षिणेश्वरीं वरचेवर जाणें येणे, यात नरेंद्राचा वेळ जाऊ लागला त्याने वकील व्हावे असे त्याच्या वडिलांच्या मनात असल्यामुळे,

त्यानी त्याला एव्हापासूनच निमाईचरण बसू या सुप्रसिद्ध वकिलाच्याकडे काम शिकण्यास ठेवून दिले व त्याचे लग्न करण्याचा बेत ठरवून मुली पाहाण्यासहि सुरुवात केली

त्या दिवसात श्रीरामकृष्ण आपण होऊन मधून मधून नरेंद्राच्या घरी जात व साधनभजनासबधी नानाप्रकारचा उपदेश त्याला करीत भक्तमडळीच्या तोडून, नरेंद्राचे लग्न ठरत असल्याचे ऐकून, श्रीरामकृष्णाच्या जिवाला चैन पडेना व इतर साधारण लोकाप्रमाणे नरेंद्रहि ससारी तर बनणार नाहीना, या भीतीने त्याच्या मनाची गडबड उडून गेली ! ! आईबापाच्या सुखासाठी व त्याना दु ख होऊ नये म्हणून, नरेंद्र कदाचित लग्न करून टाकीलहि, असे वाटून त्यानी त्याला ब्रह्मचर्यपालनाविषयी उत्साहित करावे त्यानी म्हणावे, " बारा वर्षपर्यंत अखड ब्रह्मचर्य पालन केल्यास मनुष्याची मेधानाडी उघडते, तेव्हा त्याची बुद्धि अत्यत सूक्ष्म विषयात सुद्धा चालू शकते व त्याचे आकलन करू शकते अशा प्रकारच्या बुद्धीच्या साहाय्यानेच, ईश्वराचा साक्षात्कार करून घेता येतो, अशा प्रकारची शुद्ध बुद्धीच त्याची धारणा करू शकते." त्यानी श्रीजगदबेजवळ मोठया काकुळतीने म्हणत बसावे, " आई ! नरेंद्राला ससारात जखडून टाकू नको त्याचे लग्न फिसकटून टाक ! " पुढे जगदबेनेच जेव्हा त्याना सागितले की, " नरेंद्राचे लग्न होणार नाही, " तेव्हा कुठे त्याच्या जिवात जीव आला व त्याच्यासबंधाने ते निश्चित झाले ! स्वामी विवेकानद सागत असत, " एक दिवस श्रीरामकृष्ण मला ब्रह्मचर्यपालनाचा उपदेश करीत असता, माझ्या आजीने ते ऐकून माझ्या मातापित्याजवळ सागितले सन्याशाच्या सगतीने मी कदाचित् सन्यासी होईन, या भीतीने त्यानी माझ्या लग्नाची मोठया जारीने खटखट चालविली पण उपयोग काय ? श्रीरामकृष्णाच्या प्रबल इच्छाशक्तीपुढे, त्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ झाले कित्येकदा तर असेहि व्हावे की, इतर सर्व गोष्टी कराव्या आणि एखाद्या अगदी सामान्य गोष्टीवरूनहि लग्न मोडावे बरे, 'या सन्याशाची सगत सोड,' असेहि नरेंद्राला

सागण्यास कोणी धजत नसे कारण त्याचा करारी स्वभाव सर्वाना पूर्ण माहीत होता व त्याच्या मनाविरुद्ध एखादी गोष्ट त्याला करावयास सागितल्यास त्याचा भलताच परिणाम होईल अशी त्याना भीति वाटत असे असो

श्रीरामकृष्णाच्या दिव्य सहवासात, त्याचे दिवस या वेळी कसे आनदात जात असत, याविषयी पढे तो आम्हाजवळ कित्येकदा बोलत बसे तो म्हणे, “ श्रीरामकृष्णाच्या सगतीत दिवस कसे आनंदात जात, त्याची कल्पना इतराना करून देणे कठीण आहे खेळणे, गप्पागोष्टी करणे, वगैरे साऱ्या गोष्टी चालल्या असता सुद्धा, त्यानी आम्हाला नेहमी उच्च तऱ्हेचे शिक्षण, न कळत कसे देत असावे, त्याची आता आठवण होऊन मन चकित होऊन जाते ! एखादा शक्तिसपन्न मल्ल आपल्या लहान शिष्याबरोबर कुस्ती खेळत असता, स्वत सावध राहून, कधी आपण जगु अत्यत आयासपूर्वक त्याला पाडीत आहो, असे भासवून अथवा कधी शिष्याकडूनहि स्वत पडून, त्याचा आत्म-विश्वास वाढवीत असतो, तसाच प्रकार, आमच्याशी वागताना श्रीरामकृष्णाचा असे आमची मने यत्किंचितहि न दुखविता त्यानी आमचे दोष आम्हाला दाखवावे, आमच्या आगच्या एखाद्या लहानशा गुणाची सुद्धा प्रशसा करून, तो अधिक वाढविण्याविषयी आम्हाला उत्तेजन द्यावे आणि एखाद्या वासनेच्या तडाक्यात सापडून आम्ही जीवनाचे ध्येय गमावून बसू नये, म्हणून आमचे प्रत्येक आचरण बारकाईने पाहून आम्हाला नेहमी सदसद्विचार करण्यास सागावे आणि आश्चर्याची गोष्ट ही की ते आमचा प्रत्येक व्यवहार निरखून पाहात आहेत, असे आम्हाला त्यावेळी कधीहि समजून येऊ नये ! शिक्षण देण्याचे आणि माणूस तयार करण्याचें त्याचें अपूर्व कौशल्य यातच होतें ! श्रीरामकृष्णाचे साधनस्थल जी पचवटी तेथेच आम्ही ध्यानधारणादि करीत असावे ध्यानधारणाचशी काय, पण गप्पागोष्टी, खेळ वगैरे सुद्धा आम्ही तेथेच करीत असू बहुतेक वेळी श्रीरामकृष्णहि तेथे येत असत व ते असले म्हणजे तेथे आनदाचे जगु तुफान सुटे तिथे आम्हीं शिवाशिवी खेळावी,

माधवी लताची, खाली लोबत असलेली बळकट दोरखंडे धरून झोके घ्यावे, तर कधी तेथे स्वयंपाकहि करावा एक दिवस मी स्वयपाक केल्याचें पाहून श्रीरामकृष्णानी स्वत तेथे भोजन केले ! ते ब्राह्मणेतर वर्गाच्या हातचे अन्न ग्रहण करू शकत नाहीत, हे माहीत असल्यामुळे, त्याच्यासाठी श्रीजगदंबेच्या प्रसादाची आम्ही अगोदरच व्यवस्था करून ठेवली होती परतु श्रीरामकृष्णानी माझ्याच हातचे खाण्याचा हट्टच धरला ते म्हणाले, ‘ तुझ्यासारख्या शुद्धसत्वगुणी मनुष्याच्या हातचे अन्न खाल्ल्यास काही दोष लागणार नाही ! ’ तसे करण्यास मी पुष्कळ हरकत घेतली, तरी त्यानी तिकडे लक्षच दिले नाही आणि माझ्या हातचे अन्न मोठया आनंदाने खाल्ले ! असो

परंतु हे आनदाचे दिवस फार वेळ टिकले नाहीत १८८४ सालीं बी ए च्या परीक्षेचा निकाल लागण्याचे अगोदर, नरेंद्राच्या पित्यास एकाएकी देवाज्ञा झाली व ससाराचा सर्व भार त्याचेवर पडला विश्वनाथबाबूंनी आपल्या धंद्यात पुष्कळ पैसा मिळविला, तरी त्याचा स्वभाव फार खर्चिक असल्यामुळे, त्यानी आपल्या मागे काहीच ठेवले नाही येवढेच नव्हे तर उलट थोडेसे कर्जच करून ठेवले होते आदा मुळीच नाही आणि खर्च जशाचा तसाच, अशा बिकट पेचात सापडल्यामुळे त्या मानी व श्रीमतीत वाढलेल्या कुटुंबाची काय अवस्था झाली असेल, याची कल्पनाच करावी काही वेळपर्यंत नरेंद्र तर किंकर्तव्यमूढ बनून गेला त्याला जिकडे तिकडे अंधकार दिसूं लागला पण स्वस्थ बसून कसे चालणार ? घरी पाच सहा मंडळी खाणारी, त्याची वाट काय ? अशा विचाराने कोठे एखादी चाकरी मिळाली तर पाहावी, म्हणून त्याने प्रयत्न चालविला, पण चाकरीहि कोठे मिळण्याचें चिन्ह दिसेना अशा स्थितीत तीन-चार महिने लोटले व उत्तरोत्तर त्याच्या कुटुबाची स्थिति अधिकाधिकच वाईट होऊ लागली

नरेंद्रावर हा प्रसग आलेला पाहून श्रीरामकृष्णाचे चित्त फार कळवळे आपल्याकडे येणाऱ्या मडळीना नरेंद्राच्या घरची परिस्थिति सागून त्यानी

म्हणावें, " अरेरे ! बिचाऱ्यावर केवढा वाईट प्रसंग गुदरला आहे ! त्याला एखादी नोकरी मिळेल तर किती चागलें होईल ! " ऐहिक सुखदु खाविषयी सर्वथैव उदासीन असगाऱ्या श्रीरामकृष्णाच्या तोंडून, नरेंद्राबद्दलचे हे उद्गार ऐकून सर्वांना मोठे आश्चर्य वाटावे श्रीरामकृष्ण आपल्याविषयी ज्याच्या-त्याच्याजवळ असे सागतात, हें एक दिवस नरेंद्राच्या कानावर गेलें त्याच्या मानी स्वभावाला हें मुळीच आवडले नाही तो लगेच श्रीरामकृष्णाना म्हणाला, " महाराज ! आपग हे काय चालविलें आहे ? माझ्यासारख्या एखाद्या य·कश्चित् माणसाबद्दल ज्याच्यात्याच्याजवळ असें तोंड वेंगाडणें आपल्याला शोभत नाही ! " हें ऐकून श्रीरामकृष्णाचे डोळे पाण्याने भरून आले व अश्रू गाळीत ते म्हणाले, " नरेन्, नरेन्, गरज पडली तर हातात झोळी घेऊन तुझ्यासाठी दारोदार भिक्षा मागायला सुद्धा माझी तयारी आहे रे ! मग तुझ्यासाठी एवढीशी गोष्ट लोकाजवळ काढायला मला कमीपणा वाटेल काय ? "

ह्या हालअपेष्टाच्या दिवसाची हकीकत नरेंद्र पुढे कधी कधी सागे. तो म्हणे, " त्या दिवसात चाकरी मिळविण्यासाठी मी सारा दिवस, उपाशी अनवाणी, उन्हातान्हात एकसारखे हिंडावे आणि संध्याकाळचे सुमारास हताश होऊन घरी परतावें, हा प्रकार दररोज सुरू झाला कधी कोणीतरी बरोबर असावे, कधी नसावे. पुष्कळ दिवस हिंडून जेव्हा नोकरी मिळण्याचें काहीच चिन्ह दिसेना, तेव्हा मन अत्यंत निराश झालें. हा संसार म्हणजे दुर्बळासाठी, दरिद्री लोकासाठी नाही आणि ही देवाची रचना नसून सैतानाची असावी, असें वाटूं लागलें. थोडयाच दिवसापूर्वी मला साहाय्य करण्याची सधि मिळाल्यास ज्याना धन्यता वाटे, तेच मला यावेळी मुद्दाम टाळू लागले ! एक दिवस दुपारीं प्रखर उन्हात हिंडता हिंडता अगदी थकून गेलो आणि पायाला फोड आले होते, म्हणून मैदानावरील पुतळ्याच्या सावलींत क्षणभर आडवा झालों. त्या दिवशीं माझ्याबरोबर एक दोन स्नेही होते माझी अवस्था पाहून, दु ख होऊन त्यांतील एकजण मला धीर देण्यासाठी—

" देव दयाघन हरील सारें दु ख तुझे मनुजा— "

हें पद गाऊ लागला पण तें ऐकून, कोणी डोक्यावर काठया माराव्या, तशा मला वेदना होऊ लागल्या ! आई, भाऊ, बहिणी याची असहाय आणि दीन अवस्था माझ्या डोळ्यासमोर उभी राहिली आणि दु ख, अभिमान, निराशा यानी अंत करणात एकच खळबळ उडून, मी एकदम ओरडून म्हणालो, ' बस् बस् पुरे कर. उदरंभरणाची काळजी ज्याना कधी माहीत नाही, भुकेच्या वेदनाची ज्याना कधी कल्पना नाही त्यानाच आरामखुर्चीवर बसून पख्याची हवा खात असता तुझे ते पद गोड लागेल ! मागे मलासुद्धा ते गोड लागत असे, पण आता या धडीधडीत प्रत्यक्ष परिस्थितीत, तें म्हणणें म्हणजे निव्वळ वेडावण्यासारखें आहे ! " माझ्या या भडिमाराने त्या बिचाऱ्याला अत्यंत वाईट वाटले माझ्या मनाची त्या वेळी काय स्थिति होती हे त्याला कसे समजावे ? '

" त्या दिवसात, सकाळीं उठताच, प्रथम कोणासही न समजूं देतां घरांत सर्वांना पुरेसें खायला आहे की नाही हे मी अगोदर पाहावें, नसल्यास, ' आज मला एकाकडे जेवायला जायचे आहे, ' असे आईला सागून लगेच बाहेर पडावें आणि एक पैशाचे काहीं तरी खाऊन अथवा कधी उपाशीच राहून दिवस काढावा ! पण कोणाला काही कळूं देऊ नये ! दु खात सुख एवढेच होते की, ईश्वर मंगलमय आहे याबद्दल मन कधीहि सशयग्रस्त झालें नाही पहाटे उठतांच प्रथम त्याचें नामस्मरण करून मग इतर कामाना सुरुवात करावी. एक दिवस असेंच नामस्मरण करीत असता आई एकदम ओरडून म्हणाली, ' गप बस, कारटया ! लहानपणापासून, सारखे भगवान भगवान चालविलें आहेन्, त्यानंच तर ही दशा केली ! ' हे तिचे शब्द माझ्या काळजाला झोंबले. मी मनाशीं म्हणालों, ' ईश्वर खरोखरच आहे काय ? मग तो माझ्या इतक्या काकुळतीच्या प्रार्थना कसा ऐकत नाही? ईश्वरचंद्र विद्यासागर म्हणत असत—' ईश्वर जर खराच दयामय असेल, तर त्याच्या सृष्टींत इतकें दु ख दारिद्रय का ? ' त्याची आठवण झाली आणि हृदय संशयग्रस्त झालें.

"कोणतीहि गोष्ट चोरून करण्याचा माझा स्वभाव कधीच नव्हता अर्थातच, ईश्वर नाही व असला तरी त्याला आळवण्यात काही अर्थ नाही, ही गोष्ट मी त्या वेळी उघड उघड बोलू लागलो! याचा परिणाम असा झाला की थोडक्याच दिवसात 'नरेंद्र नास्तिक झाला,' असे जो तो म्हणूं लागला. एवढेचसे काय पण एकदोघाजवळ मी असेहि म्हणायला कमी केले नाही, 'संसारातील दु खकष्ट क्षणभर विसरण्यासाठी, जर कोणी मद्यपान करू लागून अथवा वेश्यागृही जायला लागून त्यात सुख मानूं लागला, तरी मी त्याला कधी दोष देणार नाही, एवढेच नव्हे तर संसारातील दु ख-कष्ट विसरण्याचा हा एवढाच मार्ग आहे अशी जर माझ्या मनाची खात्री झाली, तर मी देखील या मार्गाचे अवलंबन करण्यास कधी मागे पुढे पाहाणार नाही!

"झालं! जाता जाता ही गोष्ट खुद्द श्रीरामकृष्णाच्या कानापर्यंत गेली आणि मधून मधून भक्तमंडळीत या संबंधाने चर्चा सुरू झाली कोणी कोणी ही माझी हीन अवस्था पाहाण्यासाठी म्हणून स्वत मजकडे येऊं लागले! माझ्या चारित्र्याविषयी लोकांना एवढा संशय उत्पन्न व्हावा ही गोष्ट मला फार लागली आणि माझा मानी स्वभाव पुन्हा जागृत झाला आणि माझ्याकडे येणाऱ्या मंडळीबरोबर, ईश्वराच्या अस्तित्वासंबंधी मी खूप वादविवाद करू लागलो माझे खरोखरच अध पतन झाले आहे, अशी मंडळीची खात्री झालेली दिसली म्हणजे मला बरे वाटावें व मी मनात म्हणावे, 'बरे झाले, आता ही गोष्ट श्रीरामकृष्णाच्या कानावर जाऊन त्याचीहि खात्री होईल!' आणि असें वाटे की 'माणसाच्या बऱ्या वाईट मताला या जगात जर इतकी थोडी किंमत आहे, तर श्रीरामकृष्णाचेहि वाईट मत झाले, तरी काय हरकत आहे?' पण झाली गोष्ट निराळीच माझ्या कानावर असे आलें की, माझ्या या अध पतनाची बातमी ऐकून, श्रीरामकृष्ण प्रथम काही एक म्हणाले नाहीत पण पुढे भवनाथ रडत रडत त्याच्याकडे जाऊन जेव्हा म्हणाला, 'महाराज! नरेंद्राचें हें असें होईल, हे कधी स्वप्नात देखील आले

नव्हते, ' तेव्हा ते एकदम त्याच्या अंगावर ओरडून म्हणाले, ' गप बसा पोरांनो ! आईने सांगितले आहे की, तो कधी सुद्धा वाईट मार्गाला लागायचा नाही पुन्हा जर तुम्ही कोणी माझ्याजवळ असे बोललात, तर मी तुमचे तोंडसुद्धा पाहाणार नाही !

' पण असे बळेंबळेंच नास्तिक्य बुद्धीचे प्रदर्शन करून काय उपयोग ? बाल्यकालापासून आणि विशेषत श्रीरामकृष्णाच्या दर्शनापासून जो अनुभव प्राप्त झाला होता, त्यायोगे लगेच वाटू लागावे, ' छे ! छे ! ईश्वर नाही असे कसे असेल ? तो असलाच पाहिजे, नाहीतर या घोर संसारात जिवंत राहण्याचा काही अर्थच नाही, असे म्हणावे लागेल कितीहि दु खे आली तरी, त्याचे दर्शन घेण्याचा मार्ग अवश्य शोधून काढला पाहिजे ' अशा परस्पर विरोधी विचाराच्या मधे मन हेलकावे खाऊ लागले

" उन्हाळा गेला, पावसाळा आला, तरी सुद्धा मी नोकरीसाठी दररोज हिंडतच होतो एक दिवस सारा दिवस उपाशी पावसातच हिंडहिंड हिंडलो व संध्याकाळचे सुमारास इतका थकून गेलो की, माझ्याने एक पाऊलहि पुढे टाकवेना डोळ्यापुढे अंधेरी येऊ लागली आणि तसाच एका घराच्या पडवीत पडून राहिलो तशा स्थितीत किती वेळ गेला कोणास ठाऊक पण एवढे मात्र स्मरण आहे की, मनाच्या पडद्यावर नानाप्रकारच्या चिंताची चित्रे उमटत होती व नाहीशी होत होती एकाएकी असे वाटू लागले की, मनावरील एकएक पडदा जणु काय कोणी बाजूला सारीत आहे आणि ईश्वर न्यायी आहे की नाही, त्याच्या सृष्टीत इतकी विषमता का, वगैरे ज्या गोष्टीचा इतके दिवस उलगडा न झाल्यामुळे, मन अस्थिर होऊन गेले होते, त्या गोष्टी कोणी तरी समजावून देत आहे ! हे पाहून माझे सर्व संशय नाहीसे झाले, मन आनंदाने भरून गेले आणि अंगात एक प्रकारची विलक्षण हुशारी वाटू लागली, सारा थकवा नाहीसा झाला आणि लगेच उठून मी घरी आलो आणि पाहातो तो रात्र सरण्यास थोडाच अवकाश होता

" त्या दिवसापासून स्तुति, निंदा याविषयी मी पूर्ण उदासीन झालो आणि मनाचीहि अशी खात्री झाली की पैसा मिळविणे आणि कुटुंबपोषण करणें एवढयासाठी काही आपण खास जन्मास आलो नाही अशी खात्री होताच आपल्या आज्याप्रमाणे संसारत्याग करण्याची मी गुपचुप तयारी करू लागलो दिवसहि ठरला, इतक्यात असे ऐकले की त्या दिवशी श्रीरामकृष्ण कलकत्त्यात कोणा एका भक्ताचे घरी येणार आहेत हे ऐकून वाटले की ' वा ! ठीक झाले, एकदा शेवटचे गुरुदर्शन घेऊन संसाराला कायमचा रामराम ठोकूं ' श्रीरामकृष्णाची गाठ पडताच ते म्हणाले, ' आज तुला माझ्याबरोबर दक्षिणेश्वरी आले पाहिजे ' मी पुष्कळ आढेवेढे घेतले, पण ते ऐकेनात नाइलाजाने त्याचेबरोबर गाडीत बसून निघालो वाटेने ते काही एक बोलले नाहीत गाडीतून उतरताच इतर मंडळीबरोबर मी त्यांच्या खोलीत जाऊन बसलो थोडयाच वेळात त्याना भावावेश झाला आणि पलंगावरून उठून माझ्याजवळ येऊन, माझ्या गळ्यात हात घालून, अश्रू गाळीत गाळीत गाऊ लागले

कथा बलते डराई[1], ना बलते ओ डराई—

( आमार ) मने सन्दे[2] हय बुझि तोमाय हाराई हा–राई !* ॥

" इतका वेळ मी आपले मन कसे तरी मोठया कष्टाने आवरून धरले होते, पण आता मात्र माझ्याने राहवेना कंठ दाटून येऊन त्यांच्या सारखेच माझ्याहि डोळ्यातून अश्रू वाहू लागले ! माझी खात्री झाली की, श्रीरामकृष्णाना सर्व काही समजले आहे ! आम्हा दोघाचे हे विचित्र आचरण पाहून सर्वजण चकित होऊन गेले हळूहळू श्रीरामकृष्ण देहभानावर आले व एकजणाने असा प्रकार होण्याचे कारण विचारल्यावरून, थोडे हासून म्हणाले, ' ऊ, काही विशेष नाही आमचे आपले ते

---

१ भितों २ संशय

* बोलावे तरी भीति वाटते, न बोलावे तरी भीति वाटते, माझ्या मनात संशय येतो की मी कदाचित् तुला गमावून बसेन !

एक काही तरी होऊन गेलं, झाले!' मग, रात्री, इतर सर्वांना बाजूला करून, मला जवळ बोलावून ते म्हणाले, 'मला ठाऊक आहे की, तू आई-जगदंबेच्या कामासाठी इथे आला आहेस, तू संसारात कधीच राहू शकणार नाहीस, तरीपण मी जोपर्यंत आहे, तोपर्यंत माझ्यासाठी म्हणून संसारात राहा' असे म्हणून श्रीरामकृष्ण पुन्हा हुंदके देऊन अश्रु गाळू लागले!!

"श्रीरामकृष्णाचा निरोप घेऊन घरी परतलो आणि पुन्हा संसारातील हजारो काळज्या माझ्यामागे लागल्या नोकरी पाहाण्यासाठी माझे पुन्हा पूर्वीसारखे भटकणे सुरू झाले अखेरीस, एका वकीलाच्या घरी कारकुनीचे काम करून आणि काही पुस्तकांची भाषांतरे करून, थोडे बहुत पैसे मिळवू लागलो. पण पैसे मिळण्याचे निश्चित असे काहीच साधन नसल्यामुळे, घरची स्थिति जशीची तशीच राहिली काय करावं काहीच समजेना एक दिवस मनात आले की, 'श्रीरामकृष्णाचे तर ईश्वर ऐकतो ना? मग असेच करावे की, 'घरच्या मंडळींना खाण्यापिण्याचे कष्ट होऊ नयेत' अशी ईश्वराची प्रार्थना करण्याबद्दल श्रीरामकृष्णापाशी धरणें धरून बसावे म्हणजे झाले माझ्यासाठी एवढी गोष्ट ते खास करतील' ह्या विचाराने मनात फार हुरूप आला, आणि ताबडतोब त्यांचकक्षणी दक्षिणेश्वराची वाट धरली तेथे पोहोचताच तडक श्रीरामकृष्णाच्या खोलीत गेलो आणि त्यांना म्हणालो, 'महाराज, माझ्या घरच्या माणसाच्या अन्नवस्त्राची काही तरी व्यवस्था करण्याबद्दल जगदंबेची तुम्ही प्रार्थना केलीच पाहिजे. मला त्यांचे हाल बघवत नाहीत"

**श्रीरामकृष्ण**—"बाबारे, ही असली गोष्ट माझ्याच्याने बोलवणार नाही तूच का तिच्या कानावर घालीत नाहीस? तू आईला मानीत नाहीस, म्हणून तर तुला असे कष्ट होतात!"

**मी**—मला तर आईची माहितीहि नाही आपणच माझ्यासाठी एवढे आईजवळ सांगा आपण एवढे केलेच पाहिजे मी काही केल्या आज आपणाला सोडणारच नाही"

यावर श्रीरामकृष्ण मोठ्या प्रेमाने म्हणाले —" नरेंद्र, तुला काय सांगूं? मी कित्तीदा तरी आईला म्हणालों असेन, की 'आई, नरेंद्राचे दुःख-कष्ट दूर कर,' पण तूं आईला मानीत नाहीस, म्हणून तर आई तिकडे लक्षच देत नाही! पण तुझा एवढा आग्रहच आहे, तर ठीक आहे, आज मंगळवार आहे, मी सांगतों की, तूं आज रात्रीं आईच्या मंदिरात जाऊन तिला नमस्कार कर आणि तुला काय पाहिजे तें तूंच तिच्याजवळ मागून घे आई तुला तें खास देईल. माझी आई चिन्मयी, ब्रह्मशक्ति,—नुसत्या इच्छामात्रेंकरून जगत् निर्माण करणारी तिनेच मनात आणले तर ती काय करूं शकणार नाही?

" ह्या आश्वासनाने माझ्या मनात दृढ विश्वास उत्पन्न झाला की, श्रीरामकृष्णच ज्या अर्थी असे सांगत आहेत, त्या अर्थी नुसती प्रार्थना केल्या-बरोबर, सारी दुःखें आता खास नाहीशीं होणार! मन अत्यंत उत्कंठित झालें आणि दिवस एकदाचा केव्हा जातो व रात्र येते, असे होऊन गेलें हळूहळू रात्र झाली एक प्रहर रात्र झाल्यावर, आईच्या मंदिरात जाण्यास श्रीरामकृष्णानी मला सांगितलें मी निघालो, पण मनाला एक प्रकारची विलक्षण गुंगी आली, पाय थरथर कांपूं लागले आणि आता आपल्याला मातेचें दर्शन होणार आणि तिचे शब्द ऐकावयास सांपडणार असें वाटूं लागून, इतर सर्व काळज्या आणि विचार यांचें विस्मरण होऊन, ही एकच गोष्ट मनात घोळूं लागली! मंदिरात गेलों आणि पाहातों तों असें दिसले की, आई खरोखरच चिन्मयी असून जिवंत आहे; आणि तिच्या अंगातून रूप, प्रेम, लावण्य, करुणा, जणु काय निथळत आहे! हें पाहाताच भक्तिप्रेमाने हृदय उचंबळून आले आणि विव्हल होऊन, सद्गदित अंतःकरणाने पुन्हा पुन्हा नमस्कार करीत म्हणूं लागलों, 'आई! विवेक दे, वैराग्य दे, ज्ञान दे, भक्ति दे आणि जेणेंकरून मला तुझ्या दर्शनाचा निरंतर लाभ होईल असे कर!' मनाला अतिशय शांति प्राप्त झाली, जगन्माते-वाचून इतर सर्व विचार विसरून गेलो! आणि अत्यंत आनंदाने श्रीराम-कृष्णाच्या खोलीकडे परतलो

"मला पाहताक्षणी त्यानी विचारलें, 'काय रे ? सासारिक दु:खकष्ट नाहीसे करण्याबद्दल आईची प्रार्थना केलीस की नाही ?' हें ऐकताच कोणीतरी हलवून जागे करावे तसे होऊन, मी चकित होऊन म्हणालो, 'अरेरे, खरेंच मी सारे विसरूनच गेलो, आता काय करावें ?' श्रीरामकृष्ण म्हणाले, 'जा, जा, पुन्हा जा आणि पुन्हा प्रार्थना करून ये.' पुन्हा मंदिरात गलो, आणि जगन्मातेसमोर जाताच, पुन्हा सारें विसरून जाऊन भक्ति आणि ज्ञान देण्याची तिला प्रार्थना करून परत फिरलों ! मला पाहाताच हसत हसत श्रीरामकृष्ण म्हणाले, 'काय रे ? आता तरी नीट प्रार्थना केलीस ना ?' हें ऐकताच मी पुन्हा देहभानावर आलों आणि म्हणालों, 'नाही महाराज, आईला पाहाताच मी साऱ्या गोष्टी विसरून गेलो आणि पुन्हा भक्तिज्ञानाबद्दल प्रार्थना करून आलो आता कसें होईल ?' श्रीरामकृष्ण म्हणाले, 'अहारे शहाण्या ! जरा नीट सावध राहून एवढी साधी प्रार्थनासुद्धा, तुला धड करता आली नाही ? बघ, पाहिजे असेल तर आणखी एकदा जाऊन प्रार्थना करून ये जा लौकर !' पुन्हा गेलो, पण मंदिरात प्रवेश करताच मनाला फार लाज वाटूं लागली मी मनात म्हणालो, 'ही काय य:कश्चित् गोष्ट जगन्मातेला मागायला आलों ? राजा प्रसन्न झाला आणि काय म्हणे त्याच्याजवळ भोपळा मागितला ! हा तरी तसलाच मूर्खपणा नव्हे काय ?—असें वाटून जगन्मातेला पुन्हा पुन्हा नमस्कार करून म्हणूं लागलों, 'आई ! दुसरें काहीएक मला नको केवळ ज्ञान आणि भक्ति दे !' मंदिरातून परत येताना मात्र सारी गुंगी उतरली आणि वाटूं लागलें की, हा सारा श्रीरामकृष्णाचाच खेळ असला पाहिजे ! नाहीतर तीनतीनदा मंदिरात जाऊन असें कसें व्हावें ? श्रीरामकृष्णाच्या खोलींत जाताच त्याच्यापाशी धरणें धरून बसलो आणि म्हणालो, 'तें काही नाही, महाराज ! हा सारा आपलाच खेळ आहे आता आपणच माझ्यासाठी आईजवळ प्रार्थना केली पाहिजे' यावर ते म्हणाले, 'काय करूं रे ? मी कोणाबद्दलहि अशी प्रार्थना आजपर्यंत कधी करूं शकलों नाही, अशी गोष्ट माझ्या तोंडातून

बाहेरच येत नाही म्हणून तुला सांगितले, की तूं आईजवळ वाटेल ते माग. आई तुला तें खास देईल पण तुला एवढी साधी गोष्टसुद्धा करता आली नाही तुझ्या नशीबातच ससारसुख नाही, त्याला मी तरी काय करू ?' मी थोडाच गप्प बसणार होतो ? मी पुन्हा म्हणालो, 'ते काही नाही, महाराज, आज मी आपल्याला सोडणारच नाही आपण एवढी गोष्ट केलीच पाहिजे, माझी खात्री आहे की, आपण मनात आणले तर सर्व काही होईल ' त्यानी जेव्हा पाहिले, की मी काही केल्या ऐकत नाही, तेव्हा ते म्हणाले, 'बरं तर, जा तुम्हाला जाडयाभरडया अन्नवस्त्राची कमतरता पडणार नाही !' आणि तेव्हापासून आमच्या सर्व अडचणी* कशा ना कशा तरी भागत गेल्या "

नरेंद्राच्या आयुष्यात वरील गोष्टीचे फार महत्त्व आहे इतके दिवस ईश्वराच्या साकार स्वरूपावर त्याचा विश्वास नसे एवढेच नव्हे तर निरनिराळ्या देवाची आणि मूर्तिपूजेची तो टवाळी करण्यासहि कमी करत नसे ही त्याची टवाळी कित्येक वेळा इतक्या थराला जाऊन पोहोचे, की प्रत्यक्ष श्रीरामकृष्णाच्या समोरहि जगदबेला नावे ठेवण्यास तो मागेपुढे पाहात नसे ! एक दिवस शातीचे सागर श्रीरामकृष्णहि त्याच्या भडिमाराला इतके चिडले, की डोळे लाल करून ते त्याच्या अंगावर जाऊन ओरडले, "साल्या, निघ येथून माझ्यासमोर माझ्या आईला नावे ठेवायला तुला लाज नाही वाटत ?" नरेंद्राने पाहिले की, आपण आज आपल्या मर्यादेबाहेर वागलो असे वाटून तो तिथेच एका बाजूला, गुपचुप, कोपऱ्यात जाऊन बसून राहिला ! काही वेळाने श्रीरामकृष्णाचे लक्ष त्याचेकडे गेले व त्याचे हृदय उचंबळून येऊन ते म्हणाले, "नरेन्, तुझ्या-सारख्या शहाण्या मुलाने असे करावे का बरे ? साग पाहू ? तू माझ्या-आईची निदा केलीस म्हणून माझें डोके फिरून गेले तुला निदाच करायची

* यानंतर लौकरच नरेंद्राला नोकरी लागली

असेल तर माझी कर, हवी तितकी ! माझ्या आईची उगीच का म्हणून ? ”
असो अशा प्रकारच्या नरेंद्राचा आज साकार स्वरूपावर विश्वास बसला, हे पाहून श्रीरामकृष्णाचा आनंद गगनात मावेना ! ज्याच्या त्याच्याजवळ “ नरेंद्र जगन्मातेला मानू लागला ! ” असे म्हणून ते आनद प्रदर्शित करू लागले तारापद घोष एक दिवस दक्षिणेश्वरी गेले होते दुपारची वेळ होती, आणि नरेंद्र व्हराडयात एका बाजूला निजला होता तारापद सागत असत–“ मी जाऊन श्रीरामकृष्णाना नमस्कार करताच, नरेंद्राकडे बोट करून ते मोठया हर्षाने म्हणाले, ‘ अरे, हा पाहिलास का येथे एक मुलगा निजला आहे मोठा चागला मुलगा आहे याचे नाव नरेंद्र इतके दिवस जगन्मातेला मानीत नसे, पण कालपासून मानू लागला ! त्याच्या घरची स्थिति चागली नाही, म्हणून मी त्याला जगन्मातेची प्रार्थना करण्यास सागितले पण तो धन दौलत काहीच मागू शकला नाही—म्हणाला, ‘ मला लाज वाटली ! ’ मदिरातून आला आणि मला म्हणाला, ‘ जगदबेचे एखादे गाणे शिकवा ! ’ मी त्याला एक गाणे शिकविले सारी रात्र तेच गाणे तो गात बसला होता ! म्हणून आता जरा निजला आहे ( अत्यत आल्हादाने हासत हासत ) नरेंद्र अखेरीस जगन्मातेला मानू लागला ! कसे ? छान झाले की नाही ? ’ त्याचा हा आनद पाहून मीहि म्हणालो, ‘ हो महाराज, छान झाले ! ’ काही वेळाने हासत हासत ते पुन्हा म्हणू लागले, ‘ नरेंद्र जगन्मातेला मानू लागला छान झाले, नाही बरे ? ’ त्या दिवशी त्याच्या बोलण्याला दुसरा विषयच नव्हता ज्याच्या त्याच्याजवळ आनदाने म्हणत, ‘ नरेंद्र जगन्मातेला मानू लागला, छान झाले, नाही बरे ? ’ त्या दिवशी भावावेशात सुद्धा त्याना दुसरा विषयच नव्हता आठ वाजण्याच्या सुमारास श्रीरामकृष्णाचा भावावेश नाहीसा झाला व मी आणि नरेंद्र दोघेहि श्रीरामकृष्णाचा निरोप घेऊन घरी परतलो ”

श्रीरामकृष्णाचे स्वत वरील अपार प्रेम आठवून नरेंद्राने कितीतरी वेळा म्हणावे, “ एका श्रीरामकृष्णानीच केवळ, मला प्रथम पाहिल्यापासून, सर्व

बाबतीत सर्व वेळा माझ्यावर सारखाच विश्वास ठेवला, दुसऱ्या कोणीहि नाही,—आईबापानीसुद्धा नाही ! त्याच्या या विश्वासाने आणि प्रेमानेच त्यानी मला कायमचे बाधून टाकले ! एखाद्यावर निष्काम प्रेम असे तेच करू जाणत व करीत इतर सर्वजण स्वार्थासाठी प्रेमाचें नुसते वरवर प्रदर्शन मात्र करीत असतात ! " असो.

संसाराचा गाडा कसाबसा नीट चालू लागल्याचे पाहून, नरेंद्र निश्चित झाला व साधनभजन, ग्रथवाचन इत्यादिकात आता त्याचा बराच वेळ जाऊ लागला वेळ सापडताच त्याने श्रीरामकृष्णाच्या दर्शनास धावून जावे आणि साधनामार्गातील आपल्या अडचणी त्याना निवेदन कराव्या श्रीरामकृष्णानीहि केव्हा काय केले पाहिजे, कसे केले पाहिजे, वगैरे उपदेश त्याला मोठ्या प्रेमाने करून, अधिकाधिक साधनभजन करण्यास त्याला उत्तेजन द्यावे व धीर द्यावा सद्गुरूच्या साक्षात् देखरेखीखाली नरेंद्राची आध्यात्मिक उन्नति मोठ्या झपाट्याने होऊ लागली व त्याला निर्गुणसाक्षात्काराची तळमळ लागून तो अधिकाधिक उग्र साधना करू लागला हे पाहून श्रीरामकृष्णानाहि फार आनद झाला व नरेंद्राच्या ईश्वरानुरागाची आणि तीव्र वैराग्याची, ते मोकळ्या मनाने ज्याच्या त्याच्या-जवळ स्तुति करू लागले

नरेंद्राची तळमळ वाढत चालली त्याला वाटू लागले की श्रीरामकृष्णानी मनावर घेतले तर ईश्वरदर्शन काय, समाधि काय, सारा केवळ आपल्या हातचा मळ आहे त्याच्यापाशीच धरणे धरून बसल तर ? असा विचार मनात येताच त्याने श्रीरामकृष्णाना त्रास देण्यास सुरवात केली त्याने म्हणावे, " महाराज, निर्विकल्पसमाधिसुखाचा अनुभव मला आपण प्राप्त करून दिला पाहिजे " यावर श्रीरामकृष्ण नेहमी जे इतराना उत्तर देत तेच त्यानी नरेंद्राला द्यावे त्यानी म्हणावे, " मी काय करू शकतों रे? माझ्या हातात आहे काय ? आईची जशी इच्छा असेल तसें होईल ! " यावर नरेंद्राने म्हणावे, " महाराज, आपली इच्छा असली म्हणजे आईलाहि इच्छा होईल " यावर त्यानी म्हणावे, " अरे, पण

अशी घाई करून कसे होईल ? बी जमीनीत पुरल्याबरोबर लगेच त्याचे झाड होऊन त्याला फळे लागतात काय ? वेळ आल्याशिवाय काय होईल ? " यावर नरेंद्र एक दिवस धिटाईने म्हणाला, "पण महाराज, ही वेळ तरी येणार केव्हा ? आपण तर दिवसेंदिवस * खगत चालला आहा. आपण गेलात म्हणजे मग मी कोणाकडे पाहावे ? " हे ऐकून श्रीरामकृष्ण चकित होऊन नरेंद्राच्या तोंडाकडे पाहू लागले व काही न बोलता स्वस्थ बसले

होता होता एक दिवस नरेंद्र नित्याप्रमाणे ध्यानस्थ बसला असता, त्याची एकाएकी गभीर समाधि लागली ! त्याच्याजवळ त्याचे इतर गुरुबधूहि ध्यान करीत बसले होते त्याचे ध्यान आटोपले व पाहातात तो नरेंद्र अगदी स्थिर बसला असून त्याची दृष्टि नासाग्री लागली आहे श्वासोच्छ्वास बद असून शरीरामध्ये प्राण असल्याचे काहीच चिन्ह नाही हा काय प्रकार आहे असें वाटून भयाने गागरून जाऊन एक दोघेजण श्रीरामकृष्णाना ही गोष्ट सागण्यासाठी धावत माडीवर गेले श्रीरामकृष्ण आपल्या आथरुणावरच स्वस्थ बसले असून, त्याची मुद्रा शात व गभीर दिसत होती त्याचे बोलणे ऐकून ते गभीरपणाने म्हणाले, " राहू द्या त्याला तसाच काही वेळ ! त्याने अलीकडे जसे माझे डोके पिकवले होते ! " हे त्याचे शातपणाचे उत्तर ऐकून ते चकित झाले, पण त्याची खात्री झाली की, ही सारी गोष्ट श्रीरामकृष्णाना माहीत आहे व नरेंद्राच्या जिवाला काही अपाय खास नाही, असे पाहून ते परत खाली जाऊन नरेंद्राजवळ बसून राहिले. बऱ्याच वेळाने नरेंद्र देहभानावर आला त्याचे अंत करण भरून आले होते नेत्रातून अश्रुधारा वाहात होत्या व त्याच्या हृदयात दिव्य आनंद आणि शाति याचा प्रचड प्रवाह वाहू लागला होता ! देहभानावर येताच प्रथम त्याने श्रीरामकृष्णाना उद्देशून नमकार केला आणि लागलीच उठून जिन्याकडे धाव घेतली वर श्रीरामकृष्ण अजून सचित बसले होते वर जाऊन त्याच्यापुढे लोटागण घालून, नरेंद्र हात जोडून स्वस्थ-

* यावेळी श्रीरामकृष्ण गळ्याच्या रोगाने आजारी होते.

पगे उभा राहिला कृतज्ञता, आनंद, शाति वगैरेनी त्याचे हृदय भरून आले होते व त्याच्या तोंडातून शब्दहि बाहेर निघत नव्हता आपल्या पट्ट–शिष्याला पाहून श्रीरामकृष्णाच्या आनदालाहि भरते आले त्यानी त्याच्या हृदयातील खळबळ जाणली व त्याला म्हणाले, " आता तुला आईने सर्व काही दाखविले आहे आणि तुझ्या पेटीची किल्ली मात्र तिने माझ्याजवळ दिली आहे हा अनुभव आता नीट जतन करून ठेव आणखी काही दिवस लोकात मिसळू नको व कोणाशी फारसा बोलू नको आणि काही दिवसपर्यंत जेवण आपल्या हातानीच करून खात जा, समजले ? जा आता थोडी विश्राति घे आणि थोड्या वेळाने आईच्या मदिरात जाऊन तिला नमस्कार करून ये "

अशा रीतीने, श्रीरामकृष्णाच्या कृपेने नरेंद्राने मानवजीवनाचे ध्येय हस्तगत करून घेतले श्रीरामकृष्णाचें आपल्या भक्तमडळीशी किती प्रेमाचे व आपलेपणाचे वर्तन असे, त्याच्या आध्यात्मिक उन्नतीकडे त्याचे कसे बारकाईचें लक्ष असे व त्याना आपल्या मार्गात ते कसें साहाय्य करीत, याचे एक उदाहरण म्हणून नरेंद्राच्या आध्यात्मिक उन्नतीचा इतिहास सक्षेपत सागितला श्रीरामकृष्णाचे नरेंद्रावर जरी सर्वाहून अधिक प्रेम होतें, तरी इतरावरहि काही कमी नव्हते ज्याला त्याला वाटे की श्रीरामकृष्णाचें आपल्यावरच सर्वांत अधिक प्रेम आहे, ज्याला जितक्या प्रेमाची आवश्यकता वाटे, त्याहून अधिक प्रेमाचा जर त्याला प्रत्यक्ष अनुभवच येई, तर त्याला तसे वाटावे यात आश्चर्य ते काय ? एखाद्याला दहा रुपये मिळण्यातच आनंद होत असता त्याला पधरा रुपये मिळाले आणि एखाद्याला शंभर रुपये हवे असता दीडशे रुपये मिळाले, तर दोघानाहि होणारा आनद सारखाच असणार नाही काय ! तीच स्थिति श्रीरामकृष्णाच्या भक्तमंडळीची होती ज्याला जितक्या प्रेमाची अपेक्षा असे, त्याहून कितीतरी जास्त प्रेम त्याला श्रीरामकृष्णांकडून मिळे आणि म्हणूनच सर्वजण आनदांत असत

मागे सांगितलेच आहे की, श्रीरामकृष्णांची बहुतेक भक्तमडळी त्यांच्याकडे सन १८८१ च्या पुढे आली आणि श्रीरामकृष्णाचें धर्माच्या पुनरुज्जीवनाचे

बरेचसे कार्य याच वेळी झाले १८८१ ते १८८५ एप्रिलपर्यंत आपल्या भक्ताच्या-बरोबर अद्‌भुत लीला करून सारं कलकत्ता शहर आणि पर्यायाने सारा बंगाल प्रांत त्यांनी हालवून सोडला आणि लोकांच्या धर्मविषयक कल्पनांत प्रचंड क्रांति घडवून आणली १८८५ साली त्यांच्या गळ्याला एक चमत्कारिक रोग झाला व तेव्हापासून सुमारे दीड वर्ष ते रुग्णशय्येवरच होते म्हटले तरी चालेल प्रकृति ठीक नव्हती तरी त्यांचा उत्साह कायमच होता व त्या आजारी-पणांतहि त्यांनी आपली भक्तमंडळी एकत्रित करण्याचे महत्कार्य केले ही त्यांच्या अखेरच्या दीड वर्षांची हकीगत पुढील प्रकरणांत सांगावयाची आहे.

---

## २०. पानिहाटीचा महोत्सव

सन १८८५ च्या प्रखर उन्हाळयात श्रीरामकृष्णाना अतिशय त्रास होऊ लागल्याचे पाहून त्याच्या भक्तमडळीनी त्याच्यासाठी बर्फाची व्यवस्था केली आणि तेहि दररोज बर्फ घातलेले थडगार पाणी पिऊन, एखाद्या लहान मुला-प्रमाणे आनंद प्रदर्शित करू लागले ! परतु एकदोन महिने लोटल्यावर त्याच्या गळ्यामध्ये वेदना होऊ लागल्या व हळूहळू त्या अधिकाधिक वाढू लागल्या

सुमारे एक महिना लोटला तरी वेदना कमी होण्याचे काहीच चिन्ह दिसेना उलट एक नवीनच प्रकार उपस्थित झाला बराच वेळ बोलत राहिल्यास आणि समाधीनंतर, वेदना अतिशय वाढू लागत्या काही दिवसानी गळ्यावर थोडी सूज आली, म्हणून मंडळीनी त्यावर लेप वगैरे लावले, काही दिवस लेप लावूनहि सूज उतरेना, तेव्हा भक्तमडळीनी बहुबाजारातील डॉक्टर राखालचद्र याना बोलावून आणले त्यानी गळ्याला आतून लावण्यास औषध दिले व बाहेरच्या बाजूस चोळण्यासहि काही औषध देऊन, फार बोलत न जाण्यास व वरचेवर समाधिमग्न न होण्यास सागितले

हळूहळू ज्येष्ठ महिना आला कलकत्त्याच्या उत्तरेस तेरा-चवदा मैलावर पानिहाटी या नावाचे ठिकाण आहे, तेथे दरवर्षी त्या महिन्यात रघुनाथ-दास गोस्वामी याच्या स्मरणार्थ वैष्णव सप्रदायाचा जगी उत्सव होत असतो श्रीकृष्णचैतन्य ऊर्फ श्रीगौराग महाप्रभूंच्या शिष्यमडळीपैकी श्रीरघुनाथदास हे एक होते व ईश्वरलाभासाठी त्यानी या महिन्याच्या शुक्ल त्रयोदशीस ससाराचा त्याग करून सन्यास घेतला होता या गोष्टीच्या स्मरणार्थ हा उत्सव तेथे होत असे अनेक ठिकाणचे वैष्णव भक्त त्या दिवशी तेथे जमतात व

सर्व दिवस कीर्तन, भजन, नामस्मरण याची एकच गर्दी तेथे होत असते मागे मागे श्रीरामकृष्ण या उत्सवास दरवर्षी जात, परंतु सन १८८० सालापासून, काही ना काही कारणाने ते तेथे जाऊ शकले नाहीत या वर्षी तेथे जाण्याचे मनात आणून ते आपल्या भक्तमंडळीस म्हणाले, " या उत्सवात तेथे आनंदाचा बाजार भरतो, ईश्वराच्या नामघोषाने दाही दिशा गर्जून जातात तुम्ही ' यग बंगाल ' मडळींनी कधी अशा प्रकारची मजा पाहिली नसेल येत असाल तर जाऊन येऊ म्हणतो " हे ऐकून रामचंद्र दत्त वगैरे मंडळीना फार आनंद झाला, परतु काही काही मडळी त्याचे दुखणे पाहून होकार देण्यास काकू करू लागली त्याच्या समाधानासाठी ते म्हणाले, " असे करूं, इथून अगदी सकाळी थोडा फराळ करून निघू आणि तिथे जाऊन एक-दोन तास थावून परत फिरू, म्हणजे झाले ! आणि दुखण्याबद्दल, थोडे सावध राहून, कुणाशी फारसे बोललें नाही म्हणजे झाले ! " या त्याच्या उत्तराने सर्वांचे समाधान झाले आणि मंडळी तेथे जाण्याची सर्व व्यवस्था करण्यास लागली

ज्येष्ठ शुक्ल त्रयोदशीचा दिवस उजाडला आज पानिहाटीचा उत्सव अगदी सकाळी सुमारे पचवीस जण भक्त भाडयाच्या दोन नौका करून दक्षिणेश्वरी येऊन पोहोचले कोणी कोणी कलकत्त्याहून पायीच आले श्रीरामकृष्णाच्यासाठी एक स्वतंत्र नौका घाटावर तयार होती पहाटेच काही स्त्रीभक्तमडळी आली होती त्यानी व माताजींनी स्वयंपाक करून सर्वांना जेवू घातले व सुमारे दहा वाजता मंडळी निघण्याची तयारी झाली श्रीरामकृष्णाचा फराळ झाल्यावर माताजींनी " मी बरोबर येऊ काय ? " असे विचारण्यास त्याच्याकडे एका स्त्रीला पाठविले, श्रीराम-कृष्ण म्हणाले-" तुम्ही तर येतच आहा, तिचीहि यायची इच्छा असेल तर येऊं द्या तिला " श्रीरामकृष्णाचा निरोप ऐकून माताजी म्हणाल्या, " तिथे खूप गर्दी होईल, नौकेंतून उतरून अशा गर्दीतून देवदर्शन घेणे मला शक्य होणार

नाही, म्हणून मी येत नाही तुम्ही दोघी चौघीजणी त्याच्या नावेतच बसून जा म्हणजे झाले "

दोनप्रहरच्या सुमारास नौका पानिहाटीच्या घाटास लागल्या त्या दिवशीं थोडी थोडी झिमझिम् वृष्टि होत होती मडळी उतरली व पाहातात तों उत्सव-स्थान माणसानी जसे फुलून गेलें आहे ! जिकडे तिकडे हरिनामाचा गजर चालला होता नौकेंत बसताना नरेंद्र, बलराम, गिरीश, रामचद्र, महेद्रनाथ वगैरे मंडळीनी श्रीरामकृष्णाना विनंति करून सागितले होते की, "आज आपण कोणत्याहि भजनी-मंडळींत मिसळूं नये आज भजन करू लागला म्हणजे आपण देहभान विसराल व समाधिमग्न व्हाल आणि अशाने आपले दुखणें मात्र विनाकारण वाढेल " नौकेतून उतरताच श्रीरामकृष्ण भक्तमडळीबरोबर थेट श्रीयुत मणि सेन याच्या घरी गेले श्रीरामकृष्ण येताच सर्वानी उठून त्याचे स्वागत केलें व त्याना नेऊन दिवाणखान्यात बसविले दहा-पंधरा मिनिटें तेथे थाबून श्रीरामकृष्ण देवदर्शनास निघाले

देवळात जाताच त्याना भावावेश झाला ते देवाचे दर्शन घेत असताच, तेथे एक भजनी दिंडी आली तेथील प्रघात असा होता की, प्रत्येक दिंडीने प्रथम देवासमोर काही वेळ भजन करावे व मग तेथून जाऊन गगातीरावर वाळवटात भजन करीत बसावे ती दिंडी तेथे असताच एक भले धष्टपुष्ट, जटाधारी, मुद्रा लावलेले, गौरवर्ण बोवाजीहि झुलत झुलत, माळा जपत तेथे आले भजनी मडळीला उत्तेजन देण्यासाठीच की काय, ते एकदम दिंडींत मिसळले आणि भावाविष्ट झाल्यासारखे, हातवारे करीत हुंकार देत नाचूं लागले !

देवाचे दर्शन घेऊन सभामडपात एका बाजूला उभे राहून श्रीरामकृष्ण भजन ऐकत होते बोवाजीचा तो वेश आणि थाट-माट पाहून, थोडे स्मित करून, ते जवळ असलेल्या नरेंद्र वगैरेकडे वळून म्हणाले, "पाहा, ढंग तर

# २१. श्रीरामकृष्णांचें कलकत्त्यास आगमन

## ( सप्टेंबर १८८५ )

“ आईनेच 'समजावून दिले की—' हे इतके लोक वाटेल तसलीं कामे करून येतात आणि तुला शिवतात, त्याची दुर्दशा पाहून तुझ्या मनात दया उत्पन्न होते—व त्याच्या कर्मांचीं फळे तुला भोगावी लागतात, म्हणून हे असें झालें आहे ! ' ( गळ्याकडे बोट करून ) म्हणून तर इथे रोग उत्पन्न झाला आहे ! ! नाही तर या शरीराकडून कधी कुणाला त्रास झाला नाही, की कधी कुणाचे वाईट झालें नाही,—मग याच्यामागे रोगबीग का लागावे ? ”

—श्रीरामकृष्ण

---

पानिहाटीचा उत्सव व स्नानयात्रापर्व या दोन्ही दिवशीं श्रीरामकृष्णाना फार त्रास झाला अगोदरच त्याची प्रकृति ठीक नव्हती, त्यात उत्सवाच्या दिवशी तीन चार तास पावसात काढावे लागल्यामुळे आणि बराच वेळ भावसमाधिमग्न झाल्यामुळे, त्याना फार श्रम झाले. मंडळींनी पुन्हा डॉ. राखालचंद्र याना बोलावून आणले व त्यानी सांगितले की “ हा सारा पावसांत भिजल्याचा व वरचेवर भावसमाधिमग्न झाल्याचा परिणाम आहे असें पुन्हा न होऊ देण्याविषयी तुम्हीं फार काळजी घेतली पाहिजे, नाहीतर याचा परिणाम चागला होणार नाही ” डॉक्टर निघून गेल्यावर, मंडळींनी, यापुढे असें होऊ न देण्याची शक्य तेवढी काळजी घेण्याचें आपापसात ठरविलें व श्रीरामकृष्णानाहि वरचेवर भावसमाधिमग्न न होण्याची खबरदारी घेण्याची

विनंती केली. बालकस्वभाव श्रीरामकृष्णानी त्या दिवशीं घडलेल्या प्रकाराचा सारा दोष रामचंद्र दत्तप्रमुख मंडळीच्या माथी मारला ते म्हणाले, “ या सर्वांनी जर थोडा जोर करून सागितले असते, तर मी पानिहाटीला कसा गलो असतों ? ’ याच सुमारास एक दिवस श्रीरामकृष्णाचे एक भक्त श्रीराम-कृष्णाच्या दर्शनास दक्षिणेश्वरी गेले होते ते गेले तेव्हा गळयाला लेप लावून श्रीरामकृष्ण आपल्या खोलीत छोटया पलगावर, गुपचुप बसले होते. एखाद्या लहान मुलाला एका ठिकाणी बसवून, तेथून न हालण्याची शिक्षा दिली असता, तें बिचारें जसें खिन्न आणि हिरमुसलें दिसतें—तशीच त्यावेळी श्रीरामकृष्णाची मुद्रा दिसत होती श्रीरामकृष्णाना नमस्कार करून त्यानी विचारले, “ का, आपण आज असे कां दिसता ? ” यावर, आपल्या गळयाला लावलेल्या लेपाकडे बोट करून, अत्यत हळू स्वरात ते म्हणाले, “ हे बघ ना, दुखणें वाढलें आहे, डाक्टरानी ‘ फार बोलूं नका, ’ असे सागितलें आहे ” ते म्हणाले—“ हं, मी ऐकलें आहे खरेंच, की ज्या दिवशी आपण पानिहाटीला गेला होता त्या दिवसापासूनच दुखणें वाढले ” हे ऐकून दुसऱ्याच्या अपराधाबद्दल स्वत ला विनाकारण शिक्षा झाल्यास, मुलाला जसा राग येतो, तशा रागाने आणि अभि-मानाने श्रीरामकृष्ण म्हणाले, “ हं हं, पाहा ना बरे, वरून पाऊस, खाली चिखल, वारा चाललेला—आणि असल्या हवेत तिथे नेऊन, रामने मला सारा दिवस नाचायला लावायचें काय ? तो चागला परीक्षा दिलेला डॉक्टर,—जर थोडा जोर करून ‘ जायचें नाही, ’ म्हणून सागता, तर काय मी तिथे जात होतो ? ” ते म्हणाले, “ खरेंच महाराज, रामने मोठी घोडचूक केली पण आता काय त्याचें ? व्हायचे तें होऊन गेलें, आता यापुढे काही दिवस नीट काळजी घ्यावी म्हणजे लवकरच दुखणें बरे होऊन जाईल ” हें ऐकून त्याना आनंद झाला व ते म्हणाले, “ तें खरें रे, पण तसें असलें म्हणून बोलणें अजीबातच बंद करून कसें चालेल ? आता हेंच पाहा ना—तूं इथे किती लांबून आलास बरे ? आणि तुझ्याबरोबर मुळीच न बोलता, मी तुला असेच परत पाठवायचें ? हें कसे व्हावे ? ” हें ऐकून त्यांना गहिवर आला व ते म्हणाले, “ पण

श्री मणि सेन यांच्या घरून निघून काही वाट चालून गेल्यावर, त्यांचा तो भावावेश, त्यांची दिव्य अंगकांति आणि त्यांचे तें मधुर नृत्य पाहून, नवीन उत्साहाने भजनी मंडळी गाऊं लागली —

सुरधुनिर तीरे हरि बले के रे,
बुझि[1] प्रेमदाता निताई एसेछे,
ओरे हरि बले के रे, जय राधे बले के रे।
बुझि प्रेमदाता निताई एसेछे!
( आमादेर[2] ) प्रेमदाता निताई एसेछे!
निताई नइले[3] प्राण जुडावे किसे ?—
( एइ आमादेर ) प्रेमदाता निताई एसेछे! ॥—

ध्रुपद म्हणताना, मंडळी, श्रीरामकृष्णांकडे बोट दाखवून, एकसारखे " एई आमादेर प्रेमदाता! " असें म्हणून आनंदातिशयाने उद्दाम नृत्य करूं लागली! उत्सवाला आलेल्या मंडळींपैकी कोणी कोणी या दिंडीजवळ येऊन हा काय प्रकार चालला आहे हें पाहून व श्रीरामकृष्णांचे ते दिव्य रूप आणि मनोहर नृत्य आणि मंडळीच्या त्या आनंदाच्या गर्जना ऐकून तेहि या घोळक्यात मिसळले! एक आला, दोन आले, चार आले आणि अशा रीतीने, उत्सवाला आलेल्या मंडळींपैकी बहुतेक मंडळी श्रीरामकृष्णांच्या भोंवती जमून, हा सारा प्रचंड समुदाय, सावकाश सावकाश राघवपंडिताच्या घराकडे सरकूं लागला!

काही स्त्रीभक्तांनी श्रीचैतन्य देव व श्रीनित्यानंद यांचा थोडासा प्रसाद श्रीरामकृष्णांसाठी आणला होता व तो त्यांना देण्याची त्या संधि पाहात होत्या. एका मुद्रा लावलेल्या जटाधारी बुवाजींनी हे पाहिले व त्यांच्या हातातील थोडासा प्रसाद घेऊन गर्दीतून वाट काढून, जणु भावाने व प्रेमाने गद्गद होऊन

१ कदाचित् २ आमचा ३ आला नाही तर

तो आपल्या हाताने श्रीरामकृष्णाच्या मुखात घातला! त्यावेळीं श्रीरामकृष्ण पूर्ण भावावस्थेत होते बाबाजीचा स्पर्श होताच त्याचे सर्वांग थरारले, त्याचा भाव भंगला व "थू थू" करून त्यानी तो प्रसाद थुकून टाकून तोंड पुसलें! हा प्रकार पाहून, हा बुवाजी कोणी तरी ढोंगी आणि लुच्चा असला पाहिजे, असे तेव्हाच ताडून मंडळी त्याच्याकडे रागारागाने पाहूं लागली! आता आपली धडगत नाही असे पाहून बुवाजी शहाणपणाने तेथून निसटून अंतर्धान पावले!

हा एक मेळाचा मार्ग आक्रमण्यास त्या प्रचंड जनसमुदायास जवळ जवळ तीन तास लागले! श्रीरामकृष्णानी मंदिरात जाऊन देवाचे दर्शन घेतले व अखेरीस विश्रांति घेतली श्रीरामकृष्णाना येथे सोडून काही वेळाने, मंडळी परतली गर्दी कमी झालीशी पाहून भक्तमंडळीनी श्रीरामकृष्णाना नौकेकडे नेले, परंतु तेथेहि एक अद्भुत गोष्ट घडून आली कोन्नगरचे नवचैतन्य मिश्र याना पानिहाटीला श्रीरामकृष्ण आल्याची बातमी समजून, ते त्याचे दर्शन घेण्यासाठी अत्यंत आतुरतेने त्यांना इकडे तिकडे शोधीत होते इतक्यात श्रीरामकृष्णाना नौकेत चढलेले त्यानी पाहिले आणि एकदम तीरासारखे धावत येऊन त्यानी नौकेत उडी घेतली आणि त्याच्या पायावर आपला देह टाकून "प्रभो, कृपा करा!" असें म्हणत अत्यंत व्याकुळतेने क्रंदन करूं लागले! त्याची भक्ति आणि व्याकुळता पाहून श्रीरामकृष्णाचे हृदय उचंबळून आलें आणि त्यानी भावावेशात त्याच्या हृदयाला स्पर्श केला त्या अद्भुत स्पर्शाच्या योगाने त्याना कमले दर्शन प्राप्त झालें हे सांगवत नाही परंतु क्षणार्धांत त्याचे रडणे वगैरे नाहीसे झाले व त्याची मुद्रा आनंदित दिसूं लागली, आणि एखाद्या उन्मत्तासारखे ते श्रीरामकृष्णाच्या समोर नृत्य करू लागून, त्याची नाना-प्रकाराने स्तुति करीत त्याना वारंवार साष्टांग नमस्कार घालू लागले! काही वेळाने श्रीरामकृष्णानी त्याना जवळ घेऊन, त्याच्या पाठीवरून हात फिरविला व अनेक प्रकारानी उपदेश करून त्याना शांत केले श्रीरामकृष्णानी आपल्यावर कृपा करावी म्हणून नवचैतन्यानी आज किती दिवस तरी वाट पाहिली होती;

ती इच्छा आज सफल होऊन त्याच्या आनंदास पारावार उरला नाही दोन-चार दिवसातच, त्यानी आपल्या संसाराचा भार आपल्या पुत्रावर घालून संसाराचा त्याग केला तेव्हापासून, गगातीरावर एका पर्णकुटीत राहून, साधन-भजन, जप वगैरे करण्यात त्यानी आपले आयुष्य घालविले त्याचा ईश्वरानुराग आणि प्रेम पाहून अनेक माणसे सन्मार्गाला लागली असो

नवचैतन्य निघून गेल्यावर श्रीरामकृष्णानी नौका सोडण्यास सागितले थोडयाच वेळात सन्ध्याकाळ झाली आणि साडेआठच्या सुमारास सर्वजण दक्षिणेश्वरी पोहोचले श्रीजगदंबेचे दर्शन घेऊन श्रीरामकृष्ण आपल्या खोलीत येताच, त्याना प्रणाम करून मडळीनी त्याचा निरोप घेतला सर्वजण नौकेंत बसले, इतक्यात एकजणाला आपला जोडा श्रीरामकृष्णाच्या खोलीबाहेर राहिल्याची आठवण होऊन, तो आणण्यासाठी त्याने तिकडे धूम ठोकली. श्रीरामकृष्णानी त्याला परत येण्याचे कारण विचारले व त्याचें उत्तर ऐकून ते हासत हासत म्हणाले, " बरे झाले, नौका सुटण्याच्या पूर्वी ही गोष्ट तुझ्या लक्षात आली म्हणून, नाहीतर आजच्या साऱ्या आनंदावर विरजण पडले असतें, नाही ?" हे ऐकून तो लाजला व त्याना नमस्कार करून परत फिरणार तोच श्रीरामकृष्ण म्हणाले, " कायरे ? आज कशी मजा झाली ? हरिनामाचा जसा काय बाजार बसला होता, नाही ? " तो ' हो ' म्हणाल्यावर आज कोणाकोणाला भावावेश झाला त्याची नावे घेत घेत छोट्या नरेंद्राची गोष्ट काढून त्याची प्रशसा करीत ते म्हणाले, " तो कुठे नुकता इथे येऊं लागला, पण त्याला इतक्यातच भावावेश होऊ लागला हे आश्चर्य नव्हे का ? त्या दिवशी त्याला भावावेश झाला, तर एक तास त्याला देहभान नव्हते ! तो म्हणतो ' आजकाल माझे मन निराकारात लीन होत असते ! ' छोकरा मोठा चागला आहे, नाही ? तू एक दिवस त्याच्या घरीं जाऊन त्याच्याशी काही गप्पा मारून येशील ? " तो म्हणाला, " पण महाराज, मोठा नरेंद्र मला जसा आवडतो तसा दुसरा कोणीच आवडत नाही म्हणून छोट्या नरेंद्राच्या घरी जाण्याची इच्छाच होत नाही. "

यावर त्याचा किंचित् तिरस्कार करून श्रीरामकृष्ण म्हणाले, " तूं लेका भारीच एकागी माणूस ! एकागी असणे ही मोठया हीनबुद्धीची गोष्ट आहे. माणसाने कधी एकागी असू नये. अरे, भगवानाचे नाना प्रकारचे भक्त असतात, त्या सगळ्याशी मिळून मिसळून आनंद करता येऊं नये, ही तुझी हीनबुद्धिच नव्हे का ? मग काय ? त्याच्या घरी जाशीलना एक दिवस ? " यावर तो बिचारा काय करतो ? ' होय ' असे म्हणून त्याने श्रीरामकृष्णाचा निरोप घेतला.

स्त्रीभक्तमंडळी त्या दिवशी नौबतखान्यात माताजीच्या जवळच राहिली रात्री फराळ करीत असता श्रीरामकृष्ण त्याच्यापैकी एकजणीजवळ म्हणाले, " आज तिथे इतकी गर्दी, ज्याची त्याची दृष्टि माझ्याकडे लागलेली, बरे झाले, ही बरोबर आली नाही म्हणून ! ती असती, तर लोक म्हणाले असते ' वा ! हंस आणि हंसी ! छान आहे बुवा !! ' ती आली नाही हें तिने मोठे छान केले ! "

श्रीरामकृष्णाचा फराळ झाल्यावर त्या स्त्रीकडून श्रीरामकृष्णाच्या तोडचे उद्गार ऐकून माताजी म्हणाल्या, " आज सकाळी ' मी येऊ का ' असे विचारून पाठविल्यावर त्यानी दिलेल्या उत्तरावरूनच मी समजलें की, मी बरोबर यावे असें काही त्याच्या मनात नाही त्याच्या मनात असते तर ते म्हणते की ' हं, ये म्हणावे, ' पण तसे न करता ' तिची यायची इच्छा असेल तर येऊ द्या ' असें उत्तर देऊन ही गोष्ट माझ्याच इच्छेवर त्यानी टाकली, तेव्हा मी समजले की मी यावें अशी त्याची इच्छा नाही ! " असो

त्या साऱ्या दिवसभर अतिशय श्रम झाल्यामुळे सारी रात्र श्रीरामकृष्णाच्या अंगाचा एकसारखा दाह होत होता व अंग ठणकत होते अर्थातच त्याना त्या रात्री मुळीच झोप लागली नाही कदाचित् नानाप्रकारच्या लोकाचा त्याच्या शरीराला स्पर्श झाल्यामुळेहि असे झाले असेल, कारण कित्येकदा अपवित्र लोकाच्या स्पर्शाने त्याचा गात्रदाह झालेला आम्हाला ठाऊक होता. दुसऱ्या

दिवशीच स्नानयात्रापर्व होतें, म्हणून त्या दिवशी गंगास्नानास आणि श्रीराम-कृष्णाच्या दर्शनास कलकत्त्याहून खूप लोक आले होते त्यात एक स्त्री, आपल्या इस्टेटीचा बंदोबस्त करून ठेवण्यात श्रीरामकृष्णाचा आशीर्वाद घेण्याच्या उद्देशाने आली होती ! ती सारा दिवस त्याच्या मागे मागे करून त्याना उगीच त्रास देत होती दुपारी जेवणाचे वेळीहि ती त्याच्याजवळून हालली नाही, यामुळे श्रीरामकृष्ण फार त्रासून गेले व त्या दिवशी रोजच्यासारखे जेवलेहि नाहीत जेवणानंतर ती जरा बाजूला गेली असे पाहून दुसऱ्या एका स्त्रीभक्ताजवळ ते म्हणाले, " इथे सगळे लोक येतात,—भक्तिप्रेम वगैरे प्राप्त व्हावे म्हणून इथे आल्याने तिच्या इस्टेटीचा बदोबस्त होईल होय ? त्या बाईने अनेक मनात कामना धरून, सदेश वगैरे खायचे जिन्नस आणले होते, त्यातला एक सुद्धा माझ्याच्याने तोंडात घालवला नाही आज स्नानयात्रा, दर वर्षी या दिवशी किती भाव-समाधि आणि किती आनद होत असतो, तीन-तीन, चार-चार दिवस तो भाव कमी होत नाही ! आणि आज पाहा ना ? काही सुद्धा झाले नाही ! " ती त्या रात्री सुद्धा दक्षिणेश्वरीच राहिली आणि त्यामुळे तर श्रीरामकृष्ण फारच त्रासले रात्री फराळाच्या वेळी ते एका स्त्रीभक्ताजवळ म्हणाले, " इथे बायकानी इतकी गर्दी करणें चागले नाही मथुरबाबूचा मुलगा त्रैलोक्यबाबू आजकाल इथेच राहात आहे, तो मनात काय म्हणत असेल बरे ? दोनचार बायका मिळून आल्या, एखादा दुसरा दिवस राहिल्या, परत निघून गेल्या,—तें नाही, जशी एक सारखी गर्दी करून सोडली आहे ! बायकाची इतकी हवा माझ्याने सहन नाही होत ! " श्रीरामकृष्णाना आपल्यापासून त्रास होत असल्याचे पाहून सर्वच बायकाना फार वाईट वाटलें व बिचाऱ्या हिरमुसलें तोंड करून पहाटे आपआपल्या घरी निघून गेल्या निरंतर उच्चभावभूमीवर मन असून सुद्धा दैनं-दिन गोष्टीकडे श्रीरामकृष्णाचे किती बारकाईने लक्ष असे व आपल्या भक्त-मडळीच्या कल्याणाची सदैव चिंता करून, त्याना ते कसे शिक्षण देत याची थोडीफार कल्पना वरील हकीगतीवरून होईल

---

# २१. श्रीरामकृष्णांचें कलकत्त्यास आगमन

## ( सप्टेंबर १८८५ )

" आईनेच समजावून दिले की—' हे इतके लोक वाटेल तसली कामे करून येतात आणि तुला शिवतात, त्यांची दुर्दशा पाहून तुझ्या मनात दया उत्पन्न होते—व त्यांच्या कर्मांची फळे तुला भोगावी लागतात, म्हणून हे असे झाले आहे! ' ( गळ्याकडे बोट करून ) म्हणून तर इथे रोग उत्पन्न झाला आहे!! नाही तर या शरीराकडून कधी कुणाला त्रास झाला नाही, की कधी कुणाचे वाईट झाले नाही,—मग याच्यामागे रोगबीग का लागावे ? "

—श्रीरामकृष्ण

---

पानिहाटीचा उत्सव व स्नानयात्रापर्व या दोन्ही दिवशी श्रीरामकृष्णाना फार त्रास झाला. अगोदरच त्यांची प्रकृति ठीक नव्हती, त्यात उत्सवाच्या दिवशी तीन चार तास पावसात काढावे लागल्यामुळे आणि बराच वेळ भावसमाधिमग्न झाल्यामुळे, त्याना फार श्रम झाले. मंडळींनी पुन्हा डॉ. राखालचंद्र याना बोलावून आणले व त्यांनी सांगितले की " हा सारा पावसात भिजल्याचा व वरचेवर भावसमाधिमग्न झाल्याचा परिणाम आहे. असें पुन्हा न होऊ देण्याविषयी तुम्ही फार काळजी घेतली पाहिजे, नाहीतर याचा परिणाम चांगला होणार नाही." डॉक्टर निघून गेल्यावर, मंडळींनी, यापुढे असे होऊ न देण्याची शक्य तेवढी काळजी घेण्याचें आपापसात ठरविले व श्रीरामकृष्णानाहि वरचेवर भावसमाधिमग्न न होण्याची खबरदारी घेण्याची

विनंती केली बालकस्वभाव श्रीरामकृष्णानी त्या दिवशी घडलेल्या प्रकाराचा सारा दोष रामचद्र दत्तप्रमुख मंडळीच्या माथी मारला ते म्हणाले, “ या सर्वांनी जर थोडा जोर करून सागितले असते, तर मी पानिहाटीला कसा गलो असतो ? ” याच सुमारास एक दिवस श्रीरामकृष्णाचे एक भक्त श्रीराम-कृष्णाच्या दर्शनास दक्षिणेश्वरी गेले होते ते गेले तेव्हा गळ्याला लेप लावून श्रीरामकृष्ण आपल्या खोलीत छोट्या पलगावर, गुपचुप बसले होते एखाद्या लहान मुलाला एका ठिकाणी बसवून, तेथून न हालण्याची शिक्षा दिली असता, ते बिचारे जसे खिन्न आणि हिरमुसले दिसतें—तशीच त्यावेळी श्रीरामकृष्णाची मुद्रा दिसत होती श्रीरामकृष्णाना नमस्कार करून त्यानी विचारले, “ का, आपण आज असे का दिसता ? ” यावर, आपल्या गळ्याला लावलेल्या लेपाकडे बोट करून, अत्यत हळू स्वरात ते म्हणाले, “ हे बघ ना, दुखणें वाढले आहे, डॉक्टरानी ‘ फार बोलू नका, ’ असे सागितले आहे ” ते म्हणाले—“ हं, मी ऐकले आहे खरेंच, की ज्या दिवशी आपण पानिहाटीला गेला होता त्या दिवसापासूनच दुखणे वाढले ” हे ऐकून दुसऱ्याच्या अपराधाबद्दल स्वत ला विनाकारण शिक्षा झाल्यास, मुलाला जसा राग येतो, तशा रागाने आणि अभि-मानाने श्रीरामकृष्ण म्हणाले, “ ह हं, पाहा ना बरे, वरून पाऊस, खाली चिखल, वारा चाललेला—आणि असल्या हवेत तिथे नेऊन, रामने मला सारा दिवस नाचायला लावायचे काय ? तो चागला परीक्षा दिलेला डॉक्टर,—जर थोडा जोर करून ‘जायचे नाही,’ म्हणून सागता, तर काय मी तिथे जात होतो ? ” ते म्हणाले, “ खरेंच महाराज, रामने मोठी घोडचूक केली पण आता काय त्याचे ? व्हायचे ते होऊन गेले, आता यापुढे काही दिवस नीट काळजी घ्यावी म्हणजे लवकरच दुखणें बरे होऊन जाईल ” हे ऐकून त्याना आनद झाला व ते म्हणाले, “ ते खरे रे, पण तसे असले म्हणून बोलणे अजीबातच बंद करून कसे चालेल ? आता हेंच पाहा ना—तूं इथे किती लाबून आलास बरे ? आणि तुझ्याबरोबर मुळीच न बोलता, मी तुला असेच परत पाठवायचे ? हे कसे व्हावे ? ” हें ऐकून त्याना गहिवर आला व ते म्हणाले, “ पण

महाराज, डाक्टरानी सांगितले आहे ना ? केलें चार दिवस बोलणे बंद, त्यात काय हरकत आहे ? आपल्याला पाहूनच आम्हाला आनंद होतो, आपण काही एक बोलला नाही, तरी आम्हाला काही वाईट वाटावयाचे नाही आपण बरे झालात म्हणजे मग खुशाल बोलत बसू " पण हे ऐकतो कोण ? डॉक्टराचे सांगणे, स्वतःला होत असलेले कष्ट,—हे सर्व पार विसरून जाऊन, ते नानाप्रकारच्या विषयावर पहिल्यासारखेच बोलूं लागले !

हळूहळू आषाढ महिना आला एक महिनाभर लेप, औषधे वगैरे लावूनहि दुखणें कमी होण्याचे मुळीच चिन्ह दिसेना इतर दिवशी दुखणें पुष्कळ कमी असे, तरी एकादशी, पौर्णिमा, अमावस्या वगैरे तिथीच्या दिवशीं तें फारच वाढावें आणि कोणत्याहि प्रकारचे अन्न त्याच्या घशाखाली उतरणे अशक्य होऊन जावे ! म्हणून ते आता दूध, लापशी, साबूदाणा वगैरे पातळ पदार्थावरच राहू लागले डॉक्टर लोकानी परीक्षा करून त्याचा रोग Clergyman's sore throat ( रात्रदिवस लोकाशीं बोलत राहिल्याने धर्म-प्रचारकाच्या गळ्याला रोग होऊन क्षत होऊं लागते, तो ) आहे असे ठरविलें व त्याप्रमाणे औषधाची व पथ्याचीहि व्यवस्था करून त्यानी स्पष्ट सांगितले की, " वरचेवर समाधिमग्न झाल्यास आणि बोलणें बंद न केल्यास रोग बरा होणे शक्य नाही " डॉक्टराच्या सांगण्याप्रमाणे औषध व पथ्य तर नीट सुरू झाले, पण त्यानी सांगितलेल्या दोन्ही गोष्टी श्रीरामकृष्णाच्याकडून होईनात ! यत्किंचित् उद्दीपन होताच त्यांनी साऱ्या गोष्टी विसरून एकदम समाधिमग्न व्हावे आणि संसाराच्या तापाने तापलेला कोणीहि मनुष्य शांतिलाभासाठी त्याच्याकडे येताच, त्यानी दयार्द्र होऊन त्याला उपदेश करीत आणि धीर देत, त्याच्याशी तास तास बोलत राहावे !

या सुमारास श्रीरामकृष्णाकडे धर्मपिपासु मंडळीची एकसारखी गर्दी होऊ लागली होती जुन्या भक्तमंडळीखेरीज दररोज निदान पाच-सात तरी नवे लोक त्याच्याकडे येत सन १८७५ साली केशवचंद्र सेन याच्या प्रथम भेटी-

पासून दररोज नवे नवे लोक येऊ लागले अर्थातच या सर्वांशी बोलण्यात, गेली दहा वर्षे श्रीरामकृष्णाना कित्येक वेळी खरोखरच जेवणाखाण्याला अथवा विश्रांति घेण्यालाहि फुरसत सापडत नसे शिवाय महाभावाच्या प्रेरणेमुळे त्याना झोपहि फार थोडी मिळे नेहमी असे दिसून येई की, रात्री अकरा वाजता निजून थोडासा वेळ झाला नसेल तोच ते उठून भावावेशात खोलीत अगर व्हराडयात फिरत आहेत, हे दार उघड, ते दार उघड असे करून बाहेर पाहात आहेत अथवा कधी कधी बिछान्यावरच शात पडून असले तरी जागेच आहेत ! असा प्रकार सुमारे चार वाजेपर्यंत चाले चार वाजले की नित्य त्यानी उठून श्रीभगवानाचे नामस्मरण, मनन अथवा स्तुति करीत बसावे व अरुणोदय होताच रात्रीं तेथेच निजलेल्या मंडळीस जागे करावे ! दिवसा जिवापलीकडे श्रम आणि रात्री अनिद्रा असा प्रकार आज कित्येक वर्षे चालल्यामुळे आता त्याची प्रकृति कायमची ढासळावी यात आश्चर्य कोणते ? आपल्याला फार श्रम पडतात असे जरी त्यानी कोणाला कधी बोलून दाखविले नाही, तरी भावावस्थेत त्याचा आपल्या आईशी जो प्रेमकलह चाले ( मागे पान १४३-४५ पाहा), ह्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते

त्यानी स्वत च्या अंतकालासबधाने ज्या गोष्टी सागितल्या होत्या, त्या अलीकडे एकेक घडून येत होत्या, तरी भक्तिप्रेमाने अध झालेल्या त्याच्या भक्तमडळीच्या लक्षात त्या गोष्टी आल्या नाहीत त्यानी मागेच सागून ठेवले होते की "जेव्हा वाटेल त्याच्या हातचे खाऊ लागेन, खाद्याचा अग्रभाग दुसऱ्याला देऊन स्वत अवशिष्टाश ग्रहण करीन, रात्रीची कलकत्त्यात वस्ती करू लागेन, तेव्हा समजा की देह ठेवण्याचे दिवस जवळ आले ! " यातील बहुतेक गोष्टी अलीकडे घडून आल्या होत्या,—नरेंद्राच्या अन्नाचा अवशेष त्यानी ग्रहण केला होता, मधून मधून उशीर झाल्यास बलराम बसूच्या घरी ते रात्रीचे राहू लागले होते. माताजी म्हणत, "नरेंद्राच्या अन्नाचा अवशेष ग्रहण करू नये, असे मी सागताच ते म्हणाले, 'नरेंद्र शुद्धसत्त्वगुणी त्याच्या अन्नाचा अवशेष ग्रहण करण्यास हरकत नाही ' त्यानी अशा रीतीने माझे कसेबसे समाधान केले तरी त्याचे

बोलणे आठवून मनाला फार चुटपुट लागली. " तसेंच श्रीरामकृष्ण अनेकदा म्हणाले होते की, "पुष्कळ लोक मला देवासारखा मान देऊं लागले, की लवकरच हें शरीर अंतर्धान पावेल!" असे होते तरी, श्रीरामकृष्णाचे एकूण एक भक्त, एकाच वेळी एकाच ठिकाणी, जमण्याचा सुयोग आजपर्यंत कधीच आला नसल्यामुळे "इतके लोक त्याना देवासारखा मान देतात," ही गोष्ट स्पष्टपणे नजरेस आली नव्हती, आणि म्हणून श्रीरामकृष्णाचें दुखणे लौकरच बरें होईल असेंच बहुतेकाना वाटत असे, असो

याच सुमारास एक दिवस एक स्त्री दक्षिणेश्वरी त्याच्या दर्शनास आली होती दुपारी जेवण झाल्यावर ती श्रीरामकृष्णाच्या हातावर पाणी घालीत असता ते एकदम तिला म्हणाले, ' का ग ? आज माझा गळा फारच दुखत आहे, तुला तो रोग बरा करण्याचा मत्र येत आहेना ? तो म्हणून तू माझ्या गळयावरून हात फिरव बघू ?" हे ऐकून ती बाई काही वेळ तटस्थ उभी राहिली व थोडया वेळाने तिने श्रीरामकृष्णाच्या म्हणण्याप्रमाणे मत्र म्हणत त्याच्या गळयावरून हात फिरवला मग माताजीकडे जाऊन, घडलेली हकीकत सागून ती म्हणाली, " मला हा मत्र येतो हें त्याना कसे समजले बाई ? मागे एका बाईजवळून, हा मत्र चागला उपयोगी आहे असे पाहून मी घेतला होता परतु ईश्वराची निष्कामभावाने भक्ति करणे हेच जन्माचे ध्येय असल्याचे समजल्यापासून मी तो मत्र मागेच टाकून दिला आणि मी असा मत्र घेतला होता हे कळल्यास, ते माझा तिरस्कार करतील या भीतीने ही गोष्ट मीं त्यांना कधी सागितलीहि नव्हती!" हें ऐकून माताजी हासत हासत म्हणाल्या, " अग, त्यांना सर्व गोष्टी समजतात, आणि कोणीहि मनुष्य चागल्या हेतूने एखादी गोष्ट करीत असल्यास, ते त्याचा कधीहि तिरस्कार करीत नाहीत तुला भ्यायचे मुळीच कारण नाही, मी सुद्धा इथे येण्यापूर्वी तो मत्र घेतला होता आणि इथे आल्यावर ही गोष्ट त्याच्या कानी घालताच ते म्हणाले, " तूं मंत्र घेतला होतास, काही हरकत नाही आता मात्र तो आपल्या इष्ट देवतेच्या पायावर वाहून टाक म्हणजे झालें!" असो.

श्रावण संपला, भाद्रपदहि निम्माशिम्मा निघून गेला तरी जेव्हा दुखण्याचे पाऊल मागे न पडता पुढेच पडू लागलें, तेव्हा मात्र काय करावें हे कोणासच सुचेना परंतु लवकरच घडून आलेल्या एका गोष्टीने औषधासाठी त्यांना कलकत्त्यात आणण्याचे मंडळींनी ठरविलें बागबाजारात राहाणाऱ्या एका भक्ताने नरेंद्र, 'एम्', राम वगैरे मंडळीस जेवण्यास बोलावलें होतें व श्रीरामकृष्णानाहि येण्याची विनंती करण्यासाठी एकजणाला पाठविलें होतें परंतु त्याने येऊन निरोप सांगितला की, " आज श्रीरामकृष्णाच्या गळ्याला क्षत पडलें असून त्यातून रक्त बाहेर आल्यामुळें ते आज येऊ शकत नाहीत " हें ऐकून मंडळी फार चिंताक्रांत झाली व लगेच आपआपसांत विचार करून त्यांनी ठरविलें की आता विलंब करून उपयोग नाही, एक घर भाड्याने घेऊन तेथे श्रीरामकृष्णाना आणून ठेऊन चांगल्या चांगल्या डॉक्टराकडून त्यांच्या रोगाची चिकित्सा करविली पाहिजे जेवणाचे वेळी नरेंद्राचा चेहरा उदास झालेला पाहून एकजणाने तसें होण्याचे कारण विचारतां नरेंद्र खिन्नपणे म्हणाला, " मी मुद्दाम वैद्यक ग्रंथ वाचले व पुष्कळ डॉक्टरांनाहि विचारलें त्यावरून असें दिसतें की, अशा प्रकारच्या कंठरोगापासून पुढे कॅन्सर होतो, आज रक्त पडल्याचें ऐकून माझी खात्री झाली आहे की, हा तोच रोग आहे या रोगावर अजूनहि औषध निघालें नाही ! "

दुसऱ्याच दिवशी सकाळी, रामचंद्र दत्त वगैरे मंडळींनी दक्षिणेश्वरी जाऊन, चिकित्सेसाठी कलकत्त्यास नेण्याचा आपला मानस त्यांना कळविला व त्यांची विनंती ऐकून श्रीरामकृष्णानीहि त्याला आपली संमति दिली लवकरच, मंडळींनी बागबाजारात एक लहानसें घर भाड्याने घेऊन तेथे श्रीरामकृष्णांना आणलें परंतु गंगेच्या तीरावर आणि दक्षिणेश्वरच्या ऐसपैस मोकळ्या व हवेशीर जागेत राहाण्याची श्रीरामकृष्णांना सवय झालेली, त्या लहानशा घरात येताच त्यांनी तेथे राहाण्याचें नाकारलें व तेथून निघून ते त्याच पावली, जवळच असलेल्या बलराम बसूच्या घरी गेले श्रीरामकृष्ण आलेले पाहून

बलरामाना अत्यानंद झाला व दुसरे चागले घर मिळेपर्यंत तेथेच राहाण्यास त्यानी श्रीरामकृष्णाना विनंती केली मंडळी लगेच दुसरे घर पाहूं लागली, परंतु तोपर्यंत स्वस्थ बसणें बरे नव्हे हे जाणून, त्यानी त्याच दिवशी बलरामाचे घरीच कलकत्त्यातील प्रसिद्ध प्रसिद्ध वैद्य, गगाप्रसाद, गोपीमोहन, द्वारकानाथ, नवगोपाल,—वगैरेना श्रीरामकृष्णाची प्रकृति दाखविण्यास बोलावून आणलें त्यानी पुष्कळ वेळपर्यंत परीक्षा करून रोग कॅन्सर (Cancer) अथवा रोहिणी असल्याचेंच निश्चित केले वद्य मंडळीनी काहीच आशा न दाखविल्यामुळे व अधिक प्रमाणात औषध घेणें श्रीरामकृष्णाहि सोसत नसल्यामुळे, कोणातरी होमिओपाथिक डॉक्टराचे औषध सुरू करण्याचे ठरून, नवीन घरात गेल्यानंतर डॉ महेद्रलाल सरकार याना बोलावण्यात आले एका आठवड्यात श्यामपुकूर भागातील गोकुलचद्र भट्टाचार्य याचें घर घेण्याचे ठरून तेथे श्रीरामकृष्णाना नेण्यात आले इकडे, दक्षिणेश्वरचे परमहस औषध घेण्यासाठी कलकत्त्यात आले असल्याची बातमी हा हा म्हणता सर्व शहरभर पसरली आणि त्याच्या दर्शनासाठी बलरामाच्या घरी लोकाच्या झुडीच्या झुंडी लोटूं लागल्या ! बलरामाचे घर म्हणजे एक उत्सवक्षेत्रच बनून गेले ! डॉक्टराच्या आणि भक्तमंडळीच्या सागण्याकडे अगदी दुर्लक्ष करून, त्यानी सर्वकाळ, आलेल्या मडळीना उपदेश करीत बोलत राहावे ! असे वाटे की, ज्याना दक्षिणेश्वरी येण्यास सवड नाही त्याच्यासाठी, श्रीरामकृष्ण स्वत च त्याच्या दारीं आले आहेत की काय ! सकाळीं उठल्यापासून दुपारी जेवणाचे वेळेपर्यंत व मग एक दोन तास विश्राति घेतल्यानतर पुन्हा तेथून, तों रात्री जेवण व निजण्याच्या वेळेपर्यंत, एकसारखी लोकाची रहदारी असे ! त्या आठवड्यात, किती लोकाना त्यानी उपदेश करून सन्मार्गाला लावले असेल आणि किती लोकाना शातिसुखाचा व आनदाचा लाभ करून दिला असेल, याची कल्पनाच करवत नाही एक आठवड्यानतर श्रीरामकृष्ण नवीन घरात राहाण्यास गेले

---

# २२. श्रीरामकृष्णांचें श्मामपुकुरात वास्तव्य

" शरीरधारण केले की त्याबरोबर कष्ट, रोग, दु खे आलीच "

—श्रीरामकृष्ण

नवीन घरात येताच डा महेंद्रलाल सरकार यानी श्रीरामकृष्णाची नीट परीक्षा करून औषध सुरू केले मथुरबाबू असताना त्याच्या घरी औषध वगैरे देण्यासाठी महेंद्रलाल कित्येकदा दक्षिणेश्वरी गेले होते, व त्यावेळी त्यानी श्रीरामकृष्णाना पाहिलेहि होते परतु या गोष्टीस आज कित्येक दिवस लोटले होते व कदाचित् त्याना त्यावेळची आठवणहि नसेल असे वाटून, कोणाला औषध सुरू करावयाचे आहे वगैरे काही न सागताच मडळीनी त्याना आणले होतें परतु श्रीरामकृष्णाना पाहाताच त्यानी ओळखले व अत्यत लक्षपूर्वक परीक्षा करून, औषध देऊन, बराच वेळ मोठ्या आनदाने त्याच्याशी धर्मसबधी गोष्टी बोलून त्या दिवशी त्यानी श्रीरामकृष्णाचा निरोप घेतला व दुसऱ्या दिवशी सकाळी येऊन सर्व दिवसाची सविस्तर हकीकत स्वत ला कळविण्यास त्यानी मडळीना सागितले आणि त्या दिवशीची व्हिजिट फीहि घेतली, परंतु दुसरे दिवशी जेव्हा त्याना समजले की, श्रीरामकृष्णाना त्याच्या भक्तमडळींनीच कलकत्त्यास आणले असून, त्याचा सर्व खर्च तेच चालवीत आहेत, तेव्हा, त्याच्या गुरुभक्तीने अत्यत प्रसन्न होऊन फी घेण्याचे नाकारून ते म्हणाले, " मी मुळीच पैसे न घेता तुमच्या या सत्कार्यास थोडी फार मदत करीन. मलाहि तुमच्यापैकी एकजण समजा "

अशा रीतीने औषधाची व्यवस्था झाली, तरी श्रीरामकृष्णाच्या शुश्रूषेसाठी त्याच्या जवळ कोणीतरी सदैव हजर असण्याची आवश्यकता होती तसेच त्याच्या पथ्याचे पदार्थ तयार करण्यासाठीहि कोणीतरी तेथे असणे जरूर होते म्हणून मडळीनी दक्षिणेश्वराहून माताजीनाच तेथे आणण्याचे व आपल्या पैकी कोणी कोणी आळीपाळीने सदैव श्रीरामकृष्णापाशी राहाण्याचे ठरविले माताजीचा स्वभाव अत्यत लज्जाशील असल्यामुळे येथे येणे त्याना कितपत आवडेल, अशी मडळीना काळजी वाटत होती या बाबतीत श्रीरामकृष्णांना विचारतां ते म्हणाले, " ती येथे येऊन राहाणे कठीणच दिसते तरीपण तिला विचारून पाहा तिची इच्छा असेल तर माझी हरकत नाही " माताजीना विचारताच, प्रसग जाणून त्यानी आपल्या अडचणी बाजूला ठेऊन, तेथे येण्याचे कबूल केले व लवकरच श्यामपुकुरच्या घरी येऊन, श्रीरामकृष्णाच्या पथ्यपाण्याची व्यवस्था त्या पाहू लागल्या.

माताजी तेथे येतात की नाही, अशी काळजी वाटण्याला कारणहि तसेच होते त्याचा स्वभाव इतका लाजाळू होता की, इतके दिवस दक्षिणेश्वरी नौबतखान्यात राहून श्रीरामकृष्णाच्या सेवेत नित्य मग्न असून मुद्धा, श्रीरामकृष्णानी स्वत आपण होऊन ज्या दोन चार बालभक्ताशी त्याची ओळख करून दिली होती, त्याच्या खेरीज कोणाहि इतर भक्ताला, त्याच्या चरणाचे अजून दर्शन झालें नव्हतें, की त्याचें बोलणेहि ऐकावयास सापडले नव्हते !! तेथे असताना त्यानी नित्य तीन वाजता उठून प्रातर्विधि उरकावे व गंगेवर स्नान करून जें घरात जाऊन बसावे, तें सारा दिवस बाहेर पडूंच नये सारा दिवस जप, ध्यान, पूजा, श्रीरामकृष्ण व भक्तमंडळी याच्यासाठी स्वयपाक, यातच मग्न असावे तोच प्रकार येथेहि झाला येथे तर दक्षिणेश्वरापेक्षा जागा कमी व सकुचित, तरीमुद्धा त्यानी आपली सर्व कामे अशा बिनबोभाट रीतीने व शातपणाने उरकावीं, की येथे कोणी श्रीरामकृष्णाच्या पथ्यपाण्याच्या व्यवस्थेसाठी राहिले आहे, असें कोणाला समजूंहि नये ' तेथे स्नानाचीहि निराळी जागा

नसल्यामुळे पहाटे तीनच्या अगोदर उठून सर्व विधि उरकून, केव्हा स्नान करून त्या आपल्या खोलीत जात, ते कोणासहि समजत नसे ! सर्व दिवस त्या खोलीत राहून वेळचेवेळी, त्या श्रीरामकृष्णाचे खाण्याचे पदार्थ तयार करून कोणाबरोबर तरी निरोप पाठवीत, म्हणजे मग सर्व मंडळी बाहेर जात व मग त्या स्वत येऊन श्रीरामकृष्णाना जेऊ घालीत, फारच गर्दी असेल तर भक्तमंडळीपैकी कोणी तरी, तेथून ताट वाढून घेऊन येई सन्याकाळी असेच रात्री सुमारे अकरा वाजता त्या निजत व पुन्हा पहाटे अडीच–तीन वाजता उठून, आपल्या कामास लागत हा नित्यक्रम त्यानी श्रीरामकृष्ण तेथे असेपर्यंत ( तीन महिने ) चालविला ! व या तीन महिन्यातहि त्या इतर कोणाच्या दृष्टीस पडल्या नाहीत

श्रीरामकृष्णाची प्रकृति अधिकाधिक खालावत चालली, तेव्हा शुश्रूषेसाठी त्याच्याजवळ कोणीतरी सदैव राहाणे जरूरीचें वाटू लागले नरेंद्र, शशी, काली वगैरे शिष्य मडळी सदैव तेथे असतच, पण त्या शिवाय आणखीहि जास्त मडळीची आवश्यकता होती परंतु डॉक्टरानी तो रोग ससर्गजन्य असल्याचे सागितल्यापासून, त्याच्याजवळ सदैव राहाण्यास मडळी थोडी भिऊ लागली एक दिवस डॉक्टर येऊन क्षत धुवून गेले जखमेतील रक्त, पू, पाणी वगैरे घाण एका ग्लासात तशीच होती सर्व मडळी बसली होती, इतक्यात नरेंद्र उठला व त्या ग्लासातील पाणी त्या मडळीच्या समोर त्याने शातपणे पिऊन टाकले ! ! नरेंद्राच्या या विलक्षण करणीने मडळी चकित झाली त्याची भीति कोठच्या कोठे नाहीशी झाली आणि तेव्हापासून श्रीरामकृष्णाच्या सेनेत कोणीहि मागे पाय घेतला नाही आणि सद्गुरूच्या सेवेसाठी आपला स्वार्थहि गुडाळून ठेवण्याचा कित्येकानी सकल्प केला दिवसा श्रीरामकृष्णाच्या जवळ पुष्कळ मडळी बसलली असतच, म्हणून नरेंद्र, काली वगैरे मडळी प्रथमत रात्रीच येत, म्हणून त्याच्या घरच्या मडळीस यात काही विशेष वाटले नाही परतु पुढे काही दिवसानी श्रीरामकृष्णाना काशीपूरच्या बगीच्यात नेल्यावर, ही मडळी जेव्हा त्याच्या सेवेसाठी रात्रंदिवस तेथे राहू

लागली व आपल्या कॉलेजच्या अभ्यासाकडेहि दुर्लक्ष करूं लागली, तेव्हा त्याच्या घरची मडळी चिताक्रांत झाली व हे काम सोडून पूर्ववत् आपल्या अभ्यासाकडे लक्ष देण्यास त्याना उपदेश करू लागली, परंतु त्याचा सद्गुरूच्या सेवेंत स्वत लाहि बळी देण्याचा दृढनिश्चय झाला असल्यामुळे, त्यानी सर्वांच्या सागण्याकडे दुर्लक्ष केले व श्रीरामकृष्णाची मनोभावाने सेवा करण्याचें काम चालू ठेवले असो

येथवर सर्व गोष्टीची नीट व्यवस्था झाली, पण हा सर्व खर्च चालावयाचा कसा ? अशी भक्त मंडळीना काळजी उत्पन्न झाली दुखणे असाध्य नसले तरी, त्याना बरे होण्याला बरेच दिवस लागणार व ज्या भक्तमडळीनी श्रीराम-कृष्णाना कलकत्त्यात आणले होते, त्यापैकी कोणीच श्रीमत नव्हते, म्हणून हा खर्च सर्वांनी मदत केली तरच चालण्यासारखा होता. आणि मनुष्य कितीहि भक्तिसपन्न असला, तरी जेथे पैशाचा प्रश्न आला, तेथे त्याची भक्ति एक-सारखी कायमच राहील हे कशावरून ? श्रीरामकृष्णाच्या दिव्य सहवासाने ज्याना शातिलाभ झाला होता अशा, रामचद्र दत्त, महेंद्रनाथ, गिरीशचद्र, बलराम, सुरेश—इत्यादि भक्ताची गोष्ट निराळी, त्याचा भक्तिभाव सर्व प्रकार-च्या प्रसगास पुरून उरण्याइतका बळकट होता परंतु दुखण्याच्या वाढीबरोबर कदाचित श्रीरामकृष्णाचा आध्यात्मिक शक्तिप्रकाश कमी कमी होत गेल्यास, केवळ तोच पाहून आकृष्ट झालेल्या इतर मडळीचा विश्वास व सेवेचा उत्साह कसा कायम राहावा ? अशी चिंता भक्तमडळीना वाटू लागली परतु जसजसे दिवस लोटू लागले, तसतसा श्रीरामकृष्णाचा आध्यात्मिक शक्तिविकास उलट वाढत असलेला जेव्हा त्यानी पाहिला, तेव्हा त्याची सर्व चिंता कोठल्याकोठे नाहीशी झाली व त्याच्या अत करणात नवा उत्साह व नवे बळ उत्पन्न झाले ! त्याना वाटू लागले की, आजपर्यंतच्या श्रीरामकृष्णाच्या इतर सर्व कार्याप्रमाणे हे त्याचे आजारीपण सुद्धा लोकाच्या कल्याणासाठीच नसेल कशावरून ? काही विशिष्ट कार्यासाठीच हे दुखणे त्यानी आपल्यावर ओढून घेतले नसेल कशावरून ? कदाचित् आपल्या सर्व भक्तमडळीना आपल्या सेवेचा अधिकार देऊन, त्याना

धन्य करण्यासाठीच, ते यावेळी रोगी होऊन पडले नसतील कशावरून ? कदाचित् असेहि असेल की, दक्षिणेश्वरपर्यंत सुद्धा येण्याला ज्याना सवड नाही त्याच्यासाठी या आजाराचे मिष करून दयामय भगवान त्याच्याच दारात आले असावे ! या प्रकारच्या विचारानी भक्ताची अत करणे भक्तिभावाने भरून जावी व त्यानी म्हणावे, "श्रीरामकृष्ण आपली सर्व व्यवस्था आपणच करून घेतील आपल्याला त्याची काळजी कशाला हवी ? ज्यानी आपल्याला सेवाधिकार देऊन धन्य केले, तेच तो अधिकार नीट बजावण्याचे सामर्थ्यहि खास देतील !" कोणी कोणी म्हणाले,—"जोपर्यंत आमची घरे आहेत, तोपर्यंत काय काळजी ? वेळ पडल्यास घरे विकून पैशाची व्यवस्था करू !" कोणी म्हणाले, "मुलामुलींचे विवाहात किंवा आजारीपणात आपण पैशाची कशी व्यवस्था करतो ? तशीच आताहि करू ! घरात चार जिन्नस आहेत, तोपर्यंत काय काळजी ?" या उत्साहाच्या प्रेरणेने, कोणी कोणी तर आपले प्रपचातील नित्य खर्च कमी करून ते पैसे श्रीरामकृष्णाच्या सेवेसाठी देण्यास सुरुवात केली ! सुरेंद्र, श्रीरामकृष्णासाठी घेतलेल्या घराचे सर्व भाडे स्वत देऊ लागले, व बलराम राम, महेंद्र, गिरीशचद्र वगैरे भक्त मिळून, श्रीरामकृष्णासाठी होणारा इतर सर्व खर्च चालवू लागले

श्यामपुकुरात श्रीरामकृष्णाचे एकदर तीन-साडेतीन महिने (सप्टेंबर १८८५ त डिसेंबर १८८५) वास्तव्य होते डाक्टर सरकार दररोज येऊन प्रकृति पाहून औषध देत श्रीरामकृष्णाशी गप्पा मारीत बसले असता त्याना वेळेचेहि भान राहू नये कित्येक वेळा तर त्याचे चारचार पाचपाच तास तेथेच गप्पागोष्टी करण्यात जावे व शेवटीहि आता गेल्यावाचून गत्यतर नाही, असे वाटून त्यानी मोठया कष्टाने त्याचा निरोप घ्यावा !

डॉक्टर महेंद्रलाल सरकार हे एक थोर गृहस्थ होते पाश्चात्य विद्याविभूषित असूनहि त्याना हिंदुधर्माचा अभिमान असे ते फार सरळ स्वभावाचे, निर्भीड वृत्तीचे आणि परोपकारी गृहस्थ होते श्रीरामकृष्णाकडे चिकित्सेस येऊ

लागल्यापासून त्याना आपण एक अगदीच निराळ्या वातावरणात येऊन पड-ल्याचा अनुभव येऊ लागला श्रीरामकृष्णाशी आणि त्याच्या शिष्यमडळीशी त्याचा रोज कोणत्याना कोणत्या विषयावर वादविवाद होई

**ता. १८-१०-८५**

एक दिवस ज्ञानी मनुष्याच्या लक्षणासबधी चर्चा चालली असता श्रीराम-कृष्ण म्हणाले,

**श्रीरामकृष्ण** —" पूर्ण ज्ञान ज्ञात्याचे लक्षण आहे,—विचार ( वाद ) बद होऊन जातो "

**डॉ सरकार** —" पण असा पूर्ण ज्ञानी कुठे सापडतो ? तुम्ही तरी अजून कुठे मौनव्रत धारण केले आहे ? मग तुम्ही का आपले बोलणे अजून बद केले नाही ? "

**श्रीरामकृष्ण** —" ( हासून ) पाणी स्थिर असले तरी ते पाणीच आणि हालल तरी पाणीच ! लाटा आल्या तरीहि पण पाणीच ! आणखी एक गोष्ट —सर्वाभूती नारायण ही गोष्ट खरी, पण हत्ती नारायण जरी मानला आणि त्याच्या वाटेतून बाजूला सरण्याची इच्छा नसली, तरीपण माहूतहि नारायणच ! मग त्याचे का ऐकू नये ? ईश्वरच शुद्ध मन, शुद्ध बुद्धि याच्या रूपाने आपल्या अंतर्यामी वसत आहे, मग त्याचे ऐकू नये काय ? माझा तर असा भाव आहे की 'मी' यत्र, चालविणारा 'तो', 'मी' घर, आत राहाणारा तो', 'तो' करवील तसे करावे, चालवील तसे चालावे ! "

**डॉ सरकार** —" पण महाराज, मग आपण वरचेवर का म्हणत असता की एवढा रोग बरा कर ? "

**श्रीरामकृष्ण** —" जोपर्यंत हा ' मी ' पणाचा घट आहे, तोपर्यंत असेंच चालायचे. एखाद्या महासागरात एखादा घट असावा, त्याच्या

आत बाहेर पाणीच असते पण तो घट भंगल्याशिवाय त्यांतील पाणी त्या महासागराशी कसे एकरूप होईल ? ”

**डॉ सरकार** —“ तर मग हा जो तुम्ही ‘ मी ’ पणा म्हणता तो तरी कोणी राखून ठेवला ? ”

**श्रीरामकृष्ण** —“ परमेश्वराने ! पण त्याने तो का ठेवला, हे कुणी सागावे ? त्याची इच्छा ! त्याची तशी का इच्छा, हे आपल्याला कसे कळावे ? डॉक्टर, तुम्हाला जर साक्षात्कार झाला तर या सर्व गोष्टी पटतील त्याचे दर्शन झाले म्हणजे सर्व सशय नाहीसे होतात ”

आणखीहि बराच वेळ निरनिराळ्या विषयावर बोलणे होऊन काही वेळाने डॉक्टर परत जाण्याला निघाले जाताना त्यानी त्या दिवशीचे औषध म्हणून दोन गोळ्या दिल्या देताना म्हणाले, “ ह या दोन गोळ्या दिल्या आहेत बर का, एक पुरुष आणि दुसरी प्रकृति !! ” ( हशा )

**श्रीरामकृष्ण** —( हासत )“ हा, ती दोघे एकत्रच राहातात खरी ! ” श्रीरामकृष्णानी डॉक्टराना थोडीशी मिठाई प्रसाद म्हणून दिली.

**डॉ. सरकार** —( खात खात )“ आज मोठा मजेत वेळ गेला बुवा ! ”

**श्रीरामकृष्ण** —“ तर मग एक Thank you द्या बघूं ? ”

**डॉ सरकार** —“ देतो, पण तो मिठाईबद्दल, तुमच्या उपदेशा-बद्दल नाही, बर का ! उपदेशाबद्दल Thank you या तोडाने कसा देऊ ? ”

**श्रीरामकृष्ण** —“ तुम्हाला आणखी काय सागूं ? ईश्वराचे ठिकाणीं मन ठेवा आणि त्याचे यथाशक्ति ध्यान करीत जा ”

× × × ×

**ता २२-१०-१८८५**

आज श्रीरामकृष्णाबरोबर डॉक्टर बराच वेळ गप्पा मारीत बसले हे पाहून गिरीश म्हणाले —" डॉक्टरसाहेब, येथे येऊन तुम्हाला चार तास झाले ना ? आज आणखी कोठे व्हिजिटला जायचे नाही वाटते ? "

**डॉ. सरकार** —( एकदम भानावर येऊन )" काय म्हणता ? इथे यायला लागल्यापासून कसली डॉक्टरकी आणि कसचे रोगी ? या तुमच्या परमहंसाच्या संगतीने अलीकडे आम्हीहि परमहंसच व्हायला लागलो आहो 'आपल्यासारखे करिती तात्काळ!' " ( सारे हासतात )

**श्रीरामकृष्ण** —"हे पाहा डॉक्टर, कर्मनाशा नावाची एक नदी आहे त्या नदीत जो बुडी मारतो त्याच्या सर्व कर्मांचा नाश होतो आणि पुन्हा त्याच्याकडून कर्मच होत नाही !! " ( सारे हासतात )

**डॉ सरकार** —( गिरीश वगैरेस ) " हे पाहा, तुम्ही सर्वजण मला आपल्यापैकीच एकजण समजा, नुसते याच्या आजारापुरतेच नव्हे, तर नेहमीच, समजलात ? ( श्रीरामकृष्णाना ) ह्या आजारात तुम्ही कोणाशी बोलता कामा नये, ( हासत ) मात्र माझ्याबरोबर बोलायला हरकत नाही ! " ( हशा )

**श्रीरामकृष्ण** —( एखाद्या लहान मुलासारखे )" डॉक्टर या रोगा-मुळे मला ईश्वराचे नामगुण गाता येत नाहीत, मला लौकर बरा करा ना ? "

**डॉ. सरकार** —" तुम्हाला नामगुणाशीं काय करावयाचे आहे ? ध्यान केले म्हणजे झाले ! "

**श्रीरामकृष्ण** —" वाहवा ! माणसाने कधी असे एकांगी असावे का ? मी कधी पूजा करतों, तर कधी जप करतो, तर कधी ध्यान, तर

कधी गुणवर्णनच करतो अथवा कधी नामस्मरणच करीत आनंदाने नाचतो! एकागी का व्हावे? * * ' तुमचा मुलगा अमृत, अवतार मानीत नाही पण त्यात तरी काय दोष आहे? ईश्वरावर निराकार म्हणून विश्वास असला तरी त्याचा लाभ होतो, साकार म्हणून विश्वास असला तरी त्याचा लाभ होतो मुख्य गोष्ट ही आहे की, त्याच्या कोणत्या तरी स्वरूपावर विश्वास हवा व त्याला सर्वस्वी शरण जायला हवे माणसाची बुद्धि किती? चूक व्हायचीच, म्हणून कोणत्याहि मार्गात असले, तरी हरकत नाही,—व्याकुळतेने त्याचा धावा केला म्हणजे झाले ईश्वर तर अंतर्यामी, व्याकुळतेची हाक तो खास ऐकेल व्याकुळता हवी, मग कोणत्याहि मार्गाने जा, त्याची प्राप्ति होईलच होईल साखरेची वडी वाटोळी करून खा किंवा चौकोनी करून खा, गोडच लागायची! * * तुमचा मुलगा मोठा चांगला आहे "

**डॉ. सरकार**—"तुमचाच चेला, मग काय विचारायचे आहे?"

**श्रीरामकृष्ण**—( हासत ) " कुणीहि साला माझा चेला नाही मीच सगळ्याचा चेला! सगळीच ईश्वराची मुले, सगळेच त्याचे दास, चांदोमामा सगळ्याचाच मामा!" ( हशा )

* * *

अशा रीतीने डॉक्टराच्या श्रीरामकृष्णाशी गप्पा चालत श्रीरामकृष्णाविषयी त्याच्या मनात प्रथमपासूनच आदर होता, पण पुढे पुढे तर श्रीरामकृष्णावाचून त्याना काही सुचेनासे झाले एक दिवस 'एम्' श्रीरामकृष्णाकडे आले असता डॉक्टराची गोष्ट निघाल्यावरून म्हणाले, "आज सकाळी डॉक्टराच्याकडे गेलो होतो, त्याचा चेहरा कसा उतरल्यासारखा दिसला "

**श्रीरामकृष्ण** —" का बरे ? काय झाले ? "

**एम्** —" काल एकजण त्याना म्हणाला, ' तुम्ही एवढी डॉक्टरकीची ऐट कशाला मारता ? तुमच्या विद्येची फजीती करण्यासाठीच परमहंस आजारी होऊन बसले आहेत ! !' "

**श्रीरामकृष्ण** —" कोण बुवा त्याना असे म्हणाला ? "

**एम्** —" महिमाचरण "

**श्रीरामकृष्ण** —" वा ! "

**एम्** —" डॉक्टर म्हणाले, ' रात्री तीन वाजता एकदम जागा झालो– आणि मनात सारे परमहंसाचे विचार ! सकाळी आठ वाजले तरी आमचे परमहंस चाललेच आहेत !, "

**श्रीरामकृष्ण** —(हासत हासत) तो इंग्रजी शिकलेला माणूस, त्याला ' तूं रोज माझे चिंतन करीत जा, ' म्हणून सांगायची सोयच नाही ! बरे झालें, तो आपल्या आपणच करायला लागला ! आणखी काय काय गोष्टी झाल्या ? "

**एम्** —" मी विचारले, ' आजच्या औषधाची काय व्यवस्था ? ' ते त्रासल्यासारखे करून म्हणाले, ' व्यवस्था कसली घेऊन बसलात कपाळाची ? आज मला पुन्हा एकदा त्याच्याकडे जाऊन आले पाहिजे ! ' ( श्रीरामकृष्ण हासतात ) आणखी म्हणाले—' रोजचे माझे किती नुकसान होत आहे, याची तुम्हाला काही कल्पना आहे ? रोज दोन तीन रोग्याकडे जायचे राहून जाते ! ! ' "

* * *

**ता. २३-१०-१८८५**

सध्याकाळ झाली श्रीरामकृष्ण बिछान्यावर पडले आहेत पडल्या पडल्या श्रीजगदंबेचें नामस्मरण करीत आहेत भोवताली भक्तमंडळी बसली आहेत काही वेळाने श्रीरामकृष्णाना पाहाण्यास डॉ. सरकार आले.

**डॉ. सरकार** —" काल रात्री तीन वाजता एकाएकी जागा झालो आणि मनात तुमचे विचार येऊ लागले थोडा थोडा पाऊस पडत होता,—वाटलें की खोलीची दारे कुणी लावून घेतली असतील की उघडीच असतील ? "

डॉक्टराचा प्रेमळ स्वभाव व आपल्याविषयीची काळजी पाहून श्रीरामकृष्ण प्रसन्न होऊन म्हणतात –" काय म्हणता ? * * .

असे आहे की देह असेपर्यंत प्रयत्न केला पाहिजे ! * * पण मला प्रत्यक्ष दिसत आहे की देह निराळा आणि आत्मा निराळा कामिनीकाचनावरील प्रेम जर सर्वस्वी नाहीसे झाले, तर देह निराळा आणि आत्मा निराळा, असे स्पष्टपणे दिसून येतें नारळातील पाणी सुकून गेले, म्हणजे जसा आतील खोबऱ्याचा गोटा करवटीपासून सुटून अलग होतो आणि मग खोबरे निराळे आणि करवटी निराळी असे दिसून येते, अथवा जशी म्यानात ठेवलेली तरवार— पण म्यान निराळे आणि तरवार निराळी,—तसेच देह आणि आत्मा याचे, म्हणून या दुखण्याची गोष्ट माझ्याने आईजवळ काढवत नाही. "

* * *

काही वेळाने कामकाचनत्यागाचा विषय निघाला

**श्रीरामकृष्ण** —( डॉक्टरास ) " कामकाचनाचा त्याग तुमच्या सारख्याच्यासाठी नाही तुम्ही मनाने त्याग करावा जो सन्यासी असेल, त्याच्यासाठी कामकाचनाचा सर्वस्वी त्याग तुमच्यासाठी—ससारी माणसाच्यासाठी—स्त्रीचा सर्वस्वी त्याग सागितला नाही मात्र एक दोन अपत्ये झाल्यावर तुम्ही बहीणभावडाप्रमाणे राहिले पाहिजे "

* * *

**ता. २७-१०-१८८५**

नरेंद्र येऊन प्रणाम करून श्रीरामकृष्णाजवळ बसला त्याचे वडिलाना देवाज्ञा झाल्यापासून त्याच्या कुटुबाला मोठे वाईट दिवस आले होते घरचा

खर्च चाललेलाच आणि मिळकत मुळीच नाही घरच्या माणसाच्या अन्नवस्त्राची एकदाची काही तरी व्यवस्था लावून आपण मोकळे व्हावे, यासाठी नरेंद्राची धडपड चालली होती.

श्रीरामकृष्णाना या सर्व गोष्टी माहीत होत्या

नरेंद्राकडे अत्यत प्रेमपूर्ण नयनानी पाहात श्रीरामकृष्ण म्हणाले —

**श्रीरामकृष्ण** —" एक दिवस केशवचद्र सेनशी बोलत असता मी त्याला यदृच्छालाभाविषयी सागितले थोरामोठयाच्या घरच्या मुलाला खाण्याची का कुठे चिंता असते ? ( 'एम्'कडे वळून ) नरेंद्राची इतकी उच्च अवस्था, पण मग त्याच्या मागची ही चिंता कशी सुटत नाही ? ईश्वरचरणीच सारे लक्ष ठेवले तर तोच अन्नपाण्याची चिंता करणार नाही का ? "

**एम्** —" होय महाराज, आपण म्हणता तसें हळूहळू होईल "

**श्रीरामकृष्ण** --" पण तीव्र वैराग्य प्राप्त झाल्यावर हा सारा विचार राहात नाही 'घरचा नीट बदोबस्त करून मग स्वस्थपणे साधना करू,' इतका धीर मग राहात नाही केशव सेन एकदा म्हणाला, 'महाराज, आपल्या घरादाराची नीट व्यवस्था लावून जर कोणी स्वस्थ चित्ताने साधना करू म्हणेल, तर ते शक्य नाही काय ?' मी त्याला म्हणालो—' बाबारे, तीव्र वैराग्य प्राप्त झाले म्हणजे ससार एखाद्या खड्ड्यासारखा वाटू लागतो आणि आपले इष्टमित्र सापासारखे वाटू लागतात ! त्या वेळीं पैसे जमविण्याचे आणि घराची व्यवस्था करण्याचे विचारच मनात येत नाहीत ' "

" एकदा एका स्त्रीला काही अत्यत शोकजनक वार्ता कळली आता रडायचे,—तेव्हा तिने काय केले, अगोदरच नाकातली नथ काढून पदरात नीट बाधली आणि मग 'अरे देवारे' असे म्हणत जमीनीवर आग टाकून दिले !—पण तेहि अशा सावधगिरीने की नथेला धक्का लागून ती फुटू नये ! !

खरोखरीच शोक झाला असेल, तर ही असली सावधगिरी राहाणे शक्य नाही ! ”

नरेंद्र स्तब्ध बसला होता ह्या साऱ्या गोष्टी त्याच्या मनाला फार झोंबल्या श्रीरामकृष्ण त्याला आणखी काही सांगणार, इतक्यात दुसरे कोणी आले व मग बोलणे तितकेंच राहिलें

* * *

श्यामपुकुरास काही दिवसपर्यंत श्रीरामकृष्णाची प्रकृति बरी होती, पण पुन्हा प्रकृति अधिकाधिक बिघडू लागली तरी पण, डाक्टरानी वरचेवर आग्रहाने सांगितलें असताहि कोणी त्याच्याकडे आल्यास, त्याचेबरोबर बोलल्याशिवाय ते कधीहि राहिले नाहीत ! लोकांची एकसारखी रहदारी चालू असे, आणि कित्येक दिवस त्याना खरोखरच जेवणासहि फुरसत मिळत नसे त्याची शरीरप्रकृति खालावत चालली होती, पण लोकाना उपदेश करण्याचा त्याचा उत्साह अधिकाधिक वाढत होता

* * *

या साडेतीन महिन्याच्या अवधीत इतर विशेष काही गोष्ट घडून आली नाही मात्र आश्विन महिन्याच्या अमावास्येच्या दिवशीं (सहा नोव्हेंबर १८८५) एक अद्भुत गोष्ट घडली त्या दिवशी श्रीरामकृष्णानी 'एम्' ना म्हटलें की “ आज अमावास्या, कालीपूजेचा दिवस आज मातेची पूजा करायला पाहिजे ” 'एम्'नी ही गोष्ट इतर मंडळीत काढली व मंडळीनी मोठ्या उत्साहाने पूजेची सर्व सामग्री जमविली

आज संध्याकाळी श्रीरामकृष्ण मातेची पूजा स्वत करणार, म्हणून सर्व मंडळी मोठ्या आनंदात संध्याकाळ होण्याची वाट पाहात बसली संध्याकाळ झाली,—सात वाजले सर्व पूजासामग्री वर माडीवर नेऊन श्रीरामकृष्णाच्याजवळ

ठेवण्यात आली श्रीरामकृष्ण अथरुणावर बसले होते भोवती श्रीरामकृष्णांची पूजा पाहाण्यासाठी जो तो उत्सुक झाला होता थोडया वेळाने श्रीरामकृष्णानी सर्वांना काही वेळ ध्यान करण्यास सागितले ध्यान झाले, तरी पूजेला ठिकाणच नाही ! ! सर्वजग एकमेकाच्या तोंडाकडे टकमक पाहू लागले इतक्यात गिरीशाच्या मनात एक विचार आला, " आज आम्ही साऱ्यानी श्रीरामकृष्णाची जगदबाज्ञानाने पूजा करावी, असे त्याच्या मनात आहे की काय ! ' हा विचार मनात येताच त्याचे मन भक्तीने आणि उत्साहाने भरून गेले आणि त्या प्ररणेसरशी एकदम उठून, त्यानी " जय रामकृष्ण ! " असा जयघोष करून देवीसाठी तयार केलेली सुदर पुष्पमाला श्रीरामकृष्णाच्या चरणी समर्पण केली ! त्याच्या मागोमाग ' एम् ' नी गधफुले वाहिली त्याच्यानंतर राखाल, राम, वगैरे मडळीनी जयघोष करीत त्याच्या चरणी पुष्पाजलि समर्पण केली इतक्यात निरजनने पायावर फुले वाहून " जय ब्रह्ममयी ! जय ब्रह्ममयी ! " असा घोष करीत त्याच्यापुढे साष्टाग नमस्कार घातला सर्व मडळी " जय माते ! " " जय माते ! " असा घोष करू लागली ! !

असा जयघोष चालला असता श्रीरामकृष्णाना समाधि लागली आणि त्याचे एकदम अद्भुत रूपातर झाले वदनमंडलावर एक अपूर्व दिव्य तेज चमकूं लागून, हाताची ठेवण, भक्ताना अभय देताना जशी असावी तशी झाली ! ! त्याच्या त्या ज्योतिर्मय वदनमंडलावर रोगाचें यत्किंचित् सुद्धा चिन्ह दिसत नव्हते ! प्रत्यक्ष जगदंबाच श्रीरामकृष्णाच्या शरीरात आविर्भूत होऊन आपल्या भक्ताना अभय देत आहे की काय, असे वाटून भक्तमडळीची हृदयें भक्तीने आणि आनदाने भरून येऊन, सर्वजण हात जोडून जगदबेच्या स्तुतिपर पदे म्हणूं लागले ! बऱ्याच वेळाने श्रीरामकृष्ण थोडे देहभानावर आले मग मडळीनी नैवेद्य दाखविला त्याच्या आनदासाठी श्रीरामकृष्णानी नैवेद्याचा थोडासा अश स्वत ग्रहण केला काही वेळाने तो महाप्रसाद सर्वांना वाटण्यात आला व सर्व मंडळी श्रीरामकृष्णाना नमस्कार करून आजच्या अद्भुत प्रकाराविषयी गोष्टी बोलत, आनंद करीत आपापल्या घरी गेली असो

हळूहळू रोग वाढत चालला एक घासभर सुद्धा अन्न पोटात जाणे अशक्य झाले, बोलण्यालाहि त्रास होऊ लागला कोणतेच औषध लागू पडेना औषधाने दोनचार दिवस गुण आलासा वाटावा, पण पुन्हा पहिल्यासारखेच व्हावे, असे होऊ लागले शरीर उत्तरोत्तर अधिकाधिक दुर्बल, अशक्त होत चालले चार पावले सुद्धा चालण्याची शक्ति नाहीशी झाली नुसते उठून बसण्याने सुद्धा क्षतस्थानी ठणका लागू लागला सर्व मंडळी अत्यंत चिंताक्रांत झाली काय करावे कोणास काहीच सुचेना सरतेशेवटी डॉक्टराच्या सल्ल्यावरून पुन्हा एकदा घर बदलून पाहाण्याचें ठरले श्रीरामकृष्णाच्या दर्शनास माणसाची एकसारखी रीघ लागलेली असावयाची, यामुळे तो घरवालाहि अलीकडे कुरकुर करू लागला होता दुसरे घर पाहावयाचे, पण ते जर श्रीरामकृष्णाना पसंत पडले नाही, तर पुन्हा पहिल्या घराच्या वेळच्यासारखा त्रास व्हावयाचा आणि मग श्रीरामकृष्णाना तेथून या अशा भयंकर स्थितीत, कुठे दुसरीकडे न्यावयाचे ? अखेरीस श्रीरामकृष्णानीच काशीपूरच्या बाजूला घर पाहावयास सांगितलें मंडळीनी त्या बाजूला घरें पाहाण्यास पुन्हा सुरवात केली व त्याच दिवशी एक चांगला हवेशीर बंगला महिना ऐंशी रुपये भाड्याने ठरविला त्याच दिवशी श्रीरामकृष्ण नवीन घरात राहाण्यासहि गेले (एकवीस डिसेंबर १८८५)

# २३. काशीपूर येथील अखेरचे दिवस आणि महासमाधि

" जो राम, जो कृष्ण तोच आता रामकृष्ण, तुझ्या वेदांताच्या दृष्टीने नव्हे, तर प्रत्यक्ष ! " ( विवेकानंदास उद्देशून )

" आणखी दोनशे वर्षांनी वायव्य दिशेकडे यात्रे लागणार आहे "

—श्रीरामकृष्ण

---

नवीन घरात राहाण्यास गेल्यापासून श्रीरामकृष्णाची प्रकृति सुधारू लागली गळ्याचे क्षत पुष्कळसे बरे होऊन, थोडेफार अन्नहि पोटात जाऊ लागले उठून बसल्याने पूर्वीसारखा ठणका लागेनासा झाला चार पावले चालण्याचीहि शक्ति अंगात आली यामुळे सर्वांना फार आनंद झाला परंतु हा आनंद फार दिवस टिकला नाही रोगाने पुन्हा उचल खाल्ली क्षतस्थानीं पुन्हा अतिशय ठणका सुरू झाला हा प्रकार पाहून मंडळींनी बहुबाजारातील डॉ. राजेंद्र दत्त यांचे औषध सुरू केले तीन चार महिने त्यांचे औषध देऊनहि काही एक उपयोग होत नाहीसे दिसून आल्यावरून डा नवीन पाल यांचे औषध सुरू केले त्याशिवाय मधून मधून इतर डॉक्टरहि येत होतेच. डॉ पाल यांच्या औषधानेहि काही गुण येत नाहीसे पाहून, श्रीरामकृष्णाचे अनुमोदन घेऊन कलकत्ता मेडिकल कॉलेजचे

प्रिन्सिपॉल डॉ कोटस् याना आणण्यात आले त्यानी नीट परीक्षा करून, रोग असाध्य आहे असे सागितले !

इतक्या डॉक्टराची आणि वैद्याची औषधे झाली, परतु रोगाबद्दल कोणा-चेच एकमत झाले नाही कोणी म्हणाले कठरोग, कोणी म्हणाले गंडमाळा आणि कोणी कॅन्सर म्हणून सागितले ! कधी कधी ते क्षत नाहीसे होऊन त्याच्या-जागी एक मोठा फोडच उत्पन्न होई आणि त्याने तर श्रीरामकृष्णाना अत्यत वेदना होत ! कधी कधी तो फोड इतका मोठा होई की, त्याना श्वासोच्छ्वास करण्यालाहि त्रास होई !! तो फोड फुटेपर्यंत त्याना अशाच प्राणातिक वेदना होत ! पोटात एक घासभर सुद्धा अन्न जात नसे एक पावशेर दुधातले निम्मे पोटात उतरे व निम्मे बाहेर पडे ! काही दिवसानी तो फोड थोडासा फुटून त्यातून पू वाहू लागे आणि मग मात्र त्याना काही वेळ जरासे बरे वाटे पण काही केल्या रोगाचे पाऊल मात्र मागे पडेना ह्या सर्व दारुण वेदना ते हास्य-मुखाने सहन करीत " रोग कमा बरा होईल, " याची त्यानी कधी चिता केली नाही, की, कधी उदास होऊन ते स्वस्थ बसून राहिले नाहीत त्यानी आपले लोकाना उपदेश करण्याचे महत्कार्य अव्याहत रीतीने चालू ठेवले " 'फार बोलत जाऊ नका,' असे डॉक्टरानी सागितले आहे," अशी एखाद्याने आठवण करून दिली, तर ते हासून म्हणत, " देह जाने, दु ख जाने, मन, तुमि आनंदे थाक ! " डॉक्टर अथवा इतर मडळीपैकी कोणी रोगाची चर्चा सुरू केली, म्हणजे क्षणमात्र आपल्या रोगाकडे त्याचे लक्ष जाई व त्याना आपल्या रोगाची चिता वाटल्यासारखी दिसे, पण ते केवळ क्षणमात्रच, दुसऱ्याच क्षणी ते सर्व विसरून जाऊन ते ईश्वरीय गोष्टी बोलू लागत !

श्रीरामकृष्णाच्या आयुष्यातील या अखेरच्या आठ-साडेआठ महिन्याची दिवसमहिनेवार हकीगत देणे शक्य नाही व आवश्यकहि नाही, म्हणून त्या दिवसातील काही प्रसगाचे येथे वर्णन देऊ, म्हणजे स्वत श्रीरामकृष्णाच्याच तोंडचे काही शब्द आपल्याला ऐकण्यास सापडतील —

ता २३-१२-१८८५

**श्रीरामकृष्ण** —( 'एम्'ला ) " माझे दुखणे किती दिवसानी बरें होईल असें तुला वाटतें ? "

**एम्** —" दुखणे बरेच वाढले आहे, तेव्हा बरेच दिवस लागतीलसे वाटते "

**श्रीरामकृष्ण** —" किती दिवस ? "

**एम्** —" पाच सहा महिने तरी हवेत "

**श्रीरामकृष्ण** —( अधीर होऊन ) " काय ? पाच सहा महिने ? "

**एम्** —" असें वाटते खरं, पण पूर्ण बरं होण्याला ! "

**श्रीरामकृष्ण** —( धीर येऊन ) " ह, अस काही म्हण ! का म्हटल पाच सहा महिने ! पण वा रे, ही अशी ईश्वररूपदर्शने आणि भाव आणि समाधि—आणि मग हे दुखणें कसे ? "

**एम्**:—" आपणाला क्लेश फार होतात खरे, पण त्यातहि काही उद्देश आहे "

**श्रीरामकृष्ण** —" कोणता ? "

**एम्** —" आपल्या अवस्थेचें आता परिवर्तन होत आहे आपल्या मनाचा झोक आता निराकाराकडे कलूं लागला आहे "

**श्रीरामकृष्ण** —" होय, असे वाटते खरे—आता उपदेशहि बंद होऊ लागला आहे—बोलवतच नाही सर्व जगत राममय दिसूं लागले आहे एकेकदा वाटतें, की, आता बोलूं तरी कुणाजवळ ? * * * हेंच पाहाना, माझ्यासाठी हा बंगला तुम्ही भाड्याने घेतला आहे असे कळल्यापासून, किती लोक येऊ लागले आहेत पाहा ! "

**एम्** —" आणखी एक उद्देश दिसतो लोक-परीक्षा, लोक-कल्याण,—पाच वर्षांच्या तपश्चर्येने जो लाभ झाला नसता, तो येथे थोडयाशा दिवसात भक्ताना झाला आहे,—साधना-प्रेम-भक्ति वगैरे "

**श्रीरामकृष्ण** —" हं, ते खरे ( निरंजनाला उद्देशून ) तुला कसे काय वाटते ? "

**निरंजन** —" इतके दिवस नुसते प्रेम वाटत होते, पण आता तेथून दुसरीकडे जायचीच सोय नाही ! "

ऐकता ऐकता एकाएकी श्रीरामकृष्णाची समाधि लागली बऱ्याच वेळाने समाधि उतरल्यावर ते म्हणू लागले —

" असे पाहिले की सर्व चराचर साकाराकडून निराकाराकडे चालले आहे ! . . . आणखीहि पुष्कळ सागावेसे वाटते, पण सागवत नाही. ( 'एम्' ला ) हा निराकाराकडे झोक,—लय होण्यासाठीच ना ? "

**एम्** —( चकित होऊन ) " असेलहि कदाचित् ! "

**श्रीरामकृष्ण** —" लोक-परीक्षा,—असे तू म्हणालास तेच खरे या दुखण्यामुळेच अतरग भक्त कोणते, बहिरग भक्त कोणते, हे कळून येत आहे ससार सोडून जे येथे शुश्रूषेला येत आहेत, ते अतरग आणि जे नुसते तोड दाखवून ' का महाराज, कसें काय आहे ' म्हणून परत जात आहेत, ते बहिरंग "

* * *

**ता. २३-१२-१८८५**

आज सकाळी श्रीरामकृष्णानी प्रेमरसाची लूट माडली होती ! निरजनाला म्हणाले, " तूं माझा बाप, मला तुझ्या माडीवर बसूं दे ! " कालीपदाच्या वक्ष स्थलावर हात फिरवून म्हणाले, " चैतन्य हो ! " त्याची हनुवटी वरून

त्याला कुरवाळीत म्हणूं लागले-" जे मनापासून ईश्वरभक्ति करतात, त्याना इथे आलेच पाहिजे ! " एकजणाच्या वक्ष स्थळावर आपले चरण लावून ते काही वेळ बसले तो आनदाने बेहोष होऊन अश्रु ढाळीत, चरण कवटाळीत, सद्गदित होऊन म्हणू लागला—" भगवान, दयासागर,—आपली केवढी कृपा ! " प्रेमाची नुसती लूट ! काही वेळाने म्हणाले, " जा गोपाळला बोलावून आण ! "

४

श्रीरामकृष्ण दक्षिणेश्वरीं असता एक दिवस भक्तमडळीना म्हणाले होते की " मी जेव्हा जाईन ( देह विसर्जन करीन ) तेव्हा आपले प्रेमाचे भाडे फोडून जाईन ! " आता तीच वेळ आली होती काय ? कारण वर वर्णन केल्यासारखी प्रेमाची लूट अलीकडे मधून मधून चालली होती आणखी आठच दिवसानी, ( जानेवारी १८८६ रोजी ) घडलेल्या अद्भुत प्रकाराचे सविस्तर वर्णन माग ( पान ११३-११६ ) आलेच आहे

*                *                *

### ता. ४-१-१८८६

नरेंद्र येऊन बसला श्रीरामकृष्ण त्याचेकडे मोठया प्रेमाने पाहात आहेत आणि मधे मधे हासत आहेत काही वेळाने मणीला म्हणाले— " आज नरेंद्र आपल्या घराहून रडत आला ! " सर्वजण स्तब्ध बसले आहेत.

**नरेंद्र** —" आज तिथे जावे म्हणतो "

**श्रीरामकृष्ण** —" कोठे ? "

**नरेंद्र** —"दक्षिणेश्वरी. तेथे रात्री बेलाखाली धुनी पेटवून बसावें म्हणतो "

**श्रीरामकृष्ण** —" अह, तसे करूं नको दारूगोळयाच्या कारखान्यातील पहारेकरी तेथे धुनी पेटवू देणार नाहीत पचवटी छान जागा आहे अनेक साधु महात्म्यानी तेथे जप, ध्यान केले आहे पण रात्र

काळोखी आणि थंडी फार " ( सर्वजण अगदी स्तब्ध बसले आहेत )

श्रीरामकृष्ण पुन्हा बोलू लागले,

**श्रीरामकृष्ण** —( हासत ) " आता पुढे शिकत नाहीस का ? "

**नरेंद्र** —" आजपर्यंतचे सारे शिकलेले विसरून जाईन असे एखादे औषध मला मिळेल तर फार बरे होईल ! "

कालीपदाने श्रीरामकृष्णासाठी काही द्राक्षे आणली होती श्रीरामकृष्णानी करडीतून काही द्राक्षे घेऊन प्रथम नरेंद्राला दिली आणि बाकीची भक्तमंडळीत पिस्करून टाकली ! !

संध्याकाळ झाली नरेंद्र व मणी एकीकडे एकटेच बोलत आहेत

**नरेंद्र** —" गेल्या शनिवारी इथे ध्यान करीत बसलो होतो एकाएकी हृदयात कसेसेच होऊ लागले "

**मणीः**—" कुंडलिनी जागृत झाली असावी "

**नरेंद्र** —" असेल इडा पिंगला स्पष्ट दिसूं लागल्या, हाजराकडे जाऊन म्हणालो—' जरा छातीवर हात तर ठेऊन पाहा ' काल रविवार, माडीवर जाऊन त्याना ( श्रीरामकृष्णाना ) सारे काही सांगितले आणि म्हणालो, ' प्रत्येकाला काही ना काही मिळाले आहे आता मला काही तरी द्या ' "

**मणी** —" मग ते काय म्हणाले ? "

**नरेंद्र** —" ते म्हणाले ' तूं एकदा घरची नीट व्यवस्था करून ये म्हणजे सर्व काही होईल तुला काय पाहिजे ? ' "

**मी म्हणालों** —" मला असे वाटतें की एकसारखे तीन चार दिवस समाधिमग्न होऊन राहावे ! उगीच थोडेसे खाण्यापुरती समाधि उतरावी हे ऐकून ते म्हणाले, " तू तर फारच हीनबुद्धि बुवा ! अरे, त्या अवस्थे-

पेक्षाहि उच्च अवस्था आहे तुला तर ते गाणे येते—‘ जो कुछ ह सो तूहि है ? ’ तू एकदा घरची नीट व्यवस्था लावून ये,—समाधि अवस्थेहून ही उच्च अवस्था तुला मिळेल ”

“ मग आज सकाळी घरी गेलो सारी मडळी मला बोलू लागली, ‘ असा काय मूर्खासारखा उगीच इकडे तिकडे भटकतोस ? ( वकीलीची ) परीक्षा इतकी जवळ आली—अभ्यास बिभ्यास राहिला आणि नुसता आपला भटकतो आहे ! काही वेळाने आपल्या अभ्यासाच्या खोलीत गेलो पुस्तक हातात घेतले—वाचायची भीतिच वाटू लागली, छाती धड् धड् उडू लागली, रडू आले,— आजच्यासारखा असा कधीहि रडलो नसेन ! ! एकाएकी काय वाटले कोणास ठाऊक,—पुस्तक तसेच फेकून दिले आणि इकडे धाव मारली ! रस्त्याने लोक पाहाताहेत, जोडा कुठे पडला शुद्ध नाही, वाटेत काय आहे इकडे लक्ष नाही ! एकदाचा इथे येऊन पोहोचलो ! ! ”

काही वेळ गप्प बसून नरेंद्र पुन्हा बोलूं लागला —

**नरेंद्र** —“ विवेकचूडामणीतील श्लोक आठवून मन जास्तच व्याकुळ झाले शकराचार्यांनी म्हटले आहे, या तीन गोष्टी माणसाला मोठ्या पुण्याईने आणि ईश्वराच्या कृपेनेच प्राप्त होतात—‘ मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुषसश्रय ,’—असे वाटले, आपल्याला या तिन्हीहि प्राप्त झाल्या आहेत—मनुष्यजन्म मिळाला आहे, मोठ्या पुण्याईने मुक्तीची इच्छा प्राप्त झाली आहे आणि ईश्वरकृपेने याच्यासारख्या महापुरुषाच्या आश्रयाचा लाभहि झाला आहे ! ! मग आता वाट कशाची पाहायची ? ”

हे ऐकून मणीचें हृदय भरून आले नरेंद्र पुन्हा बोलू लागला.

**नरेंद्र** —“ आता ससाराकडे मन लागत नाही, की ससारात असलेली माणसेहि आवडत नाहीत ”

काही वेळ थाबून —

**नरेंद्र** —" तुम्ही मडळी मोठी भाग्यवत, तुम्हाला शातिलाभ झाला आहे पण माझ्या प्राणाची तळमळ मात्र वाढत चालली आहे ! "

* * *

रात्र झाली नवाचा सुमार श्रीरामकृष्णाजवळ निरजन आणि शशी बसले आहेत मणी जाऊन पाहतो तो श्रीरामकृष्णाना झोप लागली आहे थोड्या वेळाने ते जागे होऊन नरेंद्राच्याच गोष्टी बोलू लागले

**श्रीरामकृष्ण** —" नरेंद्राची अवस्था खरोखरच मोठी आश्चर्यकारक आहे काय चमत्कार आहे ? हाच नरेंद्र मागे साकार मानीत नसे पण त्यालाच आज कशी तळमळ लागली आहे पाहा ! * * * ईश्वरदर्शनासाठी असा प्राण व्याकुळ होऊ लागला म्हणजे समजावे की आता ईश्वरदर्शनाला उशीर नाही ! "

नरेंद्र आज रात्री दक्षिणेश्वरी निघून गेला बरोबर एक दोन भक्त-मडळी होती

* * *

**ता. १४-३-१८८६**

फाल्गुन शुक्ल पक्षातील नवमी तिथि दोन प्रहर रात्रीचा समय आज श्रीरामकृष्णाची प्रकृति जास्तच बिघडली आहे पिठासारखे शुभ्र चादणे पडले असून बंगल्याभोवतीचें उद्यान जणु आनदमय झाले आहे ! भक्तमंडळीच्या मनात मात्र आनंद नाही ! श्रीरामकृष्ण माडीवर बिछान्यावर तळमळत पडले आहेत अंगाकडे बघवत नाही ! नुसते अस्थिचर्म राहिलें आहे ! झोप नाही ! जवळ एक दोन भक्त बिचारे हताश होऊन बसले आहेत ! काय करणार ? आपल्या गुरुदेवासाठी ते आपला प्राणहि देतील पण त्याचे क्लेश कसे कमी करता येणार ? क्षणमात्र

त्याचा डोळा लागलासा वाटावा, पण लगेच पुन्हा झोपमोड व्हावी असें चाललें होतें 'एम्' जवळच बसले होते श्रीरामकृष्णानी त्याना आणखी जवळ येण्याची खूण केली बोलवत नाही ! हर हर ! काय कष्ट हे !

श्रीरामकृष्ण अत्यत खोल आवाजात अस्पष्ट स्वराने म्हणूं लागले– " तुम्ही सारेजण रडत बसाल, म्हणून हा भोग भोगीत आहे, पण तुम्ही जर म्हणाल की 'इतके क्लेश होतात, तर आता पुरे,' तर आत्ताच देह ठेवावा म्हणतो ! "

हे शब्द कानीं पडताच भक्तमडळीचे हृदय शतधा विदीर्ण झाले, जो त्याचा मातापिता, त्याचे इहपरलोकीचे सर्वस्व, त्याचा पालनकर्ता परमेश्वर— त्याच्या तोंडून हे कर्णकठोर शब्द बाहेर पडत आहेत काय ? त्याना ती रात्र काळरात्रीसारखी वाटूं लागली श्रीरामकृष्णाची प्रकृति अधिकच अत्यवस्थ होऊं लागली ! काय करावे ? डॉक्टराकडे माणसे पाठविली गिरीशचद्र त्या तेवढया रात्री डॉक्टर उपेद्र व नवगोपाल याना बरोबर घेऊन आले. बिछान्या-भोवती मंडळी गोळा झाली * * *

श्रीरामकृष्णाना जरा बरे वाटत आहे हळूहळू म्हणत आहेत, " देहाला क्लेश व्हायचेच, स्पष्ट दिसत आहे की पंचभूताचा देह ! " गिरीशकडे वळून म्हणतात, " अनेक ईश्वरीय रूपें दिसत आहेत, त्यातच हे रूपसुद्धा ( स्वत चा देह ) दिसत आहे !! "

ती काळरात्र एकदाची सरली सकाळीं सात-आठ वाजले असावे भक्त-मंडळी स्वस्थ बसली आहेत काल रात्रीचे श्रीरामकृष्णाचे क्लेश आठवून कोणाच्याच तोंडून शब्द निघत नाही 'एम्'कडे पाहून श्रीरामकृष्ण म्हणतात – " मला आता काय दिसत आहे सागू ? तोच सर्व काही झाला आहे सर्व जगत् त्यानेच व्यापलें आहे .बलि, बलि मारण्याचा ठोकळा आणि तो मारणारा हे सर्व तोच झाला आहे ! "

श्रीरामकृष्ण जीवाच्या कल्याणासाठी आपल्या शरीराचें बलिदान देत आहेत, असा याचा अर्थ की काय ?

बोलता बोलता त्याना भावावस्था प्राप्त झाली " आहा ! आहा ! " म्हणत ते समाधिमग्न झाले ! ! काही वेळाने समाधि उतरल्यावर म्हणत आहेत –" आता मला काहीएक क्लेश होत नाहीत आता अगदी पहिल्यासारखा झालो ! " ही सुखदु खातीत अवस्था पाहून भक्तमंडळी चकित झाली थोडया वेळाने श्रीरामकृष्ण म्हणतात –" हा लाटू, डोक्याला हात लावून बसला आहे, पण जणु काय ईश्वरच डोक्याला हात लावून बसला आहे असें दिसत आहे ! " काही वेळाने श्रीरामकृष्णाच्या स्नेहसागराला जणु भरती आली राखाल व नरेंद्र याना मुलासारखे कुरवाळीत त्याच्या तोंडावरून हात फिरवीत आहेत !

काही वेळाने 'एम्' कडे वळून म्हणतात –" आणखी काही दिवस देह राहता तर पुष्कळाचें कल्याण झाले असते—पण तो आता राहाणार नाही !! " मंडळी अगदी चित्रासारखी तटस्थ बसली आहे श्रीरामकृष्ण पुढे म्हणतात —" पण तो आता ( आई ) राखणार नाही ! सरळ मूर्ख पाहून कदाचित् लोक सारे ओळखतील, सरळ मूर्ख मी कदाचित् लोकाना सारे देऊन टाकीन, म्हणून आई हा देह राखणार नाही !! "

**राखाल** —(लाडिकपणाने) "महाराज, आपणच आपला देह आणखी काही दिवस राखण्याला आईला सांगा ना ? "

**श्रीरामकृष्ण** —" आईची इच्छा असेल तसे होईल ! "

**नरेंद्र** –"आपली इच्छा आणि आईची इच्छा एक होऊन गेली आहे ! "

* * * *

थोडा वेळ थांबून श्रीरामकृष्ण म्हणतात –" देह धारण केला की त्याबरोबर क्लेश आलेच. म्हणून एखाद्या वेळीं वाटतें की आता पुन्हा यावे लागू

नये तरी पण आणखीहि एक गोष्ट आहे बाहेरच्या आमंत्रणाची चटक लाग-ल्यावर घरची भाजीभाकरी चांगली लागत नाही !! ”

* * *

ता. २२-४-१८८६

आज डॉक्टर सरकार व राजेंद्र दत्त दोघेहि श्रीरामकृष्णाकडे आले होते प्रकृति वगैरे पाहाणे झाल्यावर, श्रीरामकृष्णासाठी होणारा सारा खर्च त्यांची भक्तमंडळी चालवीत आहेत, अशी गोष्ट निघाली

**श्रीरामकृष्ण** —“ काय करावे ? फार खर्च चालला आहे ”

**डॉ. सरकार** —“ पण त्याबद्दल आपण कष्टी होऊ नये ही सर्व मंडळी खर्च चालवायला तयार आहेत (थोडे हासून) आता सांगा बरे, कांचन हवे की नको ते ! ”

**श्रीरामकृष्ण** —( हासत नरेंद्राला ) “ तूं सांग ना त्यांना ! ”

नरेंद्राने काहीच उत्तर दिले नाही

**डॉ सरकार** —“ म्हणून म्हणतो—कांचनाचा त्याग करून चालत नाही. ”

**डॉ. राजेंद्र** —“ मी असे ऐकले की याची पत्नी याच्या पथ्यपाण्याची व्यवस्था ठेवीत आहे ? ”

**डॉ. सरकार** —“ आणि म्हणून, पाहा बरे—कामिनीहि पाहिजे ! ”

**श्रीरामकृष्ण** —( स्मित करून ) मोठी पंचाईत आहे, बुवा ! ”

**डॉ. सरकार** —“ वा ! पंचाईत नसेल तर मग काय ? सगळेच परमहंस ! ”

**श्रीराकृष्ण** —“ काय सांगू ! स्त्रियांचा नुसता स्पर्शहि खपत नाही झाल्यास विंचवाने नांगी मारल्यासारख्या वेदना होतात ”

**डॉ सरकार** —“ तुम्ही सागता त्याच्यावर माझा विश्वास आहे पण हे सागा,—कामिनीवाचून चालावे कसे ? ”

**श्रीरामकृष्ण** —“ पैशाचा नुसता स्पर्श झाला तरी हात वाकडा तिकडा होऊन जातो ! श्वासोछ्वास बंद होतो ! * * * पैशाचा उपयोग कोणी ईश्वरसेवकेड केला, तर त्यात दोष नाही आणि स्त्री हे जगदंबेचेच एक स्वरूप आहे, असे जाणून घेऊन ससार करू लागल्यास मग त्यात गुरफटून जाण्याची भीति नाही स्त्री म्हणजे काय वस्तु आहे, हे ईश्वरदर्शन झाल्यावाचून समजत नाही ”

* * *

असो काशीपुरात श्रीरामकृष्ण एकदर आठ महिने होते उत्तरोत्तर त्याचा रोग बळावत चालला डॉक्टर झाले, वैद्य झाले, हकीम झाले, मत्रतत्र तोडगे, सर्व काही झाले—परतु कशानेहि काही गुण येईना त्याना आराम पडावा म्हणून त्याच्या भक्तमडळीपकी पुष्कळानी काही व्रते नेम करण्यास सुरुवात केली परंतु कशाचाहि उपयोग झाला नाही काही दिवस क्षतातून पू वाहिल्यावर तो बद होऊन रक्त वाहण्यास सुरुवात झाली ! एखादे दिवशी इतके रक्त जावे, की ते आता बदच होत नाही की काय असे वाटावे !! रक्त वाहात असता त्याना प्राणातिक वेदना होत एक दिवस असाच रक्तस्राव होत असता रामचद्र दत्ताच्या गळ्यास मिठी मारून ते म्हणाले-“ इतका रक्तस्राव होत आहे, तरी सुद्धा अजून प्राण जात नाही !! ” त्याच्या त्या दारुण वेदनाकडे बघवतहि नसे. परंतु तेवढी वेळ गेली, की आपले सर्व क्लेश विसरून लगेच ते ईश्वरविषयक गोष्टी बोलू लागत !!

श्रीरामकृष्णाच्या सेवेसाठी या सुमारास राखाल, योगेन, शशी, नरेंद्र, बाबूराम, लाटू, शरद, गोपाळ वगैरे बालभक्त सदैव असत ससारी भक्तापैकी ‘एम्’, राम, गिरीश वगैरे मडळी येऊन जाऊन सदैव असत माताजीहि होत्याच, परतु या सर्व मडळीत शशीने गुरुसेवेची पराकाष्ठा केली सर्व गोष्टीकडे त्याची

दृष्टि असे श्रीरामकृष्णाना कोणत्या वेळेला काय पाहिजे, त्याना केव्हा काय द्यावयाचें, वगैरे सर्व गोष्टीकडे त्याचे सारखे लक्ष असे, रात्रंदिवस श्रीरामकृष्णाच्या जवळ तो बसून असे त्याला भूक नाही, तहान नाही, दिवस नाही, रात्र नाही, झोप नाही, आपली सेवा की आपण ! तिसरी गोष्ट त्याला माहीत नव्हती त्याच्या इतर गुरुबधूंपैकी कोणी कोणी ध्यान, धारणा, जप, तप, व्रते वगैरे करीत असत परंतु शशीला ते काही नाही ! त्याचे जपतप साधना सर्व काही गुरुसेवा ! श्रीज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात " आचार्योपासनम् " या पदाचे व्याख्यान करताना श्रीज्ञानेश्वराच्या गुरुभक्तीला भरती येऊन, त्या भरात त्यानी, गुरुसेवेचे जे बहारीचे वर्णन केले आहे, आणि गुरुसेवेची जी पराकाष्ठा दाखविली आहे,—तशी त्या अखेरच्या दिवसात शशीने प्रत्यक्ष दाखविली !! धन्य शशी !! त्याच्या गुरुभक्तीला तुलना नाही जे जे त्याची ती विलक्षण गुरुसेवा पाहात, ते चकित होऊन जात ! असो

दिवसेदिवस श्रीरामकृष्णाची प्रकृति अधिकाधिक खंगत चालली त्याना आपला देह आता फार दिवस राहात नाही हे कळून चुकलेंच होतें व त्याप्रमाणे त्यानी अखेरची निरवानिरव करण्यास सुरवात केली अलीकडे त्यानी दोन-तीन वेळ बोलून दाखविले होते की " जहाजात दोन भाग पाणी भरले आहे आणखी एक भाग लवकरच भरून जहाज समुद्रात बुडून जाईल ! " रोज, केव्हा तरी, सर्व मंडळीना बाहेर जाण्यास सागून ते नरेंद्राला जवळ बोलावीत आणि त्याला नानाप्रकारचा उपदेश करीत त्याला निर्विकल्पसमाधिसुखाचा लाभ नुकताच झाला होता आणि त्याला आपल्या आयुष्याचे ध्येय आणि आयुष्यातील काम काय आहे, हे कळून आले होते त्यावेळी त्याला श्रीरामकृष्णानी सागितले होते की, " तुला आता आईने सर्व काही दाखविले आहे आणि तो सर्व अनुभव तुझ्या हृदयात बद करून त्याची किल्ली तिने माझ्या हातात दिली आहे ! आता यापुढे तुला माझे काम करावयाचे आहे ते काम पुरे झाल्याशिवाय तुला येथून जाता येत नाही " ते

आता नरेंद्राला आपले काम समजावून देत होते ! नरेंद्राशी त्यांचे एवढे काय खलबत चालत आहे, याची एकदोघांशिवाय इतरांना काहीच कल्पना नसल्या-मुळे, श्रीरामकृष्ण महाप्रयाणाची तयारी करीत आहेत, असे समजण्याला त्यांना काहीच मार्ग नव्हता

एक दिवस त्यांची प्रकृति अत्यंत अस्वस्थ झाली असता, अंतकाळ जवळ आला, असे वाटून मंडळी शोकाकुल झाली एकजण म्हणाला सुद्धा —“ महाराज, आता आम्ही कोणाच्या तोंडाकडे पाहावे ? ” हे ऐकून श्रीराम-कृष्णांना दु ख झाले व ते अत्यंत क्षीण आवाजाने म्हणाले, ‘ नरेंद्र तुम्हाला शिकवील ! ’ हे ऐकून नरेंद्राला ही जबाबदारी आपल्या शक्तीबाहेरची आहे, असे वाटून तो म्हणाला, “ महाराज, हे माझ्याने होणार नाही ! ” त्याबरो-बर त्याचेकडे क्षणमात्र पाहून श्रीरामकृष्ण म्हणाले, “ तू काय नाही म्हणतोस ? तुझी हाडेसुद्धा करतील ! ”

आणखी एक दिवस सर्व मंडळींना बाहेर जाण्यास सांगून श्रीरामकृष्णांनी नरेंद्राला आपल्या खोलीत हाक मारून त्याला ध्यानस्थ बसण्यास सांगितले नरेंद्र ध्यानस्थ बसला आणि लवकरच त्याचे बाह्य जगताचे ज्ञान नाहीसे झाले काही वेळाने ध्यान विसर्जन करून पाहातो तो श्रीरामकृष्णहि जवळ बसले असून, त्यांच्या नेत्रातून अश्रु वाहात आहेत ! ! श्रीरामकृष्ण त्याचेकडे पाहून म्हणाले, —“ नरेन्, मजजवळ होते नव्हते तेवढे सर्व तुला देऊन, आता मात्र मी खरा खरा फकीर बनलो ! धर्मप्रचाराच्या कामी तुला या शक्तीचा उपयोग होईल !! ” श्रीरामकृष्णांनी आपल्या सर्व सिद्धीचे दान केल्याचे पाहून नरेंद्राचे डोळे पाण्याने भरून आले

अशा रीतीने जुलै ( १८८६ ) महिना संपला उत्तरोत्तर क्षीण होत चाललेल्या त्यांच्या प्रकृतीकडे पाहून सर्वांना कळून चुकले, की आता अंतकाळ समीप आला आहे भक्तमंडळींनी वरचेवर म्हणावे, “ महाराज, आप-

णच मनावर घेतल्याशिवाय रोग बरा होणार नाही ” यावर त्यांनी हासत म्हणावें, “ देह म्हणजे एक कागदाची पिशवी आणि तिला एक भोक पडलेले दिसत आहे झाले ! असल्या गोष्टीची का कुठे काळजी करायची असते ? ” आणि हे सारें बोलणे हसण्यावारी न्यावें !

ऑगस्ट महिन्याच्या तेरा किंवा चवदा तारखेस श्रीरामकृष्णाचें दुखणे फारच वाढलें बिछान्याभोवती मंडळी पुतळ्यासारखी स्तब्ध बसून होती त्याचे क्लेश कोणाच्यांनेहि पाहावेनात ! नरेंद्र त्याच्या अगदी जवळ बसलेला होता एक क्षणभर—एकच क्षणभर—त्याच्या मनात विचार आला की– “ राम आणि कृष्ण झालेलाच आता रामकृष्ण होऊन आला आहे, ” असे हे वरचेवर म्हणत असतात, पण याचे हे क्लेश पाहून मनात सशय आल्यावाचून राहात नाही या वेळी जर हे पुन्हा तसेंच म्हणून दाखवतील, तर खरें मानीन ! ” हा विचार येण्याचा मात्र अवकाश,—एकदम त्याच्याकडे वळून टक लावून पाहात, श्रीरामकृष्ण गंभीर स्वराने म्हणाले—“ अजूनहि शंका, अ ? पक्कं लक्षात ठेव की जो राम आणि जो कृष्ण, [ झाला होता ] तोच आता रामकृष्ण ! [ होऊन आला आहे ] तुझ्या वेदाताच्या दृष्टीने नाही तर प्रत्यक्ष ! ! ” हे शब्द कानीं पडताच सर्व मंडळी—व विशेषत. नरेंद्र अगदी चकित होऊन गेला !

ऑगस्ट महिन्याची सोळावी तारीख आली त्या दिवशीं रविवार होता. ( श्रावणी पौर्णिमा ) सकाळींच त्यानी एकजणाला पंचांग पाहून एखादा चागला दिवस पाहाण्यास सागितलें त्याच दिवशीचें फलाफल सागून तो भक्त पुढील दिवसाचें, म्हणजे भाद्रपद कृष्ण प्रतिपदेचें ( बंगाल्यात मासगणना पौर्णिमान्त असते ) फलाफल सागण्यास सुरुवात करणार, तोच त्याला थाबण्यास सागून ते दुसऱ्याच काही गोष्टी बोलू लागले त्या दिवशीं त्याचे सर्व व्यवहार काही निराळ्याच तऱ्हेचे दिसू लागले दुपारी डॉ नवीनपाल त्याना पाहाण्यासाठी आले श्रीरामकृष्ण त्याना म्हणाले, “ आज अत्यंत क्लेश

होत आहेत. पाठीच्या कण्याजवळचा भाग जसा काही जळत आहे ! " असें म्हणून त्यानी आपला हात पुढे केला नाडी पाहून डॉक्टर श्रीरामकृष्णाकडे टक लावून पाहूं लागले श्रीरामकृष्णानी विचारलें, " काही उपाय ? " डॉक्टराना आता काय बोलावें तें समजेना श्रीरामकृष्ण आपग होऊन म्हणाले, " आता काही उपाय नाही, दुखगे असाध्य झालें आहे, असेचना ? " हे ऐकून खाली मान घालून डॉक्टर " असे वाटतें खरें " असे पुटपुटले त्याबरोबर देवेंद्रकडे वळून श्रीरामकृष्ग म्हगतात, " ही मंडळी इतक्या दिवसानी मला हें सागत आहेत काय ? ' दुखगें बरें होईल, ' असे सागून मला इथे आणलेत आणि आता दुखगे बरे होत नसेल, तर व्यर्थ क्लेश तरी का करून घ्या ? " डॉक्टर निघून गेले त्यावेळेपासून त्यानी मग आपल्या दुखण्याचें अथवा क्लेशाचें अथवा औषधाचें नावहि काढल नाही काही वेळाने ते म्हणूं लागले, " देख, आमार हाडी हाडी डाल भात खाइते इच्छा हइतेछे ! " हे ऐकून देवेंद्र त्याची एखाद्या लहान मुलासारखी समजूत घालूं लागला पण ते काही गप्प बसेनात

डॉक्टर निघून गेल्यापासून त्याची मुद्रा अजिबात बदलून गेली त्याना आपल्या दुखण्याचा पूर्ण विसर पडला असून ते आनंदी दिसत होते. थोडया वेळाने एक गृहस्थ त्याना योगासंबंधी काही प्रश्न विचारण्यास आला, त्याचे-बरोबर ते जवळ जवळ दोन तास बोलत बसले त्याच्या मुद्रेवर दुखण्याचे काहीएक चिन्ह दिसत नव्हतें. काही वेळाने डॉक्टर आले व त्याना एक औषध देऊन म्हणाले, " या औषधाने आपल्याला खात्रीने गुण येईल " तें घेऊन श्रीरामकृष्ग किंचित् रागावल्यासारखे करून म्हणाले—" आई, आणखी किती दिवस तूं मला उष्टे खायला लावगार आहेस ? "

त्या रात्री त्याना नेहमीपेक्षा जास्त अन्न गेलें व ते मोठया आनंदाने म्हणूं लागले, " मला काही एक झालेलें नाही फक्त ( गळ्याकडे बोट करून ) हें येथे एक कायसें झाल्यासारखे दिसतें " रात्री ते उशीला टेकून आपल्या आथ-

रुगावर बसून बराच वेळ मंडळीशी बोलत बसले होते त्याचे अंग मात्र नेहमी-पेक्षा बरेच ऊन लागत होते काही वेळाने ते म्हणाले, " तुम्ही सर्वजण मला वारा घाला " मंडळी वारा घालू लागली नरेंद्र त्याचे पाय आपल्या मांडीवर घेऊन ते हळूहळू चेपीत होता श्रीरामकृष्ण त्याला म्हणाले, " या मुलाची नीट काळजी घे बर ! " हे शब्द त्यानी त्या रात्री तीनचारदा तरी उच्चारले असतील ! काही वेळाने ते म्हणाले, " मला जरा झोप येत आहे, निजतो " असे म्हणून ते आथरुणावर निजले दोन अडीच तास त्याना चागली झोप लागली एक वाजण्याच्या सुमारास ते एकदम कुशीवर वळले व ॐ, ॐ, असा घोगऱ्या आवाजाचा उच्चार मडळीच्या कानावर आला त्या वेळी त्याचे सर्वांग रोमाचित झाले असून, वदनमंडळ अत्यत शात व तेजोमय झालेले दिसले नरेंद्राने त्याचे पाय घाईघाईने पण हळूच एका उशीवर ठेवले व आपण जिन्याकडे धाव मारली ! त्याला तो देखावा बघवेना एकजण डॉक्टर जवळच होते, ते नाडी पाहू लागले, पण त्याना नाडीचा पत्ताच लागेना ! त्याबरोबर ते मोठमोठ्याने रडू लागले ! शशीचा अजून समज होता की ही नेहमीसारखीच समाधि आहे, म्हणून तो एकदम ओरडून म्हणाला, " केवढ्याने ओरडतोस रे गद्धया ? " थोड्याच वेळात नरेंद्रहि वर आला सर्वांचा अजून समज होता की, ही समाधि आहे म्हणून ती उतरावी यासाठी सर्वांनी ' हरि ॐ ' असा मोठ्याने जप चालविला पहाटे पाचच्या सुमारास श्रीरामकृष्णाचे अंग थंड पडू लागले तरी पण कण्याचा भाग उष्ण लागत होता, म्हणून ही महासमाधि आहे असे कोणालाच वाटेना अगोदरच मडळी आणखी इतर डॉक्टराच्याकडे गेलीच होती डॉ० सरकार आले व सर्व लक्षणें पाहून त्यानी ही महासमाधिच आहे असें सांगितले ! !

तरीसुद्धा कोणाकोणालाच अजून सशय होताच डॉ० सरकार निघून गेल्यावर तेथे त्या वेळी काही संन्यासी आले व त्यानी ही सर्व लक्षणे पाहून ही महासमाधिच असल्याचे सांगितले ! !

झालें ! आता संशयाला काही जागाच उरली नाही जिकडे तिकडे एकच हाहा कार उडाला ! भक्तमंडळीना दाही दिशा शून्य वाटूं लागल्या ! त्याना या अफाट जगात एकटेच सोडून देऊन त्याच्या इहपरलोकीचा आधार, त्याचें सर्वस्व, त्याचा देवाधिदेव त्याना सोडून गेला ! ! पहाटेपासूनच ही दारुण वार्ता सर्व शहरभर पसरली होती सकाळीच खालच्या मजल्यांतील दिवाणखान्यात एक सुदर मंचक तयार करून, पुष्पमालादिकानी तो शृंगारून त्यावर श्रीरामकृष्णाचा देह आणून ठेवला होता साऱ्या शहरावर शोकाची छाया पडल्यासारखी दिसूं लागली ! त्या महापुरुषाचे अखेरचे दर्शन घेण्यास चोहोकडून लोकाच्या झुडीच्या झुडी काशीपुरच्या त्या बगल्याकडे लोटूं लागल्या !

दुपारच्या वेळी, श्रीरामकृष्णाच्या देहाचा व त्याच्या सर्व शिष्यमंडळीचा फोटो घेण्यात आला संध्याकाळपर्यंत माणसाची एकसारखी गर्दी सुरूं होती सध्याकाळी सहाचे सुमारास श्रीरामकृष्णाच्या पार्थिव देहाला अखेरचा अग्नि-सस्कार देण्यासाठी अखेरची यात्रा निघाली बरोबर भजनी दिडया होत्या चारी दिशानी हरिनामाचा गजर आणि श्रीरामकृष्णाचा जयजयकार चालला होता

लवकरच मंडळी काशीपुरच्या घाटावर जाऊन पोहोचली तेथे काही वेळ भजन वगैरे झाल्यावर, चंदन व तुलसीकाष्ठाच्या चितेवर श्रीरामकृष्णाचा देह ठेवण्यात आला आणि थोडयाच वेळात अग्नीने आपले काम केलें ! ! मग त्याच्या अस्थि एका ताब्याच्या भाडयात घेऊन, शिष्यमंडळी शून्य मनाने काशी-पुरच्या बंगल्याकडे परत फिरली

---

# सूची

## अ



## आ



## इ



## ई



## उ



## ए



## क

## ख



## ग



## च



## ज



## तं



## द

## न



## प



## ब

भ



म



य



र

## व

**श**



**स**



**ह**



---

### श्रीरामकृष्णांच्या चरित्रांतील

# मुख्य मुख्य सनांचें टांचण

## द्वितीय भाग

| सन | घटना |
|---|---|
| १८६४-६५ | श्रीमत् तोतापुरीचे दक्षिणेश्वरी आगमन श्रीरामकृष्णाचे सन्यासग्रहण व वेदान्तसाधना |
| १८६५-६६ | अक्षयची पूजकपदावर नेमणूक श्रीमत् तोतापुरीचे प्रयाण |
| १८६६-६७ | इस्लामधर्मसाधना व जन्मभूमिदर्शन |
| १८६८-६९ | पुनरागमन व तीर्थयात्रा |
| १८६९-७० | हृदयच्या पत्नीचा मृत्यु व द्वितीय विवाह, अक्षयचा मृत्यु |
| १८७१ | मथुरबाबूचा मृत्यु |
| १८७२-७३ | श्रीमाताजीचें दक्षिणेश्वरी आगमन व षोडशी पूजा |
| १८७४ | रामेश्वराचा मृत्यु |
| १८७५ | ख्रिस्तीधर्मसाधना व श्रीकेशवचंद्र सेन याची प्रथम भेट |
| १८७६ | श्रीचंद्रादेवीचा मृत्यु |
| १८७९ | भक्तमंडळीच्या आगमनास सुरवात |
| १८८० | श्रीनरेंद्रनाथाचे आगमन |
| १८७९-८५ | भक्तमंडळीचे आगमन व लीला |
| १८८५ | दुखण्याचा आरंभ |
| ,, | (सप्टेंबर) दक्षिणेश्वराहून प्रयाण व श्यामपुकुरात वास्तव्य |
| ,, | (डिसेंबर) काशीपुरात आगमन |
| १८८६ | (ऑगस्ट १६,) महासमाधि |
| १८९३ | शिकागोची सर्वधर्मपरिषद व विवेकानंदाकडून हिंदुधर्माचे श्रेष्ठत्वस्थापन |
| १८९७ | श्रीरामकृष्णमठ स्थापना |
| १९०२ | स्वामी विवेकानंदाची महासमाधि |
| १९२० | (जुलै २०,) श्रीमाताजीची महासमाधि. |
| १९२२ | (एप्रिल, १०) स्वामी ब्रह्मानंदाची महासमाधि. |

# आमचे अन्य प्रकाशन

## मराठी विभाग

| | | |
|---|---|---|
| १७. परिव्राजक | ( तृतीय संस्करण ) | १।) |
| १८. प्राच्य और पाश्चात्य | ( तृतीय सस्करण ) | १।) |
| १९. महापुरुषों की जीवनगाथायें | (प्रथम सस्करण) | १।) |
| २०. राजयोग | ,, | १=) |
| २१. स्वाधीन भारत ! जय हो ! | ( प्रथम संस्करण) | १=) |
| २२. धर्म रहस्य | ( प्रथम संस्करण) | १) |
| २३ भारतीय नारी | ( प्रथम संस्करण ) | ।।।) |
| २४ शिक्षा | (प्रथम सस्करण) | ।।=) |
| २५. शिकागो वक्तृता | ( पञ्चम सस्करण ) | ।।=) |
| २६. हिन्दू धर्म के पक्ष में | ( प्रथम संस्करण ) | ।।=) |
| २७. मेरे गुरुदेव | ( चतुर्थ सस्करण ) | ।।=) |
| २८. वर्तमान भारत | ( तृतीय सस्करण ) | ।।) |
| २९. पवहारी बाबा | ( प्रथम सस्करग ) | ।।) |
| ३०. मेरा जीवन तथा ध्येय | ( प्रथम सस्करण ) | ।।) |
| ३१. मरणोत्तर जीवन | ( प्रथम सस्करण ) | ।।) |
| ३२. मन की शक्तियाँ तथा जीवनगठन की साधनायें | | ।।) |
| ३३. भगवान रामकृष्ण धर्म तथा संघ—स्वामी विवेकानन्द, स्वामी शारदानन्द, स्वामी ब्रह्मानन्द, स्वामी शिवानन्द, मूल्य | | ।।=) |
| ३४. मेरी समर-नीति | ( प्रथम सस्करण ) | ।≡) |
| ३५. ईशदूत ईसा | ( प्रथम संस्करण ) | ।=) |
| ३६. परमार्थ-प्रसंग—स्वामी विरजानन्द, ( आर्ट पेपर पर छपी हुई ) | | |
| | कपड़े की जिल्द, मूल्य | ३।।।) |
| | कार्डबोर्ड की जिल्द ,, | ३।) |
| ३७. विवेकानन्दजी की कथायें | ( प्रथम संस्करण) | १।) |
| ३८. श्रीरामकृष्ण-उपदेश—स्वामी ब्रह्मानन्द द्वारा सङ्कलित, | ( प्रथम सस्करण ) | ।।=) |

**श्रीरामकृष्ण आश्रम, धन्तोली, नागपूर-१, मध्यप्रदेश.**

---